# पुरस्कार

डॉ. श्री. म. पिंगे यांनी पीएच्. डी. च्या पदवीकरितां म्हणून लिहिलेल्या ' युरोपियनांचा मराठीचा अभ्यास व सेवा ' या प्रबंधाची मधलीं कांहीं प्रकरणें ' मराठी संशोधनपत्रिके'मध्यें नमुन्यादाखल यापूर्वींच प्रसिद्ध झालीं होतीं. आतां त्यांचा सबंध प्रबंध मुद्रित होऊन ग्रंथरूपानें वाचकांपुढें येत आहे.

प्रस्तुत प्रबंधांत युरोपियनांचा हिंदुस्थानाशीं भाषिक व्यवहार कसकसा सुरू झाला, याची प्रथम त्यांनी माहिती दिली आहे. तसेंच, सतराव्या शतकापासून जेझुइट, फ्रांसिस्कन, बॅप्टिस्ट, अमेरिकन, स्कॉटिश वगैरे मिशनऱ्यांनीं व पुढ राज-कर्ते म्हणून इंग्रजी लोकांनीं आणि केवळ भाषाशास्त्राच्या प्रेमानें ब्लुल ब्लोकसारख्या युरोपियनांनीं, मराठी भाषेचा जो अभ्यास केला, किंवा त्या भाषेंत किंवा त्या भाषे-विषयीं ग्रंथ अथवा निबंध लिहिले, त्यांची शक्य तितकी तपशीलवार व साधार अशी हकीकत या प्रबंधांत वाचावयास मिळेल. केवळ प्रांतिक भाषांचाच नव्हे, तर जगांतील कोनाकोपऱ्यांतील कित्येक लहानसान बोलींचादेखील क्रिस्ती मिशनऱ्यांनीं अभ्यास करून आपल्या धर्मप्रसाराच्या मदतीकरितां म्हणून त्यांचीं व्याकरणें व कोश लिहिले. पुढें युरोपियन लोक ज्या ज्या भागांत राज्यकर्ते बनले तेथील आपल्या प्रजेचीं सुखदुःखें कळून घेण्याकरितां असो किंवा आपलें शासन जास्त दृढ करण्याकरितां म्हणून असो, लोकभाषेचा त्यांनीं अभ्यास चालविला व आपल्या देशबांधवांच्या उपयोगाकरितां त्या भाषाचीं व्याकरणें व कोश तयार केले. हिंदु-स्थानातील बहुतेक प्रत्येक भाषेचीं आरंभींचीं व्याकरणें व कोश यांची निर्मिती विदेशी लोकांकडूनच झालेली दिसून येते. अशा प्रकारें भारतीय भाषांना प्रथम नियमबद्धता, एकरूपता व शास्त्रीय स्वरूप आणून देण्याच्या प्रयत्नाचें श्रेय या विदेशी लोकांना आहे, ही गोष्ट नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं.

मराठी प्रांतिक भाषेचीं किंवा तिच्या कांहीं बोलींचीं व्याकरणें, स्टिफन्स, कॅरे, स्टिव्हन्सन, बॅलंटाइन, बर्जेस, मॅफे वगैरे युरोपियनांनीं लिहिलीं; किंवा दियोगु रिबैर केनेडी, मोल्स्वर्थ, कँडी, मॅफे वगैरे परकयांनीं तिचे कोश तयार केले. क्रिस्ती धर्मप्रचारात्मक त्यांचें ( बायबलचीं भाषांतरें वगैरे ) कांहीं मराठी गद्य लिखाणही प्रसिद्ध आहे; परंतु थेट ज्ञानेश्वर, एकनाथ यांच्यासारख्या जुन्या महाराष्ट्रकवींच्या धर्तीवर त्यांनीं ओवीबद्ध प्रासादिक मराठी ग्रंथरचना केलेली ज्यावेळीं आपण पाहातों, त्यावेळीं आश्चर्य वाटल्याखेरीज राहात नाहीं. स्टिफन्सचें मराठी क्रिस्तपुराण वाचल्यावर हा ग्रंथ एका विदेशी माणसानें रचिला असेल या गोष्टीवर पुष्कळांचा विश्वासच बसत नाहीं कोणातरी बाटग्या ब्राह्मणानें तो रचिला आणि स्टिफन्सच्या नांवावर घातला, असें म्हणणारे कांहीं लोक मला आढळले.

एकादें नांवच सांगावयाचें झालें, तर सुप्रसिद्ध पाली पंडित प्रो. धर्मानंद कोसंबी यांनीं माझ्या मेजावर पडलेल्या ख्रिस्तपुराणांतील कांहीं भाग वाचून अशा प्रकारची शंका माझ्याकडे एकदां व्यक्त केली होती. कवीच्या कौशल्याचें व यशाचें खरें मर्म यांतच आहे असें मी समजतों.

स्टिफन्स १५४९ सालीं जन्मला व १५७९ सालीं हिंदुस्थानांत आला. लवकरच त्यानें स्थानिक भाषेचा अभ्यास सुरू केलेला दिसतो. ता. २४ आक्टोबर १५८३ सालीं त्यानें आपला बंधु रिचर्ड याला गोव्याहून लिहिलेलें जें पत्र उपलब्ध आहे, त्यांतील भाषाविषयक निर्देशावरून ही गोष्ट कळून येते. स्टिफन्सनें १६१४ सालीं या ग्रंथाची समाप्ति केली; म्हणजे ज्या सालीं तो हिंदुस्थानामध्यें आला त्या सालीं तो गोव्यांत जन्मला असें मानलें. तर आपल्या वयाच्या पस्तिसाव्या वर्षी असा ग्रंथ त्याला रचितां येणार नाहीं काय? गोमंतकांतील साष्ट हा प्रांत ब्राह्मणांनीं त्या काळीं गजबजलेला होता आणि स्टिफन्स या बाटलेल्या लोकांशीं मिळूनमिसळून एकजीव होऊन राहिला होता. राज्यकर्ते म्हणून एतद्देशियांशीं फटकून वागण्याची अरेरावी व उन्मत्त वृत्ति आरंभींच्या मिशनऱ्यांमध्यें नव्हती. जुन्या काळीं गोमंतकांत मराठी ग्रंथरचना पुष्कळ होत होती, असेंही मानण्यास जागा आहे. एकनाथानें भागवताच्या दशम स्कंधावरील मराठी टीका शके चौदाशें पंचाण्णव (म्हणजे इ स १५७३) मध्यें लिहिली; पण त्याच्या आधीं गोमंतकांत शके चवदाशें अठेचाळिस (इ. स. १५२६) मध्यें कृष्णदास सामा किंवा शामराज नांवाच्या गोमंतकस्थ कवीनें लिहिलेली भागवताच्या दशमस्कंधावरील मराठी टीका पोर्तुगालमध्यें अलीकडेच उपलब्ध झाली आहे. हा ग्रंथ रोमन लिपींत आहे. याच्या भाषेचा नमुना पहा:—

श्री केशवाये नम ॥ जेणें गोकुळ पाळिलें। गोवर्धनाथें धरिलें। गोपिकांथें रमविलें। गुणेंकरूनि ॥ १ ॥ विश्वार्थें रचिता। विश्व आपणचि पाळिता। विश्व संहारूनि मागुता। उरे विश्वरूप ॥ २ ॥ देवकियें उदरीं वाढिला। दसमतियें पाळिला। दुर्योधनाचा वैरी जाहाला। द्रुपदिये कारणें ॥ ३ ॥ ऐसा तो अवेरीं। विस्तारला चराचरीं। त्या गुरुच्या चरणावरी। नमस्कारु माझा ॥ ४ ॥ गुरून देवो दाविला। म्हणउनि गुरुचि देवो मानिला। जैसा देवो तैसा भाविला ॥ येकरूपें ॥ ५ ॥ (अध्याय २)

या ग्रंथाचा शेवट पाहा —

राजा शालिवाहनु राज्य करी। चौदाशें अठेचाळिसावरी। वरसें आदालीं ॥ २४६ ॥ जो ऋतु पालटतां वे धर्मीं। वैशाख मधु-मुधर मासीं। शुद्धपक्षीं त्रियोदशी। आरंभु केला ॥ २४७ ॥ केळसीं ग्राम ब्रह्मपुरी। जेथें

शांतादुर्गा परमेस्परी । कौशिक गोत्र ऋषिमाझारी । वरिष्ट जे ॥ २४८ ॥ ते गोत्रकुळीं उत्पन्न । श्रीरामराजानंदनु । विष्णुभक्ति परियेणु । नांवें सामराजु ॥ २४९ ॥ जाला कृष्णाचा दासु । तारावया संसारु गर्भवासु । भक्ति करून ऋषिकेशी । आरंभिला ॥ २५० ॥ पंचेचाळीस अध्यायांची टीका । ग्यां साख्येंपें करूनि देखा । सांगितली आइका श्रुतेजन ॥ २५१ ॥

जुन्या काळीं तयार झालेलें हें सारें हिंदूंचें मराठी वाङ्मय धर्मांध पोर्तुगीजांनीं जाळून टाकलें. अशा ब्राह्मण लोकांच्या सहवासांत स्टिफन्सला नवाक्रिश्चनांकरितां क्रिस्तपुराण लिहिण्याची स्फूर्ति व्हावी, यांत नवल नाहीं. स्टिफन्स १६१९ सालीं वारला आणि लगेच ता. १ फेब्रुवारी १६२० रोजीं लिहिलेल्या एका पत्रांत "even the Gentoos (हिंदु) pride on speaking of it," असा त्याच्या या ग्रंथासंबंधीं निर्देश आढळतो. स्टिफन्सच्या नंतर झालेला फ्रेंच पुराणकार कुवा याच्यासंबंधीं लिहितांना, Alex Rhodes या प्रत्यक्ष त्याला भेटलेल्या समकालिन प्रवाशानें तिकडील रहिवाशांपेक्षांही त्याला कानारी (बोली) व मराठी चांगल्या बोलतां येतात, असें आपल्या प्रवासवर्णनांत लिहून ठेविलें आहे.

ज्ञानेश्वराचा जन्म श० ११९७ सालीं झाला असें मानतात. (जनीच्या एका अभंगांत "श्राणवाव्या सालीं ज्ञानेश्वर प्रगटले," असा निर्देश आहे). ज्ञानेश्वरी हा ग्रंथ श० १२१२ सालीं समाप्त झाला हें तर प्रसिद्धच आहे. म्हणजे आपल्या वयाच्या पंधराव्या (किंवा जनीच्या म्हणण्याप्रमाणें एकोणिसाव्या) वर्षी ज्ञानेश्वरांनीं आपला ग्रंथ पुरा केला, असें म्हणणाऱ्यांना वर नमूद केल्याप्रमाणें हिंदुस्थानांत आल्यानंतर पसतीस वर्षांनीं स्टिफन्सनें पुऱ्या केलेल्या क्रिस्तपुराणाबद्दल अशी शंका कां वाटावी कळत नाहीं. शिवाय या मिशनऱ्यांनीं केवळ मराठीमध्येंच अशी काव्यरचना केली आहे, असेंही नाहीं. बेस्की (Constantius Beschi) या जेसुइट पाद्रीनें (१६८०-१७११) तामीळ भाषेंत "थेंबावनी" या नांवाचें जोसेफवर (मेरीचा नवरा) जें काव्य लिहिलें आहे, तें तामीळ भाषेंतील एक उत्कृष्ट प्रासादिक काव्य मानलें जातें. इतकेंच नव्हे तर त्या भाषेंतील प्रसिद्ध रामायणाला यानें मागें टाकलें, असें म्हणणारेही लोक आहेत. परभाषेमध्यें काव्यरचना जमणें अशक्य असतें, असेंही नाहीं. इंग्रजीमध्यें पुष्कळ हिंदी लोकांनीं चांगली काव्यरचना केलेली दाखवितां येईल

सतराव्या शतकांतील कॅथोलिक मिशनऱ्यांसारखी विस्तृत मराठी काव्यरचना एकोणिसाव्या शतकांतील पुढील प्रॉटेस्टंट मिशनऱ्यांच्या हातून झालेली दिसत नाहीं. याचें कारण हिंदु लोकांमध्येंदेखील या काळांत जुन्या कवींप्रमाणें ओवीबद्ध रचना करण्याची पद्धति मागें पडून सर्वत्र गद्यलेखन प्रचारांत आलें होतें. प्रॉटेस्टंट मिशनरींनीं नव्या धर्तीवर कांहीं मराठी काव्यरचना केलेली आहे. रे. मरे मिचेल

यानें मात्र तुकारामाच्या अभंगांच्या धर्तीवर "येशुखिस्तमाहात्म्य" नांवाचा सहा अध्यायांचा ग्रंथ लिहून 'ज्ञानोदयांत' प्रसिद्ध केलेला आढळतो.

स्टिफन्सप्रमाणें क्रुवा व सालदान्ज यांनीं आपले ग्रंथ मराठी ओवींतच लिहिले. कारण त्याकाळीं गद्यलेखनाचा विशेष प्रचार नव्हता. स्टिफन्स व क्रुवा यांच्या ग्रंथांच्या प्रस्तावना ठेवल्या मराठी गद्यांत सांपडतात.

एकोणिसाव्या शतकांत मराठी गद्याच्या बाबतींत मात्र युरोपियन लोकांनीं फार मोठी कामगिरी केलेली आहे. मोल्स्वर्थ यानें मराठी-इंग्रजी कोशाची रचना करून मराठी भाषेचा पायाच घातला असें म्हणावयास हरकत नाहीं. अशासारखा कोश कोणत्याही इतर देशी भाषेंत त्याकाळीं झाला नाहीं. अद्यापि या कोशाचें महत्त्व कमी झालेलें नाहीं. कँडीचा इंग्रजी-मराठी कोशही उपयुक्त आहेच; परंतु कँडीनें मराठी भाषेला नियमबद्धता व एकरूपता आणून दिली ही त्याची मोठीच कामगिरी होय. जांभेकर, दादोबा पांडुरंग यांच्यासारख्यांच्याही मराठी लिखाणां-तील चुका दाखवून त्यांना कँडीनें एकेकाळीं सळो कीं पळो करून सोडलें होतें. स्वतः त्यांचे पंडित परशुरामतात्या गोडबोले यांच्या 'मृच्छकटिक' व 'कादंबरीसार' या ग्रंथांतील मराठीचे दोष त्यानें काढले आहेत. 'बालबोध' मासिकाचे संपादक सुप्रसिद्ध मराठी लेखक विनायक कोंडदेव ओक हे 'विविध-ज्ञानविस्तारात' (पु. ३६, अं. १-१९०५, पृ. ४३) लिहितात, "मी प्रांजलपणें आणि मोठ्या कृतज्ञभावानें कबूल करितों कीं, मला मराठी लिहिण्यास मेजर क्यांडीसाहेबांनीं शिकविलें, वास्तविक पाहिलें असतां, त्यांचें प्रत्यक्ष दर्शन मला कधींच झालें नाहीं. परंतु त्यांचे जे अभिप्राय लेख पाहण्यास शाळाखात्याच्या अधिकाऱ्यांनीं मजकडे पाठविले, त्यांवरून पुष्कळ चांगल्या चांगल्या सूचना मला मिळाल्या, आणि माझ्या चुका कळल्या." सरकारी आश्रय मिळविण्याकरितां कँडीची खुशामत म्हणून ओकांनीं हा मजकूर लिहिला नसून कँडीच्या निधनानंतर कित्येक वर्षांनीं हा ऋणनिर्देश केला आहे, हें अवश्य लक्षात ठेविलें पाहिजे. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या चरित्रात त्यांचे बंधु लक्ष्मणराव यांनीं कँडींचा एके ठिकाणीं "महाराष्ट्रभाषागुरु" असा निर्देश केलेला आढळतो.

डॉ. प्रियो यांनीं हा प्रबंध लिहून पांचसात वर्षे झालीं. त्यानंतर मराठी भाषेच्या जुन्या युरोपियन अभ्यासकांची आणखीही माहिती पुढें येत आहे. रोम येथील फे. जोजेफ विकी (Fr. Joseph Wicki) या जेसुइट पाद्रीनीं सोळाव्या व सतराव्या शतकातील मराठी ग्रंथाच्या पोर्तुगीज भाषांतरांचीं तीनचारशें टंकलिखित पृष्ठें काहीं शंकानिवारणार्थ माझ्याकडे तीनचार वर्षांपूर्वीं पाठविलीं होतीं. यांपैकीं दों. फ्रान्सिस्क गार्सिय नावाच्या पोर्तुगीज पाद्रीनें भाषांतरीत केलेला मजकूर त्यांनीं संपादून पोर्तुगालसरकारच्या वसाहतखात्यानें अलीकडे *O Homem das*

*trinta e duas perfeicoes e outras historias* (Lisboa 1958) या नांवाखालीं प्रसिद्धीला आणला आहे.

दों फ्रांसिस्क गार्सिय हा जेजुइट पाद्री १५८० सालीं जन्मला व १६०२ सालीं हिंदुस्थानांत आला. गोवा, ठाणें, वांद्रें, वसई वगैरे मराठी मुलुखांत धर्माधिकारी किंवा जेजुइट कॉलेजाचा शिक्षक म्हणून त्यानें काम केल्यावर १६३३ च्या सुमाराम तो दक्षिण हिंदुस्थानांत गेला व क्रागानोर येथें आर्चबिशपच्या अधिकारावर असतां १६५९ सालीं तेथें मरण पावला. १६५७ च्या सुमारास त्यानें इंक्विझिशनला पाठविलेलें एक पत्र उपलब्ध आहे, त्यात मडगांव व लोटली या भागांत अकरा वर्षें आपण घालविलीं व तेथें देशी भाषेचे पुष्कळ ग्रंथ आहेत व स्थानिक भाषा आपणास फार चांगली कळते, असें तो लिहितो. स्टिफन्सचें वास्तव्यही याच भागांत होतें. या ठिकाणीं असतांना गार्सियानें हीं मराठीचीं भाषांतरें केलीं असावीं. पि. विकीनें संपादिलेल्या उपरिनिर्दिष्ट ग्रंथांत (१) हरिश्चंद्राख्यान (पृष्ठ. १–६२), विक्रमादित्याची कथा किंवा सिंहासनबत्तिसी (पृ. ६३–१६०) व ब्राह्मणांच्या ग्रंथांतून निवडलेल्या विविध कथा (पृ. १६१–३०६. पंचतंत्र, हितोपदेश, महाभारत, रामायण वगैरे ग्रंथांतील) आहेत. शेवटीं पृ. ३०७–३२२ हिंदुधर्मविषयक कांहीं लॅटीन मजकूरही सांपडतो.

याशिवाय 'योगराज-टिळक', 'ज्ञानेश्वरीचा तेरावा अध्याय', 'अनादिपुराण' (नामदेवकृत) वगैरे कांहीं मजकुराचें जर्मन भाषांतर किंवा सारांश Bonn युनिव्हर्सिटीचे प्राध्यापक Dr. Hacker हे प्रसिद्ध करणार असल्याचें त्यांच्याकडून आलेल्या पत्रावरून कळतें. योगराज-टिळकाचें पोर्तुगीज भाषांतर मानुएल ओलिव्हेर नांवाच्या बाटलेल्या ब्राह्मणानें केल्याचें पि० विकी लिहितात; परंतु या "दत्तात्रयाच्या ग्रंथाचा" ('योगराज-टिळका'चा) फ्रांसिस्क रोइज यानें केलेल्या पोर्तुगीज भाषांतरांमध्यें अन्तर्भाव असल्याचें ता. ८-१२-१५५० च्या एका पत्रांत नमूद आहे, असें प्रो. पिसुर्लेकर कळवितात. म्हणजे Franciosco Roiz हाही एक मराठीचा अभ्यासक दिसतो. पोर्तुगाल, रोम, फ्रान्स वगैरे भागांत स्वतः जाऊन तपास केल्यास मराठी भाषेच्या युरोपियन अभ्यासकांचा आणखीही शोध लागण्याचा संभव आहे. असो.

डॉ. पिंगे यांनी ही जी युरोपियन लोकांच्या मराठी सेवेची माहिती प्रयत्नपूर्वक गोळा करून प्रबंधरूपानें वाचकांपुढें ठेविली आहे ती त्यांना उद्बोधक व मनोरंजक वाटेल, अशी मला आशा आहे. या ग्रंथाचा मराठी संशोधनमंडळातर्फे पुरस्कार मी मोठ्या संतोषानें करितों.

मराठी संशोधनमंडळ
मुंबई, ता. १५।१२।५९

अ. का. प्रियोळकर.

# लेखकाचे दोन शब्द

युरोपियन लोकांनी मराठी भाषेचा अभ्यास कां व कसा केला आणि मराठी भाषेंत कोणते ग्रंथ लिहिले याची शक्य तितकी सविस्तर व साधार माहिती या प्रबंधांत आढळेल. आतांपर्यंत मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत कांहीं मोजक्या युरोपियनांच्या ग्रंथांचा नामोल्लेख होत असे; परंतु या प्रबंधांत बहुतेक सर्व युरोपियन लोकांच्या ग्रंथांविषयीं संपूर्ण माहिती देऊन ते ग्रंथ कोणत्या परिस्थितींत लिहिले गेले याविषयीं ऐतिहासिक भूमिका विशद करण्यांत आली आहे.

जेसुइट वाङ्मयाविषयीं या प्रबंधांत जें विवेचन केलें गेलें आहे, त्याचीं मूलतत्त्वें मुख्यतः प्रमुख पोर्तुगीज ग्रंथांत उपलब्ध असल्यामुळें व ती भाषा लेखकास अज्ञात असल्यामुळें त्यांतील माहिती भाषांतरित स्वरूपांत प्रा. अ. का. प्रियोळकर यांनीं उपलब्ध करून दिली; परंतु हे मराठी जेसुइट ग्रंथ मूळांत स्वतः प्रत्यक्ष पाहून त्यासंबंधीं विवेचन करण्यांत आलें आहे.

प्रबंध तयार करतांना अनेक व्यक्ति व संस्था यांचा उपयोग मीं करून घेतला आहे. महाराष्ट्रांतील युरोपियनांच्या भाषिक व्यवहारांचें विवेचन करतांना सर जदुनाथ सरकार व रियासतकार रा. ब. गो. स. सरदेसाई यांच्याकडे कांहीं शंकांकरितां पत्रद्वारें विचारणा करण्यांत आली होती. जर्व्हिस, मोल्सवर्थ व थॉमस कँडी यांची चरित्रविषयक माहिती कॉमनवेल्थ रिलेशन्स ऑफीस, लंडन येथून पत्रद्वारें मिळविली. अमेरिकन मराठी मिशनच्या वाङ्मयसेवेची माहिती व येथील मिशनचे रेकॉर्ड पाहण्याची परवानगी प्रेसिडेंट, अमेरिकन बोर्ड ऑफ कमिशन्स फॉर फॉरिन मिशन्स, बोस्टन (अमेरिका) यांच्याकडे मागण्यांत आली होती व अमेरिकेंत वास्तव्य करीत असलेले अमेरिकन मिशनचे रे. जे. एफ्. एडवर्ड्स यांनाहि याविषयीं लिहिण्यांत आलें होतें. त्यांनीं परवानगी दिल्यामुळेंच अहमदनगर येथील अमेरिकन मराठी मिशनचें दप्तर व दुर्मिळ पुस्तकें मला पाहावयास मिळालीं. माझ्या पत्रांची या सर्वांनीं आस्थापूर्वक उत्तरें पाठविलीं याबद्दल त्यांचे आभार मानले पाहिजेत मुंबई सरकारचा, तसेंच पुणें येथील शिक्षणखात्याचा (डायरेक्टर ऑफ एज्युकेशन) दप्तरखाना, व अहमदनगर येथील अमेरिकन मिशनचें रेकॉर्ड-ऑफिस यांतील सर्व कागदपत्रांचा मीं उपयोग केला आहे. या दप्तरखान्यांतील अधिकाऱ्यांनीं सहानुभूतीनें वागून तत्परतेनें सर्व प्रकारचें मला साहाय्य पुरविलें, याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

याशिवाय, कांहीं दुर्मिळ व अगदीं सुरवातीच्या कांहीं मराठी ग्रंथांची माहिती या प्रबंधांत करून देण्यात आली आहे, त्यांतील बरींचशीं पुस्तकें प्रा. अ. का. प्रियोळकर यांच्या खाजगी ग्रंथसंग्रहांत असून त्यांचा त्यांनीं उपयोग करण्यास आनंदानें परवानगी दिली. त्याप्रमाणें मराठी संशोधनमंडळांतील मायक्रोफिल्म्स-

वरून युरोपियन लोकांनी लिहिलेल्या हस्तलिखित व मुद्रित जुन्या मराठी पुस्तकांचा परिचयहि या प्रबंधांत करून देण्यांत आला आहे. मुंबई विद्यापीठ रॉयल एशियाटिक सोसायटी, पेटिट इन्स्टिट्यूट, गुजराथी फोर्बस सभा, विल्सन कॉलेज व सेंट झेव्हियर कॉलेज यांची ग्रंथालयें, तसेंच मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, व मुंबई मराठी संशोधन-मंडळाचा ग्रंथसंग्रह, पुणे येथील महाराष्ट्र ग्रंथालय या ठिकाणीं मला प्रबंधासाठीं आवश्यक असें साहित्य मिळालें. या सर्व व्यक्तींचा व संस्थांचा मी आभारी आहे.

प्रबंधछपाईसाठीं पुढील संस्थांनीं देणग्या दिल्या :

| | |
|---|---|
| मुंबई विद्यापीठ, मुंबई | ......७५० रुपये |
| धी सारस्वत कोऑपरेटिव्ह बँक लिमिटेड, मुंबई | ......२५१ रुपये |
| धी बॉम्बे ट्रॅक्ट अँड बुक सोसायटी, मुंबई | ......१०१ रुपये |
| धी बोर्ड ऑफ ट्रस्टीज ऑफ धी टेंपल्स, चॅरिटेबल इन्स्टिट्यूशन्स अँड फंड्स ऑफ धी गौड सारस्वत ब्राह्मिन कम्युनिटी ऑफ बॉम्बे, मुंबई | ......१०० रुपये |

वरील संस्थांनीं देणग्या देऊन प्रबंध प्रकाशित करण्यास जें साहाय्य केलें त्याबद्दल मी कृतज्ञ आहे.

मराठी संशोधनमंडळानें हा प्रबंध आपला पुरस्कृत ग्रंथ म्हणून मान्य करून कांहीं कागद देणगीदाखल दिले, याबद्दल मी 'मंडळा'चे उपकार मानतो.

शेवटीं माझे मार्गदर्शक प्रा. अ. का. प्रियोळकर, डायरेक्टर, मराठी संशोधनमंडळ, मुंबई यांनीं वेळोवेळीं प्रोत्साहन देऊन जी मदत केली व या प्रबंधाला पुरस्कारहि लिहिला, त्याबद्दल मी त्यांचा अतिशय ऋणी आहे. प्रबंधाचें प्रूफ-करेक्शनचें किचकट काम माझे मित्रद्वय डॉ. कृ. भि. कुलकर्णी, किशनचंद चेलाराम कॉलेज, मुंबई व प्रा. सु. आ. गावस्कर, कीर्ति कॉलेज, मुंबई यांनीं केलें. या दोघांचे जेवढे आभार मानावेत तेवढे थोडेच होतील. स्वर्गवासी कोरोनेर रा. ब श्री. एन्. आठवले यांनीं आपल्या जवळील कांहीं ग्रंथ देऊन वेळोवेळीं मदत केली होती; पण हा ग्रंथ पुरा झालेला पाहण्यास ते हयात नाहींत याचें मला वाईट वाटतें. साधना प्रेसचे मॅनेजर श्री. चिं. ग. वझे यांनीं या प्रबंधाची सुबक छपाई केल्याबद्दल त्यांचेहि आभार मानतों.

या प्रबंधाचें मुद्रण पुण्याला व लेखक औरंगाबादला असल्यानें या पुस्तकांत कांहीं मुद्रणदोष राहिलेले आहेत; पण ते वाचकांच्या सहज लक्षांत येण्यासारखे असल्यामुळें शुद्धिपत्र दिलें नाहीं.

२४ बी, कॅन्टोनमेंट
औरंगाबाद
२५-१२-१९५९

श्री. म. पिंगे

# अनुक्रमणिका



डॉ॰ विल्यम कॅरे
(पृ॰ ४५ पहा)



मेजर थॉमस कँडी
(पृ. १८१ पहा)

Thos Candy Major

Cap.1.

G.Satemanita,anny vcharita,aisse mhannatàssi quitea ?

S.Quiteà bhauarthià Christauana, IESV Christachy see satema nuchy, taissichi, zari yecade uello ti muqhĩ ucharunchy zaita, tàri tichè qhatira maranna pauatoi tàri, muqhĩ ucharunchy.

G.Mannussu Christaõ zalea nimĩ tim, connu manu, connĩ uhaddiua taca zoddata ?

S.Paramesparacho dharma putru hounu, suarguĩcho ddaizy zata.

G.Anny Christaũ nhoe to ?

S.Ho aissalo saitanacho gulamu, anny suarguinchea ddaizaea chucata.

G.Christaũ nãua conna uaraunu amacã labalã ?                IE-

स्टीफन्सच्या दौत्रिन क्रिस्तांचें एक पृष्ठ, १६२२.
( पहिल्या जेसुइट प्रकरणांतील पृ. १४ पहा )

IESVS MARIA

# ARTE DA LINGOA CANARIM

COMPOSTA PELO PADRE Thomaz estevaõ da Companhia de IESVS & acrecentada pello Padre Diogo Ribeiro da mesma Cõpanhia E nouemente reuista, & emendada por outros quatro Padres da mesma Companhia. Colleg. Roman. Soc. I.



Com Licenca da S. Inquisicam & Ordinario em Rachol no Collegio de S. Ignacio da Companhia de IESV. Anno de 1640.

स्टीफन्सच्या कानारी ( कोंकणी ) भाषेच्या व्याकरणाचें मुखपृष्ठ, १६४०.
( पहिल्या जेसुइट प्रकरणांतील पृ. १७ पहा )

# PADVA

## MHALLALEA

XARANTVLEA SANcto Antonichy ziuitua catha.

13 de Iunho.

NAmeno mazē Peramesparā
Suerga sruftichea rachannata
Crupaxendhu carunnaccea
Mugeiraya. 1.
Namo Mariye suaminny
Tū suarga saunsarachy ranny
Saftangoē uzā charannī
Prannipatu maza. 2.
Tuzea Deuapuerachē varudane
Maza deuauize mati gneana
Tuze crupestāua sangaina
Sancto Antonichy catha. 3.
Mags Portugale razedessi
Lixboa mhennipe ecca nagarassi
Sancto Antonio gharaoassi
Apaiā nizeftzani. 4.



सालदान्ज-विरचित 'सांतु आंतोनीच्या जीवितकथे' चें पाहलें पृष्ठ, १६५५.
(पहिल्या जेसुइट प्रकरणांतील पृ. २१ पहा)

श्रीमन्तास् म्हटली तदनन्तर श्रीमन्त काय
बोलतेत श्रीमन्ताचा मनोदय वायआहे?
जो श्रीमन्ता वा मनोदय असेल त्याच् प्रमाणे
वर्तणुक करू ।

अहो एक गोघ्य कानांत् आयकून् जा
साहेबांचे कानांत् म्हणून् जे आज्ञा करीत् ते
सत्वर येऊन् अम्हास् सांगा तदनन्तर आप
ले विचारांत् जे गोघ्य दृढ येईल् ते करूं ।
तुम्हीं इकडे या कांहीं गोघ्य म्हणायाची
आहे आयकून् जा त्वरेने त्याहांस् समागमें
घेऊन् या । तिकडे त्यांहांचे जवळ जा आम्
चा निरोप विनम्र पूर्वक सांगा तेही
आयकून् सत्वर स्वार होऊन् येतील् आ
ज त्याहासही आणा पाप्ता देऊन् आणा ।
अहो तुम्हास् कांही विचारही आहे उद्या
इंगरेजाचा मोटा दिवस होईल सारे इंगरेज
मोटी खुशी करतील् तोपा फार सोडतील्

ब

डॉ. कॅरेंच्या मराठी भाषेच्या व्याकरणाचें एक पृष्ठ, १८०५.

( पृ. ७२ पहा )

# Marathi Punctuation.

---

## विरामचिन्हांची परिभाषा,

मेजर क्यांडीसाहेब ह्यांनी

रचिली,

ती पुणेपाठशाळा एथील छापखान्यात

छापिली

---

छापणारा नारोरामचंद्र ठकार.

---

इसवीसंन१८५०

शके१७७२

---

मे. कँडीच्या ‘ विरामचिन्हांचा परिभाषा ’ या पुस्तकाचे
मुखपृष्ठ, १८५० ( पृ १८९ पहा )

# पोर्तुगीज व जेसुइट यांची मराठी वाङ्मय-सेवा

पोर्तुगाल देशांतील फ्रान्सिस्कन, डोमिनिकन व जेसुइट इत्यादि मिशनरींनीं हिंदुस्तानांत येऊन गोवें व दक्षिण हिंदुस्थान या भागांत सोळाव्या शतकाच्या आरंभीं जम बसविला. पोर्तुगीज लोक येथें येण्यापूर्वीं कित्येक शतकें हिंदुस्तानांत पाश्चात्य प्रवासी येत व येथील लोकांच्या चालीरीतींचा अभ्यास करून आपल्या देशांतील लोकांच्या माहितीसाठीं ग्रंथ लिहीत; परंतु या देशांत राहून येथील भाषांचा अभ्यास करणारे व त्या भाषांत ग्रंथ लिहिणारे जेसुइट मिशनरी हेच पहिले परकीय लोक होत.

हिंदुस्तानविषयक माहिती पाश्चात्य लोकांना अलेक्झांडरच्या स्वारीपासून झाली. या स्वारीमुळें पाश्चात्य लोकांना हिंदुस्तानचें दारच खुलें झालें, असें म्हणावयास हरकत नाहीं. अलेक्झांडरचा सेनापति सेल्युकस याचें व तत्कालीन सम्राट चंद्रगुप्त याचें शातेतेच्या तहामुळें सख्य होतें. यामुळें सेल्युकसनें चंद्रगुप्ताच्या दरबारीं पाटलीपुत्र येथें मेगॅस्थिनीस नांवाचा आपला वकील पाठविला. यानें हिंदुस्तानच्या माहितीनें भरलेले ग्रंथ लिहिल्याचें नमूद आहे.[1] हिंदुस्तानासंबंधीं सर्व तऱ्हेची माहिती आपल्या ग्रंथाच्या द्वारें पाश्चात्यांना करून देणारा मेगॅस्थिनीस हा पहिला लेखक असावा असें वाटतें.

मेगॅस्थिनीस याच्यानंतर जे कांहीं युरोपियन प्रवासी हिंदुस्तानांत आले त्यांची माहिती आपणांस उद्बोधक होईल. इ. स. १२९३ मध्यें व्हेनीसचा व्यापारी मार्कोपोलो हा दक्षिण हिंदुस्तान व सिलोन येथें आला होता. हा एका मुसलमान राजाकडे कांहीं काळ आश्रयाला होता. त्याच्यासंबंधीं सर हेन्री यूल लिहितो,

> "The first traveller to reveal... India the Great, not as a dream-land of Alexandrian fables, but as a country seen and partially explored with its virtuous Brahmins, its obscene ascetics, its dimonds and the strange tales of their acquisition . ."[2]

मार्कोपोलोनंतर जॉर्डान्यू (Jordanus) हा फ्रेंच डोमिनिकन पाद्री इ. स. १३२१ मध्यें हिंदुस्तानांत आला. येथें तो दोन वर्षें होता. हिंदुस्तानांतील लोक देवीपुढें

---

१. E. J. Rapson, *The Cambridge History of India, Vol. I "Ancient India"*, p. 400. मेगॅस्थिनीस यानें लिहिलेले हे ग्रंथ "*Fragments of Megasthenes*" या नावानें प्रसिद्ध आहेत. पहा—*Ibid*, p. 075.

२. Col. Sir Henry Yule, *The Book of Sir Marco Polo, Vol. I.* pp. 106–107. मार्कोपोलो मलबार प्रदेशाची माहिती देतांना त्याला "*India the Greater*" असें म्हणतो. पहा—*Ibid, Vol. II, Book III, Chapter XVI*. p. 331.

स्वतःचेंच मान कापून कसा बळी देतात याचें वर्णन त्यानें काहीं ठिकाणीं केलें आहे.[३] याच्यानंतर निकोलो-द कोंती (Nicolo De' Conti) हा इटालियन प्रवासी सन १४२०-२१ च्या सुमारास हिंदुस्तानात आला. यानें विजयनगर, खंबायत हे भाग पाहिल्याचे उल्लेख आढळतात[४]. हिंदुस्तानातील लोकांचें खाणेंपिणें, कपडे, प्रेतसंस्कार, सती यांविषयीं त्यानें लिहिलें असल्याचें नमूद आहे. विशेष म्हणजे हिंदुस्तानातील अनेक भाषा पाहून कोंतीला नवल वाटलें. त्याला अरबी व फारशी या दोनच भाषा येत होत्या यासंबंधीं पुढील उल्लेख आढळतो —

"He was also struck by the great variety of Indian languages though he himself, unfortunately, learnt only Arabic and Persian."[५]

अशा रीतीनें पंधराव्या शतकात व त्याच्यापूर्वीं जे पाश्चात्य प्रवासी हिंदुस्तानात येत, त्यांना अरबी व फारसी या भाषा येत असाव्यात. स्पॅनिश व पोर्तुगीज लोकांना अरबी भाषा अवगत होती, याचें कारण, स्पेन व पोर्तुगाल हे देश अरबांच्या वर्चस्वाखालीं कित्येक शतकें होते. तसेंच या काळात अरबस्तानातील लोक हिंदुस्तानशीं व्यापार करीत होते. हिंदुस्तानच्या किनाऱ्याला त्यांची व्यापारी ठाणीं होतीं. त्यामुळें तेथें त्यांची भाषा चालू झाली. या भाषाव्यवहाराची माहिती देताना रिचर्डसन् म्हणतो,

"For many centuries previous to the discovery of the Cape of Good Hope, they were the chief traders in the East, and the commodities of India flowed into Europe, by way of Egypt and Syria, almost solely through their hands. Their Commercial settlements skirted the Indian Coasts, their transactions with the Gentoos were extensive, and their language found its way where even their arms and their religion had made no impression."[६]

सोळाव्या शतकात पृथ्वीपर्यटनाचे निरनिराळे मार्ग प्रवाशांनीं शोधून काढले. वास्को द गामा यानें हिंदुस्तानचा जलमार्ग शोधून तो इ. स. १४९८ च्या मे महिन्यात हिंदुस्तानात आला. हिंदुस्तानातील एतद्देशीय लोकांनीं वास्को द गामानें एका

---

३ Jarl Charpentier, *Livro da Seita dos Indios Orientais*, Introduction, p. XVI

४. Robert Sewell, *Forgotten Empire*, pp. 60–81

५. Jarl Charpentier, *Livro da Seita dos Indios Orientaes*, Introduction, p. XIX.

६ John Richardson, *Dictionary Persian, Arabic and English Dissertation*, p. VIII

स्पॅनिश भाषा जाणणाऱ्या मुसलमान दुभाष्यामार्फत व्यवहार चालविला होता. वास्को द गामा जेव्हा आपल्या लोकांबरोबर कालिक्त येथें आला तेव्हा दोन मुसलमानांनीं त्याला विचारलें, "तुम्ही येथें कशासाठीं आलात?" त्यावर त्यानें उत्तर दिलें, 'आम्ही खिश्चन्स व मसाला यांच्या शोधार्थ येथें आलों' ("Al diabro que te doo quam traxo aqua?" "Vimos buscar Christaos e especiaria")[८]

या संवादावरून पोर्तुगीज लोक व्यापारासाठीं जरी येथें आले तरी ते धर्मप्रसारालाहि तितकेंच महत्त्व देत हें स्पष्ट दिसून येतें.

वास्कोद गामानंतर इ. स. १५०० मध्यें दुआर्त-बार्बोसा (Duarte Barbosa) हा पोर्तुगालमधील प्रवासी हिंदुस्तानात आला. कोचीन येथील वखारींत त्यानें १५१६ पर्यंत काम केलें. विजयनगर येथेंहि हा या सुमारास होता, व या काळातील विजयनगरची हकीकत त्यानें लिहून ठेविली आहे.[९] कोचीन येथें असतांना तो मल्याळी भाषा शिकला. देशी भाषेचा अभ्यास पाश्चात्यांनीं येथपासून सुरु केल्याचा स्पष्ट उल्लेख बार्बोझाच्या ग्रंथात आपणास मिळतो.

बार्बोझानंतर सन १५२० मध्यें दुमिंगुश पाइश (Domingos Paes) हा पोर्तुगीज प्रवासी हिंदुस्तानांत आला. यानें विजयनगरचा वृत्तान्त लिहून ठेवला आहे. तसेंच सन १५३५ मध्यें फेर्नांव नुनिश (Fernao Nuniz) या प्रवाशानें विजयनगरचा वृत्तान्त लिहिला आहे.[१०] येथील ब्राह्मण हे फार धार्मिक व विद्वान् आहेत. ते मातृदेवाची पूजा करीत असून वीर व पराक्रमाच्या गोष्टी असणारीं पुस्तकें त्यांच्याजवळ आहेत असें तो लिहितो. दक्षिण हिंदुस्तानांतील मल्याळी भाषा बार्बोझाप्रमाणें नुनिश शिकला असता तर ब्राह्मणांचीं पुस्तकें कसलीं आहेत, हें त्याला सांगता आलें असतें. परंतु अशी कोणतीहि भाषा शिकल्याचा स्पष्ट उल्लेख नुनिशसंबंधीं आढळून येत नाहीं.

पोर्तुगीज लोक हिंदुस्तानांत आल्यानंतर त्यांनीं गोव्यात आपलें वर्चस्व हिंदु लोकांच्या मदतीनें लवकरच प्रस्थापित केलें. हिंदु लोकांचे हे उपकार स्मरून त्यांचा धर्म व संस्कृति यांविषयीं पोर्तुगीजांची वागणूक सहिष्णुतेची होती आणि आल्बुकर्क

७ Elphinstone (Sir E. Colebrooke Editor) *The Rise of the British Power in the East* p. ...

८ *Roteiro da Viagem de Vasco da Gama em 1497* (2nd Edition) p. 51

९ Robert Sewell *A Forgotten Empire* p. 128

१० Jarl Charpentier, *Livro da Seita dos Indios Orientaes* Introduction p. LXIII

११ Robert Sewell, *A Forgotten Empire* p. 128

हा गोव्याचा गव्हर्नर असतांना पोर्तुगीज लोकांनीं हिंदूंना चांगल्या प्रकारें वागविलें असा समज आहे; परंतु ही गोष्ट नव्या पुराव्यानें खोटी ठरत आहे.

पोर्तुगीजांनीं दिवाडी ( गोवा ) येथील शिल्पकलेचा उत्कृष्ट नमुना असलेल्या हिंदूंच्या एका देवळाचा व त्यांतील मूर्तींचा विध्वंस केला, असा आशयाचें पत्र ता. १५ जानेवारी १५१५ रोजीं कोचीनहून आंद्रे कोर्साली यानें रोम येथें पाठविलेलें आढळतें.[१२] हा प्रकार अल्बुकर्क गव्हर्नर असतांनाच घडला; कारण पुढें १५ डिसेंबर १५१५ मध्यें तो मरण पावला. अल्बुकर्कला ही गोष्ट माहीत नव्हती किंवा त्याच्या गैरहजेरींत ही गोष्ट घडली असावी, अशीं कारणें देऊन अल्बुकर्कवरील दोष घालवितां येईल. कसेंहि असलें तरी, त्या वेळेपासून हिंदूंविरुद्ध वातावरण निर्माण होऊं लागलें होतें असें दिसतें. पण १५४१ पासून त्यांचा पद्धतशीरपणें छळ होऊं लागला.

गोव्यांत ज्याप्रमाणें हिंदूंचा छळ सुरू झाला, त्याप्रमाणें कोंकणांतील इतर भागांत म्हणजे उत्तरेकडे पोर्तुगीज सत्तेखालीं असलेल्या एलिफंटा, करंजा, वसई, ठाणें व मुंबई या भागांतील हिंदूंनाहि जाच होऊं लागला. हिंदूंचीं देवळें पाडण्यांत आलीं. त्यांच्या मूर्ति फोडून तोडून टाकण्यांत आल्या व त्यांचे धर्मग्रंथ जाळण्यांत आले. हिंदु लोकांच्या या छळाचें वर्णन गोवा सरकारचा चीफ सेक्रेटरी कुन्ह रिव्हार यानें खालील शब्दांत केलें आहे :

" In the first excitement of the conquest the Hindu temples were destroyed, all the emblems of their worship were crumbled to dust, and all the books written in the vernacular languages burnt, as convicted or suspected of containing the precepts and doctrine of idolatry. " [१३] ( पोर्तुगीजचें इदर्जा भाषांतर ).

पोर्तुगीजांनीं हिंदूंचा छळ करून, त्यांना बाटवून ख्रिस्ती केलें; या बाटलेल्या लोकांना ख्रिस्ती धर्माची मुळींच माहिती नसे. ते नांवानेंच ख्रिश्चन झाले होते. या वेळीं बाटलेल्या लोकांची संख्या वाढली. ख्रिस्ती धर्माचीं तत्त्वें त्यांना पटलीं होतीं, म्हणून हे ख्रिस्ती झाले होते असें मुळींच नव्हतें; तर कित्येक लोकांनीं छळाच्या भीतीमुळें, तर कित्येकांनीं मोटमोठ्या अधिकाराच्या जागांना व पैशांना वश होऊन ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला होता. या ख्रिस्ती धर्मप्रसाराचें व तत्कालीन लोकांच्या मनःस्थितीचें वर्णन आपणास न्यायमूर्ति आंतोनियु नोरोञ्ह यांच्या खालील शब्दांत आढळून येईल :

१२. A. B. Braganca Pereira, *Historia Religiosa de Goa*, vol. I, p. 45.

१३. J. H. da Cunha Rivara, *Ensaio Historico da Lingua Concani*, p. 261.

"It is now known how the conversion was so rapid and so extensive; some from fear of physical pain, others through moral cowardice; many as they could not overcome the love for their *native* land from which they would otherwise be expelled; not a few that they might not lose their property and interests; some with eyes on lucrative posts and almost none from conviction. Conviction and faith, these were to come later, when they would be grossly beaten with strifes" [१४]. (इंग्रजी भाषांतर.)

वर सांगितल्याप्रमाणें पोर्तुगीज लोकांनीं नाना तऱ्हेनें लोकांचा छळ करून व पुष्कळ प्रकारचीं आमिषें दाखवून त्यांना खिस्ती धर्म स्वीकारावयास लावला, तरी त्यांचा विश्वास मात्र खिस्ती धर्मावर बसला नाहीं. खिस्ती धर्माचें आचरण करीत आहोंत असें वरकरणीं खोटेंच दाखवून ते हिंदुधर्माप्रमाणें आचरण करीत. याला आळा घालण्यासाठीं १५६० सालीं इन्क्विझिशनची स्थापना करण्यांत आली. युरोपमध्यें ज्यू लोकांचा ज्या पद्धतीनें छळ करण्यांत आला, तीच पद्धत हिंदु लोकांचा छळ करण्यांत पोर्तुगीजांनीं स्वीकारली.[१५] या संस्थेच्या नियमाप्रमाणें पर-धर्माचा एखादा हिंदु ग्रंथ जवळ बाळगणें हा शिक्षेला पात्र असा भयंकर गुन्हा ठरे.[१६] इन्क्विझिशनच्या स्थापनेमुळें हें शिक्षासत्र जोरांत चाललें व हिंदु लोकांच्या छळालाहि सीमा राहिली नाहीं. असें असलें तरी पोर्तुगीजांना हवें तसें यश येईना. तेव्हां या देशांत खिस्ती धर्माचीं पाळेंमुळें खोलवर रुजावयाचीं असतील तर लोकांचें मन वळवून त्यांच्यामध्यें धर्माविषयीं प्रेम व आपुलकी निर्माण केली पाहिजे, हें त्यांना लवकरच कळून चुकलें.

धर्मप्रसाराचें धोरण ठरविण्याकरितां बिशपाच्या प्रांतिक सभा ( Concilios Provinciaes ) सन १५६७ पासून भरत असत. १५८५ सालच्या तिसऱ्या सभे-मध्यें पुढील ठराव मंजूर करण्यांत आला :

"This assembly of Bishops ( Concilio ) orders that a text book of Christian Doctrine shall be prepared in Portuguese language which shall generally be taught in all parts of India, so as to maintain conformity between all, and that this shall be translated in the languages of those lands where conversion takes place and shall be taught therein. In the same manner shall be prepared a

---

१४. *A India Portuguesa* Vol. II, *Nova Goa*, 1923, p. 261.

१५. J. Murray Mitchell, *In Western India*, p. 25.

१६. *Regimento do Santo officio da Inquisicao dos Reynos de Portugal* 1640, § 12.

brief catechism in conformity with Catechismo Tridentino adapted to the nations of these parts."[१७] (पोर्तुगीजचें इंग्रजी भाषांतर).

या कौन्सिलच्या आदेशाप्रमाणेंच पुढें पोर्तुगीज मिशनरींनीं प्रथम पोर्तुगीज भाषेंत व नंतर मराठी भाषेंत व गोव्याच्या बोलींत ख्रिस्ती धर्माचीं तत्त्वें विशद करणारीं लहान प्रश्नोत्तररूप पुस्तकें लिहिलीं व इतर विषयांवरहि ग्रंथ तयार केले. अशा तऱ्हेनें देशी भाषांत ग्रंथ लिहिण्याला पोर्तुगीज मिशनरींकडून प्रारंभ झाला.

## पहिले पोर्तुगीज मिशनरी

आतां पोर्तुगीज मिशनरींसंबंधीं माहिती देऊं. पोर्तुगीजांचा पहिला गव्हर्नर अल्बुकर्क याच्याबरोबर जे पहिले मिशनरी गोव्यांत आले, ते डोमिनिकन पंथाचे मिशनरी होते. ते गोव्यांत इ. स. १५१० मध्यें आले. परंतु १५४८ पर्यंत ते त्या ठिकाणीं स्थायिक झाले नाहींत.[१८] त्यानंतर सन १५१७ मध्यें फ्रान्सिस्कन मिशनरी गोव्यांत आले. त्यांनींच प्रथम ख्रिस्ती धर्मप्रसाराचीं बीजें पेरलीं. यांच्यानंतर सन १५४२ मध्यें फ्रॅन्सिस झेविअर हा जेसुइट मिशनरी आला.[१९] कुटिनो आपल्या पुस्तकांत अशी माहिती देतो कीं, फ्रॅन्सिस्कन हे गोव्यांत प्रथम येऊन त्यांनीं तेथें एक चर्च स्थापन केलें. नंतर डोमिनिकन आले व त्यानंतर १५४२ मध्यें जेसुइट आले.[२०] यासंबंधीं मोर्स स्टीफन्स आपल्या पुस्तकांत लिहितो,

"The Franciscan friars who first came to India were engaged in looking after the souls of the Portuguese soldiers, but they were followed, and in increasing numbers after the successes of Saint Francis, by priests and friars and Jesuits, who left Europe for the express purpose of converting the heathen."[२१]

फ्रॅन्सिस झेवियर हा हिंदुस्तानांत आल्यानंतर त्यानें दक्षिणेकडील एतद्देशीय लोकांस ख्रिस्ती धर्माची दीक्षा दिली. हा चीनमध्यें जात असतांना सन १५५२ मध्यें मरण पावला. झेवियरनें जरी हिंदु लोकांमध्यें ख्रिस्ती धर्माचा प्रसार केला, तरी त्याला या देशाच्या भाषा शिकण्याचें विशेष महत्त्व वाटलें नाहीं. त्यामुळें त्याचे

१७. J. H. de Cunha Rivara. *Arquivo Oriental Portuguesa*, Vol. IV. त्याचप्रमाणें Cunha Rivara चें *Ensaio Historico da Lingua Concani*, p. LII.

१८. Jose Nicolau de Fonseca, *An Historical and Archaeological Sketch of the City of Goa*, p. 68.

१९. *Ibid.*, p. 63.

२०. Cottineau, *Cottinau's History of Goa*, p. 39.

२१. H. Morse Stephens (Edited by W. W. Hunter) *Rulers of India : Albuquerque*, p. 191.

पुष्कळसे व्यवहार दुभाष्याकरवींच होत असत. याविषयीं प्रो. जाल कार्पेंटियर आपल्या एका ग्रंथाच्या प्रस्तावनेंत म्हणतो,

"XAVIER, whose mother tongue undoubtedly was Basque, never seems to have fully realised the importance of mastering the languages of these foreign peoples to whom he preached the Gospel and thus mostly had to fall back upon the aid of interpreters; what he himself learnt Tamil and Japanese can never have been very much."[२२]

फ्रॅन्सिस झेवियर जेव्हां मलबारच्या किनाऱ्यावर उतरला, तेव्हां मलबारी व व पोर्तुगीज भाषा जाणणाऱ्या एका दुभाष्याकडून त्यानें प्रश्नोत्तरावळीचें मलबारी भाषांतर करवून घेतलें. हें भाषांतर झेवियरनें तोंडपाठ करून धर्मोपदेश करण्यास सुरुवात केली. झेवियर धर्मोपदेश करण्यासाठीं ज्या खेड्यांत जात असे, त्या खेड्यांत घंटा वाजवून तो लोक गोळा करीत असे व त्यांच्यापुढें मलबारी भाषेंत पाठ केलेले 'प्रश्नोत्तरावळींतील उतारे' म्हणत असे.[२३] हें भाषांतर करवून घेण्यासाठीं झेवियरला चार महिने खर्चावे लागले. या कालांत लहान मुलांना धर्मतत्त्वें सांगणें, लोकांचें धर्मांतर करणें हीं कामें त्यानें केलीं. या पुस्तकाच्या भाषांतरानंतर व पठनानंतर झेवियरला "Ten Commandments" व "Apostles Creed" हीं दोन प्रकरणें त्या लोकांच्या भाषेंत सांगतां येऊं लागलीं. त्या लोकांबरोबर त्यांच्याच मोडक्यातोडक्या भाषेंत स्वर्ग व नरक या गोष्टींबद्दल त्याला विवेचन करतां आलें. झेवियर पद्धतशीर रीतीनें भाषा शिकला नाहीं तरी हे लोक अडाणी असल्यामुळें व त्यांना अक्षर-ओळख मुळींच नसल्यामुळें देशी भाषेबद्दल एवढी तयारी केल्यानें त्याचें काम भागलें.[२४]

अशा रीतीनें झेवियरचें धर्मप्रसाराचें काम चालू होतें. झेवियरला लोकांच्या भाषांचा खोल अभ्यास करण्याची गरज वाटली नाहीं, याला भाविक लोक निराळेंच कारण देतात. लोकांची झेवियरसंबंधीं अशी एक समजूत आहे कीं, त्याला बहुभाषांची देणगी होती. झेवियर जीं ख्रिस्ती तत्त्वें आपल्या भाषेंत समजावून सांगत असे, तीं तत्त्वें श्रोत्यांना त्यांच्या वेगवेगळ्या भाषांत ऐकूं येत असत. हा झेवियरचा भाषाविषयक चमत्कार पुढील शब्दांत देण्यात आला आहे:—

"The natural interpretation of the words of St. Luke seems to be, that while the Apostles spoke with 'diverse tongues' every

२२. Jarl Charpentier, *Livro da seita dos Indios Orientaes*, Introduction, p. XXXVIII.

२३. Henry James Coleridge, *Life and Letters of St. Francis Xavier*, Vol. 1, p. 151.

२४. *Ibid.* Vol. I, p. 159.

man heard them speak in his own tongue and that the miracle must have been twofold–in the possesion of new languages by the Apostles, and in the hearing of the multitude that came *together, on whose ears the same sound fell in many different* languages at once."[२५]

फ्रॅन्सिस झेवियरनें देशी भाषेच्या पायाशुद्ध अभ्यासाकडे जरी दुर्लक्ष केलें, तरी मलबारांत जो धर्मोपदेश करावयाचा तो मलबारी बोलींतच करणें त्याला कसें प्राप्त झालें, याचा उल्लेख मागें आलाच आहे. झेवियरच्या मागून जे धर्मोपदेशक आले, त्यांनी गोवा प्रांताच्या ज्या भागांत वास्तव्य केलें, तेथें सुशिक्षित समाज असल्यानें त्यांना देशी भाषेंत ख्रिस्ती धर्मविषयक ग्रंथरचना करावी लागली.

पोर्तुगीज मिशनरींनीं देशी भाषांपैकीं ज्या दुसऱ्या एका भाषेचा अभ्यास केला, ती फारसी भाषा होय. *या फारसी भाषाभ्यासामुळेंच त्यांना अकबराच्या* दरबारांत मोठें स्थान प्राप्त झालें. अकबराच्या दरबारच्या भाषेसंबंधीं एक युरोपियन प्रवासी लिहितो :

"The Persian is the language of the Moghol's Court, most spoken and us'd in all publick writings."[२६]

इ. स. १५७८ मध्यें गोव्याच्या पोर्तुगीज व्हाइसरॉयानें आंतोनियु काब्राल नांवाचा आपला वकील अकबराच्या दरबारांत पाठविला होता.[२७] अकबरानें त्याच्या आचारविचारांची माहिती करून घेतली व ही माहिती करून घेत असतांना त्याला ख्रिस्ती धर्मासंबंधीं उत्सुकता वाटूं लागली. त्या धर्माची माहिती आपणांस करून द्यावी, अशी विनंती अकबरानें पोर्तुगीज वकिलास केली. त्या विनंतीप्रमाणें पुढें

२५. *Ibid.*, Vol. I, p. 172. फादर आंतोनियु द सालदान्ह यानें 'सँट आंतोनीची जीवितकथा' या नांवाच पुराण लिहिलें आहे. त्यांत सँट आंतोनीच्या बहुभाषाचा चमत्कार त्यानें पुढीलप्रमाणें वर्णन केला आहे :—

तें अपूर्व वेगळें करानि । तो सदैव भग्तु सांतु आंतोनि ॥
अनेकें अपूर्वें करोनि प्रतिदिनीं । जगीं प्रसिद्ध ॥ २४९
तेआ जनां आपुलिये भासे । कथुनि सांगितलें होए जैसें ॥
ते ते परी जाणवे तैसें । संधेवाविण ॥ २५०
म्हणिपे विविध यातिचेआं जनां । येकी भासेन केलेया कथन ॥
तांतांचि भासे तांतांचिआ मना । परसे कथन ॥ २५१

२६. Edward Grey, *The Travels of Pietro Della Valle in India*, Vol. I, p. 96–97. तसेच पुढील पुस्तकातहि अशाच प्रकारची माहिती दिली आहे. पहा– C. H. Payne, *Akbar and the Jesuits*, p. 18.

२७. C. H. Payne, *Akbar and the Jesuits*, p 14.

सन १५८२ मध्यें पोर्तुगीज मिशनरींचा प्रवेश अकबराच्या दरबारांत झाला.[१८] पोर्तुगीजांचा पहिला मिशनरी Father Rudolf Aquaviva या नांवाचा होता. त्याच्याबरोबर मदतीला Father Francois Henriques याला देण्यांत आलें होतें. हा बाटगा नवख्रिश्चन होता; परंतु याला फारसी भाषा अवगत होती, म्हणूनच याची निवड करण्यांत आली होती, असें दिसतें.

भाषेचें हें वाढतें महत्त्व जाणून पोर्तुगीज मिशनरींनीं पुढें स्वतःच फारसी भाषेचें ज्ञान संपादन केलें. या भाषाज्ञानाचा त्यांना राजकारणांत व धर्मप्रसार करण्यांत फारच उपयोग झाला. परकीय युरोपियन लोकांनीं हिंदुस्तानांत प्रवेश केल्यानंतर धर्मप्रसारासाठीं व राजकीय कारणासाठीं दरबारची भाषा शिकण्याचा पायंडा कसा पाडला, हें आपणांस येथें दिसून येईल. अकबराच्या दरबारांतील पोर्तुगीज मिशनरी विद्वत्तेनें कसे होते, यासंबंधीं सी. एच्. पेन आपल्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत लिहितो,

"The Fathers who resided at the Mogul Court were men of learning and culture, and in most cases accomplished writers. They were also keen, and as far as their religion prejudices permitted, sympathatic observers." [१९]

आपल्या कामासाठीं या अभ्यासाचा त्यांनीं चांगलाच उपयोग करून घेतला असें दिसतें. इ. स. १५९४ सालीं अकबराच्या दरबारांत Father Hieronymo Xavier हा मुख्य मिशनरी होता.[२०] फादर झेवियरनें अकबराला कांहीं चित्रें नजर केलीं, तीं चित्रें कोणाचीं आहेत याची माहिती अकबरानें त्याला त्या चित्राखालीं फारसी भाषेंत लिहावयास सांगितली. तसेंच फादर प्रॉव्हिन्शियल यांजकडून आलेल्या पत्राचें फारसी भाषेंत स्पष्टीकरण करावयास सांगितलें.[२१] यावरून अकबराच्या दरबारांत असतांना पोर्तुगीज मिशनरींनीं फारशी भाषा चांगलीच अवगत करून घेतलेली दिसते.

याच फादर झेवियरनें दिल्लीला असतांना ख्रिस्ती धर्मतत्त्वें प्रतिपादन करणारा "The Fountain of Life" हा ग्रंथ लिहिला व तो अकबरास अर्पण केला. हा ग्रंथ अर्पण केल्यानंतर कांहीं लोकांच्या मदतीनें त्यानें तो फारसींत भाषांतरित केला.[२२]

---

१८. *Ibid.*, p. 8.

१९. *Ibid*, Introduction, p. XXXIX

२०. *Ibid*, p 52.

२१. *Ibid*, pp. 82–83.

२२. *Idid.*, p. 97. यानें फारसी भाषेंत दुसरे ग्रंथ लिहिले. त्याची माहिती याच पुस्तकांत पृष्ठ १९० व २०७ वर दिली आहे. रे. मरे मिचेल्हि याच्यासंबंधीं माहिती देतो. पहा– J. Murray Mitchell, *In Western India*, p. 36.

हे जेसुइट मिशनरी फारशी भाषा शिकून त्या मार्फत धर्मोपदेशक करीतच; पण दरबारांत त्यांचें प्रथ मोठें असल्यानें तेथें जे परकीय देशाचे प्रवासी किंवा व्यापारी येत असत, त्यांचीं पत्रें वाचणें व दुभाषाचीं कामें करणें यासाठीहि ते आपल्या भाषाज्ञानाचा उपयोग करीत. विल्यम हॉकिन्स हा इंग्लिश प्रवासी सन १६०९ मध्यें जेव्हां हिंदुस्तानांत आला, तेव्हां त्यानें आपल्याबरोबर इंग्लंडच्या राजाचें पत्र आणलें होतें. हें पत्र स्पॅनिश भार्षेत होतें, असें म्हणतात. जहांगीरनें तें पत्र जेसुइट मिशनरीस वाचावयास सांगितलें व तें पत्र वाचून त्याचा मथितार्थ त्यानें जहांगिरास फारशी भार्षेत सांगितला.[२३]

हे मिशनरी फारशी भाषेचा उपयोग धर्मोपदेशासाठीं करीत, याचा निर्देश निकोलस विदिंग्टन हा करतो. हा प्रवासी हिंदुस्तानांत सन १६१२ मध्यें आला होता. तो आग्रा येथें १६१४ मध्यें गेला. त्यानें जेसुइट मिशनरीचें चर्च पाहिलें व धर्मोपदेशहि ऐकला. याविषयीं त्यानें पुढीलप्रमाणें लिहून ठेवलें आहे:—

"So the poore Jesuits are fayne to make a church of one of theire chambers, wherein they saye masse twice a daye and preach everye sundaye, firste in the Persian tongue, that the Armenians and Moors may understand and afterwards in Portugale, for the Portungales, Italians and Greeks."[२४]

पोर्तुगीज मिशनरी आर्मेनियन आणि इतर मूर या लोकांना फारशी भार्षेतून व पोर्तुगीज, इटालियन व ग्रीक या लोकांना पोर्तुगीज भार्षेतून धर्मोपदेश करीत. यावरून त्या काळीं आग्र्यांत कोणत्या देशाचे परकीय लोक असत, याचाहि बोध होतो. या परकीय लोकांचा भाषाव्यवहार, यांच्या मातृभार्षेतून न होतां पोर्तुगीज भार्षेतून होत असे, हेंहि लक्षांत ठेवण्यासारखें आहे. याचें एक उदाहरण बर्नियर आपल्या प्रवासवर्णनांत देतो. त्या काळीं आग्रा व दिल्ली येथें पोर्तुगीज भार्षेतील धार्मिक पुस्तकांचा प्रसार झाल्याचें तो लिहितो. दिल्लीच्या बाजाराचें आपल्या प्रवासवृत्तांत वर्णन करतांना बर्निअर हा येथील बाजारांत बसलेल्या ज्योतिष्यांचें वर्णन देऊन त्याच्याजवळ असलेल्या साहित्याची माहिती सांगतो, ती अशी:—

"His only instrument was an old mariners's compass, and his books of astrology a couple of old Romish prayerbooks in the *Portuguese* language, the pictures of which he pointed out as the signs of the *European* zodiac."[२५]

२३. Sir William Foster, *Early Travels in India*, p. 80.
२४. *Ibid*, p. 223.
२५. Archibald Constable., *Travels in the Mogul Empire, A. D. 1656-1668 by Francois Bernier*, Vol. I, p. 244.

हे ज्योतिषी म्हणजे मिश्र रक्ताचे ( Half-caste ) पोर्तुगीज होते. यावरून लोकांना बाटवून त्यांना पोर्तुगीज भाषेतील पुस्तकें वांटण्यासाठीं द्यावयाचीं, अशी या जेसुइट मिशनरींची प्रथा होती असें दिसतें. या पोर्तुगीज पुस्तकांच्या प्रसारावरून दूरदूरच्या प्रदेशांतसुद्धां जेसुइट व इतर पाश्चात्य लोकांचा व्यवहार पोर्तुगीज भाषेंतून होत असावा, असें मानण्यास हरकत नाहीं.

एतद्देशीयांशी भाषाव्यवहार करण्यासाठीं पोर्तुगीज मिशनरी फारसी भाषा शिकले, हें वर दिलेंच आहे. फादर झेवियर यानें ज्याप्रमाणें फारशी भाषेंत ग्रंथ लिहिण्याची कामगिरी केली, त्याप्रमाणें फादर नोबिली व फादर बेस्की यांनीं संस्कृत व तामिळ भाषांमध्यें केली. त्यांची माहिती देतांना रे. मरे मिचेल म्हणतो,

"It is well known that important works in the Native languages have been composed by Romish ecclesiastics in various parts of India. We may particularize the names of Hieronymo Xavier, Roberto di Nobili, and Constantino J. Beschi. The first of these wrote various works in the Persian language and attracted attention at the court of Emperor Jahangir. Still more celebrated is Roberto di Nobili, whose attainments both in Sanskrit and Tamil seem to have been of high order."[२६]

अशा रीतीनें या पोर्तुगीज मिशनरींनीं ज्याप्रमाणें इतर ठिकाणच्या देशी भाषांविषयीं आस्था दाखविली, त्याप्रमाणें मिशनरींच्या सर्व चळवळींचें केंद्र असा जो गोवा प्रांत तेथील लोकांच्या मराठी भाषेविषयीं ते उदासीन राहणें शक्य नव्हतें. दक्षिण व उत्तर कोंकणांतील ग्रांथिक व बोली भाषांचा अभ्यास करून मागें सांगितलेल्या कौन्सिलच्या आदेशाप्रमाणें त्यांनीं मराठी भाषेंत व गोव्याच्या बोली भाषेंत ग्रंथ लिहिण्यास प्रारंभ केला.

पोर्तुगीज व जेसुइट मिशनरी हिंदुस्तानांत येऊन गोवा येथें राहिल्यानंतर कौन्सिलच्या आदेशाप्रमाणें मराठींत ग्रंथलेखन करूं लागले. त्यांची माहिती पुढीलप्रमाणें :—

१ः फादर स्टीफन्स

फादर स्टीफन्स याचा जन्म इ. स. १५४९ मध्यें झाला. विंचेस्टर येथें त्यानें आपलें शिक्षण घेतलें. पुढें तो रोम येथें गेला व जेसुइट धर्मपंथांत त्यानें प्रवेश केला. हिंदुस्तानांत मिशनरी कार्य करावें अशा इच्छेनें लिस्बन येथून प्रवासाचा परवाना घेऊन १५७९ च्या वसंत ऋतूंत तो तेथून बोटीनें निघाला व २४ ऑक्टोबर

२६. *The Journal of the B. B. R. A. S.*, *January 1849*, p. 132-33.

१५७९ रोजीं गोवा येथें येऊन पोहोंचला.[३७] त्यानें गोव्याहून ता. १० नोव्हेंबर १५७९ रोजीं आपल्या वडिलांना लिहिलेलें पत्र उपलब्ध आहे या पत्रांत त्यानें प्रवासाची हकीकत लिहिलेली असून गोव्यांतील लोकांचें वर्णन दिलें आहे.[३८]

स्टीफन्स मराठी भाषा केव्हां व कसा शिकला याविषयीं निश्चित सांगतां येत नाहीं. गोव्यास आल्यानंतर चार वर्षांनीं म्हणजे २४ ऑक्टोबर १५८३ रोजीं आपला भाऊ रिचर्ड याला त्यानें लिहिलेलें एक पत्र उपलब्ध आहे. स्टीफन्सचें हें पत्र अपुरें असून तें ब्रुसेल्सच्या नॅशनल लायब्ररींत संग्रहित आहे. मूळ पत्र लॅटिन भाषेंत असून स्टीफन्सच्या पुराणाच्या नवीन आवृत्तींत तें इंग्रजींत भाषांतरित करून छापलें आहे.[३९] या पत्रांत तो लिहितो,

"Many are the languages of these places. Their pronunciation is not disagreeable, and their structure is allied to Greek and Latin. The phrases and constructions are of a wonderful kind. The letters in the syllables have their value, and are varied as many times as the consonants can be combined with the vowels and the mutes with the liquids." [४०]

या उताऱ्यावरून या कालांत फादर स्टीफन्स मराठी भाषेचा अभ्यास करीत होता, असें दिसतें.

फादर स्टीफन्सला प्रांथिक मराठी व कानारी (कोंकणी) बोली येत होत्या. ता. १ फेब्रुआरी १६२० च्या एका पत्रांत स्टीफन्ससंबंधीं जो मजकूर आहे, त्याचें रे. हॉस्टेननें इंग्रजी भाषांतर केलें आहे. त्यांतील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणें :—

"He made himself thoroughly master of the Canarine (Konkani) tongue......he applied himself also most diligently to the study of Industanee Language (Marathi), that used by the nobility." [४१]

---

३७. J. Courtney Locke, *The First Englishmen in India*. p. 30, व Sir W. Foster, *Early Travels in India*, p. 3, (Foot-Note).

३८. J. Courtney Locke, *The First Englishmen in India*, pp. 19-31. तसेंच, *The Christian Puranna, Biographical Note*. pp. XXVI-XXX. व *Bulletin of the School of Oriental Studies*, Vol. III-1923-25 pp. 234-239 पहा.

३९. *The Christian Puranna*, Biographical Note. pp. XXX to XXXIV.

४०. *Ibid.*, Biographical Note, XXXIV.

४१. *Journal and Proceedings of the Asiatic Society of Bengal*, (New Series) Vol IX, 1913, p. 162 (Foot Note)

जिला आज कोंकणी म्हणतात, त्या गोमांतकी बोलीला त्या काळीं Canarim म्हणत असत. या बोलींतील ग्रंथांच्या भाषेचा उल्लेख करतांना Lingoa Canarim असें नांव दिलेलें आढळतें.[४२]

कानारी शब्दाचा अर्थ यूल 'हॉब्सन-जॉब्सन'मध्यें पुढीलप्रमाणें देतो. पहा :

" Canarim : n. p. This name is applied in some of the quotations under *Canara* to the people of the district now so called by us. But the Portuguese applied it to the ( Konkani ) people of Goa and their language. Thus a Konkani grammar, originally prepared about 1600 by the Jesuit, Thomas Estevao ( Stephens, an Englishman ), printed at Goa, 1640, bears the title Arte da Lingoa Canarim."[४३]

कानारी हा शब्द मूळ कनारा या फारसी शब्दावरून झाला असावा. कनारावरूनच चालू मराठी किनारा म्हणजे समुद्राचा कांठ ( Coast ) हा शब्द आला आहे. मोल्सवर्थ किनारा या शब्दाचा अर्थ पुढीलप्रमाणें देतो :—

" किनारा — Edge, side, margin, border."[४४]

यावरून आरंभीं मुसलमान लोकांनीं कनारी ( Coasters ) असें कोकणांतील लोकांना नांव दिलें व याच शब्दाचा उपयोग पुढें पोर्तुगीजांनीं केला असें दिसतें.

कोंकणी हें भाषाविषयक नांव अलिकडील आहे. कोकणांतील भाषा असा स्थलवाचक ( Regional ) त्या शब्दाचा उगम नसून कोंकण्यांची म्हणजे गोव्यांतील ब्राह्मणांची भाषा असा तिचा उगम आहे. यासंबंधीं 'कोंकणमाहात्म्य' नांवाच्या एका सतराव्या शतकांतील जुन्या ग्रंथांत त्याचा लेखक लिहितो,

'कोंकण ह्मणजे पृथ्वीकोण । से ( तेथे ? ) विद्यावंत ब्राह्मण ।
ज्यांसि कोंकणे नामाभिधान । देशिक वचन लोकांत ॥'[४५]

अशा प्रकारें पूर्वी जिला 'ब्राह्मणी भाषा' म्हणत, तिलाच पुढें ते कोंकणी भाषा म्हणूं लागले. ब्राह्मणांचा उल्लेख स्टीफन्स, क्रुवा वगैरे जेसुइट पुराणकारांनींहि 'कोंकणे' अशा शब्दानें केलेला आढळतो. स्टीफन्स आपल्या 'दौत्रिना क्रिस्ता'-मध्यें म्हणतो,

---

४२. या बोलींतील काहीं ग्रंथांत भाषावाचक पुढीलप्रमाणें आहेत :—
१. Fr. Thomas Stephens—*Arte da "Lingoa Canarim."* 1640.
२. Fr. Diogo Rebeiro—*Vocabulario de 'Lingoa Canarim,'* Ms. 1626.
३. Fr. Gaspar do S. Minguel—( i ) *Arte de Lingua Canarina.* ( ii ) *Diccionario de Lingua Canarina-Portuguesa.*

४३. Col. H. Yule and Burnell, *Hobson-Jobson*, p. 771.

४४. Molesworth, *Dictionary. Marathi-English*, p. 166.

४५. श्री कोंकणमाहात्म्य, अ. १ ओवी ४४. शके १८११ (पोथी).

हिंदुधर्म वाईट आहे, हें शुणीतरी ख्रिस्ती धर्मप्रसाराच्या दृष्टीनें सिद्ध करणें अवश्य होतें. हें काम करण्यासाठी फादर एतियन द ला क्रुवा यानें एक पुराण रचिलें.

एतियन द ला क्रुवा याचा जन्म फ्रान्समध्यें १५७९ साली झाला. सन १५९९ मध्यें तो जेसुइट सोसायटीला मिळून १६०२ मध्यें हिंदुस्तानांत आला. गोवा येथें आल्यानंतर तेथील भाषा तो लवकरच शिकला त्यानें प्रांथिक मराठी व गोमांतकी बोली यांचा अभ्यास करून त्या भाषा अवगत करून घेतल्या. याविषयीं फादर आलेदस न्होटस यानें १६२१ मध्यें आपल्या प्रवासवर्णनांत पुढीलप्रमाणें लिहून ठेविलें आहे :—

"I had the great pleasure of meeting R. P. Etienne Crucius. He has perfectly mastered the two languages of that Country, the Canarine ( Konkani ) which is in popular use and the Maraste language ( Marathi ) which has the same position as Latin enjoys amongst us. These languages he speaks better than the natives themselves and has published many books in either of these languages which are highly praised by all."[५१]

फादर क्रुवा हा रायतूर येथील सेंट इग्नेशस कॉलेजमध्यें प्रथम शिक्षक होता. पुढें तो तेथेंच मुख्याध्यापक झाला. तो सन १६४३ मध्यें मरण पावला. त्याचा ग्रंथ *Discurso sobre a Vida do Apostolo Sam Pedro em que se refuta os principaes erros do gentilismo—1629.*

फादर क्रुवानें आपल्या ग्रंथाला वरीलप्रमाणें पोर्तुगीज नांव दिलें असून 'ज्यांत हिंदु धर्मातील चुकांचें खंडन केलें आहे असें सेंट पीटरचें चरित्र,' असें त्याचें मराठींत भाषांतर होईल. या ग्रंथाची संपूर्ण प्रत लिस्बनमध्यें असून त्याची मायक्रोफिल्म नक्कल मुंबई येथील मराठी संशोधनमंडळांत आणिली आहे. या ग्रंथाच्या भाषेचा निर्देश लेखकानें 'ब्राह्मण-मारास्ट' असा केला आहे. हें पुराण या. येथील छापखान्यात सन १६२९ (१६३४?)[५२] मध्यें छापण्यांत आलें. या सेंट पीटरचा जीवनक्रम वर्णन करण्यांत आला असून त्यांत 'पूर्वेकडील ६ धर्मातील प्रमुख प्रमादाचें खंडन' केलें आहे. तसेंच ख्रिस्तनांना फादर स्टीफंनीं धर्मातील विविध चमत्कारांचें व प्रमेयांचें विशदीकरण केलें शेरा कै. राजवाडे यांनीं आपलें पुराण लिहिलें; त्यांतून त्यानें नव्या ख्रिस्ती धर्माची

५१. ख्रिस्त पुराण, 'Proceeding of the Asiatic Society of Bengal,
५२. तत्रैव, दुसरें पुराण, p. 158, ( Foot-Note )-
५३. विश्ववृत्त, फेब्रुवारी १[illegible] १६३४ चा [illegible] आहे. हें पुराण [illegible]
५४. ख्रिस्त पुराण, [illegible] ( [illegible] ) सुरुवात होऊन तें १६३४ साली प्रसिद्ध

माहिती करून दिली; परंतु जुना धर्म त्याज्य कां हें नव ख्रिश्चनांच्या गळीं उतर-विण्याचा प्रयत्न फादर क्रुवानें आपलें हें पुराण लिहून केला

सेंट पीटर हा ख्रिस्तकालीन त्याच्या प्रसिद्ध बारा शिष्यांपैकीं एक प्रमुख प्रेषित होता. ख्रिस्ताबरोबर हजर असणाऱ्या तीन शिष्यांपैकीं हा एक होय.[५८] ग्रीक, रोमन वगैरे यहुदेतर लोकांना त्या काळीं Gentios असें म्हणत. अशा लोकांना ख्रिस्ती धर्माची दीक्षा देण्यांत सेंट पीटर हा प्रमुख होता. हे जेंटाईल लोक तेच कोंकणांतील हिंदु लोक अशी कल्पना करून या पुराणाची रचना फादर क्रुवानें केली आहे. इंग्रजी gentile बद्दल पोर्तुगीज Gentios असा शब्द आहे गोव्यामध्यें हिंदूंना उद्देशून हा शब्द आजहि योजतात. हिंदूंनी आपले जुने देव सोडावेत यासाठीं सेंट पीटर त्यांच्या मताचें खंडन करीत आहे, असें दाखवून विष्णु, राम, महेश, गणेश, तुलसी वगैरे देवतांची क्रुवानें विलक्षण थट्टा, उपहास व विपर्यास केला आहे.

हें काव्य तीन पुराणांत विभागलें असून त्याच्या सुमारें पंधरा हजार ओव्या आहेत. हें पुराण लिहिण्याची फादर क्रुवाची भूमिका व पार्श्वभूमि नीट समजली म्हणजे, या पुराणाचें मर्म वाचकांस कळून येतें. क्रुवाच्या या उपहासात्मक पद्धतीचा विशेष कळण्यासाठीं त्यानें लिहिलेलें पुराण मुळांतून वाचल्यास हिंदु देवतांचा उपहास त्यानें कसा केला आहे, हें ध्यानांत येईल. उदाहरणासाठीं क्रुवानें हिंदु देवतांच्या कथा कशा दिल्या आहेत तें पहा :

रामानें सीतात्याग केला व सीतेला लक्ष्मणाच्या हातानें वनांत नेऊन सोडली, ही कथा देऊन विष्णु स्त्रीघातकी आहे, विष्णूनें निरपराध सीतेला वनांत सोडलें. अशा विष्णूला तुम्ही भजतां त्यामुळें घाईट भजनाचा दोष तुम्हांला लागल्याशिवाय राहणार नाहीं, असें क्रुवानें बजावलें आहे. वामनावतारामध्यें ज्या बळीनें विष्णूची सेवा केली, पुण्यधर्म आचरला व विष्णूचा सन्मान केला, अशा बळीला विष्णूनें पाताळांत लोटलें व मोठें दुष्कृत्य केलें, हें विष्णूचें वामनावतारांतील कपटी व कृतघ्न आचरण आहे, असें फादर क्रुवा आपल्या पुराणांत लिहितो. रामानें कपटानें वालीचा घात केला व परशुरामानें आपल्या आईची हत्या केली, हीं मोठीं अनी-तीचीं कृत्यें आहेत असेंहि त्यानें वर्णन केलें आहे. कृष्णाच्या आगलावेपणामुळें कौरवपांडवांचें युद्ध झालें व त्यांत अठरा अक्षौहिणी वीरांचा नाश झाला ही कथा सांगून त्यानें सर्व दोष कृष्णाला दिला आहे. मळापासून गणपति झालेला असल्यानें त्याची पूजा करणें किती वेडेपणाचें आहे हें दाखविणारा दीडशें ओव्यांचा एक स्वतंत्र अध्यायहि या पुराणांत आहे. तसेंच विष्णु, गणेश यांच्याप्रमाणें इंद्र, चंद्र, सूर्य, यम, ब्रह्मा व महेश हे देव नाहींत असें त्यानें आपल्या पुराणांत ठिक-ठिकाणीं प्रतिपादन केलें आहे.

---

५८. सेंट पीटरचें थोडक्यांत चरित्र पहा. *A Concise Bible Dictionary*, p.120

या पुराणाचा दुसरा विशेष म्हणजे यांत अनेक जुन्या हिंदु धर्मग्रंथांचे उल्लेख आहेत. उदाहरणार्थ, योगवासिष्ठ, अश्वमेध, भागवत, मार्कंडेय व द्रोणपुराण इत्यादि धर्मग्रंथांचा त्यानें ठिकठिकाणीं निर्देश केला आहे. हे ग्रंथ मराठी होते कीं संस्कृत होते, हें निश्चित कळत नाहीं. तरी पण ते मराठीच असावेत असें दिसतें. यावरून जेसुइट मिशनरींनीं हिंदु पुराणें मिळवून त्यांचा अभ्यास केल्याचें उघड दिसतें.

विष्णूनें मोहीनीचें रूप घेऊन दैत्यांना फसवून देवांना अमृत वाढलें, या कथेंत विष्णूवर त्यानें टीका केली आहे. फादर क्रुशाची ही मराठी भाषाशैली व खंडन-पद्धति समजण्यासाठीं या पुराणांतील ही विष्णूची कथा पुढें देण्यांत येत आहे :—

माकंड जेंतिव पुराणीं । विस्ट्णु मस्टता बोलिली लिहुनीं ॥
कीं दैत्यां देवां कामव्याणी । भेदावया ॥ ११ ॥
तेणें विस्ट्णें रूप आपुलें । स्त्रीआकारें पालटिलें ॥
येणें कामेंत्र पाडितलें । दोसी वेयायें ॥ १२ ॥
स्त्रीरूप धरोनि सुंदर । मांडिला श्रुंघार परिकर ॥
काम उपजाविलें जिव्हारा । देवां आणी दैत्यांसि ॥ १३ ॥
ऐसा विस्ट्णु दोसाचारी । दोस लावटें आपसेरिरीं ॥
देवां दैत्यां लावटें करी । कामवासनें भिडोनि ॥ १४ ॥
अंयु बोले जेणें प्रकारि । तुमां निरोपावया जिव्हाग्रीं ॥
मन कांपे विटाळ भारि । चिंतितांचि बोलं ॥ १५ ॥
म्हणे तें मानलें दोगांची मनीं । मग देवें रूप धरिलें मोहिनी ॥
ता जाहला तिचे स्थानीं । स्त्रीवेसें ॥ १६ ॥
तें देखोनिआं समस्त । कामें भुलले देव दैत्य ॥
ते म्हणती सुरामृत । वाढि आमां ॥ १७ ॥
मग तेया रचिलीं सुधापात्रें । दैत्या देव कामातुरें ॥
मग वाढी तेआ मधिरा । मोहिनी माया ॥ १८ ॥
ऐसा पुराणाचा उचारू । तुम्हीं आयिकिला समग्रु ॥
विस्ट्णें घेउनि वेस्याकारु । दोसीं पाडिनलें देवां दैत्यां ॥ १९ ॥
अभिमंत्रावेया कामवाण । स्त्रीरूप सुंधरपण ॥
आणि मधुरेंचें वाटपण । आधरिलें तेणें ॥ २० ॥
स्त्रीरूप मांदकी कामशाळ । सुंधरता चडवी उन्हाळ ॥
मधिरा मिळे घृत तेल । विस्ट्णु येनु सादकी कळिपुंजीं ॥ २१ ॥
ऐसी नस्टता विस्ट्णु नस्टु । आचरिजे मगिसोतु ॥
निस्कामपणें तेणें रितु । भंगेया वेरांचें ॥ २२ ॥
पण येनुकें भाव आचरण । दोस स्थावें विरात्पण ॥
नव्हे कायें मोटेपण । अद्‌भुत ऐसें ॥ २३ ॥

म्हणे ऐसा दुर्बुधी भगितनासी । देवो ऐसा कल्पयेयालि ॥
नेणों कैसी तुमांसि । उठिली कल्पना ॥ २५ ॥
तरी विस्तृ तुमंचा । देव नविपेचि देखा ॥
हाचि प्रत्ययो तेयाचा । पुरे गमावेया ॥ २६ ॥[५९]

## ३. फादर आंतोनियु द साल्दान्ज.

फादर स्टीफन्सनें येशू खिस्त व त्याची शिकवण यांची माहिती देण्याकरितां ग्रंथ लिहिले, परंतु उद्धवचिद्घन किंवा महिपति यांनीं जशीं मराठींत हिंदु संत-चरित्रें लिहिलीं, त्याप्रमाणें ख्रिस्ती संतविजय लिहिण्यास आणखी एक पाद्री पुढें आला; तो म्हणजे फादर साल्दान्ज हा होय. याचा जन्म इ. स. १५९८ मध्यें आफ्रिकेंत झाला. याचा बाप पोर्तुगीज व आई इटालियन होती. यानें प्रथम हिंदुस्थानांत लष्करी खात्यांत नोकरी धरली; परंतु पुढें ख्रिस्ती धर्माची ओढ लागल्यामुळें त्यानें इ. स. १६१५ मध्यें गोव्यांत जेसुइट पंथाची दीक्षा घेतली व धर्मशास्त्र व तत्त्वज्ञान या ग्रंथांचा अभ्यास करून तो धर्मोपदेशक बनला. आपलें सर्व आयुष्य त्यानें रायतूर येथें घालविलें व तेथेंच तो इ. स. १६६३ मध्यें मरण पावला. दक्षिण साष्टीमध्यें धर्मप्रसार करीत असतांना त्यानें तेथील प्रचलित स्थानिक बोली व ग्रांथिक मराठी यांचा अभ्यास केला. त्यानें सेंट अँथनीपुराण, जीवनवृक्षाचीं फळें, गोमांतकी बोलीचा एक शब्दसंग्रह व कांहीं धार्मिक चोपडीं लिहिल्याचें नमूद आहे. यांपैकीं पहिल्या दोन ग्रंथांच्या मायक्रोफिल्म मुंबई येथील मराठी संशोधनमंडळांत आहेत. याचे ग्रंथः—

### सांतु आंतोनीची जीवित्वकथा १६५५.

या पुराणांत सेंट अँथनी हा निरनिराळ्या देशांत ख्रिस्ती धर्माचा प्रचार करीत असतांना त्यानें केलेले चमत्कार पाद्री साल्दान्ज यानें वर्णन केले आहेत. त्यांत शास्त्रवचन ऐकण्यासाठीं मासे उड्या मारून पाण्याबाहेर आले व शास्त्रवचन ऐकूं लागले. दुसऱ्या दिवशीं शास्त्रवचन ऐकत असतांना वादळ होऊन आकाश दणाणून भरून आलें; पण सेंट अँथनीचा धर्मोपदेश चालू असतां कोणी भिजला नाहीं. अशा तऱ्हेचे चमत्कार यांत आहेत. हें पुस्तक मुंबई संशोधन-मंडळातर्फे प्रा. अ. का. प्रियोळकर यांनी संपादित करून प्रकाशित केलें आहे. साल्दान्झ याच्या पुराणाच्या भाषेचें स्वरूप समजण्यासाठीं एक उतारा पुढें देण्यांत येत आहेः—

येकि सजनि पतिव्रता नारि । पुत्र नाहीं देखोनि आपुलो घरीं ॥
म्हणउनि नित्यकाळ चिंता करी । आपुलां जिवीं ॥ ३९३ ॥
सदैवा भगता सांतु आंतोनिसि । शेरण गिगाली येके दिवसीं ॥
योरि काणिव कृपा भगतापासीं । भाकोनि म्हणे ॥ ३९४ ॥

५९. सेंट पीटरचें पुराण, दुसऱ्या पुराणाचें पांचवें कांड, अवस्वर २२ (ओव्या १-२६ )

ये सदैवा भगता माजे निमितीं । प्राथेना करोनि स्वर्गपती ॥
निपुत्र खंडोनि पुत्रवंति । ऐसें करि कां मज ॥ ३९५ ॥
तंव देवभग्तु म्हणे तिये नारी । तूं पुत्राव पावसी गे संसारीं ॥
तो पुतु देव इग्रजे भितुरी । स्यरट्ट होएल ॥ ३९६ ॥
सांव फ्रान्सिस्काचे ओर्दिचा । रेलिजिओजु देवभग्तिचा ॥
आणी देवशास्रा निनिचा । मार्तिरि होएल ॥ ३९७ ॥
आणी तेआ वरि बहूतेरां जनां । तो होएल पितेया समान ॥
मार्तिरां भगतांचं उपदाम । करिल तोचि ॥ ३९८ ॥
जें वचन देवभगतें बोलिलें । तिये नारिसि तेणें सांगितलें ॥
मग तेंचि वचन साच जाहालें । फळस्त होउनि ॥ ३९९ ॥[६०]

फादर साल्दाञ्ज यानें मराठी भाषेंत हें पुस्तक लिहिलें आहे, त्याप्रमाणें तें पुराण गोमांतकी बोलींतहि गद्यांत आहे.

प्रस्तुत पुराणकार हा मुक्तेश्वर, रामदास, तुकाराम यांच्या समकालीन आहे; परंतु मराठी ग्रंथाची भाषा पहातां तुकाराम रामदासकालीन भाषेचें प्रतिबिंब याच्या भाषेंत दिसावयास पाहिजे तें दिसत नाहीं. ती भाषा बरीच जुनी दिसते.

भाषेसंबंधीं हें विधान सर्वच जेसुइट वाङ्मयाला लावतां येईल. तेव्हां याला काय कारणें असावीत तें पाहूं : जेसुइटांचें ज्या प्रदेशांत वास्तव्य होतें, त्या गोमांतकांतील सासष्ट प्रांतांतील प्रचलित बोलीचें स्वरूप ग्रांथिक मराठीपेक्षां निराळें होतें. दुसरें त्यांच्यापुढें जे जुने हिंदु मराठी ग्रंथ होते त्यांचा किंवा स्टीफन्स, कुवा या खिस्ती मराठी कवींच्या वाङ्मयाचा अभ्यास करून साल्दाञ्ज यानें आपला ग्रंथ लिहिला असला पाहिजे. गोव्यांत बऱ्याच हिंदूंचा छळ होऊन त्यांचे धर्मग्रंथ हिसकावून घेण्यांत आले त्यापैकीं कांहीं ग्रंथ त्यांनीं जाळले व कांहीं ग्रंथ अभ्यासाकरितां राखून ठेविले असावेत. अर्थात् हे ग्रंथ शंभर दीडशें वर्षांमागचे असले पाहिजेत. अशा ग्रंथांचा अभ्यास केल्यामुळें जेसुइट मिशनरींच्या पुराणांत एकनाथानें ज्ञानेश्वरी शुद्ध करण्याच्या पूर्वीची किंवा महानुभावांच्या भाषेसारखी भाषा पहावयास सांपडते.

छापण्याची कला इकडे जुन्या काळीं नसल्यामुळें आपल्या संतांचे ग्रंथ मुद्रित स्वरूपांत न येतां, हस्तलिखित स्वरूपांतच राहिले व त्यांची नक्कल करतांना मूळ लेखकाच्या ग्रंथाच्या अनेक नकला झाल्या. त्यामुळें मुळाचें आधुनिकीकरण, अशुद्ध लेखन, प्रक्षेप, अवक्षेप असे बदल झाले व मूळ ग्रंथाच्या स्वरूपापासून आपल्याकडील संतांचें वाङ्मय फार दुरावलें. खिस्ती मिशनरी जें वाङ्मय लिहीत

६०. सांतु आंतोनीची जीविंतकथा (ओव्या ३९२–३९९).

तें बॅरेचसें मुद्रित आहे. हे ग्रंथ ग्रंथकर्त्यांच्या देखरेखीखालीं छापलेले असल्यामुळें त्यांचें महत्त्व मूळ हस्तलिखिताप्रमाणें मानावयास मुळींच हरकत नाहीं. यामुळेंच त्यांच्या ग्रंथांत बदल किंवा आधुनिकीकरण झालें नाहीं. जेसुइट मिशनरींच्या ग्रंथांची भाषा जुनी कां राहिली याला वर लिहिल्याप्रमाणें कारणें आहेत.

खिस्ताच्या वधस्तंभावरील काव्यें :

१. काव्य पहिलें :

फादर क्रुवानें " Poem of Passion " या नांवाचें एक काव्य मराठींत लिहिल्याचा निर्देश सांपडतो. हें काव्य दर शुक्रवारीं साळशी येथील चर्चमध्यें म्हटलें जाई व तें ऐकण्यास लांबून लोक येत असत अशी यासंबंधीं माहिती मिळते. क्रुवानें लिहिलेलें हें काव्य कोणतें हें नक्की सांगतां येणें शक्य नाहीं. प्रा. अ. का. प्रियोळकर यांनीं मुंबई विद्यापीठाच्या जर्नलमध्यें संपादून प्रसिद्ध केलेलें 'खिस्ताचें वधस्तंभारोहण' तें हेंच असावें असा त्यांचा तर्क आहे[६१]

२. खिस्ताचे वधस्तंभारोहणावरील काव्य-दुसरें :

हें काव्य अप्रकाशित आहे. याच्या ओव्यांची संख्या शंभर आहे. याचा कर्ता कोण हें कळत नाहीं.

३. खिस्ताचें वधस्तंभारोहणावरील काव्य-तिसरें :

हें काव्य पोर्तुगालमध्यें आहे. त्याचे फोटो मुंबई येथील मराठी संशोधन-मंडळांत आहेत.

४. जुवांव द माथियस.

" Biblioteca Lusitana " या ग्रंथांतील माहितीप्रमाणें पोर्तुगीज फादर जुवांव द माथियस यानें कार्डिनल बालारमिन याच्या " Symbolode Fe " ( Symbol of Faith ) या ग्रंथाचें भाषांतर दोन हजार ओव्यांत केलें.[६२] त्यांत खिस्ताच्या जीवनाची कथा पुराणाप्रमाणें वर्णन केली आहे. पण हा काव्यग्रंथ उपलब्ध नाहीं.

गोमंतकी बोलींतील जेसुइटांचे ग्रंथ.

प्रांथिक मराठींत ज्याप्रमाणें वरील जेसुइट मिशनरींनीं ग्रंथ लिहिले तसेच गोमंतकी बोलींतहि कांहीं मिशनरींनीं ग्रंथ लिहिले आहेत. या बोलीचा ते Lingua de terra corrente, Lingua Bramana, Bramana Canarim, किंवा

---

६१. *The Journal of the University of Bombay*, *Vol.* IX. Part. 2. September 1940.

६२. J. H. de Cunha Rivara, *Ensaio Historico da Lingua Concani*, 1857, p. 131.

Bramana vulgar असा निर्देश करतात. या बोलीला कोंकणी हें नांव फार उशीरां मिळालें. या बोलींत फादर स्टीफन्स यानें 'दौत्रिन क्रिस्तां' नांवाचा ग्रंथ लिहिला त्याचा उल्लेख वर आलाच आहे. या बोलींत लिहिलेले दुसरे कांहीं ग्रंथ :—

५. फादर दियोगु रिबैर.

गोव्याच्या बोली भाषेत लिहिणारा हा प्रमुख लेखक होय. याचा जन्म १५६० मध्यें झाला व हा सन १६३३ मध्यें मरण पावला. यानें गोवा येथें पन्नास वर्षे मिशनरी कार्य केलें. यानें फादर स्टीफन्सच्या कानारीं भाषेचें व्याकरण सुधारून वाढविलें, हें मागें सांगितलेंच आहे. याशिवाय मूळ कोणीतरी रचलेला कोंकणी-पोर्तुगीज शब्दकोश यानें १६२६ मध्यें सुधारून वाढविला. हा कोश गोवा येथें हस्तलिखित स्वरूपांत आहे.

—*Declaracao de Fé Christã.*

दियोग रिबैर यानें गोव्याच्या बोलीभाषेंत 'क्रिस्तावांच्या दोत्रिनीचा अर्थु' हें पुस्तक लिहिलेलें आढळतें. हें पुस्तक रायतुर येथें सन १६३२ मध्यें छापलें गेलें. याची मायक्रोफिल्म नक्कल मुंबई येथील मराठी संशोधन-मंडळांत आहे.

६. फादर मिंगेल द आल्मैद.

फादर रिबैर याच्याप्रमाणें या बोलीभाषेंत लिहिणारा दुसरा लेखक म्हणजे फादर मिंगेल द आल्मैद हा होय. याचा जन्म पोर्तुगालमध्यें सन १६०७ मध्यें झाला. तो सन १६२४ त गोव्याच्या सोसायटींत आला व सन १६८५ मध्यें साश्टी येथें मरण पावला. कांहींच्या मतें तो गोवा येथें सन १६८७ मध्यें मरण पावला. याचे ग्रंथ : *Jardim dos Pastores* (धनवाल्याचो मळो) १६५८.

यानें गोव्याच्या बोलीभाषेंत वर दिलेला ग्रंथ तीन भागांत मिळून लिहिला आहे. या ग्रंथाच्या पहिल्या भागाचें नांव Jardim dos pastores e Pasto de Almas. (Garden of Shepherds and the Food of Soul) हें आहे. हा पहिला भाग[६३] गोव्यामध्यें सेंट पॉल कॉलेजांत सन १६५८ मध्यें छापला असून त्याचीं ५५७ पृष्ठें आहेत. तिसऱ्या (१६५८) व पांचव्या (१६५९) भागाच्या मायक्रोफिल्म प्रती मराठी संशोधनमंडळांत आहेत.

६३. या ग्रंथाचा परिचय हॉस्टेननें "*The Examiner*" या साप्ताहिकांत करून दिला आहे. पहा : *The Examiner*, Bombay. vol, 13 Nos. 29, 30, 31, 32 & 33. 22 nd July to August 1922. pp. 288–289; 297–298; 308–309; 318–319 & 326-328.

फादर आल्मेद यानें इतरहि कांहीं पुस्तकें लिहिल्याचा निर्देश आढळतो. Biblioteca Lusitana या ग्रंथांत माहिती दिल्याप्रमाणें फादर रिबेरु याचा कोंकणी-पोर्तुगीज शब्दकोश त्यानें सुधारून वाढविल्याचें दिसून येतें.

६. जुयांव द पेद्रोझ.

याचा जन्म पोर्तुगाल येथें सन १६१६ मध्यें झाला व सोसायटी ऑफ जिझस या संस्थेमध्यें सन १६३२ मध्यें त्यानें प्रवेश केला. रायतूर येथील कॉलेजचा हा रेक्टर होता. हा इ. स. १६७२ मध्यें गोव्यांतच मरण पावला. याचा ग्रंथ :

*Soliloquios Divinos* ( 'देवाचीं एकाग्र बोलणीं' )

यानें कोंकणींत हें पुस्तक भाषांतरित केलें असून तें सन १६६० मध्यें सेंट झेवियरच्या कॉलेजच्या छापखान्यांत छापलें गेलें. कोंकणींत या ग्रंथाला नांव 'देवाचीं एकाग्र बोलणीं' असें मूळ कर्त्यानेंच दिलें आहे.

या पुस्तकाशिवाय यानें धार्मिक विषयावर कांहीं कोंकणी पुस्तकें लिहिल्याचें नमूद आहे.

८ पाद्री फ्रान्सिस्क शाव्हियेर :

यानें लिहिलेलीं पुस्तकें :

1. *Grammatica da lingua Concani* :

हें व्याकरण पाद्री फ्रान्सिस शाव्हियेर या इटालियन मिशनरीनें कानारी (कोंकणी) मध्यें लिहिलें आहे. सन १८५९ मध्यें कुन्ज रिव्हार यानें तें संपादून प्रसिद्ध केलें. हा ग्रंथ स्टीफन्सच्या व्याकरणाहून अलिकडचा, असें संपादकानें लिहिलें आहे; परंतु त्याचा किंवा त्याच्या कर्त्याचा काळ नमूद केलेला नाहीं.

ह्या व्याकरणकारानें बाळबोध लिपीसंबंधानें लिहून ती 'बाळचंद' किंवा नागर या लिपीपासून कांहीं अक्षरांनीं निराळी आहे व मोडी ही मात्र खरी मराठी आहे असें म्हटलें आहे. ऋ, ॠ, व ऌ, ॡ हे चार स्वर सोडून १२ स्वर व ३६ व्यंजनें त्यानें मानलीं आहेत. तसेंच जोडाक्षरें व अंक यासंबंधींहि विस्तृत विवेचन केलें आहे. या भागांतील एका उतार्‍यावरून हा व्याकरणकार कुकेरी (कारवार) येथील राहणारा होता हें स्पष्ट होतें.

२. पोर्तुगीज-कानारी कोश :

याचें माहिती दिलेल्या कोंकणी-पोर्तुगीज शब्दकोशाप्रमाणें हा शब्दकोश गोव्यामध्यें आहे. पण हा केव्हां लिहिला गेला, हें माहीत नाहीं. याची प्रत गोव्याच्या सरकारी ग्रंथालयात आहे.

जेसुइट वाङ्मयाचे विशेष :

जेसुइट वाङ्मयाचा विशेष म्हणजे, त्याच्या ग्रंथांची भाषा मराठी असून लिपि मात्र देवनागरीऐवजीं रोमन आहे. याचें एक कारण म्हणजे छापखान्यासाठी

(माझी बायको फ्रान्सिस्कन सांभाळतो आहे व पावलिस्तिन (जेसुइट) माझे पैसे राखतो आहे.)

या दोन कारणांप्रमाणेंच तिसरेंहि एक कारण घडलें. सतराव्या शतकाच्या मध्यास फ्रान्सिस्कन पाद्री व हिंदुस्तानांत वाढून तयार झालेले देशी पाद्री यांच्यामध्यें बारदेश येथील चर्चच्या मुख्य जागा कोणास मिळाव्या, याबद्दल वाद चालू झाला. हा वाद शतक दीड शतक चालू होता. शेवटीं फ्रॅन्सिस्कन पाद्र्यांनीं पोर्तुगीज सरकारकडे व पोपकडे तक्रार केली. याचा परिणाम असा झाला कीं, इ. स. १६८४ मध्यें देशी भाषांचा व्यवहार बंद करण्यासाठीं एक कायदा करण्यांत आला. या कायद्यान्वयें गोवा प्रांतांत देशी भाषेमधील व्यवहार बंद करून पोर्तुगीज भाषेंत सर्व व्यवहार तीन वर्षांच्या आंत सुरू करावा, अशी सक्ति चालू झाली.[७०] याचा परिणाम असा झाला कीं, परकीय मिशनरींवर देशी भाषा शिकण्याची जी जबाबदारी होती, ती नाहींशी झाली व जेसुइट व इतर मिशनरी यांच्या मागची देशी भाषा शिकण्याची कटकट दूर होऊन त्यांच्या हातून मराठी भाषेंत होणारी ग्रंथनिर्मिति बंद पडली.

**फ्रान्सिस्कन पंथीयांचें मराठी वाङ्मय.**

जेसुइट मिशनरीप्रमाणें फ्रान्सिस्कन मिशनरींनींहि मराठींत ग्रंथरचना केली असावी; पण गासार द. सा. मिंगेल या पाद्रीच्या स्टीफन्सच्या प्रशस्तीशिवाय त्यांचीं कार्यें उपलब्ध नाहींत याचे दुसरे ग्रंथ म्हणजे यानें, 'ख्रिस्ताचे शूळावर आरोहण' या विषयावर तीन हजार ओव्यांचें एक काव्य रचिलें असून 'विवेकमाळा' या नांवाचें दुसरेंहि सहा हजार ओव्यांचें एक काव्य यानें लिहिल्याचा उल्लेख आढळतो. पण यानें लिहिलेले वरील ग्रंथ कोठेंच उपलब्ध नाहींत. फक्त स्टीफन्सच्या गौरवपर अशा चौदा ओव्या त्याच्या लेखनाचा नमुना म्हणून उपलब्ध आहेत. पहा :—

साधु चतुरागु पाद्री । ह्या पुराणाचा अदिकारी ॥
थोमास इस्तेव्हं कविरत्नसुंधारीं । मिरवला चांगु ॥ १ ॥
त्याचे उतम सत्वगुण । पर उपेगी आचरण ॥
देवसेवेंसि उतावीळ मन । जाणते पुराण कर्तेत्रें ॥ २ ॥
तेआ आगी नामा ज्योति पडे । हें तेआ ठायिं घडे ॥
ऐसें आपुलेनि कैवाडें । जगजीवनें केलें ॥ ३ ॥
जरीइ ता निमाला । तरीइ जितुचि उरला ॥
आयेला सरी निरयकाल । बोलतसे ॥ १२ ॥
ऐसा हा साधु महंतु । महंतु ना जिवंतु ॥
प्रसिध पुराणीं जितां आंतु । बोलतो देंगोनि ॥ १३ ॥

७०. J. H. de Cunha Rivara, *Ensaio Historico da Lingua Concani*, p. LXXI.

तेआसी सकळांचा नमस्कारु । भावधेयांसि केला उपेगु थोरु ।।
तेणें धर्मदानाचा मेरु । अर्पिती देवा ॥ १४ ॥[७१]

उत्तर कोंकणांतील जेसुइट वाङ्मय :

आतांपर्यंत गोवा, साष्टी येथील मिशनरींनीं मराठी भाषेंत कोणतें वाङ्मय निर्माण केलें, याचा आढावा घेतला. या भागांना दक्षिण कोंकण ही संज्ञा आहे. परंतु जेसुइट मिशनरींनीं कोंकणाच्या उत्तरेकडील भागांत म्हणजे मुंबई, वसई या ठिकाणीं राहून कांहीं ग्रंथनिर्मिति केली आहे. उत्तर कोंकणांत काम करणारे जे जेसुइट, फ्रान्सिस्कन किंवा अन्य विदेशी पाद्री होते, त्यांना धर्मप्रसारासाठीं याच भागांतील बोलीचा अभ्यास करावा लागला. या बोलींतच उत्तर कोंकणी बोलीच्या अभ्यासासाठीं त्यांनीं लिहिलेलीं दोन व्याकरणाचीं पुस्तकें, एक कोश, एक पुराण व ख्रिस्ती धर्माची प्रश्नोत्तरावळी असे पांच ग्रंथ उपलब्ध आहेत.

१. *Puran da Encarnacao, Paixao e Morte de N. S. Jesus Cristo. Na Lingua Vulgar.* 1845. ( देवनागरी प्रत १९२३ ).

ह्या ख्रिस्ती पुराणाचा लेखक Francisco Vaz de Guimaraes होता, अशी समजूत आहे. उत्तर कोंकणांतील मराठी भाषेंचें हें ख्रिस्तपुराण आहे. याची पहिली आवृत्ति सन १६५९ मध्यें लिस्बन येथें छापली असें म्हणतात; पण ती कोठेंहि उपलब्ध नाहीं. त्यानंतर या पुराणाच्या हस्तलिखितांवरून १८४५ सालीं व त्यानंतर कांहीं आवृत्त्या मुंबईंत छापण्यांत आल्या. या रोमन लिपींतील पुराणाचें देवनागरी लिप्यंतर करण्यांत येऊन तें इ. स. १९२३ मध्यें प्रसिद्ध झालें. हें पुराण फादर फ्रांन्सिस्कु गिमारांइस यानें लिहिलें आहे, अशी समजूत असल्याचें वर म्हटलें आहे; परंतु अलिकडच्या संशोधनावरून या नांवाचा कोणीहि जेसुइट हिंदुस्तानांत आला, असें दिसत नाहीं.

या पुराणाचे एकंदर ३६ अध्याय असून हा लेखक कथा (Cantha) असें त्यांना नाव देतो. खरोखर पाहतां या ३६ कथा असून सुमारें त्याच्या सोळा हजार ओळी आहेत. या पुराणाची भाषा मराठी आहे. मात्र प्रत्येक कथेचें शीर्षक पोर्तुगीज भाषेंत आहे. या पुराणाच्या भाषेवर अभिप्राय देतांना सर मिचेल म्हणतो,

"The language is neither more or less than a debased Marathi with a considerable admixture of Gujarati and Hindustani." ७२

७१. Father Thomas Stephens, *The Christian Puranna* ( Edited by J. L. Saldanha ), *In Laudem Auctoris pelo Frei Gaspar de S. Miguel. Religioso do Patriarca S. Francisco.*

७२. *The Journal of the B. B. R. A. S. Vol. III*, January 1849, p. 134.

फ्रान्सिस्कु वाज़ द गिमारांइस याच्या नांवावर असलेल्या या पुराणाची कल्पना येण्यासाठी त्याच्या पुराणांतील येशू रडत असतांना मेरीनें म्हटलेल्या पाळण्याचा एक उतारा देण्यांत येत आहे.

## गांडोलं

नीज घे बाळा
डोळे थडक आयं
निजेसीं कष्ट
विसरतान.

हीं आसवं तुजीं,
बाळा माजे जीवीं
को करतेस कष्टी
मावलीला ?

कराल फाजील करूं लागला
कां तो घाय आंगाला,
दूखूं फाजील लागला
हिंवार्सी.

पाळण्या पुत्रा नंई
तुला मापर अर्थीं,
नको होऊ कष्टी
माज्या जीवा.

जेजूस दूर्नींचा संतोस
आज मावलीपर कष्टी,
का करूं तुला अर्थीं
माज्या बाळा.

वायोचा त्रास
तुजे आंगीं पैसा,
माने जीवीं कैसा
पावला नंथी.

देयदूतांचो सुमी,
आणा अर्थी खेळवणीं,
कां मापर नई
निरवाण.

घोटारनी घातला वाळ
हुसरून कुरवाळूं लागली,
गाऊं लागली गांडोलीं
विरजे मरी.

बापासर्सी स्वारगीं
राज्य भोगीतेस खुशी,
अर्थीं मावलीपर कष्टी
दुनीत.

आसवं रडत्याचीं
तूं पुसीतेस स्वारगीं,
आणि आज हीं तुजीं
होदारत नई.

आना आणि ज्याकी
मायबाप माजीं,
धू बगूं या नई
कष्टी.

नावचाला खेळवणीं
हाना अर्थी वनीं,
आसवांच्या नदी
विरजे मरीचे डोळीं.

यें तुजं सल्र रूप
अर्थीं माज्या बाळा,
कैसा झायलास कुरूप
माज्या मोगाळा.

नीज घे बाळा
विसर दे मावलीला,
अर्थीं माजे कष्टाला
नईं धीरा संगात.[९३]

उत्तर कोकणांतील पळशे ब्राह्मण, पांचकळशी, पाठारे प्रभु वगैरे आद्य रहिवाशांची ही बोली आहे. 'हुंडा' या नाटकांत त्रिलोकेकर यांनीं एका परभाच्या तोंडीं ती घातली आहे. अलिकडे या शिकलेल्या लोकांनीं ह्या बोलीचा त्याग करून प्रांतिक मराठी स्वीकारली असली तरी, वसईचे पानवाले व दूधवाले ती अद्याप बोलतात.

२. *Gramatica Marastta*, 1805.

हें व्याकरणाचें पुस्तक प्रथम १७७८ सालीं रोममध्यें मुद्रित झालें. याची दुसरी आवृत्ति सन १८०५ मध्यें लिस्बन येथें सरकारी छापखान्यांत छापण्यांत आली. निजामशहा व अदिलशहा यांच्या राज्यामध्यें जास्त प्रचलित असलेल्या मराठीचें हें व्याकरण त्या भागांत धर्मप्रचार करणाऱ्या मिशनरींच्या उपयोगाकरितां असल्याचा मुखपृष्ठावर निर्देश करण्यांत आला आहे.

यांत काहीं शब्दांचे पोर्तुगीज अर्थ कसे देण्यांत आले आहेत ते पहा:—

Sambagy — Hum Rei dos Maratas (मराठ्यांचा एक राजा).
Pessawa — O Primeiro Ministro do Reino. ७४
(राज्याचा मुख्य प्रधान).
Buda — O Mercurio.
Braspati — *A* Venus.
Xany — O Saturno.
Cartica — Novembro.
Magxira — Dezembro. ७५

वर दिलेल्या शब्दांत संभाजी म्हणजे मराठ्यांचा एक राजा असा उल्लेख करण्यांत आला आहे. त्यावरून हें व्याकरण प्रथम संभाजीच्या काळीं लिहिलें गेलें असावें. या व्याकरणाची एकंदर पन्नास पृ. आहेत. या पुस्तकाची रोममध्यें मुद्रित झालेली १७७८ ची पहिल्या आवृत्तीची मायक्रोफिल्म मराठी संशोधनमंडळानें जर्मनीहून आणविली आहे.

३. *Grammatica da Lingua Concani no dialecto do Norte*, 1858.

'उत्तरेकडील कोंकणी बोलीचें व्याकरण' असें या पुस्तकाचें नांव आहे. हें व्याकरण फादर स्टीफन्सच्या 'Arte de Lingoa Canarim' म्हणजे गोव्याकडील व्याकरण पुढें ठेवून सोळाव्या किंवा सतराव्या शतकांत तयार केलेलें दिसतें. इ. स. १८५८ मध्यें गोवा सरकारचे सेक्रेटरी मि. कुन्ह रिव्हार यांनीं तें संपादन

७३. पुराण स्वामींचा जेसुइट क्रिस्तांचें (जनन, मरण, सजीवपण यांचा कथारूपी इतिहास) केदार आवृत्ती, पृ. ६१-६१.
७४. *Grammatica Marastta*, p. 17.
७५. *Ibid.*, p. 18.

प्रथम प्रसिद्ध केलें. याची भाषा व वर सांगितलेल्या 'ग्रामातिका मराट्टा' ची भाषा एकच आहे. उत्तर कोंकणीचें व्याकरण असें जें नांव त्याला देण्यांत आलें आहे, तें मूळ लेखकाचें नसून संपादकानें दिलेलें असावें असें दिसतें.

४. *Vocabulario da lingua Canarim do Norte concertado e acrescentado em* 1664.

उत्तरेकडील एतद्देशीय भाषेचा हा कोश आहे. याची एक प्रत लंडन येथील स्कूल ऑफ ओरिएंटल स्टडीजच्या मार्सडेन हस्तलिखिताच्या संग्रहांत आहे.[७६] हा कोश अद्याप छापला गेला नाहीं. याची मायक्रोफिल्म मुंबई येथील मराठी संशोधनमंडळांत आहे.

५. *Cathechismo da doutrina Christam*, 1778.

हें पुस्तक ब्रिटिश म्युझियममध्यें असून[७७] त्याचीहि मायक्रोफिल्म मुंबई येथील मराठी संशोधनमंडळांत आहे. उत्तर कोंकणी बोलीतील ही प्रश्नोत्तरावळी रोमन लिपींत आहे. ही प्रश्नोत्तरावळी कोणीतरी पोर्तुगीज मिशनरीनें लिहिली असावी असें वाटतें; कारण यावर लेखकाचें नांव नाहीं. याचीं एकंदर १४३ पृष्ठें आहेत.

**ग्रांथिक मराठींतील कांहीं ग्रंथ :**

**सर्वेश्वराचा ज्ञान उपदेश :**

पेशवाईच्या काळांत कोणीतरी पाद्रीनें महाराष्ट्रांतील लोकांकरितां हा ग्रंथ लिहिला असावा. हें मूळ हस्तलिखित पुस्तक स्कूल ऑफ ओरिएंटल अँड आफ्रिकन स्टडीज, लंडन या ठिकाणीं असून त्याची मायक्रोफिल्म प्रत मुंबई येथील मराठी संशोधनमंडळांत आहे. याचा लेखक व लेखनकाल समजत नाहीं. या पुस्तकांत धर्मोपदेशाचा बराच भाग आहे. त्यापुढें कांहीं मंत्र व प्रार्थनाहि देण्यांत आल्या आहेत. उपदेशाचे सहा भाग आहेत.

जेसुइट मिशनरींच्या मराठी वाङ्मयास फादर स्टीफन्स याच्यापासून सुरुवात होऊन पन्नास साठ वर्षें मराठी भाषेंत जेसुइट लोकांनीं ग्रंथनिर्मिति केली. हिंदुस्थानांत प्रथम येऊन देशी भाषांचा अभ्यास करून वाङ्मयनिर्मिति करणारे जेसुइट हेच पहिले युरोपियन होत. त्या दृष्टीनें या वाङ्मयाचें महत्त्व विशेष मानलें पाहिजे. यानंतर ईस्ट इंडिया कंपनी स्थापन होऊन व्यापारानिमित्त इंग्रजांचा मराठ्यांशीं संबंध येऊन त्यांना देशी भाषांचा अभ्यास करावा लागला. त्याची माहिती पुढील भागांत देण्यांत येत आहे.

७६. *Bulletin of the School of Oriental Studies*, Vol. III, 1923-25, p. 146.

७७. J. F. Blumhardt, *Catalogue of Marathi and Gujarati Printed Books in the Library of the British Museum*, p. 25.

# युरोपियनांचा मराठीचा अभ्यास व सेवा

## युरोपियनांचा शिवकालीन महाराष्ट्रांतील भाषिक व्यवहार

जेसुइट मिशनरींच्या पाठोमागून इंग्रज हे महाराष्ट्रांत व मराठ्यांच्या मुलखांत आल्यानंतर त्यांचा मराठी भाषेशीं संबंध आला. यांपैकी कांहीं इंग्रज फिरते प्रवासी होते. निरनिराळ्या ठिकाणीं फिरतांना त्यांना जेवढा कांहीं प्रदेश दिसेल त्याचें निरीक्षण करणें व या आपल्या प्रवासाचें वर्णन लिहून त्याची माहिती आपल्या देशबांधवाना देणें, हेंच त्यांचें काम असे. मूळचेच चौकस बुद्धीचे असल्यामुळे त्यांनीं सर्व लोकांच्या आचारविचारांचें निरीक्षण केलें. तें करतांना त्यांना भाषेची जी अडचण आली ती स्थानिक भाषाभ्यासानें त्यांनीं दूर केली. फार पूर्वीपासून इराणच्या आखातांतून हिंदुस्तानांतील माल परदेशांत जात असे व परदेशांतील माल त्याच मार्गानें हिंदुस्तानांत येत असे. त्यामुळें परदेशांतील व हिंदुस्तानांतील लोकांना फारसी व अरबी या भाषा अवगत होत्या. इंग्रजांनीं भाषांकडे अभ्यासाच्या दृष्टीनें पाहिलें नाहीं तरी व्यापारी कारणांसाठीं व दळणवळणाच्या निमित्तानें त्यांच्याकडून अरबी भाषा उपयोगांत आणली जात होती. यांविषयीं पर्शियन, अरेबिक आणि इंग्लिश या शब्दकोशाच्या प्रस्तावनेंत त्याचा लेखक जॉन रिचर्डसन् म्हणतो,

"In various other lights, the usefulness of the Persian and Arabic languages will appear evident, on the slightest examination. The high political consequence of the Persian, in the affairs of India, is too obvious and too generally acknowledged to require arguments to enforce it; whilst the Arabic, totally neglected, or studied with inattention, has never been viewed, in Hindostan, by Europeans, in the important light it merits. Yet the intercourse which the Arabians have maintained with that country is ancient and intimate.(१)"

केप ऑफ गुडहोपच्या वळसा घालून हिंदुस्तानांत येण्याचा मार्ग युरोपियन लोकांना माहीत झाल्यानंतर पुष्कळ पाश्चात्य लोक हिंदुस्तानांत येऊं लागले, व जे इंग्रज लोक येथें आले त्यांना वरील भाषांच्या परिचयामुळें कुठेंहि संचार करण्यास अडचण पडली नाहीं.

फादर स्टीफन्स हा पहिला इंग्रज येथें आल्यानंतर, राल्फ फिच् हा त्याचा

---

१ John Richardson. *Dictionary Persian, Arabic and English, Dissertation. 1806.* pp. vii–viii.

देशबंधु सन १५८३ मध्यें हिंदुस्थानांत येण्यासाठीं निघाला. येथें येत असतांना हा हेर असें समजून पोर्तुगीज सरकारनें त्याला पकडून गोव्यांत ठेवलें. गोव्यांत असतांना त्याची व स्टीफन्सची मैत्री झाली. त्याच्या मदतीनें राल्फ फिच् सुटला व न्याय-निवाड्याची वाट न पहातां तेथून पळून गेला. तो १५९१ पर्यंत हिंदुस्तानांत आग्रा, बनारस, पाटणा व बंगाल येथें भटकून परत गेला. फिच्नें येथें ज्या कांहीं गोष्टी पाहिल्या त्यांची माहिती त्यानें आपल्या प्रवासवर्णनांत दिली आहे.(२) पण भाषेसंबंधीं त्यानें कोठेंहि उल्लेख केला नाहीं. फिच्बरोबर असलेला दुसरा प्रवासी जॉन न्यूबेरी यालाहि पोर्तुगीज सरकारनें पकडून गोव्यास आणिलें होतें. फिच्सोबर तोहि गोव्याहून पळाला. त्याला असी भाषा बोलतां येत असल्यामुळें(३) त्या दोघांना प्रवासांत कोठेंहि अडचण झाली नाहीं असें दिसतें. सन १५९१ मध्यें इंग्रजांनीं हिंदुस्तानाशीं व्यापार करण्याचा प्रारंभींचा प्रयत्न केला. त्यांनीं कॅप्टन रेमंड याच्या बरोबर तीन जहाजें भरून माल पाठविला;(४) परंतु त्यांचा हा प्रयत्न अयशस्वी ठरला. तीनपैकीं अवघें एकच जहाज हिंदुस्थानांत येऊन पोहोंचलें व तेंहि परत जातांना नाश पावलें. त्या जहाजांवरील अधिकारी कॅप्टन लँकास्टर याच्या अनुभवाचा फायदा मिळून इंग्रजांचा पूर्वेकडील देशांशीं संबंध वाढला(५) आणि हिंदुस्तानाशीं व्यापार करण्याचे प्रयत्न त्यांनीं जोरांत सुरू केले.

यासाठीं कांहीं उत्साही इंग्रज व्यापाऱ्यांनीं एलिझाबेथ राणीकडे हिंदुस्तानशीं व्यापार करण्यास परवानगी मिळावी असा अर्ज केला. ता. ३१ डिसेंबर १६०० रोजीं राणीनें हा अर्ज मंजूर केला व अशा रीतीनें ईस्ट इंडिया कंपनीची स्थापना झाली.(६) या कंपनीच्या निमित्तानें इंग्रजांनीं हिंदुस्थानांत कसा प्रवेश केला, याविषयीं ग्रांट डफ लिहितो,

"इंग्लिश सरकार कंपनी बहादुर या नामाचें अर्थसूचन व त्या इंग्लिश लोकांहीं हिंदु मुलखीं कोणेंनिमित्तें प्रथम प्रवेश केला तें प्रकरण.(७)"

२ Sir William Foster, *Early Travels in India.* pp. 19-25.

३ *J. Courtney Locke. The First Englishmen in India.* p. 97.

४ F. C. Danvers. *The Portuguese in India Vol, II.* p. 108.

५ Hon. Mountstuart Elphinstone, (Ed. Sir E. Colebrooke) *The Rise of the British Power in the East.* p. 29.

६ Major General Sir John Malcolm. *The Political History of India, Vol. I.* pp. 12-13.

७ कॅप्टन ग्रांट डफ (भाषांतर—कॅप्टन डेव्हिड केपन) **बखर मराठ्यांची** (१८२९). पृ. २३.

"पूर्वी हिंदूंचा मुलखांत इंग्लिश व फ्रेंच, यांचें कित्येक वेळां युद्ध होऊन शेवटीं इंग्लिशांहीं फ्रेंच लोकांस जिंकिलें. ते इंग्लिश आपली विलायत सोडून प्रथम हिंदूंचा मुलखीं आले तो प्रकार असा. तेथचे कित्येक द्रव्यवंत लोक मिळून एकचित्त होऊन त्याहीं असा संकेत केला कीं, हिंदूंचा मुलखीं जाऊन, कांहीं उदीम करावा. मग त्या साधनार्थ ते आपल्या बादशहाजवळ जाऊन विनंती करिते झाले कीं, आह्मी इतकेजण मिळून आपलें द्रव्य एकत्र करून, दूर देश हिंदू मुलुख तेथें जाऊन उदीम करूं इच्छितों. त्यास या आमचा मंडळावेरीज दुसरा कोणी तिकडे न जावा, आणि आह्मांस या कामाविषयीं अनेक प्रकारें सरकाराश्रय पाहिजे, अशास कृपा करून आमचा उद्योग निर्बाधपणें चालेशी सनद द्यावी. त्यावरून बादशहाची तशी सनद होऊन ते मंडळीचे लोक तेथून निघोन हिंदूंचा राज्यांत कलकत्ता व मद्रास व मुंबई या तिहीं ठिकाणीं आपलीं स्थळें करून राहिले.(८)"

ईस्ट इंडिया कंपनीची स्थापना होण्यापूर्वी जॉन मिल्डेनहॉल हा इ. स. १५९९ मध्यें हिंदुस्थानाकडे प्रवासास निघाला होता. ही कंपनी स्थापन झाल्यानंतर इ. स. १६०३ मध्यें व्यापाराच्या सवलती मिळविण्यासाठीं तो अकबराच्या दरबारांत गेला.(९) सन १६०६ पर्यंत तो हिंदुस्तानांत होता. यानें आपल्या प्रवासांत फारशी भाषेसाठीं एक दुभाषा ठेवला. परंतु चार वर्षांनीं तो त्याला सोडून गेल्यामुळें मिल्डेनहॉलचे फार हाल झाले. यामुळें शिक्षक ठेवून तो स्वतः फारशी भाषा शिकला. या आपल्या भाषाभ्यासाविषयीं मिल्डेनहॉल म्हणतो,

"Yet afterward I got a schoolmaster, and in my house day and night I so studied the Persian tongue that in six monthes space I could speake it something reasonably.(१०)"

देशी भाषेच्या अभ्यासाची ही दृष्टि पुढें ठेऊन, जे इंग्रज प्रवासी व ईस्ट इंडिया कंपनीचे नोकर हिंदुस्तानांत आले, त्यांना वेळप्रसंगीं या भाषाज्ञानाचा उपयोग होऊन अनेक अडचणींतून मार्ग काढतां आला. विल्यम हॉकिन्स याचें उदाहरण दिलें असतां ही गोष्ट स्पष्ट होईल. इ. स. १६०८ मध्यें ईस्ट इंडिया कंपनीचा नोकर म्हणून हॉकिन्स हिंदुस्तानांत आला. येतांना त्यानें आपल्याबरोबर मोगल बादशहासाठीं पत्रें आणलीं होतीं. तीं पत्रें त्यानें जहांगीर बादशहाला सादर केलीं. बादशहानें तीं एका जेसुइट मिशनरीला वाचावयास सांगितलीं; परंतु इंग्रज लोक येथें आले तर ते आपल्या व्यापारांत प्रतिस्पर्धी होतील म्हणून त्या जेसुइट मिशनरीनें जहांगिराला खोटेंनाटें

८ तत्रैव. पृ. २३९–२४०.

९ C. H. Payne. *Akbar and the Jesuits.* p. xlvi.

१० Foster. *Early Travels in India.* p. 57.

सांगितलें. बादशहाची मर्जी खपा झालेली दिसतांच हॉकिन्सनें त्याच्याशीं तुर्की भाषेंत बोलावयास सुरवात केली व त्याचा गैरसमज दूर केला. (११) हॉकिन्सला तुर्की भाषा येत असल्यामुळें त्याच्याकडे ईस्ट इंडिया कंपनीनें ही कामगिरी सोंपविली होती. भाषाभ्यासाचें हे महत्त्व इंग्रज लोकांना केवढें वाटत होतें, हें हॉकिन्ससंबंधींच्या पुढील उताऱ्यावरून ध्यानांत येईल:—

"Evidently it was his acquaintance with the Turkish *language and his experience of Eastern ways that procured him* his employment in the present expedition, for he was expressly designated as the person who was to deliver the royal letters to the Governor of Aden or (if available, for he might be going home direct from Aden with his ship) to the Great Mogul, and to take charge of the negotiations in either case (१२)"

हॉकिन्सप्रमाणेंच निकोलस विदिंग्टन हा ईस्ट इंडिया कंपनीची नोकरी पतकरून इ. स. १६१२ मध्यें हिंदुस्थानांत आला. याला अरबी भाषा येत होती म्हणून कंपनीच्या नोकरींत त्याला घेण्यांत आलें. पहा:—

"At Surat he was taken into the service of that body, on the plea of a deficiency of factors and (*as he tells us*) because of his linguistic attainments; probably he was acquainted with Arabic, since it appears that he had been in Morocco a few years previous.(१३)"

विदिंग्टनच्या नंतर थॉमस कोरियट हा हिंदुस्थानांत आला. इ. स. १६१२ ते १६१७ पर्यंत तो येथें होता. *आपल्या या मुक्कामात तो तुर्की, अरबी व फारसी या भाषा* शिकला. यासंबंधीं तो म्हणतो,

"At this time I have many irons in the fire; for I learne the Persian, Turkish, and Arabian tongues, having already gotten the Italian (I thank God). I have bene at the Moguls court three moneths already, and am to tarry heere (by Gods holy permission) five moneths longer, till I have gotten the foresaide three tongues, and then depart herehence to the Ganges, and after that directly to the Persian court.(१४)"

---

११ तत्रैव. पृ. ८०–८१.
१२ तत्रैव. पृ. ६१–६२.
१३ तत्रैव: पृ. १९०.
१४ तत्रैव. पृ. २४९.

या चार भाषांपैकी कोरियट विशेषतः फारशी भाषा फार परिश्रमानें शिकलेला दिसतो; कारण या भाषेंत प्रगति करून आपण बादशहापुढें दरबारांत भाषणहि केलें, अशी माहिती त्यानें या प्रवासवृत्तांत पुढें दिली आहे.(१५)

एडवर्ड टेरी हा एक इंग्रज इ. स. १६१६ ते १६१९ या कालांत हिंदुस्तानांत आला होता. या अवधींत त्यानें फारशी भाषेचें थोडेंसें ज्ञान मिळविलें.(१६) या भाषा कशा लिहितात याचीहि माहिती त्यानें करून घेतली होती. यासंबंधीं तो लिहितो,

"For the language of this empire, I meane the vulgar, it is called Indostan; a smooth tongue, and easie to be pronounced, which they write as wee to the right hand. The learned tongues are Persian and Arabian, which they write backward, as the Hebrewes, to the left.(१७)"

ईस्ट इंडिया कंपनी स्थापन झाल्यावर आरंभींच्या कालांत जे इंग्रज आले त्यांना मोगल दरबाराशीं संबंध आल्यामुळें फारशी व अरबी या भाषा शिकाव्या लागल्या. त्यानंतरच्या कालांत सुरतेस इंग्रजांनीं आपलें जेव्हां आसन पक्कें केलें, तेव्हां त्यांचा संबंध निरनिराळ्या राजेरजवाड्यांशीं येऊं लागला. हिंदुस्तानांत व्यापार करीत असतांना हा संबंध कां आला याचें कारण सांगतांना ग्रांट डफ पुढीलप्रमाणें लिहितो,

"मग तेथें कांहीं उदीम करित असता त्यांस त्या मुलखाचा रहाणाराशीं त्या कामाविषयीं कांहीं संबंध पडला; तेव्हां त्या हिंदू लोकांचा कारस्थ्यामुळें त्या इंग्लिश लोकांना आपल्या उदिमाचें व प्राणाचें रक्षण व्हावें म्हणून शिपाई लोक बाळगून किल्ले बांधावे असें अगत्य पडलें. मग तेथचा राजाशीं संबंध पडून त्यांचे हातीं कित्येक मुलुख सांपडला तेव्हा त्यांस ते काम श्रेष्ठ असें न वाटता, राजाप्रमाणें वर्तावें लागलें. (१८)"

हा संबंध आला तो प्रथम तरी मित्रत्वाचा होता. राजकारणांमुळें सुरतेच्या इंग्रजांचा व शिवाजीचा जो संबंध आला होता त्यांत इंग्रजांनीं राजेरजवाड्यांशीं जपून वागावें असें कंपनीनें सुरत येथील अधिकाऱ्यांस लिहिलेलें आढळतें.(१९) एकंदरींत कंपनीचें धोरण तटस्थतेचें होतें.(२०) शांतता पाळल्याशिवाय आपला व्यापार वाढणार

---

१५ तत्रैव. पृ. २६२.

१६ तत्रैव. पृ. २८८.

१७ तत्रैव. पृ. ३०९.

१८ कॅप्टन ग्रांट डफ. (भाषां. कॅपन). बखर मराठ्यांची. पृ. २४०.

१९ *English Records on Shivaji, Vol II. (1659–1682)* Shiv-Charitra Karyalaya. (Document 73). p. 38.

२० James Douglas. *Bombay and Western India*, Vol. I. p. 76.

नाहीं, असेंच त्यांना वाटत होतें. कारण मुख्यतः व्यापारासाठी राज्यकर्त्यांशीच त्यांची गांठ पडे व ही बोलणीं करण्यासाठीं मराठीच्या ज्ञानाचा त्यांना विचार करावा लागे.

शिवाजीच्या राज्यप्रसाराच्या उद्योगामुळें सुरतेच्या इंग्रजांचा शिवाजीशीं फार संबंध आला व त्यांना आपला व्यापार वाढविण्याची संधि चांगली मिळाली. इंग्रजांची ही व्यापार करण्याची इच्छा अगदी प्रामाणिक होती असें म्हणावयास हरकत नाहीं. शिवाजीच्या मैत्रीमुळे असो किंवा कसेंहि असो, शिवाजीशीं तह करून आपण त्यांच्या राज्यांत व्यापार करावा, असें त्यांना मनापासून वाटे. एवढेंच नव्हे तर व्यापारवाढीसाठीं एतद्देशीय राजे लोकांना नजराणे देऊन त्यांचे मन राखून ठेविलें पाहिजे असें कंपनीचें धोरण होतें, असाहि उल्लेख एके ठिकाणीं सांपडतो.(२१)

ईस्ट इंडिया कंपनीची सुरतेची जी वखार होती तीमधील इंग्रजांना हिंदुस्तानी भाषा येत होती असें सुरतेच्या लुटीच्या प्रसंगावरून दिसून येतें. याप्रसंगीं शिवाजीनें *ॲंथनी स्मिथ या इंग्रजाला* इतर लोकांबरोबर कैद केलें. या कैद्यांनी दंगा केल्यामुळें कोणाचें डोकें उडविण्याची, तर कोणाचे हात तोडण्याची अशी शिक्षा शिवाजीनें त्यांना दिली त्यावेळीं ॲंथनी स्मिथची हात तोडण्याची पाळी आली, त्यावेळीं " हात तोडण्यापेक्षां डोकेंच उडवा, " हें वाक्य शिवाजीला उद्देशून तो हिंदुस्तानींत म्हणाला. या प्रसंगाचें वर्णन रेव्हरंड लेम्कालिऑट यानें सर थॉमस ब्राऊन याला लिहून कळविलें आहे तें असें:—

" It comes to Mr. Smith (s) turne, and his right hand being commanded to be cutt of, hee cryed out in Indostan to Sevagee rather to cutt of his head, unto wich end his hatt was taken of, but Sevagee stopt execution, aud soe (praised bee God) hee escaped.(२२)"

शिवाजीला हिंदुस्तानी भाषा कळेल अशा समजुतीनें ॲंथनी स्मिथनें त्या भाषेंत विनंति केली असावी. वेळप्रसंगीं इंग्रज लोक हिंदुस्तानींत बोलत असत, हें यावरून दिसून येईल. ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरलोकांप्रमाणें मुंबईस इ. स. १६६७ मध्यें नेमलेला गव्हर्नर हेन्री गॅरी याला देशी भाषा चांगल्या अवगत होत्या. त्या भाषा त्याला बोलतां व लिहितांहि येत होत्या, असा त्याविषयींचा उल्लेख मिळतो.(२३) त्याच्या भाषाज्ञानाची तारीफ व अरबी भाषेंत तो जें लेखन करीत होता, त्याची माहिती जॉन फ्रायर पुढीलप्रमाणें देतो:—

२१ *English Records on Shivaji. Vol. I* (Document 377). p. 276.

२२ *Ibid. Vol. I.* (Document 79), p. 79.

२३ Sir Atul Chatterjee and Sir Richard Burn. *British Contributions to Indian Studies*. pp. 8-9.

"This captain Gary is he that was the last Governor for the King on the Island Bombaim. He is a person of a Mercurial Brain, a better Merchant than Soldier, is skill'd in most of the Languages of the Country, and is now writing a Piece in Arabick, which he dedicates to the Viceroy, with whom he is in great Esteem.(२४)"

हिंदुस्तानांत सन १६५३ मध्यें आलेला व्हेनीसचा प्रवाशी मनूची यानेंहि आपल्या प्रवासवर्णनांत फारसी व तुर्की या दोन भाषा आपण शिकल्याचें नमूद केलें आहे.(२५) तर जयसिंगाच्या नोकरींत आर्टिलरी कॅप्टन म्हणून आगतांना आपण शिवाजीची भेट घेतल्याचेंहि तो लिहितो.(२६)

एकंदरींत ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकर लोकांना, व तत्कालीन प्रवाशांना फारशी, तुर्की, अरबी व हिंदुस्तानी या भाषा येत होत्या, हें आपण आतांपर्यंत पाहिलें; परंतु व्यापारासाठीं व इतर कांहीं राजकीय गुंतागुंत सोडविण्यासाठीं त्यांना जेव्हां मराठीचा प्रश्न जाचे तेव्हां गुजराती (बनिये) यांची त्यांना फार मदत होत असे. बेणीदास, वेलजी असे कांहीं गुजराती लोक या कामांसाठीं त्यांच्या नोकरींत होते, असा उल्लेख सांपडतो. शिवाजीनें ईस्ट इंडिया कंपनीचे कांहीं नोकर लोक रायगड येथें कैदेंत ठेविले. या लोकांच्या सुटकेचा प्रयत्न सुरत येथील कौन्सिलचा प्रेसिडेंट जॉर्ज ऑक्सिंडेन यानें चालू केला. या प्रयत्नाची माहिती रायगड येथील कैद्यांना देतांना तो लिहितो :—

"...the President ..promiseth all readiness to increase your joy and happiness in the procury of your liberty which we assure you shall be endeavoured by all possible means, nor have wee binn backward in our readiness to advise about it with Bennidas, Vealgee, and others, who were best able to direct, putting in practice what was then concluded upon, which was that Bennidas should use his contrivance by a Braman to be sent to Sevagee to deale with his Bramans, if by this way he may be prevailed with, which wee are assured carries good probability with it,

२४ John Fryer. *A New Account of East-India and Persia in Eight Letters ( MDCXCVIII )*. p. 157.

२५ William Irvine. *Storia Do Mogul or Mogul India. ( 1653-1708) by Niccolao Manucci, Vol. I.* p. 96.

२६ *Ibid. Vol. II.* pp. 136-137.

and Venlgee has commission and order to do whatever may be suitable to your release.(२७)"

या पत्रांत वेल्जी याला काय अधिकार दिला होता हें सांगितलें आहे. त्यावरून गुजराती लोकांवर इंग्रजांचा फारच विश्वास होता व ते त्यांचा फार उपयोग करून घेत होते, हें दिसतें. राजकारणाप्रमाणें व्यापारांतहि गुजराती लोक इंग्रजांस मदत करीत. ईस्ट इंडिया कंपनीला जेव्हां शिवाजीशीं एखादा करार करावयाचा असे, तेव्हां तेव्हां गिरिधरदास नांवाच्या नोकराला पाठविण्याची व्यवस्था इंग्रजांकडून होई व तो दोघांमध्यें करार ठरवीत असे.(२८) गुजराती लोकांप्रमाणें राजकारणांत जेव्हां कांहीं बोलणीं करावयाचीं असत, किंवा कांहीं वाटाघाटी कराव्या लागत, तेव्हां त्या ब्राह्मणांच्या मध्यस्थीनें होत याचाहि परत्या पत्रांत उल्लेख आला आहे. हे ब्राह्मण इंग्रजांच्या नोकरींत जसे असत, तसे शिवाजीच्या नोकरींतहि असत. सध्या ज्याप्रमाणें परराष्ट्रांत हिंदुस्थानच्या वकिलाती आहेत, त्याचप्रमाणें सुरत व मुंबई येथें शिवाजीनें आपले वकील नेमले होते. कांहीं अडचणीचा प्रसंग निर्माण झाल्यास ते त्यांतून मार्ग काढीत. हे ब्राह्मण वकील कशाप्रकारचीं कामें करीत हें पुढील प्रसंगावरून दिसून येईल. इंग्रज लोक जंगलांतील लांकडें तोडून तीं वापरीत असत. या प्रकाराला शिवाजीच्या लोकांनीं हरकत घेतल्यामुळें इंग्रज व शिवाजी यांचें भांडण विकोपास गेलें. पुढें त्यावेळीं आपल्या राज्यांतील बंदरांत वखार स्थापण्याविषयीं इंग्रजांचें मन शिवाजीनें वळविलें, त्यावेळीं राजापूरचें नुकसान देऊन आमचें समाधान केल्यास याचा विचार केला जाईल व या कामासाठीं सुरतेचा वकील अंताजी पंडित याला हुकूम व्हावा, असें इंग्रजांनीं सांगितलें.(२९) इंग्रजांची ही मध्यस्थी अंताजी पंडितामार्फत होणार होती, हें येथें विशेष लक्षात ठेवण्यासारखें आहे. सुरतेंत इंग्रजांशीं बोलणीं करण्यासाठीं जसा अंताजी पंडित हा वकील होता, त्याप्रमाणें मुंबईत भिमाजी पंडित शिवाजीचा वकील होता. त्याच्यामार्फत इंग्रज मराठ्यांचीं बोलणीं होत. अर्थात् हें राजकारणाचें काम करीत असतांना त्यांना मराठी व हिंदुस्तानी या भाषा येत असाव्यात, असें अनुमान करण्यास हरकत नाहीं.

इंग्रजांकडेसुद्धां राजकीय व्यवहारांत भाषासंबंधीं काम करणारे दोन ब्राह्मण होते. नारायण शेणवी व राम शेणवी हीं त्यांचीं नांवें होत. हे दोघे भाऊ होते.(३०) राम शेणवी

२७ *English Records on Shivaji, Vol. I.* ( Document 48 ). p. 42.

२८ *Ibid. Vol. II.* ( Document 2 ). p. 2.

२९ *Ibid. Vol. I.* ( Document 228 ). p. 166.

३० *Ibid. Vol I.* ( Document 368 ). p. 267. त्याचप्रमाणें पुढील पुस्तकांतहि उल्लेख आढळतो. पहा:— Sir Charles Fawcett. *The English Factories in India, Vol. I.* ( *New Series.* ). p. 69.

याला वकील म्हणून कांहीं खास सवलती होत्या. याचें नांव रामोजी शेणई कोठारी असें असून हा डिचोली गांवचा राहणारा होता व मराठ्यांकडे त्याला पाठविण्यांत येत असे.(३१) इंग्रजांकडे हा पत्रेंहि लिहिण्याचें काम करी. 'Serivan' म्हणून त्याचा उल्लेख केला जातो.(३२) इंग्रजांचा राम शेणईवर फार विश्वास होता. इंग्रजांकडे त्याच्या योग्यतेचा दुसरा कर्तबगार भाषापंडित नव्हता. याविषयीं एका पत्रांत उल्लेख आहे तो असा: —

"We doubt not but Ram Sinay will give your Honr. & ca. soe much satisfaction as to gain an approvall of his coming, for he hath severall dayes discourse with the Embassador by our order, we not being able to do it ourselves, wanting a linguisht.(३३)"

राम शेणई हीं सर्व पत्रें व शिवाजीशीं झालेले महत्त्वाचे करार पोर्तुगीज भाषेत भाषांतर करून देत असे. पोर्तुगीजांचें वर्चस्व त्या काळीं गोव्यांत व आजुबाजूच्या कोंकणपट्टींत असल्यामुळें इंग्रजांना पोर्तुगीज भाषेचा परिचय असावा, त्यांच्याकडे पोर्तुगीज वाचणारी व त्यांच इंग्रजींत भाषांतर करणारीं माणसं असावीत. त्याकाळीं बऱ्याच लोकांना व कांहीं पाश्चात्य प्रवाशांना पोर्तुगीज भाषा येत असे. यासंबंधीं फ्रान्सिस पिराडे याचें उदाहरण देतां येण्यासारखें आहे. हा प्रवासी हिंदुस्तानच्या सफरीवर सन १६०१ मध्यें निघाला होता. तो फिरत फिरत १६०७ मध्यें चितगांगला आला व खंबायत, सुरत, मलबारचा किनारा हे प्रदेश फिरून तो १६११ मध्यें फ्रान्सला परत गेला. याला पोर्तुगीज भाषा चांगली येत होती. व्यापारी लोकांत मिसळून त्यांचा माल खपवितांना तो पोर्तुगीजमधून संभाषण करी. या विषयीं तो म्हणतो,

"Our intercourse was in the Portuguese language, and I acted as their factor there. (३४)"

तत्कालीन पुष्कळ लोकांना कोणत्या भाषा येत असत व कोणतीं शास्त्र हे लोक अभ्यासीत याची माहिती जॉन फ्रायरनें दिली आहे ती अशी :—

"In Esteem among them are principally Magick and Judicial Astrology, one of the sectators of which on all accounts

३१ P. S. Pissurlekar. *Portuguese e Maratas.* I. p. 8.

३२ *English Records on Shivaji. Vol I.* (Document 282). p. 205.

३३ *Ibid. Vol. I.* (Document 282). p. 236.

३४ Albert Grey, assisted by H. C. P. Bell. *The Voyage of Francois Pyrard of Laval to the East Indies, the Maldives the Moluccas and Brazil, Vol. I.* p. 280.

are consulted, as well by *Moors* as *Gentues*; Grammar and Rhetorick, some of them being Masters of *Persian, Indostan, Arabick, Sanscript* ( or Holy Language ), *Portugueze,* and all the depending speeches of *Indostan, as Duccany, Moratty, Conchany, and the like.*(३५)"

नारायण शेणई व राम शेणई यांची भाषा मराठी होतीच; पण ते पोर्तुगीज प्रांतांतले रहाणारे असल्यामुळें त्यांना पोर्तुगीजहि येत होती. पोर्तुगीज लोकांनीं धर्मप्रसारासाठीं लोकांचे जे हाल केले, त्यामुळें कित्येक ब्राह्मण कुटुंबें पोर्तुगीज प्रांत सोडून इंग्रजांच्या ताब्यांत असलेल्या मुलुखांत येऊन राहिलीं. जे कित्येक पोर्तुगीजांच्या वसई या प्रदेशांत राहात होते, त्यांनीं आपलीं घरेंदारें त्या प्रदेशाच्या बाहेर बांधून आपलीं बायकामुलें सुरक्षिततेसाठीं तेथें ठेविलीं होतीं.(३६) या पोर्तुगीजांच्या उपद्रवामुळें जीं ब्राह्मण कुटुंबें इंग्रजांच्या आश्रयाला आलीं, त्यांना पोर्तुगीज भाषा येत असल्यामुळें त्यांच्या भाषाज्ञानाचा फायदा मराठी लोकांशीं मानिक संबंध प्रस्थापित करतांना इंग्रजांनीं घेतला.

राम शेणई याला पोर्तुगीज भाषा चांगली बोलतां येत असे यावद्दल एका पत्रांत खालीलप्रमाणें उल्लेख आहे :—

"The Deputie Governour hopes that the contents of the letter he wrote Sevagee will be very satisfactory, he having the advise of Symon Seron (? Shyamsharan ) and Ramsyanna (Ram Shenvi ) to the stile thereof. It was more significant ( in ) it's originall in Gentu then Raymsynnai (as he declares himselfe) could put it into Portuguese.(३७)"

तसेंच राम शेणईला शिवाजीच्या वकिलांशीं काय बोलणें झालें, तें इंग्रजांना लिहून द्यावें लागत होतें. शिवाजीच्या वकिलाची व राम शेणई याची जी मुलाखत झाली तिची माहिती इंग्रजांनीं राम शेणईकडून पोर्तुगीज भाषेंत मागितली. यासंबंधींचा उल्लेख मुंबईच्या अधिकाऱ्यांनीं सुरतेस जें पत्र पाठविलें, त्यांत आला आहे.(३८) इंग्रजांना पोर्तुगीजमध्ये भाषांतर करून देण्याची कामगिरी राम शेणई करीत होता. तसेंच मद्रासच्या तहनाम्यासंबंधीं बोलणें करण्याकरितां राम शेणई जात असे. शिवाजी व ईस्ट इंडिया कंपनी यामध्यें सन १६७१ मध्ये जो शांततेचा तह झाला

३५ Fryer. *A New Account of East-India and Persia in Eight Letters,* p. 191.

३६ *English Records on Shivaji. Vol. II* (Document 202). p 110.

३७ *Ibid. Vol.* (Document 267). p. 195.

३८ *Ibid. Vol. I.* ( Document 268 ). p. 196.

त्यासंबंधांत सुभेदाराशीं वाटाघाटी करण्यासाठीं राम शेणईला पाठविण्यांत आलें होतें. या तहाचीं सहा कलमें होतीं. शिवाजीतर्फे आलेल्या अण्णाजी पंडिताला मराठींत भाषांतरित केलेला त्या तहाचा मसुदा राम शेणई यांजकडून देण्यांत आला. भाषेसंबंधीं महत्त्वाची गोष्ट या तहाच्या शेवटीं नमूद केली आहे ती अशीः–

"These Proposalls being exactly translated into the Morrattee language, were sent by Ramasinay' (as enordered) to Annagee Punditt and the Subedarr of Chaul.(३९)"

या तहावर विचार करून अण्णाजी पंडितानें नवीन मसुदा पाठविला. या मसुद्यावर पूर्ण चर्चा करून ईस्ट इंडिया कंपनीच्या डेप्युटी गव्हर्नरनें जें उत्तर पाठविलें तें मराठी भाषेंत होतें. या तहासंबंधींचा भाषाविषयक उल्लेख त्या वेळच्या एका पत्रांत पुढीलप्रमाणें करण्यांत आला आहेः–

"The proposalls sent by Annagee Punditt and Soobedars being debated on and seriously weighed, it was conclueded that they should bee answered too as in the foregoeing Articles and that they should bee fairly transcribed in the Morate language and confirmed as usuall(४०)"

इंग्रज व मराठे यांच्या भाषाव्यवहारांत, पोर्तुगीज व मराठी या भाषांना तहनामे, पत्रें, इत्यादि गोष्टींत स्थान होतें, हें यावरून दिसून येईल. हा सर्व व्यवहार भाषांतर करून एकमेकांपुढें मांडण्याच्या कामांत राम शेणई याचें अंग किती होतें, हें येथपर्यंत पाहिलेंच आहे. राम शेणई यानें इंग्रजांकडे राहून ही भाषाविषयक कामगिरी पार पाडली. त्याचप्रमाणें त्याचा भाऊ नारायण शेणई यानेंहि कांहीं काळ हें काम केलें होतें. याचाहि उल्लेख 'Scrivan' म्हणून एका पत्रांत केलेला आढळतो.(४१) इ. स.१६७३ मध्यें शिवाजीशीं तह करण्याच्या कामांत त्याच्या वकिलाला भेटण्यासाठीं याची नेमणूक इंग्रजांनीं केली होती.(४२) या वेळीं नारायण शेणईनें इंग्रजांना बरींच पत्रें लिहिलीं. ह्या कागदपत्रांचें इंग्रजी भाषांतर करून त्यावर इंग्रजांकडून विचार केला जाई.(४३) पुढें या कामामध्यें नारायण शेणईनें कुचराई करून विश्वासघात केल्याचें इंग्रजांना आढळून आल्यामुळें त्यांना त्या कामावरून परत बोलावण्यांत यावें

३९ *Ibid. Vol. II.* (Document 471). p. 281.

४० *Ibid. Vol. II* (Document 476). p. 288.

४१ *Ibid. Vol. I.* (Document 458). p. 335.

४२ *Ibid. Vol. I.* (Document 368). p. 267.

४३ *Ibid. Vol. I.* (Document 478). p. 347.

Language being called *Banyan* ) which is a mixture of *Persian* and *Sclavonian*, as are all the Dialects of *India*.(५१)"

व्यापारी व इतर पत्रव्यवहाराकरितां गुजराती लोक ही लिपि वापरीत. याला ते महाजन लिपि असें नांव देत. आम्ही महाराष्ट्रीयांनीं मुद्रणाकरितां बालबोध नागरी लिपि स्वीकारली; परंतु गुजरात्यांनीं मुद्रणाकरितां महाजन किंवा बनिया लिपीचा अंगिकार केला.(५२) या भाषेची माहिती येथें देण्याचें कारण इतकेंच कीं, राजकीय कामासाठीं इंग्रजांकडे जे गुजराती असत त्यांच्याकडून 'बनियन' भाषेत भाषांतर करून इंग्रज घेत. शिवाजीच्या वकिलाशीं काय भाषण झालें, याची माहिती इंग्रजांनीं गिरिधर नांवाच्या आपल्या वकिलाकडून 'बनियन' भाषेत मागितली होती. या संबंधींचा उल्लेख असा आहे:—

"I have ordered Ramsunay and Giridher to write the contents of ( our dis )course in Portuguese and Bannian, they better understanding what he s( ays ).(५३)"

इंग्रजांच्या भाषाव्यवहारांत मराठी, आणि पोर्तुगीज भाषेप्रमाणें 'बनिया' भाषेचाहि उपयोग केव्हां केव्हां केला जात असे, एवढेंच यावरून दिसतें.

राजकीय संबंध प्रस्थापित करण्यासाठीं व व्यापाराची वाढ होण्यासाठीं इंग्रजांना मराठी व पोर्तुगीज या भाषा माध्यम म्हणून स्वीकाराव्या लागल्या. या शिवाय पोर्तुगीज भाषेचा उपयोग इंग्रजांच्या कांहीं खात्यात होत असे. मुंबईचा गव्हर्नर जिराल्ड ऑंजियर यानें इ. स. १६७० मध्यें कस्टम हौसमध्यें पहिलें कोर्ट स्थापन केलें. या कामासाठीं त्यानें परभू व दुसरे अधिकारी नेमले. या कोर्टांतील कायदे कोणत्या भाषेत असावेत याविषयीं त्यानें Consultation Book मध्यें नमूद केलेला मजकूर असा आहे:—

"It is unanimously resolved that those laws which concern the administration of justice and common right, be form of judicature, and the penalties appointed against profaneness, breaches of morality and civil government shall be translated into the Portuguese and Kanarese languages and be published with all convenient speed, and the others deferred till further consideration.(५४)"

---

५१ Fryer. *A New account if East-India and Persia in Eight Letters.* p. 201. त्याचप्रमाणें पुढील पुस्तकांतहि उल्लेख आढळतो. पहा. Edward Grey.*The Travels of Pietro Della Valle in India.(MDCCCXCII). Vol. I.* pp. 96-97.

५२ अ. का. प्रियोळकर, पु. मं. जोशी इ. पंचारती. पृ. ६–७.

५३ *English Records on Shivaji. Vol. I* ( Document 826 ). p. 190.

५४ Phiroze Malbari. *Bombay in the making.* p. 149.

कोर्टात सुद्धां पोर्तुगीज भाषेला व त्याबरोबर कानारी (देशी) भाषेला महत्त्व दिलें गेलें होतें. इंग्रजी भाषा जाणणारे कारकून मिळत नसल्यामुळें, कोर्टातील दप्तर सुद्धा पोर्तुगीज भाषेंत ठेविलें जात होतें.(५५) याला पूरक अशी माहिती दुसऱ्या ठिकाणी मिळते ती अशी:—

"...Courts were first established in 1670 in the Island of Bombay, where preference was given a few years later to a factor owing to his "understanding the languages (Portuguese and Marathi.)," though his legal knowledge was slight." (५६)

ईस्ट इंडिया कंपनी हिंदुस्तानांत व्यापार करीत असतांना तिचे व एतद्देशियांचे भाषिक संबंध कोणत्या माध्यमांतून चालत असत हें येथपर्यंत पाहिलें. व्यापार करीत असतांना त्यांनी ज्या कांहीं आनुषंगिक गोष्टी केल्या, त्याचा भाषेवर परिणाम झालेला असल्यामुळें त्यांचा येथें उल्लेख करावा लागत आहे. त्यापैकी पहिली गोष्ट म्हणजे या कंपनीनें धर्मप्रसाराला ही भूमि कितीशी अनुकूल आहे, याचाहि अंदाज घेतला. या धर्मप्रसारासाठीं ख्रिस्ती धर्मावरील कांहीं पुस्तकांचें देशी भाषेंत भाषांतर करून तीं पुस्तकें मुंबई बेटांत वांटण्यांत यावींत अशी सूचना ईस्ट इंडिया कंपनीनें मुंबईच्या आपल्या अधिकाऱ्यांना केलेली दिसते; परंतु येथील लोकांच्या धार्मिक मनोवृत्तीची ओळख या अधिकाऱ्यांनी कंपनीस पटवून दिल्यामुळें ती गोष्ट तेवढ्यावरच राहिली. हा प्रयत्न अपुरा राहिला तरीहि, इंग्रजांची देशी भाषेत व्यवहार करण्याची प्रवृत्ति लक्षांत येण्यासाठीं मुंबई येथील अधिकाऱ्यांनी ईस्ट इंडिया कंपनीला पाठविलेल्या उत्तरांतील महत्त्वाचा भाग खालीं देण्यांत येत आहे :—

"Your pious order for translating the ten Commandments, the Lord's prayer, and our Creed into the country language that copy thereof may be dispersed on your Island for inviting the inhabitants to embrace our Faith wee cannot but highly esteeme, as a very religious worke, and shall put it in practise soe soon as a seasonable opportunity shall present, but please to be informed that this good designe must be managed with great secrecy and tenderness.(५७)"

हा प्रकारचें भाषांतर कोणत्या भाषेंत कंपनीनें करावयाचें ठरविलें होतें, तें समजत नाहीं. पोर्तुगीजांच्या धार्मिक छळामुळें ख्रिस्ती धर्माबद्दल लोकांच्या मनात तिरस्कार उत्पन्न झाला आहे व मुसलमान हिंदु व मुसलमान कर्मठ आहेत, असें ईस्ट इंडिया कंपनीस मुंबईच्या अधिकाऱ्यांनी कळविल्यामुळें इंग्रजांचा हा धर्मप्रसाराचा उद्योग त्यावेळी मागें पडला. पुढें एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीस मिशनरींनी

५५ *Ibid.* p. 120.

५६ Chatterjee and Burn. *British Contributions to Indian Studies.* p. 10.

५७ *English Records on Shivaji Vol. I.* (Document 429), pp 313-314.

फिरून हा उद्योग चालू केला व मराठी भाषेत खिस्ती धर्मपुस्तकांची भाषांतरें करून त्या वाङ्मयांत भर घातली.

एतद्देशियांशी भाषाव्यवहार सुलभ व्हावा यासाठी केलेल्या आणखी एका प्रयत्नाची माहिती अशी आहे:– इंग्रजांच्या वेळीं मुंबई बेटाची वाढ होत होती. हें घडत असतांना तेथील तद्देशियांचें इंग्रजांच्या भाषेकडे लक्ष गेलें. आपल्या मुलांना इंग्रजी भाषा शिकण्यासाठीं एक दोन इंग्लिश शिक्षक आणावेत, असा त्यांनीं मुंबईच्या अधिकाऱ्यांस अर्ज केला. यामुळें मुंबईचे इंग्रज हुरळून गेले. ते सुरतेच्या अधिकाऱ्यांना पुढीलप्रमाणें लिहितात:—

"wee looke on as a considerable matter both in policy, for cementing us in affection, as (by Gods blessing and assistance) alsoe in piety, for uniting us in religion; the former being noe way better assured then by a mutuall intercharge of languages, and the latter being as probable, by the devine benediction.(५८)"

येथील मुलांना इंग्रजी शिकविण्यांत एकमेकांची विचारसरणी एकमेकांस कळेल, हा शाळा काढण्याचा त्यांचा हेतु सरळच आहे; परंतु त्या पाठीमागें धार्मिक वृत्ति कशी लपलेली होती, हेंहि त्यांत दिसून येतें. त्यावेळेस हा प्रयत्न यशस्वी झालेला दिसत नाहीं. मात्र पुढें मराठ्यांचें साम्राज्य वाढलें व वाढत्या साम्राज्यामुळें व त्यांतील राजकारणांत मन घेतल्यामुळें इंग्रजांना मराठी भाषेकडे वळावें लागलें.

एकंदरींत शिवकालांत जरी इंग्रजांना हिंदुस्थानी भाषा अवगत होती, तरी मराठ्यांशीं त्यांचा संबंध येत असे, तेव्हां भाषाव्यवहारासाठीं त्यांना पोर्तुगीज व मराठी या भाषांचा अंगिकार करावा लागत असे. ईस्ट इंडिया कंपनीच्या सरकारी खात्यांतहि पोर्तुगीज भाषाच होती. यासाठीं त्यांच्याकडे दोन्ही भाषा माहीत असणारे दुभाषे होते. त्यांच्यामार्फतच हें काम चालत असे. मराठ्यांकडे कोणतेहि कागदपत्र जातांना ते मराठींतून जावेत यासाठीं इंग्रज फार दक्ष असत. तसेंच मराठ्यांशीं जें कांहीं त्यांची बोलणीं होत, त्यांचें पोर्तुगीजमधून त्यांना भाषांतर पाहिजे असे. त्यांच्याकडे या ब्राह्मणांप्रमाणें गुमास्ती करणारेहि होते व त्यांच्याकडून क्वचित् धनियामार्फत रिपोर्ट मागविल्याचे उल्लेख आढळतात; परंतु मुख्यतः मराठ्यांशीं जो भाषाव्यवहार होई तो मराठी व पोर्तुगीज या दोन भाषांत होई. या कालांत तरी इंग्रज मराठी भाषा शिकलेले दिसत नाहींत. पोर्तुगीज भाषेचाच सर्वत्र पगडा दिसतो. या कामासाठीं त्यांनीं पोर्तुगीज भाषा जाणणारे व मराठ्यांची मराठी भाषा असल्यानें ती भाषा जाणणारे ब्राह्मण पंडित नोकरीस ठेविले होते. त्यांच्याकरवीं या दोन भाषांतच इंग्रजांचे सर्व भाषाव्यवहार चालत असत, असें आपणांस या एकंदर विवेचनावरून दिसून येईल.



---

५८ *Ibid. Vol. I.* (Document 149). pp. 124-125.

# युरोपियनांचा पेशवेकालीन महाराष्ट्रांतील भाषाव्यवहार

पेशवेकालांत युरोपियन व मराठे लोक यांचा संबंध येऊन राजकीय व इतर कारणांसाठीं त्यांना ज्या भाषा शिकाव्या लागल्या, त्यांची सुरुवात अठरावें शतक सुरू होण्यापूर्वीपासून झालेली दिसते. इ. स. १६९८ मध्यें तिसऱ्या विल्यमनें ईस्ट इंडिया कंपनीला जो चार्टर दिला त्या अन्वयें हिंदुस्थानांतील रेसिडेंट मिनिस्टरनीं पोर्तुगीज व हिंदु भाषा शिकल्या पाहिजेत, असें बंधन घालण्यांत आलें होतें. हिंदुस्थानांतील भाषांकडे इंग्रज राज्यकर्त्यांचें लक्ष जाण्याचा हा पहिलाच प्रसंग असला पाहिजे. या भाषा शिकण्याचा हेतु इतर धर्मांतील लोकांना ख्रिस्ती धर्माची माहिती देतां यावी हा होता. चार्टरमधील या भाषाविषयक भागाची माहिती देतांना पीटर ऑबर लिहितो,

"By the Charter of 1698, the Company were bound to maintain a minister and schoolmaster in every garrison and superior factory, and to set apart a decent place for the performance of divine worships. ...Resident ministers in India were to learn the Portuguese and Hindu languages, to enable them to instruct the Gentoos and others in the Christian religion." (१)

वरच्या उताऱ्यांत रेसिडेंट मिनिस्टरना पोर्तुगीज व हिंदु भाषा शिकण्याचा आदेश दिला आहे, त्यांत कोणत्या हिंदु भाषा शिकाव्या याचा स्पष्ट निर्देश नाहीं; पण पोर्तुगीज भाषेचा मात्र स्पष्ट उल्लेख आहे. यावरून भाषेच्या व्यवहारासाठीं पोर्तुगीज भाषेचा उपयोग केला जात असावा, अशी इंग्लंडमधील लोकांची कल्पना दिसते. ही समजूत खोटी होती, असें म्हणवत नाहीं. अठराव्या शतकाच्या सुरुवातीस कांहीं काळ तरी पोर्तुगीज भाषेचें महत्त्व व्यवहारांत होतें. याला उदाहरण न्यायखात्यांतील एका प्रसंगाचें देतां येईल. कान्होजी आंग्रे याला गुप्त बातमी पुरवली म्हणून ईस्ट इंडिया कंपनीतील एक नोकर रामा कामती यावर सन १७२० मध्यें जो खटला भरण्यांत आला होता, त्यांत पोर्तुगीज भाषेंत असलेलें आरोपपत्रक देण्यांत आलें होतें. या विषयींचा पुरावा सांपडतो तो असा :—

"It was drawn up in English, and a copy, signed by the Secretary, was ordered to be given to the accused, together with its translation in Portuguese, requiring him to be prepared with his reply by March 17th next. It is interesting to note that the

१ Peter Auber. *Rise and Progress of the British Power in India.* (*1837*) *Vol. II.* pp. 491-492.

indictment was translated into Portuguese, and not into the language of the person charged."(२)

पोर्तुगीज भाषेत असलेले हें आरोपपत्रक देण्याचें कारण पुष्कळशा एतद्देशीय लोकांप्रमाणें आरोपीला पोर्तुगीज भाषा चांगली अवगत होती हें होय. (३)

यानंतर ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टरांना, आपल्या कंपनीच्या नोकरांनीं देशी भाषांचें ज्ञान करून घ्यावें, असें वाटूं लागलें. यामुळें कंपनीच्या तरुण नोकरांना देशी भाषांचें ज्ञान घेण्यास उत्तेजन द्यावें अशाविषयीं १६ फेब्रुवारी १७२१ रोजीं त्यांनीं बंगाल कौन्सिलला पत्र लिहिलें. हा भाषांचा अभ्यास तरुण नोकरांना कां करावयास लावला, यासंबंधीं या पत्रांतील ८२ व्या परिच्छेदांत खुलासा केला आहे तो असा :

"*We observe your want of Writers. We sent you a sufficient* supply the last season. Encourage them all to learn the country languages, which are sooner attained by youth than men grown, because the memory is then more fitted to keep what they learn, and their tongues more ready and pliable to give the true accent in pronunciation."(४)

ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टरांच्या पत्रास अनुसरून प्रथम कांहीं काळ कंपनीच्या नोकरांनीं हिंदुस्थानांतील भाषांचें ज्ञान करून घेण्याचा प्रयत्न केल्याचें दिसत नाहीं. या काळाच्या मध्यापर्यंत तरी मराठे व इंग्रज यांचा जो संबंध आला त्यावेळेस भाषाव्यवहार सुलभ व्हावा म्हणून इंग्रज वकिलाबरोबर एक दुभाषी असे. मुंबईचा गव्हर्नर स्टीफन लॉ यानें शाहूकडे ता. १० मे १७३९ रोजीं विल्यम गॉर्डन याला पाठविलें. त्यावेळीं त्याला पाठविलेल्या पत्रांत लॉ लिहितो,

"As you cannot be so well versed in the language and forms necessary to be used with these countries' Governments, I send with you a proper person well acquainted in these matters, having *heretofore* been employed by the Siddi in *messages* to Shahu Raja, who may therefore be serviceable to you in the course of your negotiation. He is a gentoo, by name Bhikajipant." (५)

२ Phiroze B. M. Malbari. *Bombay in the Making. p. 331.*

३ *Ibid.* p. 340.

४ Auber. *Rise and Progress of the British Power in India.* Vol. I. p. 29.

५ George W. Forrest. *Selections from the Letters, Dispatches and other State Papers preserved in the Bombay Secretariat. Maratha Series, Vol. I. p. 75.*

चिमाजी आप्पांकडे वसईला लॅर्नें आपला वकील म्हणून जेम्स इंचबर्डला ता. ८ जून १७३९ रोजीं पाठविलें होतें;(६) परंतु भाषेची अडचण जाणवूं नये म्हणून कोणी दुभाषी बरोबर दिल्याचा उल्लेख सांपडत नाहीं. यापुढें सन १७५९ मध्यें पेशव्यांच्या दरबारांत विल्यम ॲंड्रयू प्राइस याला पाठविण्यांत आलें. याला पेशव्यांच्या दरबारांत पाठवितांना इतर गुणांबरोबर त्याचें भाषाज्ञान इंग्रजांनीं लक्षांत घेतलें होतें. याविषयीं त्याला लिहिलेल्या पत्रांत पुढील मजकूर आढळतो :—

"Nana having frequently desired the President to send a person to Poona with whom he might converse with freedom and confidence regarding our interests, and there being at this critical juncture many important affairs which require being set in a clear and just light, we (except Mr. Brabazon Ellis) have judged it necessary to appoint you to proceed thither on this service, not only as you are master of the Moors' language, understand the Marathas pretty well and acquainted with many of the Nana's ministers and principal officers,..."(७)

इंग्रज व मराठे यांचे संबंध जरी या काळांत फार थोडे आले, तरी आपला वकील मराठ्यांच्या दरबारीं पाठवितांना दरबारशीं तो मनुष्य परिचित असावा याबरोबर भाषेची अडचण जाणवूं नये, म्हणून हिंदुस्थानांतील एकादी तरी भाषा त्याला अवगत असावी, याची ते काळजी घेत असत. असें असलें तरी त्या धरसोडबरोबर एकादा भाषापंडितहि देण्यास ते चुकत नसत. ईस्ट इंडिया कंपनीनें हिंदुस्थानांतील भाषा शिकण्याचा आदेश आपल्या तरुण नोकरवर्गाला दिल्यानंतर, पहिलीं पन्नास वर्षे तरी, त्यांच्यामध्यें देशी भाषा शिकण्याचा फारसा प्रयत्न झालेला दिसत नाहीं. परंतु पुढें सन १७७४ मध्यें महसूलपद्धतींत सुधारणा होऊन त्या खात्यांत तीन वरिष्ठ सनदी नोकर नेमण्याचें ठरलें. तेव्हां मात्र या खात्यांत जे अधिकारी नेमावयाचे त्यांच्या केवळ दीर्घकालीन नोकरीच्या अनुभवावर त्यांना न नेमतां, फारसी अगर हिंदुस्तानी या भाषांचें ज्ञान असेल त्यास नेमावें, असें कंपनीनें ठरविलें. हिंदुस्थानांतील राज्यकारभारांत भाषेला महत्त्व दिलेल्या या अभिप्रायाविषयीं पीटर ऑबर पुढीलप्रमाणें माहिती देतो :—

"Occasional Commissioners were to be appointed to visit such districts as might require a local investigation. They were to be taken from the Company's servants, not by seniority, but by the free choice of the board, and were to be qualified for the

६ *Ibid. Vol. I.* p. 60.

७ *Ibid. Vol. I.* p. 125.

trust by a knowledge of the Persian or Hindoostanee, and a moderation of temper." (८)

हिंदुस्थानांतील राज्यकारभार करतांना या खात्यांतील अधिकाऱ्यांना देशी भाषा यांच्यात याची ज्याप्रमाणें काळजी घेण्यांत आली, त्याप्रमाणें कंपनीचे वरिष्ठ अधिकारी भाषाज्ञानाकरितां फार आस्था दाखवूं लागले, असें दिसतें. हिंदुस्थानचा पहिला गव्हर्नर जनरल वॉरन हेस्टिंग्ज याला या देशांतील भाषा, कायदे व लोकांचे रीतीरिवाज या विषयीं चांगली माहिती होती.(९) विशेषतः फारसी भाषा त्याला चांगली अवगत होती.(१०) या भाषाज्ञानाचा उपयोग राजकारणांतील डाव खेळतांना हेस्टिंग्ज यांस चांगला झाला असला पाहिजे. गव्हर्नर जनरलसारख्या वरिष्ठ अधिकाऱ्यांना ही भाषा शिकावी लागत असे, तेथें हरघडी राजकारण करणाऱ्या मुलकयांना ती शिकण्याची किती जरुरी वाटूं लागली असेल, हें सांगावयास नकोच. यापुढें हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांशीं इंग्रजांचे राजनैतिक संबंध वाढत जाऊं लागले, तसतसें त्यांना या भाषांचें महत्त्व पटूं लागलें.

हिंदुस्थानांत पेशव्यांची सत्ता फार मोठी होती. इंग्रजांनी जेव्हां शांततेचें धोरण सोडून राज्यप्राप्तीसाठीं प्रयत्न सुरू केले, तेव्हां त्यांचा व मराठ्यांचा जास्त संबंध आला. इ. स. १७६७ मध्यें मॉस्टिन याला पेशव्यांच्या दरबारांत वकील नेमण्यांत आलें व त्याच्याबरोबर रामजी परभू याला भाष मित्र म्हणून दिलें.(११) पुढें सन १७७२ सालीं त्याची पुणेंदरबारांत रेसिडेंट म्हणून मुंबई सरकारनें नेमणूक केली.(१२) पुण्यास राहिल्यानंतर इंग्रजांचें राज्य कसें वाढेल याचा प्रयत्न मॉस्टिननें केला. मॉस्टिनच्या या उद्योगाविषयीं पेशवे दप्तरांत पुढीलप्रमाणें उल्लेख आढळतो:—

"मोष्टीन दोन वर्षे पुण्यात वाल्लसदागे दाखऊन होता. वस्तुता पाहातां सरकारांत कांहीं बिल्रा पडिल्यास साष्टी घ्यावी हेंच लक्ष त्याचे बिलाइतीपासून होतें, ते सिद्धीनास आलें."(१३)

८ Auber. *Rise and Progress of the British Power in India. Vol. I* p. 431.

९ *Ibid. Vol. 1.* p. 695.

१० Sir Atul Chatterjee and Sir Richard Burn. *British Contributions to Indian Studies.* p. 10.

११ George Forrest. *Selections from the Letters, Dispatches, and other State Papers preserved in the Bombay Secretariat. Maratha Series. Vol. I.* p. 113.

१२ *Ibid. Vol. I.* p. 201.

१३ G. S. Sardesai. (Editor) *Selections from the Peshwa Daftar: The Capture of the Salsette by the English.* No. 56. p. 17.

इंग्रजांचा हा प्रयत्न पाहून मॉन्स्टिनला भेटण्यासाठीं व त्याच्याशीं बोलणें करण्यासाठीं नारोबा आप्पाजी याला पाठविण्याचा पेशवे दप्तरांत पुढीलप्रमाणें उल्लेख आढळतो:—

"जनरालाकडील मॉस्टीन पुणियांत आहे, त्याशी कितेक मजकूर तुम्ही व राजश्री त्रिंबक विनायक मिलून बोलणें...बोलला असिल्यास जावसाल कसे केले, खुलासे कोणेतऱ्हेचे निघाले, ते सविस्तर लेहून पाठविणे." (१४)

इंग्रज व मराठे यांचा संबंध कसा येत गेला व त्या निमित्तानें त्यांच्यामध्यें बोलणीं चालणीं कशीं वाढत गेलीं, हें यावरून आपणांस दिसून येईल. मात्र नारो आप्पाजी व त्रिंबक विनायक यांनीं मिळून मॉन्स्टिनशीं जीं बोलणीं केलीं, त्यावेळीं भाषेचें माध्यम कोणतें होतें, हें समजावयास कांहीं मार्ग नाहीं. पुढें साष्टीचा किल्ला इंग्रजांकडे गेल्यावरहि पेशवे व इंग्रज यांचा पत्रव्यवहार चालू राहिला. पेशव्यांचा वकील आनंदराव जिवाजी याच्या पत्राला उत्तर म्हणून मॉन्स्टिननें पाठविलेल्या एका पत्राची नकल पेशवे दप्तरांत आहे.(१५) ही नक्कल मराठींत असून त्यांत फारसी भाषेंतील पुष्कळ शब्द आहेत. मूळ पत्र कोणत्या भाषेंत आहे, हें माहीत नसल्यामुळें, पेशवे व इंग्रज यांच्यामधील पत्रव्यवहार कोणत्या भाषेंत होत असे याचा उलगडा होत नाहीं.

इंग्रज व मराठे यांचा विशेष संबंध येण्यास राघोबादादा हाहि मुख्यतः कारणीभूत आहे. पेशवेपद मिळविण्यासाठीं राघोबानें मुंबईकर व कलकत्तेकर इंग्रजांशींहि सूत्रें बांधिलीं. एवढेंच नव्हे तर हणमंतराव व मनवर पारशी या दोघांकडून इंग्लंडमध्यें ईस्ट इंडिया कंपनीस पत्र पाठविलें व त्याचें उत्तरसुद्धां राघोबास मिळालें. या पत्राचें मराठींत केलेलें भाषांतर पेशवे दप्तरांतील पत्रांत आहे. त्यावर "छादर लांडण तारीख ९ जून सन १७८१" असा कालनिर्देश आहे.(१६) राघोबाचें हें मूळ पत्र कोणत्या भाषेंत ईस्ट इंडिया कंपनीस पाठविलें गेलें, हें समजण्यास मार्ग नाहीं. तरी इंग्रजी, फारसी व मराठी या तिन्ही भाषा जाणणारे वकील व भाषांतर करणारे लोक राघोबाजवळ असावेत, याविषयीं शंका राहात नाहीं. कंपनीचा सेक्रेटरी एलिस ब्रो यालाहि पाठवावयाच्या एका पत्राचा तर्जुमा पेशवेदप्तरांतील एका पत्रांत आढळतो. (१७) नुसता पत्रव्यवहारच करून राघोबा थांबला नाहीं तर इंग्लंडमध्यें कौन्सिलांत आपली तक्रार इंग्रजींत करून ती मांडण्याचा त्यानें या लोकांकरवीं प्रयत्न केला. याविषयींची माहिती पेशवेदप्तरात मिळते ती अशी :—

१४ *Ibid.* No. 12. p. 9.

१५ *Ibid.* No. 12. p. 9.

१६ G. S. Sardesai. *Selections from the Peshwa Daftar : The First Maratha War.* No. 412. p. 349.

१७ *Ibid.* No. 419. p. 356.

" मागसाचे कारभाराना मजकूर तरी सरकारचें पत्राची इंग्रेजी करून कोशलांत दिल्ही आहे. इनशाफ कोशलांत ठरेल तो सेवेशी लिहून पाठऊं. " (१८)

ईस्ट इंडिया कंपनीचा व राघोबाचा जसा संबंध होता, तसा हिंदुस्थानांत जनरल गॉडर्ड यांच्याशींहि त्याचा संबंध होता. राघोबानें आपले भास्कर मिराजी व त्रिंबकजी महादेव हे दोन वकील जनरल गॉडर्डला भेटण्यास पाठविले होते. त्या दोघांनीं गॉडर्डशीं बोलणीं करून त्याची माहिती राघोबाला कळविल्याचा व त्या प्रसंगीं गॉडर्डनें दोन मुनशी भवानजी विठोजी व शरीफ अली हे हजर असल्याचा केलेला उल्लेख एका पत्रांत आढळतो. (१९) लष्करांतील इंग्रजी अधिकाऱ्यांना वाटाघाटी करण्याच्या वेळीं मुनशींची मदत घ्यावी लागत असे. यावरून असें दिसून येतें कीं, स्वतंत्रपणें बोलणीं व वाटाघाटी करतां येतील एवढी पारंगतता त्यांनीं त्या काळपर्यंत तरी देशी भाषेत मिळविली नसावी. लष्करांतील अधिकाऱ्यांचा देशी रोजगारवाल्यांशीं व लोकांशीं नेहमी संबंध येत असल्यामुळें या देशांतील भाषा विशेषतः हिंदुस्तानी शिकण्याची त्यांना अत्यंत गरज असते, हें इंग्लिश तरुणांना सांगतांना ब्रिग्ज म्हणतो,

" An acquaintance with a people is to be obtained only by great observation, founded on constant and unreserved intercourse; but it is impossible to attain this object without a complete knowledge of the language of the country in which you reside. With an officer in the native army this is not a matter of choice, but one of imperious necessity. ...The necessity, ...therefore, of your immediately studying the language being admitted, you must instantly procure a moonshy, or tutor, and apply studiously to the aquirement of the Hindoostany tongue." (२०)

मराठ्यांची जीं बोलणीं होत, त्यावेळेस भाषेचें ज्ञान नसल्यामुळें, मुनशीवर इंग्रज अधिकाऱ्यांनी अवलंबून राहूं नये, हा उद्देश यांत दिसून येतो. इंग्रज व मराठे यांच्यामध्यें जे तहनामे होत असे, ते करतांना भाषेच्या माध्यमाचा वरी स्पष्ट उल्लेख कोठें केलेला आढळत नसला, तरी त्यांच्यामध्यें जे तहनामे होत, त्यामध्यें मराठीला स्थान होतें, असें आढळून येतें. सन १७८२ मध्यें इंग्रज व मराठे यांच्यांत डेव्हिड अँडरसन यांच्यातर्फे जो तह झाला तो मराठींत लिहिला असल्याचा उल्लेख तहाच्या शेवटीं केला आहे. तो असा :—

१८ *Ibid.* No. 400. p. 328.

१९ *Ibid.* No. 400 p. 336.

२० Lieut-Col. John Briggs. *Letters Addressed to a Young Person in India.* pp. 49-50.

"Written in the Marathi character by RAGHUBHAU DIVAN." (२१)

इंग्रज जसे मराठ्यांच्या राजकारणांत रंगून गेले तसतसे तह करतांना त्यांना मराठी भाषेचा उपयोग होऊं लागला; आणि मराठ्यांना इंग्रजांच्या मदतीची आवश्यकता वाटूं लागली. यामुळें मराठी दरबारांत व समाजांत ते जास्त मोकळेपणानें वावरूं लागले. इंग्रजांना देशी भाषा शिकण्याचें महत्त्व पटून राजकारणांत जरी त्यांचें पाऊल पुढें पडलें, त्याबरोबर एतद्देशीय भाषाभ्यासातहि त्यांची प्रगति होत गेली. मॉस्टिन याच्यापाठोपाठ मॅलेट याची पुण्यास रेसिडेंट म्हणून इ. स. १७८५ मध्यें नेमणूक झाली. (२२) आणि मराठ्यांचे व इंग्रजांचे संबंध हरघडी येऊं लागले. मॅलेट व नाना फडणीस यांची भेट मॅलेटच्या मुनशी फकिरुद्दीन याच्या तर्फे होत असल्याचा उल्लेख पेशवेदप्तरांतील एका पत्रांत आढळतो. (२३) बहिरू पंडित या नांवाचा त्याचा एक मुनशी असल्याची माहिती सांपडते. (२४) सय्यद नुरुद्दीन हुसेनखान हा फारसी भाषेचा तज्ज्ञ मॅलेटच्या पुणें दरबारांतील राजनैतिक कारभारी असून, राजकीय व्यवहारांत त्याला साहाय्य करीत होता, अशी माहिती मेजर प्राइस देतो. (२५) खुद्द मॅलेट हा भाषेचा व वाङ्मयाचा व्यासंगी असल्याबद्दल पुढीलप्रमाणें निर्देश करण्यांत आला आहे :

"It is a wellknown fact that Sir Charles was a great Persian scholar and that he had collected an excellent Persian library of most valuable illuminated manuscripts which he afterwards presented to the Royal Asiatic Society of London." (२६)

मॅलेटच्या वेळीं राजकारणासाठीं दरबारांत इंग्रजांचा प्रवेश झाला एवढेंच नव्हे तर समाजाच्या अन्य थरांतहि त्यांनीं शिरकाव करून घेतला. सवाई माधवराव पेशवे

२१ George Forrest. *Selections from the Letters, Dispatches, and other State Papers preserved in the Bombay Secretariat. Maratha Series. Vol I.* p. 481.

२२ Auber. *Rise and Progress of the British Power in India. Vol. II.* p. 27.

२३ Sardesai. *The Last Days of the Maratha Raj.* No. 10. p. 16.

२४ George Forrest. *Selections from the Letters, Dispatches, and other State Papers Preserved in Bombay, Secretariat, Maratha Series. Vol I.* pp. 540-541.

२५ Rao Bahadur D. B. Parasnis. *Poona in Bygone Days.* p. 55.

२६ *Ibid.* pp. 55-56.

व मॅलेट यांच्या नेहमीं गांठीभेटी होत असत. यावेळीं पेशव्यांनी इंग्रज वकिलाला मिऊं नये म्हणून काय व्यवस्था करावी लागत असे, याची माहिती एका पत्रांत दिली आहे ती अशी :

"इंग्रजाकडील वकील आला आहे तो श्रीमंतांचे भेटीस येईल. त्याच्या टोप्या व आंगरखे पाहून श्रीमंत मयामीत होतील, यास्तव आगोवर धीट करावे लागते. ऐशाम बामदारखान्यांत व जिनसखान्यांत वगैरे कारखान्यांत टोप्या व आंगरखे इंग्रजाचे साजाचे व सोंगाचे पाठऊन द्यावे म्हणौन पत्रीं लिहिलें त्यावरून टोप्या व कुडत्या मिलोन साडे (स)हा मनगे पाठविली." (२७)

इंग्रजांचा प्रवेश सवाई माधवराव पेशवे, नाना फडणीस व इतर मुत्सद्दी यांच्यापर्यंत झालाच; परंतु इंग्रज वैद्यांना प्रवेशनुद्धां औषधोपचाराकरितां पेशव्यापर्यंत होऊं लागला. थोरले माधवराव पेशवे आजारी पडल्यानंतर निजामाच्या दरबारीं असलेले दोन इंग्लिश डॉक्टर पाठवावे याविषयीं एक पत्र मिळतें.(२८) मॅलेट रेसिडेंट असतांना तर इंग्रज वैद्यांच्या औषधाचा इतर लोकांत प्रसार होऊन, धार्मिक भेदाभेदाकडे लक्ष न देतां इंग्रज व सामान्य लोक यांचा संबंध येऊं लागला. याविषयीं उल्लेख असा आहे :

"Drs. Crusoe and Findlay, the Residency Surgeons, contributed to the spread of English medical treatment and many persons of rank and distinction took English—medicines prescribed by these skilful doctors regardless of any religious scruples." (२९)

या कालांत एकंदरीनें इंग्रजांचे संबंध पेशव्यांच्या दरबारापासून तो त्यांच्या व इतर लोकांच्या वर्ग शय्येपर्यंत येऊं लागलेले दिसतात. त्याबरोबर इंग्रजी विद्या, कला व शास्त्र यांचाहि मराठ्यांच्या समाजांत प्रसार व्हावा असाहि मॅलेटनें प्रयत्न केला. त्याच्या या कामगिरीबद्दल पारसनीस यांनीं पुढीलप्रमाणें निर्देश केला आहे :

"Sir Charles Malet was a very popular person in Poona Society. He not only promoted nation's political and commercial interests but also introduced European Arts, Science and medicine into Maratha Society." (३०)

२७ Sardesai. *Selections from the Peshwa Daftar. The Private Life of the Later Peshwas.* No. 41. pp. 21-22.

२८ *Ibid.* No 156. pp. 86-87.

२९ Parasnis. *Poona in Bygone Days.* p. 53.

३० *Ibid.* p. 52.

मराठे व इंग्रज यांचे संबंध कसे वाढत होते, हें वरील उताऱ्यावरून दिसून येणारें आहे; परंतु हे लोक बोलत असतांना कोणत्या भाषेचा आश्रय करीत हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. तरी पण या लोकांमध्यें फारसी किंवा हिंदुस्तानी या भाषांचें माध्यम असावें, असें वाटतें. तहनामे जे होत होते ते फारसी भाषेंत होत. पण त्याबरोबर मराठी व इंग्लिश या भाषांतहि त्यांच्या प्रती करून फारसी व इंग्लिश ह्या प्रती मराठ्यांकडे आणि फारसी व मराठी या प्रती इंग्रजांकडे सहीशिक्क्यानिशीं ठेविल्या जात. मॅलेटनें सन १७९० मध्यें टिपूविरुद्ध मराठ्यांशीं जो तह केला त्या तहाच्या भाषेसंबंधानें माहिती मिळते ती अशी :—

"This treaty, consisting of fourteen articles, being this day settled and concluded by Mr. Malet, with the Peshwa Savai Madhavrao Narayan Pandit Pradhan Bahadur, Mr. Malet has delivered to Pandit Pradhan one copy of the same, in English and Persian signed and sealed by himself, and Pandit Pradhan has delivered to Mr. Malet another copy in Marathi and Persian, executed by himself." (३१)

मॅलेटच्या वेळेस इंग्रज व मराठे यांच्या व्यवहारांत ज्या भाषांचा उपयोग होई, त्याच भाषा पुढील इंग्रज अधिकाऱ्यांनीं अवगत करून घेतल्या. मॅलेटनंतर युटॉफ व पामर यांनीं पुण्यास रेसिडेंट म्हणून काम केलें; परंतु त्यांच्यावेळच्या भाषेसंबंधींचा उल्लेख कोठें आढळत नाहीं. यानंतर सर बेरी क्लोज हा सन १८०१ मध्यें पुण्याचा रेसिडेंट झाला. याला कांहीं देशी भाषा अवगत होत्या. हें एक कारण त्याला रेसिडेंट नेमण्याच्या मुळाशीं होतें. यावरून राजकारणी मुत्सद्यांना देशी भाषा आल्या पाहिजेत याविषयीं कंपनीचे अधिकारी किती जागरूक असत हें दिसून येतें. क्लोजच्या नेमणुकींत भाषाज्ञानाचें महत्त्व किती होतें, यासंबंधीं पारसनीस म्हणतात,

"He was subsequently appointed by the Marquis Wellesley, on account of his eminent talents and integrity, as well as his knowledge of the language, manners and the customs of the natives, Resident of Mysore." (३२)

बेरी क्लोजला देशी भाषा येत होत्या, एवढेंच नव्हे तर या देशांतील आचार-विचारांची त्याला चांगली माहिती होती व तें आचारविचार तो पाळीत असे. हिंदु लोक गोमांस निषिद्ध मानतात म्हणून त्याचा तो कधींच उपयोग करीत नसता.(३३)

३१ George Forrest. *Selections from the Letters, Dispatches, and other state papers preserved in the Bombay Secretariat Maratha Series Vol. I.* p. 532.

३२ Parasnis. *Poona in Bygone Days.* p. 58.

३३ *Ibid.* p. 60.

कर्नल क्लोजच्या कारकीर्दीतील महत्त्वाची गोष्ट म्हणजे वसईचा तह. ही होय. या तहानें बाजीरावाची स्थिति इंग्रजांच्या मांडलिकासारखीच झाली व त्याचा इंग्रजांशीं संबंध येऊन त्याला इंग्रजांची वारंवार सरबराई करावी लागली. कोणताहि इंग्रज आला तरी त्याला मेजवानी द्यावी लागत होती. याविषयीं अनेक उल्लेख पेशव्यांच्या डायरींत आहेत. त्यांपैकीं कांहीं खालीं दिले आहेत:—

"१५९७ रु॥ इंग्रज सिदनम वकील यांस मेजवानी केली ..."

"१२२९ कर्नेल वालीस लष्करांतून आले सा॥ त्यास मेजवानी केली त्याचा॥".(३४)

"१२७६ कर्नेल कलोप त्यास मेजवानी केली ते वेळी सनगे खर्च जाला."(३५)

"१४ इंग्रजास मेजवानी चाइली, सबब खिचडी वा॥ खर्च." (३६)

"४८३ हिराबागेंत इंग्रजास मेजवानीचें वेळी वस्त्रे, पोषाक वा॥ खर्च." (३७)

वरील कांहीं उताऱ्यांवरून वसईच्या तहानंतर इंग्रजांची पुण्यास जा ये किती असावी, त्यांचा मराठ्यांशीं व त्यांच्या मेजवानीशीं संबंध किती येत होता हें दिसून येतें. यावरून मराठ्यांच्या भाषेशीं त्यांचा संबंध पुष्कळ येत असावा, हें उघड होईल. लिहितांना फारसी, इंग्रजी व मराठी या भाषा ते उपयोगांत आणीत असें दौलतराव शिंदे व इंग्रज यांच्यामध्यें जो तह झाला त्यावरून दिसून येतें. हा तह सन १८०४ मध्यें कंपनीतर्फे मेजर माल्कम व दौलतराव शिंदे यांच्यातर्फे विठ्ठलपंत व मुनशी केवलनाथ यांच्यामध्यें झाला. फारसी, मराठी व इंग्रजी या तीन भाषांत दोन प्रती काढण्यांत येऊन एक महाराजांजवळ व एक माल्कमजवळ देण्यांत आली. (३८)

कर्नल क्लोजनें सन १८१० पर्यंत पुण्यास काम केलें. त्यानंतर त्याच्या जागीं माऊंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन याची रेसिडेंट म्हणून नेमणूक झाली. ही नेमणूक होण्यापूर्वी त्यानें भाषाविषयक तयारी करून विविधप्रकारचा अनुभव मिळविला. त्याची येथें माहिती देणें आवश्यक आहे.

हिंदुस्थानांत आल्यावर एल्फिन्स्टनची नेमणूक वेलस्लीच्या फौजेंत त्याचा चिटणीस म्हणून झाली. यामुळें वेलस्लीची जेथें जेथें छावणी असे तेथें तेथें त्याला जावें लागे. वेलस्लीची व टिपूची लढाई चालली होती तेव्हां तो श्रीरंगपट्टणला होता.

---

३४ Sardesai. *Selections from the Peshwa Daftar: Extracts from the Peshwas' Diaries.* No. 258. p. 145.

३५ *Ibid.* No. 258. p. 146.

३६ *Ibid.* No. 260. p. 147.

३७ *Ibid.* No. 267. p. 151.

३८ J. W. Kaye. *The Life and Correspondence of Major General Sir John Malcolm.* *Vol. I.* p. 532.

इ. स. १८०१ मध्यें तेथून निघून तो हैद्राबादेस आला. येथेंच त्यानें मराठी व फारसी भाषेचा अभ्यास सुरू केला. एल्फिन्स्टनच्या मराठी भाषाभ्यासाबद्दल त्याचा चरित्रलेखक कोल्ब्रुक म्हणतो,

"Elphinstone contiuned his Persian studies, and attacked the Mahratta language systematically, as if in preparation for Poona. But his reading was the most part desultory." (३९)

एल्फिन्स्टननें हिंदुस्थान व पर्शिया या देशांतील भाषांचा अभ्यास केलाच; पण ग्रीक व लॅटिन या भाषांतील वाङ्मयाचा परिचय करून घेतल्याची माहिती बिशप हेबरनें दिली आहे. (४०) या भाषाज्ञानाचा उपयोग त्यांस पुष्कळच झाला, असें दिसून येईल.

असईच्या लढाईच्या वेळीं तो वेलस्लीच्या फौजेबरोबर त्याचा चिटणीस म्हणून होता. वेलस्लीचा व मराठ्यांचा जो पत्रव्यवहार चालत असे त्याचें भाषांतर करण्याचें काम तो करीत असे. त्याप्रमाणें निरनिराळ्या दरबारास मराठींत पत्रें लिहिण्याचें कामहि त्याला करावें लागे. याविषयीं नगर येथील कँपमधून त्यानें आपला मित्र स्ट्रेची याला ता. १७ ऑगस्ट १८०३ रोजीं लिहिलेल्या पत्रांत तो म्हणतो,

"I had yesterday a trial of my appointment. I got twenty hircarras to procure intelligence, interpreted between the General and Gocla and translated into Mahratta a letter for the Raja of Colapoor, I did all I had to do, not well, you may guess, but coolly and carefully." (४१)

एल्फिन्स्टनला निरनिराळ्या राजे लोकांमधील पत्रव्यवहाराचें, हेरांच्या रिपोर्टांचें भाषांतर करावें लागे. एखाद्या वेळीं राजे लोकांना मराठींत पत्रें लिहिण्याचेंहि त्याला काम करावें लागत होतें, असें यावरून दिसून येतें. या कामाबरोबर मराठी, फारसी व इतर भाषांकरितां दुभाषी म्हणून काम करीत असल्याचा त्यानें उल्लेख केला आहे. हें दुभाषाचें कार्य किती कठीण आहे व त्यांत पुष्कळ वेळ कसा खर्च होतो हें सांगतांना १ ऑक्टोबर १८०३ मध्यें एल्फिन्स्टन स्वतःविषयीं लिहितो,

---

३९ Sir T. F. Colebrooke. *Life of the Honourable Mountstuart Elphinstone. Vol. I.* p. 30.

४० Right Rev. Reginald Heber. *Narrative of a Journey through the Upper Provinces of India. from Calcutta to Bombay. 1824-25 Vol II.* p. 219.

४१ Colebrooke. *Life of the Honourable Mountstuart Elphinstone. Vol. I.* p. 52.

stani, the language in which the Peishwa usually conversed with the Resident." (५१)

या सर्व संभाषणांत बाजीराव एल्फिन्स्टनशीं हिंदुस्थानींत बोलण्याच्या ऐवजीं मराठींतून बोलत होता. त्याला उत्तर देण्याचें काम एल्फिन्स्टन हिंदुस्थानींत करीत होता. वास्तविक बाजीराव इंग्लिश रेसिडेंटशीं हिंदुस्थानींत बोलत असे, पण यावेळीं त्याच्याशीं मराठी भाषेंत बोलण्याचें कारण ब्रिग्ज पुढीलप्रमाणें देतो:—

"The Peishwa usually conversed in Hindustani, which he spoke with great fluency; but I have said that on the present occasion he chose to make use of his mother tongue. He was aware that Mr. Elphinstone understood Mahrattee perfectly, and not a word was lost on him. The practice I had in translating so much from that language daily for the last year made me also master of all that was said." (५२)

यावरून एल्फिन्स्टनला मराठी चांगलेंच येत होतें, असें स्पष्टपणें दिसून येतें. एवढेंच नव्हे तर आपणांलाहि मराठी येत होतें, हेंहि ब्रिग्जनें जातां जातां सांगून टाकलें आहे.

एल्फिन्स्टनच्या वेळच्या पुष्कळ लष्करी अधिकाऱ्यांनीं देशी भाषांचा अभ्यास केलेला दिसतो. यापैकीं ब्रिग्जचें नांव वर आलेंच आहे. ब्रिग्जला देशी भाषांचा अभ्यास करण्याचें महत्त्व इतकें पटलें होतें कीं लष्करी अधिकाऱ्यांनीं देशी भाषेची परीक्षा द्यावी, असें त्यानें बजावून सांगितलें आहे. याविषयीं तो म्हणतो,

"No officer in the Native army is allowed to take charge of a company till he has passed an examination in the language of his regiment;" (५३)

एल्फिन्स्टनचा समकालीन लष्करी अधिकारी मेजर माल्कम यानेंहि हिंदुस्थानांत आल्यावर फारसी भाषेचा अभ्यास सुरू केला होता. याविषयीं त्याचा चरित्रलेखक म्हणतो,

"The first step towards this consummation was to acquire a competent knowledge of the language of Native Courts. He determined that he would study Persian....And very resolutely

५१ Major Evans Bell. *Memoir of General John Briggs*, p. 45.
५२ *Ibid.* p. 47.
५३ Lieut General John Briggs. *India and Europe Compared.* p.45.

did, the young man apply himself to the mastery of Oriental character and the construction of the language." (५४)

माल्कम व बाजीराव यांची भेट झाल्याचें संतु टेमगिरे नांवाच्या कंपनीच्या नोकरानें नमूद केलें आहे. या भेटीसंबंधानें तो लिहितो,

"फोडसोनी आपल्या जवळ दिले. द्वादशीचे दिवसी मी कपडे मलर्क सोस केले, लागलेच माघारे जावे आसे होते; परंतु ते दिवसी येकादसीमुळें बाजीराव याचे बोलणे जाले नाही. सा॥ ते दिवसी बापू गोखले मलर्क गोकडे आले. त्यांची भेटी जाली. नंतर द्वादसीस बाजीराव याची भेट होऊन मेजवानीस खाण्यासच बाजीराव यांचे येथें राहिले. खाण्याचे वेळेस समाधानीचे बोलणे मलर्क सो व बाजीराव यांचें जाले." (५५)

बाजीराव व माल्कम यांची ही भेट ९ ऑगस्ट १८१७ मध्यें पुण्याला झाली. या भेटीचे वर्णन माल्कम पुढील शब्दांत करतो :—

"I had a visit from Moro-Dikshut, the Prime Minister, who earnestly entered that I would remain till next morning; and as I found it was a fast-day with Brahmins, and the Peishwah consequently too exhausted for a long conference, I consented, but stipulated for a very early interview next day. The Minister kept me talking till twelve at night, and I was awakened at five o' clock on the morning of 9th with a message that the Peishwah expected me at six. I was kept by the ceremonies of previous visits from Goklah and other of the Mahratta military chiefs with whom I was acquainted till seven, when I went to the Maharajah. ...I had an interview of three hours and a half what passed is *secret and political*, but the result was satisfactory." (५६)

या भेटीत मोरो दीक्षित, बापू गोखले व इतर सरदारांबरोबर माल्कमची बोलणी झाली व बाजीरावाबरोबर साडेतीन तास मुलाखत झाली. ही बोलणी व मुलाखत कोणत्या भाषेत झाली याचा येथे उल्लेख नाही. तरी ही मुलाखत हिंदुस्तानी भाषेत झाली असावी असें वाटतें. बाजीराव इंग्रजांशी बोलतांना हिंदुस्तानीत बोलत असे.

५४ Kaye. *The Life and Correspondence of Maj. Gen. Sir John Malcolm*, pp. 19-20.

५५ Sardesai. *Selections from the Peshwa Daftar. The Last Days of the Maratha Raj.* No. 166. p. 155.

५६ Kaye. *The Life and Correspondence of Maj. Gen Malcolm. Vol. II*, pp. 169-170.

याचा उल्लेख मागें आलाच आहे. एकंदरीत हें सर्व विवेचन पाहिलें असतां, पेशवे-कालाच्या अखेरीस मराठींत व हिंदुस्थानींत अशा भाषांत इंग्रज मराठे यांचा व्यवहार होऊं लागला होता, असें दिसून येतें.

एल्फिन्स्टनच्या वेळचा कॅप्टन ग्रांट डफ यालाहि देशी भाषा व रीतीरिवाज चांगले अवगत होते, असें ब्रिग्जनें लिहून ठेवलें आहे. तें असें :

"Captain Grant (afterwards Grant Duff), who was intimately acquainted with the Mahratta customs and languages, was appointed resident" (५७)

ग्रांट डफ हा सातार्‍यास रेसिडेंट म्हणून नेमला गेला व तेथेंच त्यानें मराठ्यांच्या इतिहासाचीं सर्व साधनें जमविलीं. इतिहाससंबंधीं हीं कागदपत्रें गोळा करून इतिहास लिहिण्यास ग्रांट यांस मराठी व इतर भाषांचें ज्ञान उपयोगी पडलें असावें. कारण हे सर्व कागदपत्र ग्रांट डफ यास पहावे लागणार होते. याविषयीं बाळाजीपंत नातू प्रतापसिंह महाराजांस म्हणतो,

"सारे कागद पाहून छाप्यांत छापून विलायतेस जाईल. सर्वांस महाराजाचा पराक्रम राज्यें वगैरे जाहीर होईल. याकरितां करितात व ग्रांटाचे लक्ष महाराजाचे ठिकाणी फार." (५८)

ग्रांट डफ सातार्‍यास असतांना, तो प्रतापसिंहास राज्यव्यवहाराची माहिती करून देत असे. (५९) यावेळेस त्यानें व प्रतापसिंहानें बोलणें होई. तें कधीं कधीं प्रत्यक्ष होई. तर कधीं कधीं प्रतापसिंहाचा दिवाण विठ्ठलपंत फडणीस याचे मार्फत होई. ग्रांट याची पंधरा हजार रुपये तैनात होती असा उल्लेख एका पत्रांत आहे. (६०)

ग्रांट व प्रतापसिंह यांचें दुसर्‍या बाजीरावासंबंधीं झालेलें संभाषण एका पत्रांत दिलें आहे.(६१) हें खेळीमेळीनें होणारें संभाषण कोणत्या भाषेंत होत असावें याचा स्पष्ट उल्लेख नसला तरी ग्रांट याला देशी भाषा अवगत असल्यानें तें मराठी किंवा हिंदुस्तानी या भाषांतून होत असावें. अशा तऱ्हेनें पेशवे-कालाच्या सुरुवातीस फारसी भाषेचें जें प्रस्थ होतें तें मोडून एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीसच मराठी भाषा राजकारणासाठीं इंग्रज लोक शिकूं लागले.

---

५७ Evans Bell. *Memoir of General John Briggs*. p. 91.

५८ Sardesai. *Selections from the Peshwa Daftar: Papers referring to Pratapsinh*. No. 2, p. 25.

५९ *Ibid.* No. 1. pp. 2-3.

६० *Ibid.* No. 1. p. 11.

६१ *Ibid.* No. 5. p. 45.

ब्रिटिश अमदानीच्या सुरुवातीला सर्व कचेऱ्यांचा व्यवहार मराठी भाषेत होत असे, ही गोष्ट मराठी व इंग्रजी रुमालांच्या प्रमाणावरून दिसून येते. (६२) सर्व पेट्यांतील पत्रव्यवहार मराठीत व्हावा असा हुकूम प्रतापसिंहानें काढल्याचें त्याच्या डायरीत नमूद केलें आहे. तो हुकूम असा :—

"सारे पेट्यास यांद हुकुमाची गेली. हुजूर पत्र लिहिणें, लाखोट्यावर श्रीमंत माहाराज नाव पत्रावर नंवर म्हणो नये. पत्र म्हणोन वर आख घालावा. पत्रात येवनी शब्द लेहू नये. माहाराष्ट्र शब्द लिहिणे." (६३)

पेशवाईच्या शेवटच्या काळांत मराठी भाषा इंग्रजांच्या बोलण्यांत येऊं लागली. तशीच आपल्या अमदानीच्या सुरुवातीला त्यांनी मराठी भाषेत पुस्तकें छापण्यास सुरुवात केली. माधवराव अनंत रास्ते यांना पंचोपाख्यान पुस्तक एल्फिन्स्टननें पाठविल्यानंतर त्यांनी आभारप्रदर्शक असें उत्तर एल्फिन्स्टनला ता. २७-१०-१८२२ रोजीं लिहिलें तें पुढीलप्रमाणें आहे :—

"जंजिरे मुंबईस हाली छापखान्यांत माहाराष्ट्र भाषेत पंचोपाख्यान बालबोध लिपीत यंत्रेंकरून बुकें वाचावयास तयार केलीं आहेत. हा चमत्कार आवलोकनांत यावा म्हणौन बुक पाठविले आहे. स्वीकार होऊन मनन व्हावें म्हणून लिहिले ते कल्ले व बूक पाठविले ते पावले. त्याचा स्वीकार करून बहुत खुषी हासल जाहाली."(६४)

भाषाव्यवहारामध्ये मराठीला जें स्थान प्राप्त झालें, याचें कारण महाराष्ट्रांतील लोकांत इंग्रजांना मिसळतां यावें हें होतें. मराठी भाषेचा चांगला अभ्यास केला म्हणजे त्यापासून युरोपियन अधिकाऱ्यांना काय फायदा आहे, हें सांगतांना ब्रिग्ज लिहितो,

"...But I strongly advise you to apply yourself, at some future period, to the acquirement of the provincial language of your regiment, to enable you to communicate freely, not only with the Hindoos in the corps, but with the common people of the country, who do not speak Hindoostany. In the Bombay Army alone, of the three presidencies, a reward is held out to induce military men to acquire the Marratta and Guzeratty

६२ द. रा. गुरुजी व वि. गो. दिघे. एलिअनेश ऑफिस, पुणे येथील पेशवेदसराची मार्गदर्शिका. पृ. ३८.

६३ Sardesai. *Selections from the Peshwa Daftar: Papers referring to Pratapsinh.* No. 1. pp. 13-14.

६४ *Ibid.* No. 12. p. 52.

languages, by which means the European officers, speaking the dialect of all the men in the regiment, are better able to make impartial selections among the men for promotion." (६५)

देशी भाषा शिकण्याकडे इंग्रज वळले ते योगायोगानें नव्हे. येथील परिस्थितीचा चांगला अभ्यास करून व निरनिराळे अनुभव मिळवून त्यांनीं मराठी शिक्षणाच्या आवश्यकतेसंबंधीं आपलें मत बनविलें. पेशवेकालांत इंग्रज अधिकाऱ्यांना भाषेचें ज्ञान होतें तरी त्या प्रत्येकाजवळ दुभाषाच्या कामासाठीं मुनशी असत. मराठ्यांशीं लढाया होत असतांना व त्यांचें राज्य जिंकत असतांना इंग्रजांना दुभाषांचें फार मोठें साहाय्य होत असे; परंतु राजकारणामध्यें मुनशी मध्यस्थ म्हणून घेऊं नयेत व मराठे सरदारांशीं मुनशीमार्फत बोलाचाली व चोलणी न करतांना त्या स्वतःच करण्यास या विषयीं माल्कमनें आपले विचार कर्नल स्लियंटा लिहिलेल्या पत्रांतून प्रकट केले आहेत. मुनशी कितीहि प्रामाणिक व विश्वासू असले तरी राजकारणांत राजेरजवाड्यांशीं व लोकांशीं प्रत्यक्ष संबंध ठेवावा, याचें कारण माल्कमनें या पत्रांत दिलें आहे तें असें:—

"The principle upon which I proceed has not its origin in a distrust of those near me, but in a desire to give confidence to the inhabitants of the country, and to convey by direct communication a just impression of the European character, which they can never receive (however pure the medium) at second hand." (६६)

मराठी भाषा युरोपियन लोकांनीं कां शिकावी हें सांगतांना त्यांचा विश्वास संपादन केला पाहिजे, हें जसें माल्कमनें सांगितलें आहे, तसें मराठी लोकांच्या आदराला पात्र होण्यासाठीं त्यांची भाषा शिकली पाहिजे, असें अलिकडेही किंकेड यानें कारण दिलें आहे. याविषयीं तो म्हणतो,

"Nevertheless the Maratha people have not forgotten their ancient glory. Of all Indian peoples whom I know, they alone are deeply interested in their history and prefer to talk in their own tongue rather than the language of the foreigner. The surest way to gain their esteem is to study their past and to learn their language." (६७)

६५ Briggs. *Letters Addressed to a Young Person in India*. p. 53.

६६ Kaye. *The Life and Correspondence of Maj-Gen. Sir John Malcolm*. Vol. II. pp. 355-356.

६७ Parasnis. *Poona in Bygone Days. Foreword.* p. VI.

पेशवेकालांत मराठी व फारशी या भाषांचा उपयोग परस्पर व्यवहाराचें माध्यम म्हणून केला जाई. तसा इंग्रजीचाहि उपयोग थोड्याशा प्रमाणांत क्वचित् प्रसंगी केलेला दिसतो. तहाची इंग्रजी भाषेंत एक प्रत काढावी लागे व ती मराठ्यांकडे असे, याचा उल्लेख मागें आलाच आहे. एतद्देशीय लोकांनीं इंग्रजी लिहिल्याचा निर्देश कांहीं ठिकाणीं सांपडतो. बाजीरावाच्या नोकरींत असलेल्या खुनाथराव नांवाच्या गृहस्थाला इंग्रजी भाषा चांगली बोलतां येत असे. बाजीराव, कर्नल मरे व रेसिडेंट यांच्यांत खुनाथरावाच्या मध्यस्थीनें जें भाषण झालें, त्यांत यासंबंधीं माहिती मिळते ती अशी:—

"Some conversation took place between his highness, Colonel Murray, and the resident, through the medium of the prime minister, who speaks English remarkably well." (६८)

एतद्देशीय कांहीं लोकांना इंग्रजी येत होतें, व त्या भाषेंत ते चांगलें संभाषण करीत अशी माहिती मेरिया ग्रॅहम ही (बाई) ता. १९ सप्टेंबर १८०९ या तारखेस आपल्या रोजनिशींत देते. ती लिहिते,

"We have spent our forenoon today very agreeably, in conversing with two well informed natives, one a Hindoo, the other a Musulman. They speak English well, and are thoroughly informed in all that concerns the laws, religion and customs of their own nation." (६९)

इंग्रजांकडील पोस्ट ऑफिसरायटर रावजी बाळाजी आपल्या पत्राचा शेवट इंग्रजीमध्यें पुढीलप्रमाणें करतो :

"Honoured Sir, Your most obedient servant, Rowjee Ballajee, Post Office Writer, Boorhanpoor." (७०)

कदाचित् इंग्रजांकडे राहून रावजी बाळाजी हा थोडीफार इंग्रजी भाषा शिकला असेल; परंतु त्याची यापेक्षां जास्त प्रगति झाली नसावी. एकंदरींत एतद्देशीयांनीं इंग्रजींत बोलण्याचीं हीं उदाहरणें असलीं तरी राजकारणांत इंग्रजी भाषेंत बोलणें व वाटाघाटी करतांना ती उपयोगांत आणणें एवढी इंग्रजीची प्रगति त्यावेळीं झालेली दिसत नाहीं. अर्थात् भाषाव्यवहार करण्यासाठीं प्रथम फारशी व मराठ्यांशीं जास्त संबंध आल्यावर नंतर मराठी अशा या दोन भाषांना पेशवेकालांत स्थान प्राप्त झालें, हें स्पष्ट आहे.

६८ *The Asiatic Annual Register*, 1803, p. 100.

६९ Maria Graham, *Journal of a Residence in India*, 1813, p. 15.

७० Sardesai, *Selections from the Peshwa Daftar, The Last Days of the Maratha Raj*, No. 239, p. 226.

या कालांत इंग्रजांप्रमाणें फ्रेंचांचा हिंदुस्तानच्या राजकारणाशीं संबंध आला होता. पण भाषा शिकण्याकडे त्यांनीं अगदींच दुर्लक्ष केलें होतें असें दिसतें. मात्र डुप्ले व त्याची बायको व बुसी यांनीं देशी भाषांचा अभ्यास केल्याचा कोलब्रुक पुढीलप्रमाणें उल्लेख करतो :—

"It does not appear that the French were much more advanced. Madame Dupleix's knowledge of the native languages is mentioned as an important qualification, and Bussy did not begin to learn that language until he was established in the Deckan....The oriental splendour of M. Dupleix has been often mentioned. That of M. Bussy was at least as conspicuous. This able officer maintained a constant intercourse with the natives of rank, and might be reckoned among the greatest of the noblemen of the court of Heiderabad." (७१)

अठराव्या शतकाच्या सुरुवातीपासून राजकारणांत जसा पालट झाला, तसाच भाषाव्यवहारांतहि झाला. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर मोंगल बादशाही दुर्बल झाली व मराठ्यांनीं आपलें वर्चस्व वाढविण्यास सुरुवात केली. खुद्द दिल्लीच्या दरबारांतहि त्यांनीं आपलें वजन चलविलें व त्यामुळें दिल्लीच्या दरबारची प्रचलित असलेली फारसी भाषा पेशव्यांच्या दरबारांतहि येऊन बसली. हा संबंध जसजसा वाढत गेला तसतसा मराठ्यांचा फारसी भाषेशीं संबंध वाढत गेला. अठराव्या शतकाच्या अखेरीस मराठेशाही दुर्बल झाली व इंग्रजांनीं मराठ्यांच्या राज्यांत चंचुप्रवेश करून लवकरच त्या दरबारांत आपलें वर्चस्व स्थापन केलें. मराठ्यांनाहि इंग्रजांच्या मध्यस्थीचें महत्त्व वाटून त्यासाठीं त्यांना बोलवावें लागलें. पुढें मराठ्यांच्या दरबारीं कायमचा इंग्रज वकील ठेवल्यानें दरबारचे चेरचेस घोटाळे नाहींसे होण्यास त्यांची मदत होईल या हेतूनें इंग्रजांनीं पुण्याच्या दरबारीं कायम वकील ठेवावा, असें ठरून मॅलेटपासून पुण्याच्या दरबारीं इंग्रज रेसिडेंट कायमचा राहूं लागला. अशा तऱ्हेनें मराठ्यांचा व इंग्रजांचा संबंध आला.

हा संबंध आल्यानंतर त्यांचा व्यवहार प्रथम फारशी भाषेतून होत असावा. मराठे दरबारांत कित्येक ब्राह्मण वकील होते. त्यांना फारशी भाषेचें ज्ञान चांगलें होतें. इंग्रजांनाहि प्रथम प्रथम फारशी भाषा अवगत नव्हती. तेव्हां त्यांनीं फारशी भाषा जाणणारे मुसल्मान मुनशी नोकरीस ठेवले होते. अशा रीतीनें त्यांनीं राजकारणांतला भाषाविषयक प्रश्न सोडविला. मात्र हा संबंध पुढें जेव्हां अतिशय वाढूं लागला तेव्हां

७१ Hon. Mountstuart Elphinstone, (Ed. Sir E. Colebrooke) *The Rise of the British Power in the East.* pp. 254-255.

त्यांना स्वतःलाच फारशी भाषा शिकावी लागली. पुढें पुढें असें झालें कीं, देशी भाषेचें ज्ञान असल्यामुळेंच त्यांच्या नेमणुका दरबारांत व लष्करांतहि होऊं लागल्या. यामुळ पुढील इंग्रजांना फारशी व त्यानंतर हिंदुस्तानी या भाषा शिकाव्या लागल्या.

त्यानंतर सन १८०२ मध्यें जो तैनाती फौजेचा तह झाला, त्यामुळें पुढेंमागें मराठ्यांचें राज्य आपणांला मिळणार, असें इंग्रजांना वाटूं लागलें व त्यांनीं मराठी भाषेचा अभ्यास सुरू केला. कारण फारशी भाषा ही त्यांना दरबाराच्या कामासाठीं उपयोगी पडे. तरीसुद्धा राज्य घेतल्यावर सामान्य जनतेशीं संबंध येणार म्हणून त्यांच्यासाठीं लोकांची मराठी भाषा त्यांना शिकावी लागली. युरोपियनांचा मराठी भाषेशीं संबंध येण्यापूर्वीं, पोर्तुगीज व फारशी या भाषा राजकीय व इतर कारणांसाठीं त्यांना शिकाव्या लागल्या होत्या. पोर्तुगीज व फारशी भाषांनंतर मराठी भाषेशीं त्यांचा संबंध कसा आला, हें या प्रकरणांत विस्तारानें सांगितलें आहे.



## स्वार्ट्झ व मराठी

ट्रांकोबार येथील डॅनिश मिशनरींपैकी, तंजावर येथें राहून स्वार्ट्झनें मराठी भाषेसंबंधीं जें कार्य केलें, त्याची हकीकत येथें द्यावयाची आहे. हिंदुस्तानांत धर्मप्रसार करण्यासाठीं डेन्मार्क देशांतील मिशनरींनीं ट्रांकोबार येथें मिशनसंस्था स्थापन केली. ही संस्था स्थापण्याच्या बाबतींत डेन्मार्कचा राजा चौथा. फ्रेडरिक याचे प्रयत्न कारणीभूत झाले. त्याचा धर्मगुरु Dr. Lutkens यानें तंजावरच्या राजाकडून ट्रांकोबारचा प्रदेश खरेदी केला होता. तेथेंच मिशन स्थापन करण्यास डेन्मार्कच्या राजानें त्यांस मदत केली. (१)

हें मिशन स्थापन झाल्यानंतर Bartholomew Ziegenbalg हा सन १७०५ मध्यें तेथें आला व त्यानें ही मिशनसंस्था खूप वाढविली. तेथें त्यानें एक चर्चहि बांधलें. इ. स. १७१९ मध्यें तो मरण पावल्यावर ही मिशनसंस्था चालविण्यासाठीं तेथें दुसरे तीन मिशनरी आले. त्यापैकीं Benjamin Schultze यानें बायबलचें भाषांतर करून चोवीस वर्षें मिशनचें काम केल्यानंतर तो जर्मनीला परत गेला. याच्यानंतर स्वार्ट्झ आला. ट्रांकोबार येथील मिशनमध्यें काम करण्यासाठीं स्वार्ट्झचें मन वळविण्याचें श्रेय बेंजामिन श्रूल्ट्झ यालाच द्यावें लागेल.

स्वार्ट्झ याचा जन्म ८ ऑक्टोबर १७२६ मध्यें सोनेन्बर्ग (Sonnenburg) या गांवांत झाला. याचें संपूर्ण नांव ख्रिश्चन फ्रेडरिक स्वार्ट्झ असें होतें. लहानपणीं त्याची आई मरण पावली. त्याच्या गांवांतील शाळेंत त्यानें सोळाव्या वर्षापर्यंत शिक्षण घेतल्यावर त्याच्या वडिलांनीं त्यास Custrin येथें विश्वविद्यालयीन शिक्षणासाठीं ठेवलें. तेथें कांहीं काळ घालविल्यानंतर विसाव्या वर्षी तो Halle विश्वविद्यालयांत आला. या ठिकाणीं ट्रांकोबार येथील डॅनिश मिशनरी श्रूल्ट्झ हा ख्रिस्ती धर्मग्रंथाचें तामीळ भाषेंत भाषांतर करीत होता. या कामांत त्यानें स्वार्ट्झचें साहाय्य मागितलें व त्यानेंहि तामीळ भाषा शिकण्याची तयारी दाखवून कांहीं काळ श्रूल्ट्झला मदत केली. येथें काम करीत असतांना आपण मिशनच्या कार्याला वाहून घ्यावें असें त्यास वाटूं लागलें.

यावेळेस इंग्रज व फ्रेंच यांचें युद्ध होऊन, फ्रेंचांनीं मद्रास घेतल्यानें ट्रांकोबार मिशनची अवस्था वाईट झाली व तेथील मिशनरी पळून गेला. पुढें इंग्रजांनीं मद्रास घेतलें तरी त्या मिशनची स्थिति तशीच राहिली व तें चालविण्यासाठीं योग्य अशा मिशनरीला पाठविण्याचें ठरून शेवटीं स्वार्ट्झ याची तेथें नेमणूक करण्यांत आली.

१ Rev. M. A. Sherring. *The History of Protestant Missions in India, from their commencement in 1706 to 1871.* p. 1.

अशाप्रकारें हिंदुस्तानांत जाण्यासाठी स्वार्ट्झ कोपनहेगन येथें आला. तेथें कांहीं महिने राहून २१ जानेवारी १७५० मध्यें तो येथें येण्यास निघाला. २८ जुलै रोजीं तो कडलोर येथें पोहोंचला व तेथून ३० जुलै रोजीं ट्रांकोबार येथें येऊन दाखल झाला.

ट्रांकोबार येथें आल्यानंतर स्वार्ट्झनें तामीळ भाषेंत खूप प्रगति केली. चाळीस वर्षांच्या घासत्यांत तामीळ बोलण्याचें त्याचें कौशल्य पाहून, ट्रांकोबार येथील मिशनरी मि. Caemmerer लिहितो;

"He expresses himself in the Tamil language as correctly as a native. He can immediately reply to any question and refutes objections so well that the people acknowledge we can lay nothing to the charge of this priest." (२)

तामीळ भाषेप्रमाणेंच पोर्तुगीज भाषेचा त्यानें चांगला अभ्यास केला. (३) मुसल्मानांच्या दरबारांत फारशी भाषेचा उपयोग होतो, हें पाहातांच तो फारशी भाषा शिकला. त्याबरोबरच त्यानें हिंदुस्तानी भाषेचाहि अभ्यास केला. या भाषाभ्यासामुळें त्याला निरनिराळ्या लोकांमध्यें जातां येऊन, त्या लोकांच्या भाषेंत धर्मप्रसार करतां आला. (४) पुढें तंजावरशीं संबंध आल्यानंतर त्याला मराठी भाषेचाहि अभ्यास करावा लागला.

तंजावर येथील राजाशीं स्वार्ट्झचा संबंध सन १७६९ मध्यें आला. त्यावेळीं तुळसाजी नांवाचा राजा तेथें राज्य करीत होता. राजाची व स्वार्ट्झची भेट झाली तेव्हां स्वार्ट्झनें त्याच्याबरोबर तामीळ भाषेंत संभाषण केलें. यापुढें स्वार्ट्झची व तुळसाजीची मैत्री होऊन, त्यास स्वार्ट्झनें त्याचें गेलेलें राज्य परत मिळविण्यास मदत केली.

इ. स. १७७३ त महंमदअलीनें इंग्लिशांची मदत घेऊन तुळसाजीवर हल्ला केला व त्याचा पराभव करून त्यास कैद केलें. त्याचा सर्व प्रदेश खालसा करून आपल्या राज्यास जोडला. हा सर्व प्रकार मद्रास सरकारनें आपल्या जबाबदारीवर व महंमदअलीच्या इंग्लिश सावकारांच्या फायद्यासाठीं केला होता. कोर्ट ऑफ डायरेक्टरांना या अन्यायाची बातमी कळतांच त्यांनीं मद्रास सरकारचा निषेध केला व तुळसाजीला परत गादीवर बसविण्याचा हुकूम केला. अशा रीतीनें सन १७७६ त तुळसाजी पुन्हां गादीवर बसला. या कामीं स्वार्ट्झनें पुष्कळ श्रम करून आपलें वजन खर्ची घातलें.

२ Jesse Page. *Schwartz of Tanjore*. p. 199.

३ *Ibid.* pp. 74-75.

४ *Ibid.* p. 68.

तंजावरला राहिल्यामुळेंच व तेथील राजदरबाराशीं संबंध आल्यामुळें स्वार्ट्झला मराठी भाषा शिकावी लागली असें दिसतें. या भाषेचा उपयोग धार्मिक विषयावर पुस्तकें लिहिण्यासाठीं करतां येईल असेंहि त्याला वाटत असावें. कारण या भाषेंत खिस्ती धर्मावरील संभाषणाचें पुस्तक लिहिल्याचा उल्लेख त्याचा चरित्रलेखक पेज करतो. तो असा :—

"Meanwhile, to help the work at Tanjore, Schwartz made himself proficient in the Mahratta language and wrote a dialogue in that tongue on the Christian faith which was fruitful of good results." (५)

स्वार्ट्झच्या मराठी भाषाज्ञानामुळेंच तंजावर येथील दरबारांत त्या भाषेचा दुभाषी म्हणून त्याची नेमणूक झाली होती, अशीहि माहिती सांपडते. (६)

*स्वार्ट्झचा व तंजावरचा संबंध पुढेंहि तसाच राहिला. तुळसाजीचा दहा वर्षांचा* दत्तकपुत्र सर्फोजी याचा स्वार्ट्झनें सांभाळ करावा अशी त्यानें त्यास विनंति केली होती; परंतु तुळसाजीचा सावत्रभाऊ अमरसिंग यांस राजपुत्राचा सांभाळ करण्यास व त्याचें शिक्षण करण्यास सांगावें, असें स्वार्ट्झनें त्यांस कळविलें.

इ. स. १७८७ मध्यें तुळसाजी मरण पावल्यानंतर, अमरसिंगानें सर्फोजीचा सांभाळ न करतां त्यास गादीवरून काढून कैद केलें व आपण स्वतःच गादी बळकाविली. या अंदाधुंदीची माहिती मद्रास सरकारला कळतांच त्या सरकारनें मि. पेट्री यांस तंजावरचा कमिशनर नेमलें व स्वार्ट्झच्या मदतीनें तेथील राज्यकारभार करावा अशी व्यवस्था केली. स्वार्ट्झनें सर्फोजीला कैदेंतून मुक्त करून त्याला शिक्षणासाठीं मद्रास येथें ठेविलें. तेथेंच सर्फोजी इंग्रजी भाषा शिकला. तंजावरहून स्वार्ट्झनें सर्फोजीला कांहीं पत्रें लिहिलीं आहेत त्यांत इंग्रजी भाषेचें ज्ञान कसें करून घ्यावें हें लिहितांना तो म्हणतो,

"A language cannot," he assures Serfogee, "be learned but by assiduous application....I wish you had somebody near you with whom you could talk. By conversation we improve. When you send me a letter I wish to see your composition

५ *Ibid*. p. 107.

६ Buckland. *Dictionary of Indian Biography*. p. 378. स्वार्ट्झशिवाय त्या दरबारांत सन १७८७ मध्यें सर विल्यम ब्लॅकबर्न हा मराठी भाषेचा दुभाषी होता अशीहि माहिती आढळते. पहा : *Dictionary of Indian Biography*. p. 44.

without being corrected, when I shall be fully convinced of your progress.". (७)

सर्फोजीच्या ठिकाणीं भाषा व वाङ्मय यांची आवड निर्माण होण्यास स्वार्ट्झची ही शिक्षणपद्धति बहुतांशीं कारणीभूत झाली असली पाहिजे.

हें काम करीत असतांनाच स्वार्ट्झ पायाच्या दुखण्यानें आजारी पडला व सन १७९८ मध्यें तंजावर येथें मरण पावला.

स्वार्ट्झला मराठीशिवाय दुसऱ्या अनेक भाषा येत होत्या. त्यांचा उपयोग राजदरबारीं व लोकांशीं बोलतांना त्याला कसा झाला. याचा उल्लेख त्याचा चरित्रलेखक जेसी पेज करतो. तो असाः—

"He was a scholar, and had a good knowledge of the classics, of German literature; he was also master of Hebrew, Tamil, Persian, Hindustani, Mahratta, and the Indo-Portuguese languages. There is no doubt that his linguistic powers were very helpful to him, as we have seen, they so often enabled him to get past the crafty Brahmins, and converse with the Rajah or Periah alike in their own tongue about the truths of Christianity."(८)

स्वार्ट्झचा एक पुतळा ईस्ट इंडिया कंपनीनें मद्रास येथील फोर्ट सेंट जॉर्ज या किल्ल्यांतील चर्चमध्यें उभारला. या पुतळ्यावर जो शिलालेख लिहावयाचा तो एतद्देशियांना वाचतां यावा म्हणून देशी भाषेत असावा, अशी सूचना कंपनीनें केली होती. (९)

सर्फोजीस तंजावरची गादी मिळाली; परंतु त्यानें फार काळ राज्यकारभार केला नाहीं. टिपूच्या पश्चात् लॉर्ड वेलस्लीनें म्हैसूरच्या राज्याची व्यवस्था केली तेव्हां त्यानें सर्फोजीचें मन वळवून त्याजकडून सर्व संस्थानचा कारभार काढून घेतला व त्या संस्थानच्या उत्पन्नापैकीं कांहीं नियमित रकम देऊन त्यांस नामधारी राजा करून ठेवला व खरी सत्ता आपल्याकडे घेतली. (१०)

---

७ *Jesse Page. Schwartz of Tanjore.* p. 154.

८ *Ibid.* p. 198.

९ *Papers Presented to the House of Commons, relating to the East India Affair. Ordered to be printed 14th April 1813.* India Board Office. p. 81.

१० म. गो. रानडे. मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष. (आ. २ री. शके १८३४) पृ. १४९.

राज्यकारभाराच्या दगदगीतून सुटल्यानंतर, सर्फोजीनें आपला सर्व वेळ विद्याव्यासंगांत व निरनिराळ्या भाषांतील पुस्तकें संग्रहित करण्यांत घालविला. यापैकींहि विशेष गोष्ट म्हणजे छापखान्याची सामुग्री आणून तो सन १८०५ मध्यें सुरु केला ही होय. स्वार्ट्झच्या सहवासामुळें व शिक्षणामुळें सर्फोजीस वाचनाची गोडी लागली. यामुळेंच त्यानें तंजावर येथें स्वतःचें ग्रंथालय स्थापन केलें. बिशप हेबर यानें तंजावरला सन १८२६ मध्यें भेट दिली तेव्हां आपलें ग्रंथालय पाहाण्याची विनंति सर्फोजीनें त्यास केली. या भेटीचें वर्णन आर्चडिकॉन रॉबिन्सननें लिहून ठेविलें आहे. त्यावरून सर्फोजीच्या ग्रंथसंग्रहाची, शास्त्रीय उपकरणांचा संग्रह करण्याच्या त्याच्या आवडीची व छापखान्याच्या प्रयत्नाची कल्पना येईल. - रॉबिन्सन ३० मार्च या तारखेस लिहितो,

"The Bishop paid a private visit to the Rajah, who received us in his library, a noble room with three rows of pillars, and handsomely furnished in the English style. On one side there are portraits of the Maharatta dynasty from Shahjee and Sivajee, ten book-cases containing a very fair collection of French, English, German, Greek, and Latin books, and two others of Maharatta and Sanscrit manuscripts. In the adjoining room is an air-pump; an electrifying machine, an ivory skeleton, astronomical instruments, and several other cases of books, many of which are on the subject of medicine, which was for some years his favourite study.....His stables contain several *fine English horses; but that of which he is most justly proud*, as the rarest curiosity of an Indian court, is an English printing press, worked by native Christians, in which they struck off a sentence in Maharatta in the Bishop's presence in honour of his visit." (११)

मराठी भाषा व वाङ्मय यांच्या वृद्धीसाठी करण्यांत आलेला हा प्रयत्न महत्त्वाचा आहे. विशेष म्हणजे सर्फोजीचें मन वळवून हा छापखाना काढण्यास स्वार्ट्झनें त्यांस खूप मदत केली. (१२) अशा रीतीनें हा छापखाना काढण्यांत स्वार्ट्झ व त्याचा विद्याव्यासंगी शिष्य सर्फोजी या दोघांकडेहि याचें श्रेय जातें. देवनागरी

११ *The Life of Reginald Heber, Lord Bishop of Calcutta by His Widow. Vol. II.* London. MDCCCXXX. pp. 429-430.

१२ *Journal of the Tanjore Saraswati Mahal Library. Vol. I.* No. 2. p. 17.

टाइप असलेला य "नवविद्याकलानिधि" असें सार्थ नांव असलेला हा छापखाना सन १८०५ मध्यें सर्फोजीनें सुरू केला. या छापखान्याची माहिती मिळते ती अशी:—

"The first press with Devanagari type, in Southern India, was started about 1805, at Tanjor, by Raja Sarabhoji (Serboji) the well-known pupil of the great German Missionary Swartz. His object was to print the books required for the elementary Sanskrit and Maratha Schools he had established in the Tanjor district. A small hand press (still in the Tanjor palace) and a fount of Devanagari type were procured, probably from Madras, and this little office received the rather magniloquent name of *Navavidyakalanidhi*. The Superintendent was a Brahmin named *Kuppa Bhatta*. The First production of the press seems to have been a Sanskrit-Maratha *Panchanga*, or Almanac, which was continued for several years, till superseded by those of the Bombay lithographic presses." (१३)

सर्फोजीनें तंजावर येथें काढलेल्या या छापखान्याचें महत्त्व वाचकांच्या ध्यानीं यावें, म्हणून वर सविस्तर उतारा द्यावा लागला. या "नवविद्याकलानिधि" मध्यें छापलेलें पहिलें पुस्तक म्हणून संस्कृत-मराठी पंचांगाचा उल्लेख करून हें पंचांग बरीच वर्षे चालू होतें असें म्हटलें आहे; परंतु या पंचांगाची माहिती अन्यत्र कोठें मिळत नाहीं. तंजावर येथील छापखान्यांत अगदीं पहिलें छापलेलें पुस्तक म्हणून ज्या पुस्तकाचा उल्लेख आढळतो तें इसापच्या गोष्टींचें सखण्णा पंडितानें केलेलें भाषांतर होय. ब्रिटिश म्युझियमच्या मराठी पुस्तकांच्या कॅटलॉगमध्यें या पुस्तकाची माहिती दिलेली आहे. ती अशी :—

"AESOP. *Begin* : प्रपंच्या माजि जें शास्त्र लोपल्यां मनुष्य सृष्टीचें श्रेष्ठपण. [Balabodhamuktavali. A translation of Aesop's Fables into Marathi, interspersed with Sanskrit verse, by. Sakhkhana Pandit] ff. 196. तंजापुरी [*Tanjore*, 1806]." (१४)

या पुस्तकाची मायक्रोफिल्म मुंबई येथील मराठी संशोधनमंडळांत आहे. त्यांतील प्रस्तावनेंत "शरफोजी राजेसाहेब यांची आज्ञा जाहल्यावरून आज्ञाधारक मुब्बाजी शेषो यांनीं इमजी मानिमपील अभिप्राय यथामति महाराष्ट्र भाषेंत लिहिला आणि वेदमूर्ति शिवरामशास्त्री यांनीं त्यास संस्कृत श्लोक करून लिहिले असत..." असें नमूद आहे.

१३ *Indian Antiquary. vol. I.* 1872. p. 194.

१४ J. F. Blumhardt. *Catalogue of Marathi and Gujarati Printed Books in the Library of the British Museum. London* 1892. p. 1.

आढळतो.(३) बंगालमधील कॅथॉलिक मिशनचा रेक्टर Manoel da Assumpção यानें मिशनरी लोकांना ब्राह्मणांशीं व हिंदूंशीं वादविवाद करतां यावा म्हणून तीन पुस्तकें बंगाली भाषेंत लिहिल्याचें दिसतें. यापैकीं Cathecismo da Doutrina Christaã हें रोमन लिपींत लिस्बन येथें १७४३ सालीं छापलेलें उपलब्ध आहे. (४) हें पुस्तक इ. स. १७३४ मध्यें पुरें झालें असावें. या धार्मिक पुस्तकाप्रमाणेंच त्यानें बंगाली भाषेचा शब्दकोश व व्याकरण लिहिलें आहे. (५)

कॅरे कलकत्त्यास येण्यापूर्वी कितीतरी वर्षे अगोदर पोर्तुगीज मिशनऱ्यांची कॅथॉलिक मिशनसंस्था तेथें होती व त्या मिशनचा मिशनरी Manoel da Assumpção यानें बंगाली भाषेंत पुस्तकें लिहून मिशनचें कार्य चालू ठेवलें होतें. या कालापर्यंत येथें एकहि प्रॉटेस्टंट मिशन नव्हतें. कॅथॉलिक मिशनची चळवळ पुढें बंद होऊन प्रॉटेस्टंट मिशनची सुरवात इ. स. १७५८ मध्यें झाली. याविषयीं पुढील-प्रमाणें माहिती आढळते :—

"The protestant Mission in Bengal commenced in 1758. The Honourable Company's ships brought out the annual supplies for this Mission, and before the year 1770, religious tracts were translated into the Bengalee language;"(६)

यावरून इ. स. १७७० पूर्वी बंगाली भाषेंत धार्मिक पुस्तिका भाषांतरित होत होत्या, हा उल्लेख पोर्तुगीज मिशनरींच्या धार्मिक ग्रंथलेखनाला उद्देशून असावा, असें वर दिलेल्या माहितीवरून वाटतें. आतां इ. स. १७५८ मध्यें प्रॉटेस्टंट मिशन संस्था कलकत्ता येथें कशी स्थापन झाली तें पाहूं. कॅरे येण्यापूर्वी बंगालमध्यें एकच प्रॉटेस्टंट मिशनरी होता. त्याचें नांव Kiernander the Swede असें होतें. यास इ. स. १७५८ मध्यें क्लाईव्हनें कलकत्त्यास आणलें. यामुळें या वर्षापासून बंगालमध्यें प्रॉटेस्टंट मिशनची सुरवात झाली असें म्हटलें जातें. मात्र पोर्तुगीज मिशनरींप्रमाणें कर्नांडर यानें बंगाली किंवा दुसऱ्या एखाद्या भाषेंत ख्रिस्ता धर्मग्रंथांचीं भाषांतरें केलीं नाहींत. याचें कारण त्याला बंगाली अथवा हिंदुस्तानी या भाषा मुळींच येत नव्हत्या,* आणि यामुळेंच त्याला लोकांवर

३ Sushil Kumar De. *History of Bengali Literature*. pp. 67-68.

४. 'क्रेपार शास्त्रेर अर्थभेद' असें या पुस्तकाचें नांव असून श्री. प्रियरंजन सेन, कलकत्ता, यांनीं ही नवी आवृत्ति बंगाली लिप्यंतरासह अलिकडे प्रसिद्ध केली आहे.

५. डॉ. सुनीतिकुमार चतर्जी व श्री. प्रियरंजन सेन या दोघांनीं बंगाली भाषांतरासह १७४३ सालच्या या व्याकरण व कोश यांची दुसरी आवृत्ति तयार करून कलकत्ता, विद्यापीठानें ती १९३१ सालीं प्रसिद्ध केली आहे.

६ *The Oriental Christian Spectator*. January 1840. p. 23.

यजन पाडतां आलें नाहीं. (७) कर्नोडर हा इ. स. १७९९ मध्ये मरण पावला. कॅरे कलकत्यास आला असतां त्याची व कर्नोडरची भेट झाली होती. कर्नोडर कलकत्यास इतकीं वर्षे राहिला तरी त्यानें लोकांमध्यें मिसळून केलेलें कोणतेंहि कार्य कॅरेला दिसून आलें नाहीं व लोक कर्नोडरला त्याच्या मृत्यूनंतर अल्पावधींतच विसरूनहि गेले. (८)

हिंदुस्तानांत आल्यानंतर कॅरेला कर्नोडर हा मिशनरी जसा भेटला, तसाच हिंदुस्तानांत येण्यापूर्वी जॉन टॉमस हा दुसरा मिशनरी त्याला भेटला. कॅरेच्या पूर्वी हिंदुस्तानाच्या एकदोन सफरी करून जॉन टॉमसनें कलकत्याची माहिती करून घेतली होती. हा धंद्यानें सर्जन असून बंगाल सिव्हिल सर्व्हिसच्या लोकांना धर्मोपदेश करीत असे.(९) जॉन टॉमस इंग्लंडमध्यें परत गेल्यानंतर, त्यानें हिंदुस्तानांतील लोकांची माहिती दिल्यावरून कॅरे हिंदुस्तानांत आला. बंगालमध्यें कॅरे येण्यापूर्वी, तेथील मिशनरी लोकें काम करीत असत, हें ध्यानांत येण्यासाठींच, यापूर्वींच्या मिशनरींची माहिती देण्यांत आली आहे. त्यावरून असें दिसतें कीं, लोकांत मिसळून त्यांना खिस्ती धर्माची दीक्षा द्यावी, व धर्मप्रसार करावा असा त्यांचा उद्देश नसावा. या मिशनरींचें काम एवढेंच असावें कीं, जे युरोपियन व इंग्रज लोक ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरीनिमित्त कलकत्यास होते, त्यांना धर्मोपदेश द्यावा. यासाठींच कर्नोडर याला या देशांतील कोणतीच भाषा शिकण्याची आवश्यकता वाटली नसावी आणि त्यामुळेंच कॅरेपूर्वींच्या प्रॉटेस्टंट मिशनरींनीं या देशांतील भाषेंत कोणताहि धर्मग्रंथ भाषांतर करण्याचें मनावर घेतलें नसावें. कॅरेला येथील लोकांत धर्मप्रसार करावयाचा असल्यानें तें काम पुढें त्यानें आरंभिलें.

विल्यम कॅरे याचा जन्म इंग्लंडमधील एका खेड्यांत ता. १७ ऑगस्ट १७६१ रोजीं झाला. याच्या वडिलांचा धंदा विणकराचा असून घरची गरिबी होती. लहानपणीं त्याचें पालन त्याच्या आजीनें केलें. लहानपणापासून त्याला शिकण्याची मोठी आवड होती; आणि ही आवड चुलत्याच्या हाताखालीं माळीकाम करीत असतां त्यानें पुरवून घेतली. माळीकाम करीत असतांना वनस्पतीशास्त्राचा अभ्यास त्यानें केलाच, पण खिस्ती धर्मावरील पुस्तकें व त्यासंबंधीं ऐतिहासिक माहितीहि वाचण्यास त्यानें सुरुवात केली. लहानपणापासूनच कॅरेला धार्मिक पुस्तकें वाचण्याची आवड होती. यांविषयीं तो स्वतःच म्हणतो,

"I had many stirrings of mind occasioned by being often obliged to read books of a religious character; and, having been

७ George Smith. *The Life of William Carey*. pp. 76–77.

८ *Ibid.* p. 78.

९ *Ibid.* pp. 58–59.

accustomed from my infancy to read the Scriptures, I had a considerable acquaintance therewith, especially with the historical parts."(१०)

अशा या बाजूच्या खेड्यांत कॅरेनें माळीकाम करीत चौदा वर्षे घालविलीं व धार्मिक पुस्तकांचें वाचन केलें. तरी पुढें त्याला पोट भरण्यासाठीं कोणता धंदा करावा, याचा विचार पडला. शेवटीं बूट तयार करण्याचा धंदा तो करूं लागला. हा धंदा त्यानें वयाच्या अठ्ठावीस वर्षांपर्यंत केला. या धंद्यांत कॅरेला-फारसा फायदा होत नसल्यानें वयाच्या अठराव्या वर्षी त्यानें मोल्टन येथील बाप्टिस्ट मिशनच्या एका चर्चमध्यें धर्मोपदेशकाची नोकरी धरली. अशा रीतीनें चर्चमध्यें नोकरी धरल्यानें त्याचा अलेक्झांड्रिया, आशियामायनर येथील मिशनऱ्यांशीं संबंध आला. त्यांचें उदाहरण डोळ्यापुढें सतत उभें राहिल्यानें धार्मिक ग्रंथांबरोबर इतिहास, प्रवास व शास्त्रीय विषयांवरील पुस्तकें वाचण्याचा त्याला नाद लागला. यामुळें खिस्ती धर्माचें महत्त्व पटून परदेशांत मिशनरी कार्य करण्याचे विचार त्याच्या मनांत येऊं लागले.

ही धर्मोपदेशकाची नोकरी करीत असतांनाच त्यानें हिब्रू, ग्रीक व लॅटिन या भाषांचा अभ्यास करून त्या भाषांतील बायबलग्रंथहि वाचले. पुढें आपल्या खिस्ती बांधवांना कांहीं नवीन कल्पना पटवून द्याव्यात म्हणून कॅरेनें एक पुस्तिका सन १७९२ मध्यें प्रसिद्ध केली. या पुस्तिकेचें नांव An Enquiry into Obligations of Christians to use Means for the Conversion of the Heathens, in which the Religious state of the Different Nations of the World, the Success of Former Undertakings and the Practicability of Further Undertakings are considered, "(११) असें होतें. बंगालमध्यें मिशन स्थापन करण्याची हीच मुहूर्तमेढ होय. कारण हें पुस्तक प्रसिद्ध केल्यानंतर कॅरेनें परदेशांत मिशनरी कार्य करण्यासाठीं जाण्याचा निश्चय केला. लवकरच इंग्लंडमध्यें बाप्टिस्ट मिशनरी सोसायटी स्थापन होऊन, कॅरे हा १३ जून १७९३ रोजीं हिंदुस्तानांत येण्यासाठीं निघाला व जवळजवळ पांच महिन्यांच्या प्रवासानंतर ता. ११ नोव्हेंबर १७९३ रोजीं तो कलकत्ता येथें पोहोंचला.

हिंदुस्तानांत मिशनरी कार्य करण्यास येण्यापूर्वी कॅरेच्या मनांत अनेक अडचणी उभ्या होत्या. याचें कारण हिंदुस्तानाविषयीं त्याची कल्पना अगदीं विचित्र होती. या देशांत रानटी लोक रहात असून, त्यांच्यांत मिसळल्यानें जिवावरहि बेतण्याचा संभव आहे असें त्याला वाटत होतें; परंतु धर्मप्रसार करावयाचा तर मृत्यूचा धोकाकुद्धां पत्करला पाहिजे असें त्याच्या मनानें घेतलें, व ती भीति त्यानें झटकून टाकली.

---

१० *Ibid.* p. 8.

११ *Ibid.* p. 32.

कलकत्ता येथें आल्यानंतर धर्मप्रसार करतांनाहि त्याच्यापुढें दुसरी एक अडचण उभी राहिली. ती म्हणजे ईस्ट इंडिया कंपनीनें मिशनरी लोकांच्या धर्मप्रसाराच्या कार्यावर घातलेले निर्बंध ही होय. हिंदुस्तानांतील बराच प्रदेश या काळांत ब्रिटिश अंमलाखालीं आला होता. या प्रदेशांत जर मिशनऱ्यांनीं ख्रिस्ती धर्माचा प्रसार केला तर ब्रिटिश राजकारण ढांसळून पडेल, अशी भीति राजकर्त्यांना वाटत होती. यासाठीं मिशनऱ्यांच्या मार्गांत त्यांनीं अनेक अडथळे कसे निर्माण केले, हें खालील उताऱ्यावरून दिसून येईल :

"The East India Company, not satisfied with having banished the missionaries from British territory in India, succeeded, by their influence, in throwing so many difficulties in the way of the embarkation of new missionaries on British ships sailing direct for India, that it soon became expedient for the missionaries to make their way first to the shores of America, and from thence to take vessels to India."(१२)

मिशनरी लोकांनीं हिंदुस्तानांत येऊं नये, या ईस्ट इंडिया कंपनीच्या धोरणामुळें कॅरेच्या मार्गांत पुष्कळ अडचणी आल्या. वास्तविक कॅरेला कलकत्त्यांत प्रवेश करण्याची जरी परवानगी मिळाली, तरी या धोरणामुळें त्याला उघडपणें धर्मप्रसार करतां येईना. याप्रमाणें कलकत्त्यांत त्याला आश्रय न मिळाल्यामुळें व तेथें स्थैर्य येईल अशी आशा न उरल्यामुळें पुढें काय करावें, असा त्याच्यापुढें प्रश्न पडला. अखेर पुष्कळ प्रयत्नानंतर त्यानें मदनावती येथील निळीच्या कारखान्यांत नोकरी पत्करली.

निळीच्या कारखान्यांत सहा वर्षें काढल्यानंतर, हा कारखाना डबघाईस आल्यानें त्याचे चालक मि. जॉर्ज उडनी यांनीं तो बंद केला. हा कारखाना सन १७९९ मध्यें बंद झाल्यानंतर आपण स्वतःच असा एक कारखाना काढावा असा कॅरेनें बेत केला; पण याचवेळीं इंग्लंडहून मिशनच्या कामासाठीं वॉर्ड, मार्शमन, ग्रडसन् व ग्रांट हे हिंदुस्तानांत एका अमेरिकन जहाजांतून आले. प्रथम त्यांचा विचार मदनावतीला जाऊन कॅरेबरोबर तेथेंच मिशन स्थापावयाचा होता; परंतु कलकत्त्यास न जातां ते तसेच पुढें गेले व श्रीरामपुरास उतरले. त्यांना कलकत्त्यापेक्षां हें ठिकाण सर्व दृष्टींनी सोईचें वाटलें. विशेष म्हणजे हें ठिकाण डॅनिश लोकांच्या ताब्यांत असल्यानें ईस्ट इंडिया कंपनीकडून धार्मिक कामांत कोणत्याहि तऱ्हेचा उपसर्ग पोहोंचणार नाहीं व सुरक्षितपणें काम करतां येईल, याची त्यांना खात्री पटली. अशा तऱ्हेनें ता. १०

१२ Leighton and Morney Williams. *Serampore Letters*. pp. 74–75.

जानेवारी सन '१८००' मध्यें कॅरेनें, आपल्या उपरिनिर्दिष्ट मिशनरी सहकाऱ्यांबरोबर श्रीरामपूर येथें मिशन स्थापन केलें.

श्रीरामपूर हें ठिकाण त्याकाळीं कोणीहि आश्रय घ्यावा असें होतें. यामुळें या मिशनरींनीं तेथें जाऊन मिशन स्थापिलें यांत आश्चर्य नाहीं. तेथें हिंदु बहुसंख्यांक असून मुसलमान लोकांची वस्ती थोडी होती. कलकत्ता व बराकपूर हीं दोनहि महत्वाचीं ठिकाणें श्रीरामपूरजवळ असल्यानें व हुगळी व गंगा या दोन नद्या तेथून वहात असल्यानें, श्रीमंत लोक त्या भागांत वस्ती करून होते. या कारणामुळें श्रीरामपूरला महत्त्व येऊन या भागांत प्रथम पोर्तुगीज मग डच, फ्रेंच व इंग्रज यांनीं आपापल्या वखारी घातल्या होत्या. अगदीं शेवटीं म्हणजे प्लासीच्या लढाईपूर्वी दोन वर्षे एका मुसल्मान सरदाराकडून श्रीरामपूरची ही जागा डेन्मार्कनें विकत घेऊन तेथें आपली डॅनिश वसाहत स्थापन केली होती. अनेक अडचणींतून मार्ग काढून कॅरेनें या ठिकाणीं मिशन स्थापन केलें.

कॅरेपुढें तिसरी अडचण भाषेची होती. परक्या देशांत भाषेवांचून अगदीं अडण्यासारखें होतें; परंतु राष्ट्राराष्ट्रांत व्यापार करतांना जशा भाषेच्या अडचणी येतात त्याप्रमाणें त्या मिशनरी कामांतहि येणार, हें उघड होतें. ज्याप्रमाणें व्यापारांत येणाऱ्या अडचणी दुभाषांच्या साहाय्यानें नाहींशा करतां येतात, त्याप्रमाणें या मिशनरी कार्यांत येणाऱ्या अडचणी दुभाषांच्या साहाय्यानें नाहींशा करतां येतील, असें त्याला वाटलें. ज्या ठिकाणीं दुभाषी मिळणार नाहींत, त्या ठिकाणीं मिशनरींनीं तेथील लोकांत मिसळून त्यांची भाषा शिकावयाची व त्यांच्या भाषेंत त्यांना बायबलमधील कल्पना समजावून द्यावयाच्या, असा त्यानें विचार केला. देशी भाषा शिकण्यास फार वेळ लागणार नाहीं, अशी त्याची खात्री होती. वर्षा दोन वर्षांच्या अवधीमध्यें कोणत्याहि देशाची भाषा आपणांस शिकतां येईल, निदान त्यांच्या भाषेंत भाव व्यक्त तरी करत येईल, असें कॅरेनें ठरवून भाषाविषयक अडचणींचा निरास केला. (१३) मिशनरी कार्य करण्यासाठीं ज्या देशांत जावयानें त्या देशाची भाषा हस्तेंद्रेनें शिकली पाहिजे, हें कॅरेला माहीत होतें.

या भाषाविषयक व्यापक दृष्टीमुळेंच कॅरेला, हिंदुस्थानांत आल्यावर कोणतीहि भाषा शिकणें अवघड गेलें नाहीं. मदनावतीला असतांना कॅरेनें रामवसू नांवाच्या मुनशीच्या हाताखालीं बंगाली भाषेचा अभ्यास सुरू केला. ही भाषा अवगत करून घेतल्यानंतर तो दोनशें लोकांच्या समावासमोर त्या भाषेंत तो धर्मोपदेशहि करूं लागला; परंतु पुढें नुसता धर्मोपदेशहि करून कॅरेचें समाधान होईना. बंगाली भाषेंत बायबल प्रसिद्ध करून या लोकांना ख्रिस्ती धर्म समजावून द्यावा, म्हणजे ख्रिस्ती धर्माची खरी

१३ George Smith. *The Life of William Carey*. p. 30.

सेवा केल्यासारखी होईल, असें त्याच्या मनास वाटलें. यामुळें बंगाली भाषेंत बायबलचें भाषांतर करण्याचें काम त्यानें प्रथम सुरू केलें; परंतु संस्कृत भाषेचें चांगलें ज्ञान असल्याशिवाय बंगाली भाषेवर प्रभुत्व मिळवितां येणार नाहीं व त्याचें बंगाली भाषेंत भाषांतरहि बरोबर जमणार नाहीं, हें त्याला लवकरच दिसून आलें. यासाठीं संस्कृत भाषा शिकण्याकडे त्यानें आपलें लक्ष वळविलें व संस्कृत भाषा त्यानें अवगत करून घेतली. संस्कृत भाषेंतील महाभारत वाचून त्या भाषेंतील दुसऱ्या वाङ्मयाबद्दलहि त्याला आवड निर्माण झाली. या संस्कृत भाषेच्या आवडीमुळेंच कॅरेनें पुढें संस्कृत व्याकरण व शब्दकोश इंग्रजींत भाषांतर करण्याचा प्रयत्न केला असें दिसतें. याविषयीं सट्क्लिफला सन १७९८ मध्यें लिहिलेल्या एका पत्रांत तो लिहितो,

"I am learning the Sanskrit language....To accomplish this, I have nearly translated the Sanskrit grammar and dictionary into English, and have made considerable progress in compiling a dictionary, Sanskrit including Bengali and English" (१४)

या भाषांचा अभ्यास करून त्यांत बायबल छापावें अशी कल्पना कॅरेच्या मनांत आली व त्यानें छापखाना काढण्याचे प्रयत्न सुरू केले. कलकत्त्यास यापूर्वीच छापण्याचें काम सुरू झालें होतें. या छापखान्याचा प्रवर्तक म्हणून सर चार्लस विल्किन्स याचें नांव लक्षांत ठेवलें पाहिजे. ईस्ट इंडिया कंपनींत कारकून म्हणून हा सन १७७० मध्यें कलकत्त्यास आला व लवकरच माल्डा येथील वखारीचा सुपरिंटेंडेंट झाला. त्यानें संस्कृत भाषेचा अभ्यास केला होता. टिपूचा पाडाव झाल्यानंतर श्रीरंगपट्टण येथील ग्रंथांचा व हस्तलिखितांचा इंग्लिश सरकारनें ताबा घेतला तेव्हां यानें लायब्ररीयन म्हणून त्यांची व्यवस्था लावली. यावेळीं हाल्हेड यानें एक बंगाली भाषेचें व्याकरण लिहिलें होतें. चार्लस विल्किन्सनें कलकत्ता येथें स्वतःच पंचानन व मनोहर या बंगाली कारागिरांच्या मदतीनें छापखान्यासाठीं टाइप पाडले व हें व्याकरण सन १७७८ मध्यें छापून काढलें. कॅरेनें मिशनचा छापखाना सुरू करण्यापूर्वीं बंगालमध्यें अशा रीतीनें पुस्तकें छापण्यास सुरवात झाली होती. याचवेळेस कलकत्ता येथें एक छापखाना विकावयास निघाल्याचें कॅरेनें ऐकिलें व त्यानें तो छापखाना विकत घेऊन प्रथम मदनावतीस वसविला. पुढें श्रीरामपूर येथें मिशन स्थापन करण्याचें ठरून कॅरे, वॉर्ड व मार्शमन ही सर्व मिशनरी मंडळी तेथें गेली व हा छापखाना तेथें हालविण्यांत आला. या छापखान्याची सर्व व्यवस्था वॉर्डनें पाहिली. विल्किन्सच्या हाताखालीं तयार झालेले पंचानन व मनोहर हे दोन कारागीर कॅरेला मिळाले. टाइप व सांचे तयार करणें हीं दोन कामें हे दोन कारागीर करीत. पंचानन हें काम इतकें अचूक करी कीं, तें

१४ *Ibid.* p. 101.

युरोपियन कामगाराच्या तोडीचें होई, असें म्हटलें जातें. मनोहरमुद्रां बंगाली, नागरी, फारसी व अरबी या लिपींचे टाइप उत्कृष्ट तयार करीत असे. हे टाइप मिशनला उपयोगी पडत व बाहेरहि विकले जात.

श्रीरामपूर येथें छापखान्याची संपूर्ण सिद्धता केल्यानंतर हिंदुस्तानांतील भाषांत बायबलच्या ग्रंथाचें भाषांतर करणें हें काम कॅरेनें अंगावर घेतलें. श्रीरामपूरला येण्यापूर्वीच कॅरेनें बंगाली भाषेचें अध्ययन करून त्या भाषेंत बायबलचें भाषांतर करण्याचा प्रयत्न केला होता, हें मागें सांगितलेंच आहे. छापखाना सुरू केल्यानंतर त्यानें १८०१ मध्यें नवा करार बंगाली भाषेंत छापून प्रसिद्ध केला. देशी भाषांत बायबल छापण्याचा प्रारंभ हाच होय. इ. स. १८०४ च्या सुरवातीला मिशनरींनीं बायबलच्या भाषांतराची योजना आपल्या कमिटीपुढें मांडली. त्यांच्या मताप्रमाणें हिंदुस्तानांत प्रचलित असलेल्या भाषांपैकीं महत्त्वाच्या अशा सात भाषा होत्या. त्या म्हणजे बंगाली, हिंदुस्तानी, उरिया, तेलगू, कानडी, मराठी व तामीळ या होत. यांतील कांहीं भाषांत तरी नव्या कराराचें भाषांतर करावें, असा मिशनरी मंडळींनीं विचार केला. बंगाली भाषेंत १८०१ मध्येंच नवा करार प्रसिद्ध झाला होता व जुन्या कराराचें भाषांतर सुरू झालें होतें. १८०४ मध्यें निरनिराळ्या भाषांत विशेषतः महत्त्वाच्या अशा सात भाषांत नव्या कराराचें भाषांतर करावें, असें ठरलें. त्यांत त्यांनीं भाषांतरासाठीं मराठी भाषाहि घेतली. यावेळेपर्यंत कॅरेनें मराठी भाषेचा अभ्यास केला असावा असें दिसतें. मराठी भाषेच्या भाषांतरासंबंधीं तो लिहितो,

"I undertook no part of the Persian; but, instead thereof, engaged in translating into Maharastia, commonly called the Mahratta language, the person who assists me in the Hindostani being a Mahratta." (१५)

कॅरेनें मराठी भाषेंत बायबलचें भाषांतर करण्याचें काम सुरू केलें, तरी हें काम त्यानें एकट्यानेंच केलें असें दिसत नाहीं. या भाषांतराच्या कामांत त्याला मराठी पंडितांचें साहाय्य होतें. मात्र हा पंडित कोण होता, त्याच्या नांवाचा उल्लेख कॅरेनें केलेला नाहीं. या भाषांतराची सुरवात एका मराठी पंडिताकडून झाली याविषयीं सन १८०२ च्या सुमारांतील एका पत्रांत पुढील माहिती आढळते :—

"A Mahratta Pundit, whom we have retained, has made a beginning of some small portions of the scriptures in that language, and the Devnagur letter will answer for that tongue, and the Hindusthani as well as the Sunscrit." (१६)

१५ *Ibid*, p. 240.

१६ Eustace Carey. *Memoir of William Carey.* (2nd Ed.) p. 425.

मराठी भाषेत नव्या कराराच्या भाषांतरास सुरुवात केल्यासंबंधीं वरील उतान्यांत जो उल्लेख आहे तो 'सेंट मॅथ्यू' या विषयीं असावा. यांत पंडिताचा उल्लेख केलेला नाहीं; परंतु हा पंडित वैजनाथ पंडित असावा, याबद्दलहि शंका नाहीं. फोर्ट विल्यम कॉलेजच्या २० सप्टेंबर १८०४ च्या रिपोर्टांत कॉलेजांतील प्राध्यापकांनीं आदल्या वर्षी कोणतीं पुस्तकें छापलीं व कोणतीं पुस्तकें छापण्यासाठीं तयार केलीं यांची यादी दिली आहे. त्यांत मराठी या विषयाखालीं या पुस्तकाची माहिती देण्यांत आली आहे ती अशी :—

"The New Testament, in the Mahratta Language; translated by Vydyunath, Mahratta Pundit; revised and compared with the original Greek, by Mr. William Carey." (१७)

हें पुस्तक छापण्यासाठीं तयार केलें, असाहि उल्लेख यात केला आहे. हा नवा करार तयार करतांना कॅरेचा भाग यांत किती व वैजनाथ पंडिताचें अंग किती यासंबंधींहि थोडा तर्क करतां येतो. याचें भाषांतराचें काम वैजनाथ पंडितानें करून कॅरेनें ग्रीक प्रतीवरोबर तपासून त्यांत सुधारणा केल्या आहेत. हें पुस्तक म्हणजे 'मॅथ्यूचें शुभवर्तमान' हेंच असावें. कारण १८०५ मध्यें हें पुस्तक देवनागरी लिपींत प्रसिद्ध होऊन त्याच्या ४६५ प्रती काढण्यांत आल्याचें कॅरेच्या चरित्रांत नमूद आहे. ते असें:-

"TRANSLATIONS OF THE HOLY SCRIPTURES. 1805. 465 Matthew's Gospel in Mahratta, Nagri Type. (Quarto), 108 pages." (१८)

अशा रीतीनें 'मॅथ्यूचें शुभवर्तमान' या पुस्तकानें मराठी भाषेत बायबलच्या भाषांतराची सुरुवात झाली. डॉ. विल्सननें सुद्धां मराठी बायबलचा इतिहास सांगतांना या पुस्तकाचा उल्लेख पहिलें बायबल म्हणून केला आहे. (१९)

इ. स. १८०५ पासून पुढें २० वर्षे श्रीरामपूर मिशनसंस्था मराठी भाषेत बायबलच्या भाषांतराचें काम करीत होती. सन १८०७ मध्यें 'मथ्यूचें शुभवर्तमान' हें पुस्तक पुन्हां प्रसिद्ध करण्यांत आल्याचें दिसतें. (२०) यावेळीं हें पुस्तक मोडी लिपींत छापलें होतें. या वर्षी 'The Pentateuch' व 'New Testament' चे दोन भाग प्रसिद्ध झाले. (२१)

---

१७ *College of Fort William in Bengal*, (1805). p. 230.

१८ George Smith. *The Life of William Carey*. p. 246.

१९ *The Oriental Christian Spectator*. July 1854. p. 293.

२० *Catalogue of the Library of the Hon. East-India Company*. (1845). p. 201.

२१ *Ibid*. p. 261.

सन १८०७ साली मोडींत 'मॅथ्यूचें शुभवर्तमान' प्रसिद्ध झालें. हें पुस्तक कदाचित् १८०५ च्या पुस्तकाची पुनरावृत्ति असावी. हीं दोन्हीं पुस्तकें मिळत नसल्यानुळें यासंबंधीं निश्चित कांहींच सांगतां येत नाहीं. 'मेमोरियल पेपर्स' या अमेरिकन मिशननें प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांत १८०७ च्या आवृत्तीतील 'मात्थी' या पुस्तकांतील दोन तीन उतारे घेतले आहेत, त्यांतून एक उतारा या पुस्तकाची भाषा कशी होती हें समजण्यासाठीं येथें देण्यांत आला आहे:—

मात्थी ६ : ७–१५. श्रीरामपूर आवृत्ति १८०७.

"परंतु तुम्हे कामना करायाचे समयीं देवपूजकांचे असे नीरर्थक वाक्यवय करूं नका कांकी त्याहांचे फार बोलण्याचे साटीं त्याहांची गोष्ट अयकिली जाईल् ते हेचू मावना करितेत्! यासाठीं त्याहांचे सारीखे होऊं नका कांकी तुम्हे प्रार्थना करायाचे पुर्वी तुम्च अवस्यक काय हे तुमच पीता जाणतेत्! यासाठीं अर्थात् कामना करा हे आमचे स्वर्गस्थ पीता तुमचू नांव पवित्र मान्य होवो! तुमच राज्य प्रकाश होवो! जस स्वर्गीं तस पृथीवींत् तुमची इछ्क्रीया केली जावो! आज आमुच नील्य भक्ष आझांस् द्या आणि जस आह्मी आमुचे उधारकांस् ऋण क्षमा करतों तस आमुच ऋण क्षमा करा! आह्मांस परीक्षेत घेऊं नका परन्तु असदांतून उद्धार करा कांकी सदासर्वस्वीं राज्य तथा शक्ती तथा गौरव तुमच! आमीन! कांकीं तुह्मी जर माणसांस् त्याहांची आज्ञा उल्लंघन दोष क्षमा करता तर तुमचे स्वर्गाचे पीता तुह्मासहि क्षमा करील! पंरंतु जर माणसांस् त्याहांची आज्ञा लंघन अपराध क्षमा न करा तर तुमचे पीता आज्ञा लंघन अपराध तुह्मास क्षमा करणार नाहींत्! (२२)

बायबलचें मराठींत भाषांतर करण्याचें काम सुरू झाल्यानंतर १८०९ ते १८१२ पर्यंतच्या कामाचा अहवाल देतांना केरेनें मराठी भाषांतर करण्याचें काम कसें प्रगतिकारक चाललें आहे, याची माहिती दिली आहे ती अशी:—

"In the Mahratta language the New Testament is printed to Act IV, and the translation of the whole Bible considerably advanced." (२३)

केरेच्या या भाषांतराची अहवालप्रमाणें पुढें कांहीं पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं आहेत. १८११ मध्ये नवीन कराराच्या १००० प्रती छापून बाहेर पडल्या. यासंबंधीं विल्सनच्या चरित्रांत पुढीलप्रमाणें उल्लेख आढळतो:—

"The American missionaries first came to Bombay in 1813,

२२ *Memorial Papers of the American Marathi Mission* (1882). p. 80.

२३ Leighton and Williams. *Serampore Letters.* p. 133.

but the whole of the New Testament in Marathee had been published by the Serampore missionaries in 1811." (२४)

यांच्यापुढील वर्षी म्हणजे सन १८१२ मध्यें "The Pentateuch" हें पुस्तक पुन्हां प्रसिद्ध झालें. (२५) तसेंच १८१२ ते १८२१ या ९ वर्षांत बायबल तीन भागांत प्रसिद्ध केल्याचा उल्लेख आढळतो. याच्या पहिल्या भागांत "Books from Genesis" ते "Song of Solomen" पर्यंत मजकूर येतो. दुसऱ्या भागाला मुखपृष्ठ नाहीं व तिसऱ्या भागाला मराठी व इंग्रजी मुखपृष्ठ आहे; (२६) परंतु या दोन भागांत कोणती प्रकरणें आहेत, हें समजत नाहीं. सन १८२४ मध्यें नव्या करारचें मूळांतून भाषांतर करून ते मिशनकडून प्रसिद्ध करण्यांत आलें. (२७) याच पुस्तकाची सन १८२५ मध्यें दुसरी आवृत्ति निघाली, असा कॅरेच्या चरित्रांत उल्लेख आढळतो. (२८)

या काळांत मराठी बायबल होत असतांना कोंकणी भाषेतहि नव्या करारांचें भाषांतर करण्याचें काम कॅरेनें सुरू केलें होतें. १८१५ मध्यें नव्या करारातील सेंट मॅथ्यूनें शुभवर्तमान कोंकणींत प्रथम प्रसिद्ध झालें. (२९) याचप्रमाणें १८१९ मध्यें 'नवा करार' व १८३१ मध्यें "Pentateuch" हीं पुस्तकें कोंकणींत प्रसिद्ध झालीं. (३०) कोंकणी भाषेंतील "नवा करार" ह्या पुस्तकाचा १८१८ हा सन प्रिअर्सन देतो. (३१) या पुस्तकाची माहिती रे. ब्रूस यानें देतांना सन १८१८ हाच सन दिला आहे. या पुस्तकासंबंधीं रे. ब्रूस पुढीलप्रमाणें लिहितो :–

"The Serampore Missionaries also translated and published the New Testament in another dialect of the Marathi language

२४ George Smith. *The Life of John Wilson.* p. 50.

२५ J. F. Blumhardt. *Catalogue of the Library of the India Office. Vol. II. Part V. Marathi and Gujarati Books.* p. 101.

२६ J. F. Blumhardt. *Catalogue of Marathi and Gujarati Printed Books in the Library of the British Museum.* p. 18.

२७ J. F. Blumhardt. *Catalogue of the Library of the India Office.* Vol. II. Part V. p. 101. त्याचप्रमाणें *Catalogue of the Library of the Hon. East-India Company.* p. 261 पहा.

२८ George Smith. *The Life of William Carey.* p. 239.

२९ *Asiatic Journal and Monthly Register.* Vol. 1. 1816. 174.

३० George Smith. *The Life of William Carey.* p. 239.

३१ *Indian Antiquary.* Vol. XXXII. 1903. p. 252.

which is in use in the extreme Southern Konkan, in the vicinity of Goa. It was called the "*Kunkuna Bible, Vol. V., Containing the New Testament.*" Whether the four previous volumes, Containing the Old Testament, were published or not, the writer is unable to say. A copy of the "*Kunkune*" New Testament, dated 1818, may be found in the Library of the Bible Society. It is printed in the Balbodh character, and is much more easily read than the "*Marathi*" version, but its idioms are less easily understood." (३२).

कोकणी बोलीतील १८१८ मध्ये प्रसिद्ध झालेल्या या नव्या करारांतील एक उतारा 'मेमोरियल पेपर्स' मध्ये घेतलेला आहे. मराठीच्या दृष्टीनें हें पुस्तक कसें आहे हें दाखविण्यासाठीं तो उतारा पुढें देण्यांत येत आहे. सध्या मूळ पुस्तक कोठें मिळत नसल्यानें 'मेमोरियल पेपर्स' या पुस्तकांत प्रसिद्ध झालेला उतारा येथें उद्धृत करावा लागत आहे. केरेनें संपादन केलेल्या कोकणी बायबलमधील उतारा असा आहे :—

"पर्व ६ : १२–१९ पर्यंत.

"तरि तुमगेल्यि प्रार्थना केर्चि वेळारी देवपुजाकर्तल्यां वारि तुन्ते उत्रं येत्तु केनांका तेथिंतें तांगेले श्राद्धार उभानिर्मिनी तांगेलें उत्तर व्यायकिले दायत ते असि हेतु आदेवाती। हा निमित्ति तांचे वारी वाड नाका तेथिंते तुमगेल्यि प्रार्थना कोर्चा देलें तुमगेले अवस्य यिते हे तुमगेले बापुत् समदता। हे निमित्ती असिचि प्रार्थना कऱ्या हे आमगेले स्वर्गारि आसिल्लो बापुत् तुमगेलें नांव पवित्र मान्य जावो तुमगेलें राज्य प्रकाशु जावो कशि स्वर्गांतु तशि भुर्विचेरि तुमगेलें यिष्ट क्रिया केल्लि जावो आणि आमगेलें संद खाणचें आमकां दिया आणि कशें आमि आमगेले देणेंकारांक रुण सोडत। तशें आमगेले रुण सोडया। आमका परिक्षेंतु घेउ नाका तरि आमका आस्त्यां तुथे तुटेया तेथिंते राज्य आनि बळ आणि किर्ति निरंतर तुमगेलि आस आमिन। तेथिंतें तुमि वरि मनुष्यांक तांगेल्यि आदना निरविल्लें पाप बकशिशानि तरि तुमगेले स्वर्गांचे बापुत् तुमकां बकसित तरि वरि मनुष्यांक तांगेलि आदनानिरविल्लो अन्यायु ना बकसिश तरि तुमगेलों बापुत् तुमगेले आदनानिरविल्लो अपराद्दु तुमका बकसिशि ना नेदान।" (३३)

३२ *Memorial Papers of the American Marathi Mission.* (1882). p. 77. कोकणी बायबलविषयी मुंबई येथील बायबल सोसायटी ऑफ इंडिया अँड सिलोन् या संस्थेच्या दप्तरांत चौकशी करण्यांत आली असतां कोकणी बायबलचा तपास लागला नाहीं.

३३ *Ibid.* p. 92.

ही कोंकणी सध्यांची गोवानिज नसून दक्षिणेकडील मंगळूरकडील मराठी बोली आहे. सोळाव्या सतराव्या शतकांत गोव्यांतहि अशासारखी बोली रूढ होती असें मिशनरी ग्रंथांवरून दिसतें; परंतु अलिकडे पोर्तुगीज भाषेच्या संसर्गामुळें गोवानिज कोंकणी फार बदललेली आहे. असो. कॅरेची ही कोंकणींतील व मराठींतील बायबल-विषयक पुस्तकें धर्मप्रसारासाठीं व लोकांचें अज्ञान नाहींसें होऊन त्यांना ख्रिस्ती धर्म कळावा म्हणून जरी लिहिली गेलीं होतीं, तरी त्यामुळें भाषाविषयक अभ्यासाला चालना मिळाल्याखेरीज राहिली नाहीं.

मराठी भाषेंत श्रीरामपूर मिशननें जें कार्य केलें, त्यासंबंधीं चौकशी करून डॉ. ग्रिअर्सननें इ. स. १९०३ मध्यें एक लेख लिहिला होता. त्यांत वरील ठिकाणीं जी पुस्तकें सांपडत नाहींत अशा कांहीं पुस्तकांची माहिती दिली आहे. तसेंच पुस्तक प्रसिद्धीच्या कालसंबंधीं कांहीं ठिकाणीं वेगळा सन नमूद केला आहे. ही यादी विचारांत घेतल्यानंतर श्रीरामपूरच्या संपूर्ण वाङ्मयकार्याची माहिती होईल.

ग्रिअर्सननें आपल्या या लेखांत 'मॅथ्यू' (१८०५) व 'नवा करार' (१८११) हीं जी दोन पुस्तकें दिलीं आहेत, त्यांचा उल्लेख मागें करण्यांत आला आहे. 'Pentateuch' या पुस्तकाचा काल इ. स. १८१३ असा ग्रिअर्सननें दिला आहे; पण त्या पुस्तकाचा काल १८१२ हा असल्याचें आपण मागें पाहिलें. १८१२ नंतर लगेच १८१३ मध्यें या पुस्तकाची दुसरी आवृत्ति छापून झाली असेल, हें संभवनीय दिसत नाहीं. तेव्हां या पुस्तकाच्या प्रकाशनकालाचीं हीं दोन वेगळीं वर्षें कशीं याचा उलगडा होत नाहीं. सन १८१६ मध्यें 'Historical Books' हें पुस्तक प्रसिद्ध झाल्याचें ग्रिअर्सन म्हणतो. हें पुस्तक मागच्या यादींत आलें नाहीं. तें नवीन दिसतें. सन १८१५ पर्यंत बायबलचीं जीं जीं भाषांतरें निरनिराळ्या २४ भाषांत छापून झालीं, त्यासंबंधीं जी माहिती देण्यांत आली आहे, त्यांत या पुस्तकाचा उल्लेख "Historical Books of Scriptures–Nearly Finished", (३४) असा करण्यांत आला आहे. म्हणजे १८१६ मध्यें हें पुस्तक तयार होऊन त्याचसालीं तें प्रसिद्ध झालें असावें. यावरून ग्रिअर्सनचें १८१६ हें साल बरोबर दिसतें. यापुढील पुस्तक "Hagiographa" हें १८१८ मध्यें प्रसिद्ध झाल्याचा ग्रिअर्सन आपल्या लेखांत प्रथमच उल्लेख करतो. या पुस्तकाचा इतरत्र कोठेंहि उल्लेख नाहीं. तेव्हां "Hagiographa" (म्हणजे साधूंचीं चरित्रें, नावावरून यांत कांहीं साधूंचीं चरित्रें असावींत असें दिसतें.) व वरील पुस्तकाचा अंतर्भाव श्रीरामपूर मिशनच्या वाङ्मयाचा आढावा घेतांना त्यांत करावा लागेल. याप्रमाणेंच "Prophetical Books" या पुस्तकाचा प्रसिद्धिकाल सन १८१९ असा ग्रिअर्सन देतो; पण ईस्ट

३४ *Asiatic Journal and Monthly Register*, Vol. I. 1816. p. 174.

इंडिया कंपनीच्या ग्रंथालयाच्या-यादींत हें साल १८२१ असें दिलेलें आहे. (३५) तेव्हां या पुस्तकाविषयीं असा घोटाळा कां झाला आहे, हें समजण्यास मार्ग नाहीं. या पुस्तकांशिवाय आपल्या लेखांत "Gospels" या पुस्तकाची दुसरी आवृत्ति १८२२ मध्यें व "Acts to Revelations" ची दुसरी आवृत्ति १८२३ मध्यें निघाल्याचें ग्रिअर्सननें नमूद केलें आहे; परंतु या पुस्तकांच्या पहिल्या आवृत्त्या केव्हां निघाल्या तें त्यानें दिलें नाहीं. (३६)

एकंदर २० वर्षांत म्हणजे १८०५ पासून १८२५ पर्यंत श्रीरामपूर मिशननें बायबलच्या निरनिराळ्या भागांचें भाषांतर व धार्मिक विषयावरील इतर कांहीं पुस्तकांचें भाषांतर कसें व केव्हां केलें, हें येथपर्यंत सांगितलें आहे. त्या सर्वांचा व त्यांच्या आवृत्त्यांचा आढावा घेऊन नंतर त्यांची भाषा, लिपि इत्यादि संबंधींचा विचार करणें बरें पडेल.

| कॅरेचें मराठींतील धार्मिक वाङ्मय (मराठी) ......... | सन. |
|---|---|
| सेंट मॅथ्यू (Matthew's Gospel in Mahratta.) नागरी लिपि... | १८०५ |
| मॅथ्यू—शुभवर्तमान | ... १८०७ |
| बायबल–The Pentateuch व The New Testament (दोन भाग) | १८०७ |
| बायबल–The New Testament | ... १८११ |
| बायबल–The Pentateuch | १८१२ व १८१३ |
| बायबल–The Holy Bible. | तीन भाग १८१२ ते १८२१ |
| बायबल-जुना करार | ... १८२० |
| बायबल–नवा करार New Testament | ... १८२४ |
| बायबल–नवा करार New Testament | (दुसरी आवृत्ति) १८२५ |
| ... Historical Books | ... १८१६ |
| ... Hagiographa | ... १८१८ |
| ... Prophetical Books | १८१९ व १८२१ |
| ... Gospels | (दुसरी आवृत्ति) १८२२ |
| ... Acts to Revelations | (दुसरी आवृत्ति) १८२३ |

३५ *A Catalogue of the Library of the Hon. East India Company.* p. 201.

३६ *The Indian Antiquary.* Vol. XXXII. 1903. p. 253. विशेष माहितीसाठीं याच मासिकांतील "The Early Publications of Serampore Missionaries." pp. 241-254. हा लेख पहा.

| | | |
|---|---|---|
| (कोंकणी) बायबल St. Matthew | | ... १८१९ |
| ,, बायबल New Testament | नवा करार | १८१८ व १८१९ |
| ,, बायबल The Pentateuch | | ... १८२१ |

यांतील मराठी बायबलांचें भाषांतर कॅरेनें स्वतः केलें आहे असें म्हटलें आहे. तरी या भाषांतराच्या कामांत त्याला पंडितांचें साहाय्य झाल्याचें मार्गे सांगण्यांत आलेंच आहे. कोंकणी बायबल आपण संपादित केल्याचा उल्लेख कॅरेनें केला आहे. (३७)

या ग्रंथाच्या भाषेवर अमेरिकन व स्कॉटिश मिशनरींनी बरीच टीका केली आहे. १८०७ च्या नव्या कराराच्या भाषेवर टीका करतांना ही भाषा, नागपूरकडील एक बोली असल्याचें रे. ह्यूस म्हणतो. तसेंच याची मोडी लिपि असल्यानें वाचावयास कठिण पडतें, असेंहि त्यानें म्हटलें आहे. (३८) मराठी बायबलचा इतिहास सांगतांना १८११ मध्यें श्रीरामपूर मिशननें जो नवा करार प्रसिद्ध केला, त्यावरहि अशा प्रकारची टीका डॉ. विल्सननें केली होती. महाराष्ट्रांतील लोक जी भाषा बोलतात, ती या बायबलमध्यें नाहीं हें सांगतांना तो म्हणतो,

"The Serampore version of the Marathi New Testament, now referred to, was not used by the Bombay Bible Society. It was found to be in a local dialectic form of the language, greatly corrupted, and probably limited to some district of the province of Nagpur, with which the instances of its utility, it would appear, were associated. It is not certainly in the language generally spoken in the Maharashtra." (३९)

डॉ. विल्सननें भाषेवर ही टीका केली त्याचें कारण कॅरेच्या बायबलची भाषा संस्कृत-मराठी-मिश्रित अशी असावी, असें दिसतें. कॅरेचा संस्कृत भाषेचा अभ्यास व त्या वाङ्मयाकडे असलेल्या त्याचा कल या विषयीं त्याच्या चरित्रांत उल्लेख सांपडतो. (४०) सन १८०८ मध्यें संस्कृत भाषेंत नव्या करारांचें भाषांतर झालें त्याचें संपादन त्यानेंच केलें. (४१) सन १८१० मध्यें त्यानें जो मराठी-इंग्रजी शब्दकोश प्रसिद्ध केला, त्यांत पुष्कळच संस्कृत शब्द आहेत. याचा विचार पुढील प्रकरणांत केला आहे. सन १८११ मध्यें प्रसिद्ध झालेल्या नव्या कराराची भाषा पुष्कळशी संस्कृत-मराठी

३७ George Smith. *The Life of William Carey*. p. 239.

३८ *Memorial Papers of the American Marathi Mission*. (1882). pp. 76–77.

३९ *The Oriental Christian Spectator*, July 1854. p. 294.

४० George Smith. *The Life of William Carey*. p. 101.

४१ *Ibid*. pp. 238–239.

असण्याचा संभव आहे. यामुळेंच डॉ. विल्सनप्रभृति मिशनरींनीं बायबलच्या भाषेवर टीका केली असावी. पुढें अमेरिकन मिशनरींनीं सन १८२६ मध्यें बायबलचें हें असल मराठी भाषांतर म्हणून प्रसिद्ध केलें, त्याचीहि भाषा अशीच सदोष आहे. बायबलचें भाषांतर कसें असावें याविषयीं सर नारायण गणेश चंदावरकर यांनीं पुढील उद्गार काढले आहेत :—

" If that translation is to touch the heart of India and become a part of its life and literature, it must avoid both Padri Marathi and Sanskrit Marathi; but must have a touch of peasant Marathi, for the language of the Bible is the language of Shepherds and peasants, as all true religious literature has been and that is after all a grand style. " (४२)

कॅरेच्या बायबलमध्यें भाषेचा हा दोष राहिला. त्याला भाषांतरांतील अडचणी कारणीभूत झाल्या असाव्यात. कॅरे व त्याची श्रीरामपूरमिशनसंस्था ज्या काळांत स्थापन झाली त्या काळाचा विचार केला तर असें दिसून येतें कीं, त्या काळांत मराठी भाषा शिकण्याला उपयोगी पडणारें व्याकरण, कोश असे ग्रंथ उपलब्ध नसतांना मराठी भाषा शिकून कॅरेनें बायबलचें मराठी भाषांतर केलें. या भाषाविषयक अडचणींचें वर्णन रे. ब्रुस यानें पुढीलप्रमाणें केलें आहे :—

" They began without the aid of grammar or dictionary to acquire the language of the people, and soon were able to tell the people in their own tongue of the wonderful love and mercy of God. " (४३)

भाषांतराच्या कामांत एवढ्या अडचणी असूनसुद्धां, लोकांची भाषा शिकून त्या भाषेंत बायबलच्या ग्रंथाचें भाषांतर करून कॅरेनें त्याचा पाया घातला, हाला मराठी भाषेच्या व वाङ्मयाच्या दृष्टीनें महत्त्व यावें लागेल.

कॅरेच्या मराठी बायबलप्रमाणें त्याच्या कोंकणी बायबलवरहि टीका झाली आहे. या बायबलमधील एक उतारा 'मेमोरियल पेपर्स' मधून मागें दिलाच आहे. त्यावरून या नव्या कराराच्या कोंकणी भाषेची थोडीशी कल्पना येईलच. मराठी व कोंकणी या बायबलमधील भाषांचा दोष दाखवितांना रे. ब्रूसनें खालील उद्गार काढले आहेतः—

---

४२ Helen S. Dyer. *Pandita Ramabai, Her Vision, Her Mission and Triumph of Faith* ( Second Impression ). p. 111.

४३ *Memorial Papers of the American Marathi Mission.* ( 1882 ). p. 75.

"It will thus be seen that the Serampore Missionaries translated and published the Bible in two local dialects of the Marathi language, which were in use in the two opposite extremities of the Marathi country, while the language of the great mass of the Marathi people was left entirely untouched. It was a striking illustration of the misdirected energy and zeal." (४४)

या कोंकणी बायबलवर भाषेच्या दृष्टीनें जी टीका झाली व श्रीरामपूर येथील मिशनरींनीं त्याचें जें समर्थन केलें आहे तें पहाण्यासारखें आहे. या संबंधींचा "दि फ्रेंड ऑफ इंडिया" या वृत्तपत्रांतील एक लेख "O. C. S." मध्यें उद्धृत करण्यांत आला आहे. (४५) त्यांतील मुंबई येथील मिशनरींचें म्हणणें काय होतें हें समजून घेतलें म्हणजे त्यांच्या टीकेचा रोख कशावर आहे हें कळून येईल.

कोंकणी 'मार्गेत हें बायबल' प्रसिद्ध झाल्यानंतर १८२२ मध्यें मुंबई येथील मिशनरींनीं असें लिहिलें कीं, हें बायबल ज्या कोंकणी मार्गेत प्रसिद्ध झालें आहे, अशी कोंकणी भाषाच कोठें नाहीं. म्हणून या बायबलाचें भाषांतर करतांना श्रम व पैसा व्यर्थ खर्च झाला आहे, असेंहि त्यांनीं श्रीरामपूर येथील मिशनरींस कळविलें. कोंकणी भाषेसंबंधीं मुंबई येथील मिशनरींचें मत स्पष्ट करण्यासाठीं त्यांनीं श्रीरामपूर येथील मिशनरीस पाठविलेलें उत्तर पुढें देण्यांत येत आहे :—

"We are prepared to state that from Goa northward through the whole of the Kunkun, the Mahratta language is universally spoken with only a slight provincial variation from the same language as spoken at Poona. From the name of the country this language has been called the Kunkunee language, but it differs in so slight a degree from the Mahratta, that in our judgment of able brahmuns whom we have consulted, a distinct version is neither at all desirable nor justifiable."(४६)

मुंबई येथील मिशनरींनीं हें कोंकणी बायबल मुळींच उपयोगाचें नाहीं या म्हणण्याचें समर्थन म्हणून दक्षिण कोंकणांतील कोटींतील पंडितांचें या भाषेबद्दल मत घेतलें. या पंडितांनीं या बायबलविषयीं पुढील तुटक शब्दांत टीका केली आहे. ती अशी :—

४४ *Ibid.* p. 77.

४५ *The Oriental Christian Spectator*, July 1830. pp. 71–75.

४६ *The Oriental Christian Spectator*. July 1830. p. 72.

"The only College which had been previously established was the Mahomedan Madrasa, or college founded by Mr. Warren Hastings, in 1772, for the study of Moslem literature, comprising Arabic and Persian, to which was afterwards superadded classes for the study of English and Bengali." (१)

हेस्टिंग्जनें जी कॉलेजें उघडली, तीं काढण्याचा हेतु फारसा व्यापक नव्हता. मात्र वेलस्लीनें पुढें फोर्ट विल्यम कॉलेज स्थापन केलें, त्याचा विशिष्ट असा उद्देश होता. हिंदुस्थानांत ईस्ट इंडिया कंपनीचे जे नोकर येत त्यांना हें कॉलेज निघण्यापूर्वी नोकरींत भरती होण्यासाठीं कोणतीहि परीक्षा द्यावी लागत नसे. फक्त लिहिणें व जमाखर्चानें हिशेब ठेवणें या दोन गोष्टींचें शिक्षण झाल्याचें प्रमाणपत्र कंपनीच्या चालकांकडे देऊन, त्यानीं नोकरी करण्याची इच्छा दर्शविली कीं, कारकून (रायटर) म्हणून त्यांची येथें नेमणूक होत असे. हिंदुस्थानांत ज्यांनीं पुढें मोठी कामगिरी बजाविली असे हेस्टिंग्ज, चार्लो, एल्फिन्स्टन यांनासुद्धां कंपनीनें नोकरींत घेतांना त्यांची नेमणूक अशाच पद्धतीनें केली होती. (२)

अशा तऱ्हेनें नेमणूक होऊन येथें आलेले ईस्ट इंडिया कंपनीचे नोकर हे मुळींच कार्यक्षम नव्हते. त्यांची नीतिमत्ता अगदीं खालावली होती. त्यांच्या खाजगी व्यापारामुळें, मक्तेदारीमुळें व पैसे काढण्याच्या निरनिराळ्या जुलमी मार्गांमुळें लोकांना चांगलें सरकार व वाईट सरकार यांच्यांतील भेदभावच कळेनासा झाला होता. कंपनीच्या नोकरांच्या किळसवाण्या कृत्यांबद्दल ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टरांना लिहून इंग्रजांच्या नांवाला काळिमा लागण्याची भीति आहे, असें मत क्लाइव्हनें एका पत्रात व्यक्त केलें होतें. (३)

क्लाइव्हच्या मताप्रमाणेंच त्यावेळीं सर्व अधिकाऱ्यांचें मत होतें. सन १७८६ मध्यें लॉर्ड कॉर्नवॉलिसनें कंपनीच्या युरोपियन अधिकाऱ्यांबद्दल कठोर उद्गार काढले, असें पीटर ऑबर आपल्या ग्रंथांत लिहितो. तो म्हणतो,

"He described the European recruits as dreadful in character and low in standard, the natives were far better..."(४)

१ Lieut-General John Briggs. *India and Europe Compared, Being a popular view of the present state and future prospects of our Eastern Empire.* pp. 146-147.

२ Peter Auber. *Rise and Progress of the British Power in India, Preliminary Observations.* p. XXX.

३ Sushil Kumar De. *History of Bengali Literature.* p. 18.

४ Auber. *Rise and Progress of British Power in India.* Vol. II. p. 43.

## कॅरे व फोर्ट विल्यम कॉलेज

युरोपियन लोकांना या देशांतील भाषा शिकण्यासाठीं म्हणून फोर्ट विल्यम कॉलेज स्थापिलें गेलें. ब्रिटिश अमदानींत शिक्षणविषयक ज्या कांहीं संस्था स्थापल्या गेल्या त्यांत फोर्ट विल्यम कॉलेजचें स्थान फार मोठें आहे. याचें कारण या कॉलेजांतून भाषाशिक्षणाबरोबर मराठी व इतर भाषांत ग्रंथ छापून निघाले, हें होय. अशा रीतीनें, इंग्रजांचें राज्य महाराष्ट्रांत येण्यापूर्वी महाराष्ट्रापासून दूर असा कलकत्त्यासारख्या शहराच्या शेजारीं इंग्रज लोकांकडून मराठी भाषेंत पुस्तकें तयार होऊं लागलीं. यानंतर मुंबई येथें मराठी भाषेंत पुस्तकें छापण्यासाठीं कितीतरी काळ जावा लागला. मराठी ग्रंथ निर्माण करण्याचा इंग्रजांचा अगदीं सुरुवातीचा प्रयत्न म्हणून फोर्ट विल्यम कॉलेजला फार महत्त्व आहे. या कॉलेजमध्यें जीं पुस्तकें तयार झालीं, तीं पुस्तकें युरोपियन अधिकाऱ्यांना भाषेचा अभ्यास व्हावा व हिंदुस्तानांतील लोकांच्या रीतिरिवाजांची माहिती त्यांना व्हावी यासाठीं तयार केलीं गेलीं होतीं. यामुळें भाषेकडे जसें त्यांचें लक्ष जावें तसें गेलें नाहीं. या वाङ्मयांतून पाश्चात्य कल्पना त्यांनीं देशी भाषांतून मांडल्या व त्या येथील लोकांच्या गळीं उतरविल्या. असें असलें तरी पौर्वात्य वाङ्मयाला त्यांनीं अगदींच बाजूला न टाकतां, त्यांचा अभ्यास करून त्यांनींसुद्धां देशी भाषांत भाषांतरें केलीं.

फोर्ट विल्यम कॉलेजांतून जे ग्रंथ तयार झाले, त्यांची माहिती घेतांना वर सांगितलेल्या विधानास पोषक अशीं वरीच उदाहरणें आपणांस सांपडतील. ग्रंथ तयार करण्याबरोबर या कॉलेजांतून निरनिराळ्या भाषा शिकून बुद्धिमान् व अभ्यासू असे लोक तयार झाले, हेंहि या कॉलेजचें एक मोठें कार्य आहे. मराठी भाषेचा अभ्यासक्रम या कॉलेजांत ठेवल्यानें कॅरेचा संबंध या संस्थेशीं आला. येथें राहून कॅरेनें कांहीं युरोपियन अधिकाऱ्यांना मराठी भाषेचें शिक्षण दिलें. तसेंच स्वतः कांहीं पुस्तकेंहि लिहिलीं व पंडितांकडून कांहीं लिहवून घेतलीं.

ईस्ट इंडिया कंपनीच्या अधिकाऱ्यांनीं या देशांतील भाषा शिकाव्यात म्हणून या कॉलेजची स्थापना वेलस्लीनें केली असली तरी कंपनीचा कॉलेज काढण्याचा हा कांहीं प्रथम प्रयत्न नव्हता. इ. स. १७७३ मध्यें पार्लमेंटच्या रेग्युलेटिंग ॲक्टान्वयें जेव्हां सर्व प्रांत गव्हर्नर जनरलच्या हाताखालीं आले तेव्हां राज्यकारभाराला त्यांची गरज आहे अशा हिंदु व मुसलमान लोकांना कायद्याचें अध्ययन व्हावें म्हणून बनारस व कलकत्ता येथें वॉरन हेस्टिंग्जनें कॉलेजें काढलीं. वॉरन हेस्टिंग्जच्या या प्रयत्नाविषयीं मिल लिहितो,

"The only College which had been previously established was the Mahomedan Madrasa, or college founded by Mr. Warran Hastings, in 1772, for the study of Moslem literature, comprising Arabic and Persian, to which was afterwards superadded classes for the study of English and Bengali." (१)

हेस्टिंग्सनें जी कॉलेजें उघडलीं, तीं काढण्याचा हेतु फारसा व्यापक नव्हता. मात्र वेलस्लीनें पुढें फोर्ट विल्यम कॉलेज स्थापन केलें, त्याचा विशिष्ट असा उद्देश होता. हिंदुस्तानांत ईस्ट इंडिया कंपनीचे जे नोकर येत त्यांना हें कॉलेज निघण्यापूर्वी नोकरीत भरती होण्यासाठीं कोणतीहि परीक्षा द्यावी लागत नसे. फक्त लिहिणें व जमाखर्चाचे हिशेब ठेवणें या दोन गोष्टींचें शिक्षण झाल्याचें प्रमाणपत्र कंपनीच्या चालकांकडे देऊन, त्यांनी नोकरी करण्याची इच्छा दर्शविली कीं, कारकून (रायटर) म्हणून त्यांची येथें नेमणूक होत असे. हिंदुस्तानांत ज्यांनीं पुढें मोठी कामगिरी बजाविली असे हेस्टिंग्ज, बार्लो, एल्फिन्स्टन यांनासुद्धां कंपनीनें नोकरीत घेतांना त्यांची नेमणूक अशाच पद्धतीनें केली होती. (२)

अशा तऱ्हेनें नेमणूक होऊन येथें आलेले ईस्ट इंडिया कंपनीचे नोकर हे मुळींच कार्यक्षम नव्हते. त्यांची नीतिमत्ता अगदीं खालावली होती. त्यांच्या खाजगी व्यापारामुळें, मक्तेदारीमुळें व पैसे काढण्याच्या निरनिराळ्या जुलमी मार्गांमुळें लोकांना चांगलें सरकार व वाईट सरकार यांच्यांतील भेदभावच कळेनासा झाला होता. कंपनीच्या नोकरांच्या किळसवाण्या कृत्यांबद्दल ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टरांना लिहून इंग्रजांच्या नांवाला काळिमा लागण्याची भीति आहे, असें मत क्लाइव्हनें एका पत्रांत व्यक्त केलें होतें. (३)

क्लाइव्हच्या मताप्रमाणेंच त्यावेळीं सर्व अधिकाऱ्यांचें मत होतें. सन १७८६ मध्यें लॉर्ड कॉर्नवॉलिसनें कंपनीच्या युरोपियन अधिकाऱ्यांबद्दल कठोर उद्गार काढले, असें पीटर ऑबर आपल्या ग्रंथांत लिहितो. तो म्हणतो,

"He described the European recruits as dreadful in character and low in standard, the natives were far better..."(४)

---

१ Lieut-General John Briggs. *India and Europe Compared; Being a popular view of the present state and future prospects of our Eastern Empire.* pp. 146-147.

२ Peter Auber *Rise and Progress of the British Power in India, Preliminary Observations.* p. XXX.

३ Sushil Kumar De. *History of Bengali Literature.* p. 13.

४ Auber. *Rise and Progress of British Power in India.* Vol. II. p. 43.

लॉर्ड वेलस्ली ज्यावेळीं गव्हर्नर जनरल म्हणून कलकत्त्यास आला, त्यावेळीं कंपनीच्या नोकरांचा नंगा नाच पाहून त्याला धक्काच बसला. रविवारीं चर्चमधील प्रार्थना सोडून देऊन त्या ऐवजीं अधिकारी वर्ग रेस व जुगार खेळण्यांत तो दिवस घालवीत. सोळा वर्षांचीं हीं मुलें कंपनींत नोकर म्हणून भरती होत असल्यानें त्यांना एतद्देशीय लोकांत मॅजिस्ट्रेट, न्यायाधीश अशा जागेवर काम करण्याचें ज्ञान नसे. हे तरुण अधिकारी विकारवशतेला बळी पडून स्वार्थी बनत. आपल्या हाताखालच्या एतद्देशीय लोकांच्या स्तुतीला भाळून अन्यायी कृत्यें करीत. अलोट पैसा कमावीत आणि अनीतीचा मार्गहि धरीत. (५) अशा मार्गानें जाणाऱ्या लोकांच्या हातांत राज्य आलें तर त्याचा लवकरच नाश होईल, हे वेल्स्लीच्या ध्यानांत येऊन त्यानें या कॉलेजची स्थापना केली. हें सांगतांना एल्फिन्स्टनचा चरित्रकार म्हणतो,

" A generation had hardly passed since the newly formed empire was brought to the verge of ruin by the rapacity of its governors, and the standard of morality, public and private, was low....A few years later Lord Wellesley founded the College of Fort William, to give some change of culture to the raw youths who filled the lower branches of the establishment." (६)

कंपनीच्या नोकरांचें दुर्वर्तन पाहून ज्याप्रमाणें त्यांना सुधारण्यासाठीं कॉलेज काढण्याची आवश्यकता वेल्स्लीला वाटूं लागली, त्याप्रमाणें बदलत्या राजकीय परिस्थितीमुळें त्याला याचा विचार करावा लागला. याच वेळेस टिपूचें राज्य इंग्रजांनीं जिंकलें असल्यानें कंपनीच्या नोकरांना लाखो लोकांशीं संबंध आल्यानंतर त्या लोकांशीं भाषा, धर्म इत्यादि बाबतींत कंपनीच्या नोकरांना अन्यायी वर्तन करून चालणार नाहीं, याची त्याला खात्री पटली. या राजकीय परिस्थितीचें वर्णन पीटर ऑबरनें केलें आहे तें असें :—

" The great and rapid changes which the course of events produced, convinced the Governor General that more enlarged means were required for qualifying the junior servants to enter upon a field of duty which embraced the

५ George Smith. *The Life William Carey.* p. 213.

६ Sir T. E. Colebrooke. *Life of Honourable Mountstuart Elphinstone.* Vol. I. p. 14.

७ Auber. *Rise and Progress of the British Power in India.* Vol. II. p. 241.

dispensing justice to millions of people, of various languages, usages and religions."

इंग्रजांचें राज्य वाढूं लागल्यामुळें कंपनीचे नोकर हे राज्य चालविणारे अधिकारी होणार आहेत असें वेलस्लीला वाटत होतें व ही बाबीच कंपनीच्या डायरेक्टरांना कळून देतांना तो आपल्या टांचणांत लिहितो,

"The civil servants of the East India Company, therefore, can be no longer be considered as the agents of the commercial concern; they are in fact, the ministers and officers of a powerful soverign: They must be viewed in that capacity, with a reference, not to their nominal, but to their *real* occupations."

युरोपियन नोकर हे कंपनीचे साधेसुधे नोकर न राहतां, एका मोठ्या साम्राज्याचे अधिकारी होणार या विचारानेंच श्रीरंगपट्टणच्या विजयदिनानिमित्त ४ मे रोजीं फोर्ट विल्यम कॉलेजची स्थापना त्यानें केली. (९) कॉलेज स्थापण्याचा हा ठराव कौन्सिल्मध्यें पास करून घेतांना, कंपनीचे कनिष्ठ मुल्की अधिकारी ज्या ठिकाणीं नेमले जातील त्या प्रांताचा कारभार त्यांना न्यायानें चालवितां यावा म्हणून त्यांना शिक्षण देण्यासाठीं हें कॉलेज स्थापन करण्यांत येत आहे, असें त्यात नमूद करण्यांत आलें होतें. (१०)

बंगालमध्यें राज्यकारभार करण्यासाठीं जे कनिष्ठ मुल्की अधिकारी येतील त्यांनीं येथें आल्यानंतर पहिल्या तीन वर्षांत या कॉलेजमध्यें राहिलें पाहिजे, असें वेलस्लीनें ठरविलें. मुंबई व मद्रास येथील लष्करी खात्यातील अधिकाऱ्यांना सुद्धा या कॉलेजमध्यें प्रवेश करून घेण्यासाठीं सवलत करून ठेवली. त्याप्रमाणें या तीन इलाख्यांतील मुल्की व लष्करी अधिकाऱ्यांना परीक्षा पास झाल्यानंतर पदव्या देण्यासाठीं योजना करण्यांत आली होती. कॉलेजच्या दोन महिन्यांच्या चार टर्म्स ठरविण्यांत येऊन वर्षांतून दोनदां परीक्षा घेण्याचें ठरविण्यांत आलें. अशातऱ्हेनें या कॉलेजचे नियम तयार करण्यांत आले.

---

८ *Minutes of Evidences taken before the select committee of the Affairs of East India Company.* Vol. I. p. 230. त्याचप्रमाणें *The College of Fort William in Bengal,* (1805) pp. 5–6 पहा.

९ Auber. *Rise and Progress of the British Power in India.* Vol. II. p. 242.

१० *Asiatic Annual Register*, 1800. p. 106.

या कॉलेजच्या नियामकमंडळांत गव्हर्नर जनरल, त्याच्या कौन्सिलांतील सभासद व सुप्रीम कोर्टाचा न्यायाधीश, असे वरिष्ठ अधिकारी होते. वर्षाच्या अखेरीस थाटाचा बक्षिससमारंभ होत असे. यावेळीं परीक्षेत यशस्वी झालेल्यास बक्षिसें देण्यांत येत असत. अशा वेळीं प्राच्य भाषेंत वादविवाद होऊन निबंध वाचले जात. यांत ज्याचा उत्तम निबंध असे त्याला बक्षिसहि देण्यांत येई. या वादविवादसभेची माहिती देऊन त्याप्रसंगीं मुनशी, युरोपियन लोक, एतद्देशीय लोक व परक्या देशांतील व्यापारी हजर राहात असें ग्रॅहम या बाईनीं लिहून ठेविलें आहे. (११) प्राच्य भाषेंत हें निबंधवाचन होत असे याचें कारण कोणतें होतें हें पुढील उताऱ्यावरून दिसून येईल :—

WHEREAS it is necessary, that the students destined to exercise high and important functions in India, should be able to speak the Oriental languages with fluency and propriety; it is therefore declared, that public disputations and declamations shall be holden in the Oriental languages, at stated times, to be prescribed by the council of the college." (१२)

युरोपियन लोकांना भाषाचा अभ्यास करतांना, त्या भाषांत बोलतां आले पाहिजे, अशा धोरणानें ठेवलेलें हे निबंधवाचन पाहिलें म्हणजे येथील भाषा शिकतांना त्यांनी मुनशी सोंडओळख करून न घेतां त्याचा नीट अभ्यास झाला पाहिजे, हें त्याचें उद्दिष्ट असावें, असें वाटूं लागतें.

या कॉलेजांतील अभ्यासक्रमांत शिकविण्यासाठीं हिंदुस्थानांतील अरबी, फारसी, संस्कृत, बंगाली, मराठी, हिंदुस्तानी, तेलगू, तामिळ व कानडी या भाषांचा समावेश करण्यात आला होता. त्याशिवाय हिंदु व महमदी कायदा, सिव्हिल ज्युरिस्प्रुडन्स व लॉ ऑफ नेशन्स हे कायदेविषयक शिक्षण ग्रीक, लॅटिन व इंग्लिश या भाषा, इतिहास, वनस्पतिशास्त्र, रसायनशास्त्र व खगोलशास्त्र या विषयांचा अंतर्भावहि त्यांत करण्यांत आला होता. (१३) थोडक्यात हें कॉलेज म्हणजे "A centre of Western learning in an Eastern dress for the natives of India and Southern Asia alike as students and teachers," (१४) असें व्हावें अशी वेलस्लीची मनापासून इच्छा होती.

११ Maria Graham. *Journal of a Residence in India* p 138.

१२ *The College of Fort William in Bengal.* p 51.

१३ George Smith. *The Life of William Carey* pp. 214-215.

१४ *Ibid.* p. 214.

या कॉलेजची पहिली टर्म ६ फेब्रुआरी १८०१ मध्ये सुरू झाली. सुरवातीस सर्व भाषाविषय शिकविले जात नसत. हळुहळु हे भाषाविषय तेथें शिकविले जाऊं लागले. इ. स. १८०४ मध्यें मराठी भाषेचा वर्ग तेथें सुरू करण्यांत आला व कॅरेला त्या विषयाचा प्रोफेसर नेमण्यांत आलें. मराठी भाषेचा वर्ग सुरू करण्याचें कारण पुढीलप्रमाणें देण्यांत आलें आहे :—

"The political relation that arose between the British government and the Mahratta States, about the date of the institution of the College of Fort William, recommended the introduction of the study of the Mahratta tongue and to Dr. Carey was assigned the office of teaching it." (१५)

या कॉलेजमध्यें मराठीचा वर्ग सुरू झाल्यानंतर तेथें या विषयाची परीक्षा देऊन बरेच युरोपियन अधिकारी पास झाले. युरोपियन लोकांनीं मराठी भाषेचा अभ्यास या वेळेपासून शिक्षणसंस्थेमार्फत पद्धतशीर करण्यास सुरवात केली असें म्हणण्यास हरकत नाहीं. लॉर्ड वेल्स्लीनेंसुद्धां पदवीदानप्रसंगीं मराठी अभ्यासाच्या यशस्वी प्रारंभाबद्दल समाधान व्यक्त केलें. (१६)

१८०४ मध्यें मराठीचा वर्ग सुरू करण्यांत आल्यानंतर, त्याची परीक्षा १८०५ च्या जानेवारींत झाली. ही मराठीची पहिलीच परीक्षा होय. या परीक्षेत जे युरोपियन अधिकारी पास झाले त्यांचीं नांवें पुढीलप्रमाणें आहेत : (१७)

| नांवें | दर्जा | हिंदुस्तानांत आल्याची तारीख |
|---|---|---|
| १ ट्रावर | १००० रुपये व पदक बक्षीस | मे १८०३. |
| २ चॅपमन | पदक | ऑगस्ट १८०३. (१८) |
| ३ मूर | ,, | सप्टेंबर १८०२. |
| ४ गार्डिनर | ,, | जुलै १८०२. |
| ५ मार्टिन | ,, | ऑगस्ट १८०२. |

ह्या विद्यार्थ्यांना पास झाल्यानंतर १८०५च्या फेब्रुआरींत पब्लिक सर्व्हिस कमिशन-

१५ Eustace Carey. *Memoir of William Carey* (2 nd. Ed). p. 564.

१६ George Smith. *The Life of William Carey* p. 222.

१७ *Asiatic Annual Register*, 1805. pp. 94 and 95. तसेंच *The College of Fort William in Bengal*. p. 202 पहा.

१८ *Asiatic Annual Register*, 1806. p. 140.

मध्यें दाखल करण्यांत आले. यापैकीं ट्रावर याला एक हजार रुपये व पदक बक्षीस देण्यांत आलें होतें. याचें कारण त्यानें मराठींत निबंधवाचन करून त्यांत तो पहिला आला होता. यांना पब्लिक सर्व्हिस कमिशनमध्यें घेतांना यांच्या वर्तणुकीचा व विशेष गुणांचा उल्लेख केलेला आढळतो. यावरून हे युरोपियन कोणत्या भाषांत पास होऊन यांचा कितवा नंबर आला, हें कळून येतें. हा उल्लेख पुढीलप्रमाणें आहे :—

१ मि. डब्ल्यू. ट्रावर :– मराठी भाषेंत पहिलें बक्षीस मिळविलें. मराठी भाषेंत निबंधवाचन केलें. फारशी भाषेंत ११ चा नंबर आला.

२ मि. सी. आर. मार्टिन :– हिंदुस्तानी भाषेंत सातवा, बंगाली भाषेंत सातवा व मराठी भाषेंत पांचवा नंबर आला.

३ मि. सेंट जॉन मूर :– मराठींत तिसरा व बंगालींत पांचवा नंबर आला.

४ मि. सी. डब्ल्यू. गार्डिनर :– बंगालींत सहावा व मराठींत चवथा नंबर आला. (१९)

यांत चॅपमनचें नांव नाहीं. पुढील वर्षी जानेवारी १८०६ मध्यें कॉलेजची दुसरी परीक्षा झाली. तिच्या निकालपत्रांत चॅपमनचें नाव असून त्यांत त्याच्या नैपुण्याची वर्गवारी लावतांना त्याच्या पदवीचा पुढीलप्रमाणें उल्लेख करण्यांत आला आहे. :—

सी चॅपमन :– मराठी भाषेंत प्रावीण्य, बंगाली भाषेंत सातवा, फारशी भाषेंत अठरावा व हिंदुस्तानींत एकविसावा नंबर आला. (२०)

मराठी भाषा शिकलेले युरोपियन लोकांचें हें पहिलेंच पंचक होय. राज्यकर्त्यांना मराठीच्या महत्त्वाची जाणीव होऊन ते ही भाषा शिकूं लागले हा प्रसंग अगदीं नवीन आहे. युरोपियन लोकांचा हा भाषाभ्यास सुरुवातीला तरी मराठी भाषेला पोषक ठरला व त्यामुळें मराठी भाषेंत कांहीं ग्रंथांची भर पडली. ट्रावर यानें वाचलेल्या मराठी निबंधाची माहिती मिळत नाहीं. त्यामुळें त्यानें जो निबंध वाचला असेल त्यांतील भाषेची कल्पना येण्याचा मार्ग उरलेला नाहीं.

या कॉलेजची मराठीची तिसरी परीक्षा जानेवारी १८०७ मध्यें झाली. या परीक्षेत टेलर व हार्वेट हे दोघेजण पास झाल्याचें आढळतें. (२१) टेलरनें मराठी भाषेंत प्रावीण्य मिळविल्यामुळें त्याला पदक मिळालें.

---

१९ *Asiatic Annual Register*, 1805. p. 97. शिवाय *The College of Fort William in Bengal*. p. 217 पहा.

२० *Asiatic Annual Register*, 1806. p. 141.

२१ *Asiatic Annual Register*, 1807. p. 66.

या कॉलेजची मराठीची चवथी परीक्षा जानेवारी १८०८ मध्यें झाली. या परीक्षेंत सदेंची व ए. एफ्. टेंटलर हे दोघेजण पास झाल्याचें दिसतें. सदेंची यास पदक मिळाल्याचें व टेंटलर याचा मराठी मार्गेत दुसरा नंबर आल्याचें निकालपत्रांत नमूद करण्यांत आलें आहे. (२२) यावेळीं मराठींत निबंधवाचन झाल्याचें दिसतें. निदानरच्या नंतर वादविवाद सभेंत झालेलें हें दुसरें निबंधवाचन होय. या प्रसंगीं सदेंची यानें मराठींत "On the utility of the study of the Mahratta Language." या विषयावर निबंध वाचला. (२३) कदाचित मराठी मार्गेत निबंधवाचन करून दाखविलेल्या प्राविण्याबद्दल सदेंचीला पदक मिळालें असावें. याच्याहि निबंधाविषयीं माहिती मिळत नाहीं.

या कॉलेजच्या जानेवारी १८०९ मध्यें झालेल्या मराठीच्या पांचव्या परीक्षेंत सार्जंट या नांवाचा एकच युरोपियन पास झाला. मराठी मार्गेत प्राविण्य दाखविल्याबद्दल यास पदक मिळालें. विशेष म्हणजे सार्जंटनें मराठी लेखन केलें असल्याचेंहि यांत नमूद आहे. या प्रसंगीं यानें निबंधवाचनहि केलें. याच्या निबंधाचा विषय "The great utility is to be derived from the study of the *Mahratta* language," असा होता. आतांपर्यंत झालेल्या निबंधवाचनांत हें तिसरें निबंधवाचन होय. (२४)

सन १८०९ नंतर मात्र मराठी भाषेच्या परीक्षेची नोंद आढळत नाहीं. बंगाल सरकारच्या मुल्की व लष्करी नोकरांनाच शिक्षण देण्यांत यावें असें धोरण मर्यादित करण्यांत येऊन अरबी, फारशी, हिंदुस्तानी, संस्कृत, बंगाली व व्रज या सहा भाषांचेच प्रोफेसर व असिस्टंट प्रोफेसर नेमण्यांत आले, असें १८२१ च्या सरकारी दप्तरावरून कळतें. (२५) अर्थात् याचूर्वीच मराठीची परीक्षा बंद झालेली असली पाहिजे; पण ती निश्चित केव्हां बंद झाली, हें समजत नाहीं.

या कॉलेजचा अध्यापकवर्ग फार मोठा होता. यांत युरोपियन व एतद्देशीय लोक अध्यापनाचें काम करीत. केरे हा या कॉलेजांत संस्कृत, बंगाली व मराठी या भाषांचा प्रोफेसर होता. (२६) केरेची नेमणूक प्रथम एप्रिल १८०१ मध्यें दरमहा ५००

२२ *Asiatic Annual Register*, 1808. p. 56.

२३ *Ibid*. p. 39.

२४ *Asiatic Annual Register*, 1809. pp. 9 and 11.

२५ *G. D. Vol.* 9/10. 1821. pp. 73-74. याच संदर्भात "*The statutes of the College of Fort William in Bengal. Calcutta,*" 1814 (Forth chapter) p. 3 हा भाग पहावा.

२६ *The College of Fort William in Bengal*. p. 237.

रुपयांवर झाली व १ जुलै १८०७ पासून त्याला प्रोफेसर करण्यांत येऊन त्याचा दरमहा १००० रुपये पगार झाला. हें काम त्यानें ३१ मे १८३० पर्यंत केलें व पुढें जुलैपासून ३१ मे १८३४ पर्यंत त्यांस पांचशें रुपये पेन्शन मिळत होतें. (२७) मध्यंतरीं शेवटचीं कांहीं वर्षे दरमहा ३०० रुपये पगारावर सरकारी ट्रान्सलेटर म्हणून त्यानें काम केल्याचा उल्लेख आढळतो.(२८) या कॉलेजच्या एतद्देशीय अध्यापकवर्गांत निरनिराळ्या भाषासाठीं पुष्कळ मुनशी होते. संस्कृतसाठीं आठ व मराठीसाठीं तीन पंडित होते. त्याचप्रमाणें अरबी, फारशी, बंगाली व देवनागरी लिपि लिहिणारे (Writing Masters) होते. हा सर्व अध्यापकवर्ग विद्वान् असून केव्हां केव्हां विद्यार्थ्यांना शिकविण्याचें काम तर केव्हां भाषांतर करण्याचें काम त्याना करावें लागत असे. पहाः—

"Native Establishment of the College of Fort William."

"Learned natives, some of whom are employed in teaching the students, some in making translations, and others in composing original works in the oriental tongues." (२९)

कॉलेजमधील मराठी भाषेच्या पंडितांपैकीं विद्यानाथ याचा उल्लेख व्याकरण व शब्दकोश या दोन पुस्तकांच्या प्रस्तावनेंत आढळतो. व्याकरण तयार करीत असतांना विद्यानाथ या मुख्य पंडिताची मदत झाल्याचा उल्लेख कॅरेनें व्याकरणाच्या प्रस्तावनेंत केला आहे. (३०) तसाच उल्लेख शब्दकोशाच्या प्रस्तावनेंतहि आहे; (३१) परंतु हितोपदेश व सिंहासनबत्तिशी हीं पुस्तकें पाहिलीं असता एका पुस्तकावर वैजनाथ पंडित व दुसऱ्यावर वैजनाथ शर्मा अशीं पुस्तककर्त्यांचीं नांवें दिलेलीं आढळतात. कॅरेच्या तीन पंडितांचीं नांवें कुठें सांपडत नसल्यामुळें व्याकरण व कोश यांत कॅरेला साहाय्य करणारा विद्यानाथ व हितोपदेश व सिंहासनबत्तिशी हीं पुस्तकें तयार करणारा वैजनाथ हे वेगवेगळे दोन पंडित आहेत, कीं एकाच पंडिताचीं हीं दोन नांवें युरोपियन व एतद्देशीय यांच्या उच्चारांतील फरकामुळें झालेलीं आहेत, हें

---

२७ कॅरे ९ जून १८३४ रोजीं मरण पावला. तोंपर्यंत त्याला पेन्शन मिळत असावी. त्या नऊ दिवसांच्या पेन्शनचा हिशेब यांत धरलेला दिसत नाहीं.

२८ George Smith. *The Life of William Carey* p. 435.

२९ *The College of Fort William in Bengal* p. 239.

३० William Carey. *A Grammar of the Mahratta Language to which are added Dialogues on Familiar Subjects* (1805), Preface. pp. VI and VII.

३१ William Carey. *A Dictionary of the Mahratta Language*. Preface. p.VI.

समजावयास मार्ग नाहीं. तीं दोन नावें एकाच पंडिताचीं आहेत, याला वरील तर्काशिवाय दुसरा आधार नाहीं.

या कॉलेजांत कॅरेनें स्वतः कांहीं पुस्तकें लिहिलीं व आपल्या देखरेखीखालीं कांहीं पुस्तकें पंडितांकडून तयार करवून घेतलीं. त्यापैकीं कॅरेच्या पुस्तकांची माहिती पुढें देण्यांत येत आहे :

1) A Grammar of the Mahratta Language to which are added Dialogues on Familiar Subjects, 1805.

कॅरेनें मराठी भाषेचें हें व्याकरण इ. स. १८०५ मध्यें लिहिलें या पुस्तकावर कॅरेचें नांव असल्यामुळें हें पुस्तक त्यानेंच लिहिलें अशी समजूत आहे; परंतु फोर्ट विल्यम कॉलेजच्या प्रमुख मराठी पंडित जो विद्यानाथ त्यानें आपणांस मदत केल्याचें प्रस्तावनेंत कॅरेनें नमूद केलें आहे.(३२) त्या शिवाय या कॉलेजांतील २० सप्टेंबर १८०४ सालच्या वृत्तांतांत अध्यापकांच्या ग्रंथलेखनाची माहिती देतांना व्याकरणाच्या पुस्तकासंबंधीं पुढीलप्रमाणें उल्लेख आढळतो :—

"A Grammar of the Mahratta Language, by Vydyunath, Mahratta Pundit, in conjunction with Mr. William Carey, teacher of the Shanscrit and Bengalee languages." (३३)

या उल्लेखनावरून मराठी भाषेचें व्याकरण कॅरे व विद्यानाथ या दोघांनीं मिळून केलें असावें, असें स्पष्ट दिसतें. हें व्याकरण तयार करण्याची आवश्यकता कां वाटली, हें कॅरेनें प्रस्तावनेंत नमूद केलें आहे. कॉलेजांत मराठी भाषेचा अभ्यासक्रम सुरू झाल्यानंतर अशा पुस्तकाची अत्यंत गरज वाटूं लागली व हें पुस्तक तयार करण्याचें काम आपणांवर सोपविल्यामुळें आपण हें पुस्तक तयार करण्याचा प्रयत्न केला, अशी माहिती या पुस्तकाविषयीं त्यानें दिली आहे. (३४).

हें पुस्तक देवनागरी लिपींत छापलें आहे. मराठी राज्यांत व्यापारी लोकांची लिहिण्याची लिपि मोडी असून विद्वान लोकांची लिहिण्याची लिपि देवनागरी आहे असा खुलासा करून देवनागरींत हें पुस्तक लिहिण्याचें कारण देतांना तो लिहितो,

"This, and the superior fitness of that character to

३२ William Cary. *A Grammar of the Mahratta Language.* (1805). Preface. pp. VI and VII.

३३ *The College of Fort William in Bengal.* pp. 229–230.

३४ William Carey. *A Grammar of the Mahratta Language* (1805), preface. p. VI.

express grammatical niceties with precision, may be a sufficient apology for its use in the following work." (३५)

पुस्तकाच्या सुरवातीला देवनागरींत लिहिण्याचें दुसरें एक कारण त्यानें सांगितलें आहे तें असें:—

"Books in the Mahratta language are generally written in the Devunaguri character, but the character commonly used in business is the Moorh. The system of that alphabet and the Devunaguri is the same. Types in the Moorh character not having yet been cast in Bengal, the Devunaguri will be used in this work." (३६)

या व्याकरणाची दुसरी आवृत्ति सन १८०८ मध्यें प्रसिद्ध झाली. ही मोडींत आहे. याची प्रत महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें आहे. याची १८२५ सालची तिसरी आवृत्ति ब्रिटिश म्युझियममध्यें आहे.

2 ) A Dictionary of the Mahratta Language : 1810.

मराठी भाषेचा शब्दकोश सन १८१० मध्यें छापला. यांत मराठीकरितां मोडी टाइप वापरलेले आहेत. हा शब्दकोश रचण्याचा उद्देश प्रस्तावनेंत सांगण्यांत आला आहे. तो म्हणतो,

"To those Europeans who reside in India, the study of its different languages is confessedly of great importance, as tending to facilitate the interests of commerce, and to promote that free intercourse so necessary to the existence of mutual confidence between themselves and the natives. It is also highly important as a medium through which alone Europeans can become acquainted with the manners and customs of the different Indian nations, and with a variety of circumstances known to great body of the people, and in which they are immediately interested." (३७)

हा शब्दकोश तयार करीत असतांना वैजनाथ या प्रमुख पंडिताची मदत झाल्याचा उल्लेख कॅरेनें केला आहे. तसेंच त्याचा हा शब्दकोश छापला

३५ *Ibid*. Preface. p. VII.

३६ *Ibid*. p. 1.

३७ William Carey. *A Dictionary of the Mahratta Language*, Preface. p. III.

जाईपर्यंत डॉ. ड्रमंडचें व्याकरण व शब्दकोश प्रकाशित न झाल्यानें त्याचाहि केरेस उपयोग करतां आला नाहीं, असें त्यानें प्रस्तावनेंत नमूद केलें आहे. (२८)

या कोशांत सुमारें ९।१० हजार शब्द असून एकंदर पृष्ठें ६५२ आहेत. या कोशांत पुष्कळ संस्कृत शब्द आहेत. 'अ' या वर्णांत अग्रणी, अकच्छ, अकर्मण्य, अकल्याण, अकस्मात्, अकारण, अकींचन, व अकृत्रोम (पृ १।२), अखंड, अक्षय, अक्षुण्ण, अगणीत, अगत्य (पृ. ३), अग्रगामी (पृ. ४), अदत्त, अदर्शन (पृ. ११), अनाश्रयी (पृ. १५), अनुज (पृ. १८), अपमृत्य (पृ. २६), अल्प (पृ. ३७), अश्वशाला (पृ. ४५) असे शब्द आहेत. 'क' या वर्णांतील कर्थ (पृ. ११२), कुवचन (पृ. १४०), कुसन्तान (पृ. १४१), कृतान्त (पृ. १४३), असे शब्द आहेत. त्यांतील कांहीं शब्द संस्कृत असून ते मराठी लोकांच्या बोलण्यांत फारसे न येणारे आहेत असें दिसून येतें. यांत कांहीं फारशी भाषेंतीलही शब्द दिले आहेत. कांहीं शब्दांना आज तरी अपरिचित असे अर्थ दिले आहेत, उदाहरणार्थ :— खट्का S. a doubt, hesitation; खट्पट् S. a difficulty, a contention; खट्तर a very deceitful (पृ. १५६). केरेच्या शब्दकोशांत मराठी लोकांच्या बोलण्यांत न येणारे शब्द असल्यानें या शब्दकोशाचा आपण कोश तयार करीत असतांना कांहीं उपयोग झाला नाहीं, असें व्हॅन्स केनेडीनें लिहिलें आहे. पहा :

"For the reason before mentioned Mr. Carry's Dictionary has been of little use to me, as not many of the words contained in it are used by the Marathas the second style, and he has omitted to mark the genitive of the nouns and the quality of the verbs." (२९)

व्हॅन्स केनेडी याच्याप्रमाणेंच स्कॉटिश मिशनमधील एक मिशनरी रे. स्टीव्हन्सन् यानें मोल्सवर्थच्या शब्दकोशाचें परीक्षण करणारें एक पत्र मुंबईसरकारचे चिटणीस यांना ता. १२ जुलै १८३१ रोजीं पाठविलें होतें. या परीक्षणाच्या अनुषंगानें त्यानें केरेच्या शब्दकोशावर खालीलप्रमाणें टीका केली आहे. तो म्हणतो,

"The first work published on this subject was Dr. Cary's Murathee Dictionary. It is a vocabulary containing about ten thousand words. Of these a very great number are entitled Sangscrit, and not at all current among the Marathee people; at the same time many common words of everyday use among all classes of the population are omitted

२८ *Ibid.* Preface, p. VI.

२९ *G. D.* Vol. 50/55. 1823. p. 132.

so that, independent of Provincialism, it cannot be considered in any degree as answering as a dictionary of the language." (४०)

कॅरेच्या शब्दकोशांत व्हॅन्स केनेडी, व डॉ. स्टीव्हन्सन् यांनी दोष काढले तरी प्रथमच हा शब्दकोश कॅरेनें रचला हें विसरतां कामा नये, असें म्हणतांना सहानुभूतीनें विल्सननें त्याच्या शब्दकोशाकडे पाहिलेलें दिसतें. तो म्हणतो,

"But it should not be forgotten that in Marathee, as in forty of the languages of our Indian Subjects and Chinese neighbours, Carey had first provided a dictionary in 1810, as well as a grammar and translation of the Scriptures." (४१)

कॅरेनें हा शब्दकोश प्रथमच रचला एवढ्यासाठीं त्याच्या शब्दकोशावर दिलेला विल्सनचा अभिप्राय मान्य होण्यासारखा आहे. त्याच्या शब्दकोशांत संस्कृत शब्दांची संख्या जास्त असून मराठी लोकांकडून बोलले न जाणारे असे शब्द त्यांत आहेत, हा सुद्धां एक दोष म्हणून सांगितला जातो; परंतु जास्त संस्कृत शब्द असणें हा दोष म्हणतां येत नाहीं. व्हॅन्स केनेडी वगैरे शब्दकोशकार मराठी बोलीचाच विचार करतात. लेखी मराठींत संस्कृत तद्भव शब्द जास्त असतात याचा त्यांनीं विचार केलेला दिसत नाहीं. तसेंच संस्कृत भाषेविषयीं कॅरेची एक विशिष्ट कल्पना असल्यामुळें त्याच्या कोशांत संस्कृत शब्दांची संख्या जास्त झाली. हिंदुस्तानांतील भाषांची उत्पत्ति संस्कृत भाषेपासून झाली असून त्या भाषांत कमींत कमी तीन चतुर्थांश तरी संस्कृत शब्द असतात, अशा तऱ्हेचें प्रतिपादन त्यानें आपल्या शब्दकोशाच्या प्रस्तावनेंत केलें आहे. संस्कृत अभ्यासामुळें कॅरेची त्या भाषेविषयीं ही कल्पना झाली ती अशी:—

"If any language could be adopted as the universal medium of communication with all the different Indian nations, it would be the Sungskrita, which is indeed not only the key to all the Indian literature, but also the parent of every language spoken throughout India, in most of which three fourths of the words are either pure Sungskrita, or so obviously derived from it as to be instantly recognized by one who has studied that language" (४२)

---

४० *G. D.* Vol. 18/237, 1831. p. 136.

४१ George Smith. *The Life of John Wilson.* p. 491.

४२ William Carey. *A Dictionary of the Mahratta Language,* Preface. p. V.

कॅरेच्या कल्पनेचा त्याच्या मराठी शब्दकोशावर परिणाम होऊन, त्यांत संस्कृत शब्दांची संख्या जास्त झाली, असें म्हणावयास हरकत नाहीं. तसेंच मराठी प्रदेशाची प्रत्यक्ष माहिती त्याला असती व मराठी लोकांशीं त्याचा संबंध आला असता, तर या शब्दकोशानें स्वरूप कदाचित् बदललें असतें.

कॅरेच्या शब्दकोशांत मराठी शब्द कोणते असत व त्यांना अर्थ कसा दिला आहे यासाठीं नमुना म्हणून पृष्ठ १० वरील शब्द येथें देण्यांत येत आहेत. मराठी भाषेतील शब्दाची मोडी लिपि असून अर्थ इंग्रजीत दिले आहेत.

अतत्पर, *a.* unskilled, inexpert.

अतलस्पर्श, *a.* fathomless, battomless.

अती, *al.* very, exceedingly,

अतीक्रम, *s.* a transgession*. an exceeding, a passing over, a leaping over appointed boundaries.

अतीक्रमण्, *s.* a transgressing, an exceeding.

अतीक्रमी, *s.* a transgressor, one who passes over all bounds.

अतीकठीण्, *s* very difficult, inexorable.

अतीथी, *s.* a guest, a stranger.

अतीथीद्वेषी, *a.* inhospitable churlish to strangers

अतीथीशाला, *s.* house for strangers, or guests

अतीवाद, *a.* much, great. excessive.

अतीरीक्त, *a.* remaining, over and above.

अतीरेक, *s.* surplus.

अतीशय, *a.* great, excessive, *ad.* very, exceedingly.

अतीशयता, *s.* superabundance, plenty.

अतीशयोक्ती, *s* garrulity*, tautology.

अतीसार, *s.* flux, a diarrhoea.

अतीत, *a.* past, gone.

अतुल्य, *a.* unequalled, unlike.

कॅरेच्या वरील एका पृष्ठावरून शब्दकोशासंबंधीं कल्पना करतां येईल.

---

* ( sic ) यथामूल.

४४ *Ibid.* p. 10.

३ सिंहासनबत्तिशी : १८१४.

कॅरेच्या नांवानें प्रसिद्ध झालेल्या व्याकरण व शब्दकोश या दोन ग्रंथांशिवाय त्यानें आपल्या देखरेखोखालीं मराठी पंडिताकडून कांहीं पुस्तकें फोर्ट विल्यम कॉलेजमध्यें तयार करून घेतलीं. कॅरेच्या देखरेखीखालीं पुस्तकें तयार झालीं त्यांची माहिती आढळते ती अशी :—

"HITOPUDESHU, from the Sunskrit, also the BUTTEE-SEE SINGHASUNU, from the Sunskrit, and PRUTA-PANDITYU, from the Bengalee have been translated in the Mahratta language by learned natives, under the superintendence of the *Rev. Dr. Carey,* for the use of students of the Mahratta class." (४३)

सिंहासनबत्तिशी व हितोपदेश हीं दोन पुस्तकें संस्कृत पुस्तकांचीं भाषांतरें आहेत. हीं भाषांतरें कोणी केलीं याचा उल्लेख यांत नाहीं. मात्र या दोन पुस्तकांवर वैजनाथ पंडिताचें नांव असल्यामुळें एतद्देशीय विद्वानांचा जो मोघम उल्लेख केला आहे, त्यापैकीं एक वैजनाथ पंडित असावा, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

सिंहासनबत्तिशी हें पुस्तक १८१४ मध्यें प्रसिद्ध झालें असून त्याचीं एकंदर १८३ पृष्ठें आहेत. सर्व पुस्तक मोडींत आहे. या पुस्तकाच्या मुखपृष्ठावर "सिंहासन-बत्तिशी–महाराष्ट्र भाषेनें संग्रह–वैजनाथ शर्मा कीयते। श्रीरामपुरीं छापा झाली," असें मोडींत लिहिलें असून "किताब कालिज फोर्ट वलियम" असा आरंभीं व शेवटीं वर्तुळाकृति शिक्का आहे.

या पुस्तकांत विक्रम राजाच्या सिंहासनाची कथा, बत्तीस पुतळ्यांच्या मुखांतून वदविली आहे व अशा बत्तीस कथा यांत आहेत. या पुस्तकाचा विषय प्रथमारंभीं दिला आहे तो असा :—

"देवता लौकीक या दोहींत सामर्थ्यसंपन्न श्रीविक्रमादित्य नांवाचा यक राजाधिराज झाला होता. देवांचे प्रसादानें मिळालेल बत्तीस पुतळ्यांसगट रत्नमय यक सिंहासन त्याचे बसायाच होत। त्या विक्रमादित्य राज्याचे स्वर्गगमनानंतर त्या सिंहासनावर बसायायोग्य कोण्ही मनुष्य नसायानें मातीमध्यें गाडून गेल होत। कांहीक दिवसानंतर श्री भोजराज राजाचे अधिकाराचे काळीं तेच् सिंहासन प्रकाश झाल। त्याचे उपाख्यानाच विवरण हे।" (४४)

४३ *The Asiatic Journal and the Monthly Register*, Vol. I. 1816. p. 172.

४४ वैजनाथ शर्मा. **सिंहासन बत्तिशी** (मोडी लिपींत). १८१४. आरंभीचें पृष्ठ.

प्रस्तावनेदाखल आरंभीच्या मुखपृष्ठावर ही माहिती देऊन पहिल्या कथेला सुरवात केली आहे. या प्रस्तावनेवरून या पुस्तकाची भाषा कशी आहे, याची कल्पना वाचकांस होईल.

## ४ हितोपदेश : १८१५.

या पुस्तकाचें संस्कृतवरून भाषांतर होत असल्याची माहिती मागें दिलीच आहे. इ. स. १८१५ मध्यें हें पुस्तक मोडींत प्रसिद्ध झालें. यानंतरही पंचतंत्र हेंहि पुस्तक प्रसिद्ध झालें अशी कांहीं ठिकाणीं चुकीची माहिती दिली गेली आहे. ब्रिटिश म्युझियमच्या कॅटलॉगमध्यें संपादकानें 'हितोपदेश' या पुस्तकाची माहिती दिली आहे (४५) तर इंडिया ऑफिसच्या कॅटलॉगमध्यें 'पंचतंत्र' या पुस्तकाचा समावेश केला आहे. (४६) चुकीमुळें हितोपदेश व पंचतंत्र हीं निरनिराळीं दोन पुस्तकें आहेत, असें वाटून पुढील कांहीं ग्रंथांतहि त्याच चुकीची पुनरावृत्ति झालेली दिसते. 'अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका' या ग्रंथांत हितोपदेश व पंचतंत्र हीं दोन स्वतंत्र पुस्तकें समजून त्यांचा उल्लेख करण्यांत आला आहे. (४७) तसेच मराठी ग्रंथसूचीनेंहि 'आद्यमुद्रित ग्रंथांची नामावलि' देतांना संपादकानें या दोन पुस्तकांचा स्वतंत्रपणें निर्देश केला आहे. (४८)

वास्तविक मूळ पुस्तक नीट न पाहिल्यानें हें एकच असून दोन नांवांनीं दोन ठिकाणीं प्रसिद्ध झालें. ही एक चूक प्रथम 'पंचाग्नी' या पुस्तकांत निदर्शनास आणली गेली. (४९) पुस्तकाचें मुखपृष्ठ नीट पाहिलें तर ही चूक कशी झाली, हें दिसून येईल. हें पृष्ठ असें आहे:—

---

४५. J. F. Blumhardt. *Catalogue of Marathi and Gujarati Printed Books in the Library of the British Museum*, p. 47. त्याचप्रमाणें *A Catalogue of the Library of the Hon. East-India Company*. p. 193 पहा.

४६ J. F. Blumhardt. *Catalogue of the Library of the India Office*, Vol. II. part V. p. 78.

४७ गं. बा. सरदार, अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका. पृ. ८,९ व ८२.

४८ शं. ग. दाते, मराठी-ग्रंथ-सूचि. पृ. ९.

४९ अ. का. प्रियोळकर, डॉ. पु. मु. जोशी इ. पंचाग्नी. पृ. ३४.

"पंचतंत्र प्रभृति नीतीशास्त्रांतून कढाडलेल ।
मित्रलाभ सुहृद्भेद विग्रह संधी । या चौहींचे
अवयवविशिष्ट हितोपदेश ।
विष्णुशर्मानें केलेला संग्रहीत ।
महाराष्ट्री भाषेत् तर्जमा वैजनाथ पंडितानें केला ।
श्रीरामपुरी छापा झाली । १८१५ ॥" (५०)

**५ राजा प्रतापादित्याचें चरित्र : १८१६.**

राजा प्रतापादित्याचें चरित्र ह्या पुस्तकाचें बंगालीवरून भाषांतर झाल्याचा उल्लेख मागें दिला आहे. हें पुस्तक उपलब्ध नाहीं.

**६ रघूजी भोसल्याची वंशावळी : १८१६.**

हें पुस्तक महाराष्ट्रग्रंथालय, पुणें येथें पाहावयास मिळतें. याची लिपि मोडी असून पृष्ठें १०३ आहेत.

**७ मराठी भाषेंतील अस्सल पत्रसंग्रह : १८१६.**

हें पुस्तक प्रसिद्ध झाल्यासंबंधीं पुढील माहिती मिळते :

"A collection of ORIGINAL LETTERS, in the Mahrata language; Published for the use of the students, by the *Rev. Dr. William Carey*, Professor of the Bengali, Sanskrita and Mahratta languages, in the College of Fort William." (५१)

कॅरेनें मराठी भाषा शिकून मराठी भाषेंत बायबलखेरीज गद्य ग्रंथ व दुसरे कांहीं गद्य ग्रंथ निर्माण केले व आपल्या पंडितांमार्फत मराठी ग्रंथ तयार करावयास उद्युक्त केलें. मराठी भाषाज्ञान प्राप्त झाल्यानंतर कॅरेला त्यांत वाङ्मयनिर्मिती करता आली. कॅरेच्या या भाषाज्ञानाचें व या देशाची माहिती त्यानें जेवढी करून घेतली त्याचेंच प्रतिबिंब कॅरेच्या वाङ्मयात पडलें आहे. याविषयी स्वतःच एका वादविवादसमारंभप्रसंगी त्यानें लॉर्ड वेलस्लीपुढें भाषण केलें, त्यात तो म्हणतो :

"I, Now an old man, have lived for a long series of years among the Hindoos. I have been in the habit of preaching to

५० वैजनाथ शर्मा. हितोपदेश. (१८१५). मुखपृष्ठ.

५१ *Asiatic Journal* vol III 1816 p 230 तसेंच *Asiatic Journal*, vol. I. 1816 p. 172 वरील पुढील उल्लेख पहा:—" A collection of ORIENTAL LETTERS in the Muhratta language, is likewise in course of publication."

*multitudes daily, of discoursing with the Brahmins on every* subject, and of superintending schools for the instruction of the Hindoo-youth. Their language is nearly as familiar to me as my own. This close intercourse with the native for so long a period, and in different parts of our empire, has offered me opportunities of information not inferior to those which have hitherto been presented to any other person. I may say, indeed, that their manners, customs, habits, and sentiments, are as obvious to me, as if I was *myself* a native." (५२).

मराठी भाषेंत कांहींहि ग्रंथनिर्मिति होत नसतांना व बंगाल हा मराठी भाषेचा प्रांत नसतांना कॅरेनें तेथें मराठी भाषाविषयक पुस्तकें तयार केलीं, या एकाच गोष्टीनें कॅरेचें नांव मराठी वाङ्मयांत चिरस्मरणीय होऊन राहील. स्वतः कॅरेनें मात्र या ग्रंथनिर्मितीचें श्रेय स्वतःकडे मुळींच घेतलें नाहीं. याविषयीं आपल्या चरित्रलेखकाला उद्देशून तो म्हणतो,

"Eustace, if after my removal, any one should think it worth his while to write my life, I will give you a criterion by which you may judge of its correctness. *If he give me* credit of being a plodder, he will describe me justly. Anything beyond this will be too much. I can hold. I can persevere in any definite pursuit. To this I owe everything." (५३)

कॅरेची ही स्वतःविषयींची कल्पना खरी मानली तरीसुद्धां मराठी भाषेंत कॅरेची कामगिरी दृष्टिआड करतां येण्यासारखी नाहीं.

---

५२. *i e College of Fort William in Bengal.* pp. 174–175.

५३ Eustace Carey. *Memoir of William Carey* (2nd Ed.). pp. 585–586.

# ईस्ट इंडिया कंपनीचें हेलिबरी कॉलेज

ईस्ट इंडिया कंपनीनें हिंदुस्तानांत आपलें राज्य स्थापण्यास सुरुवात केल्यानंतर इ. स. १८०० पासून म्हणजे एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभालाच तिच्या चालकांनी कंपनीच्या अधिकाऱ्यांची कार्यक्षमता व लायकी यांची तपासणी सुरू केली. आजपर्यंत ईस्ट इंडिया कंपनी ही व्यापारी कंपनी व तिचे नोकर हे व्यापारी एजंट असें कंपनी व नोकर यांचें परस्पर नातें होतें. कंपनीचा राज्यविस्तार वाढल्यानंतर हें नातें जाऊन राज्यसंस्था व राज्याधिकारी वर्ग असें नवें नातें निर्माण झालें. ही राज्यसंस्था सुरळीत चालावयाची असेल तर त्याला लायक व कार्यक्षम असा अधिकारीवर्ग पाहिजे, अशी कंपनीच्या डायरेक्टरांची व वरिष्ठ अधिकाऱ्यांची खात्री झाली.

हा कार्यक्षम व लायक असा अधिकारीवर्ग तयार करण्यासाठीं व राज्यकारभाराला अवश्य असणारी मुख्य गोष्ट म्हणजे येथील लोकांच्या भाषांचें ज्ञान इंग्लिश अधिकाऱ्यांना झालें पाहिजे हें ओळखून लॉर्ड वेलस्लीनें कलकत्ता येथें फोर्ट विल्यम कॉलेज स्थापन केलें.(१) वेलस्लीच्या फोर्ट विल्यम कॉलेजच्या खर्चासाठीं ईस्ट इंडिया कंपनीनें जरी नापसंती दर्शविली तरी कंपनीच्या नोकरांना भाषेच्या अभ्यासाबरोबर राज्यकारभाराचें शिक्षण देण्यासाठीं तसें एकादें कॉलेज इंग्लंडमध्यें काढण्याचे ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टर-मंडळाचे प्रयत्न चालू झाले. यासंबंधीं कोर्ट ऑफ डायरेक्टरांच्या ऑक्टोबर १८०४ च्या रिपोर्टांत पुढीलप्रमाणें उल्लेख आढळतो :—

"As the Company's civil servants are to be employed in all the different branches of administration of extended dominions, it will be readily admitted that, ... they should receive an education, comprehending not only the usual course of classical learning, but the elements of such other parts of knowledge as may be more peculiarly—applicable to the stations they have to fill." (२)

---

१ Lieut-Gen. John Briggs. *India and Europe Compared.* pp. 145-146.

२ *Minutes of Evidences taken before the Select Committee on the Affairs of East India Company.* *Vol. I. Public.* 16th August 1832, p. 231.

या कॉलेजच्या स्थापनेसंबंधी दुसरीहि एक कल्पना सांगितली जाते. कँटन (चीन) येथील फॅक्टरीच्या लोकांनीं कंपनीला ता. २९ जानेवारी १८०४ रोजीं कळविलें कीं, रायटरांचें नेमणुकीचें वय सोळा असल्यामुळें त्यांना त्या वयांत येथील हवा मानवत नाहीं, तरी त्यांची वयोमर्यादा एकोणीस करावी. मात्र पहिल्या नेमणुकीचें वय न बदलतांना त्यांना तीन वर्षे शिक्षण द्यावें व मग त्यांची नेमणूक करावी. (३)

या विचारप्रमाणें एक कॉलेज प्रथम फेब्रुआरी १८०६मध्यें हर्टफोर्ड येथें स्थापन झालें व पुढें १८०९ मध्यें तें हेलिबरी येथील स्वतःच्या इमारतींत गेलें. तेथें हें कॉलेज १८५८पर्यंत चाललें होतें.(४) म्हणून सर्व ठिकाणीं हेलिबरी कॉलेज असाच त्याचा उल्लेख करण्यांत आला आहे. हिंदुस्तानांत राज्यकारभार करण्यासाठीं जो नोकरवर्ग इंग्लंडहून जाणार होता, तो या ठिकाणीं शिक्षण घेणार होता. या लोकांनीं चार टर्म्स शिक्षण घेतल्यानंतर पास झाल्याचें प्रशस्तिपत्र मिळविल्याखेरीज त्यांची हिंदुस्तानांत मुंबई, मद्रास या ठिकाणीं नेमणूक होणार नव्हती.(५) ईस्ट कंपनीचा हा कायदा सन १८१३ मध्यें झाला. या कायद्यान्वये या कॉलेजच्या अभ्यासक्रमासंबंधीं नियम दिलेले होते.(६) हेलिबरी कॉलेजमध्यें शिक्षण घेतलेल्या या अधिकाऱ्यांना मुंबई व मद्रास येथें पाठविण्यांत येत असे; परंतु तेथें हिंदुस्तानी, फारशी, संस्कृत, तेलगु व बंगाली या भाषांचाच अभ्यासक्रमांत समावेश केलेला होता. सन १८१७ मध्यें त्या कॉलेजची भाषाविषयक जी परीक्षा झाली त्यांत या भाषांच्या वाचन व भाषांतर यांच्या परीक्षेसंबंधींच फक्त उल्लेख आढळतो.(७) या भाषाज्ञानाचा उपयोग मद्रास व बंगाल येथील सिव्हिल सर्व्हंटना व्हावयाचा होता. या अभ्यासक्रमांत मुंबई इलाख्यांत प्रचलित असलेल्या मराठी व गुजराती या भाषांचा मुळींच समावेश झाला नव्हता असें दिसतें. याचें कारण हिंदुस्तान म्हणजे बंगाल व वायव्यसरहद्दप्रांत एवढीच कंपनीच्या लोकांची त्या काळीं समजूत होती. मद्रासचा उल्लेख एक दुय्यम दर्जाचा प्रांत म्हणून होत असे; परंतु त्यांची मुंबईविषयीं काय कल्पना होती ती पहा :—

३ Fredrick C. Danvers. *Memorials of Old Haileybury College*. p. 15.

४ Sir Atul Chatterjee and Sir Richard Burn. *British Contributions to Indian Studies*. p. 19.

५ Peter Auber. *Rise and Progress of the British Power in India (1837)*. *Vol. I.* pp. XXX and XXXI.

६ *Asiatic Journal and Monthly Register*. *Vol. III* 1817. p. 606.

७ *Ibid.* pp. 80–81.

"A barbarous—uncivilized spot, to which some of the men were supposed occasionally to resort; by no means a place to go to if you could help it." (८)

मुंबई हा प्रांत अगदीं मागासलेला व असंस्कृत आहे अशा कल्पनेनेंच मुंबई इलाख्याची मुख्य भाषा आज जी मराठी तिच्याकडे कंपनीच्या चालकांनीं दुर्लक्ष होऊन कॉलेजच्या अभ्यासक्रमांतून ही भाषा वगळली गेली. असें असलें तरी हेलिबरी कॉलेजांत मराठी भाषा अगदींच अपरिचित होती, असें नाहीं. हिंदुस्तानांत येणाऱ्या सिव्हिल सर्व्हंटना अनेक भाषा शिकविल्या जात. त्या ठिकाणीं गुजराती भाषेचा उल्लेख व अभ्यास चुकूनसुद्धां होऊं नव्हता; पण मराठी भाषेचें तसें नव्हतें. मुंबईला जाणाऱ्या सिव्हिल सर्व्हंटना त्या कॉलेजचे ईस्टविक नांवाचे प्रोफेसर खाजगी रीतीनें मराठी भाषेचीं मूलतत्त्वें शिकवीत. या कॉलेजांत हिंदी, हिंदुस्तानी व मराठी या भाषा शिकविण्यासाठीं जे प्रोफेसर नेमले गेले होते. त्यांचीं नांवें आढळतात तीं अशीं :—

"१ एडवर्ड स्ट्रॅनॉन् मास्त. १८२७ ते १८४५.

२ एडवर्ड बी. ईस्टविक. १८४५ ते १८५७." (९)

मराठी भाषा शिकविण्यासंबंधीं एक उल्लेख आढळतो. पहा :—

"The Rudiments of Murathi are kindly taught privately by Professor Eastwick–the ablest Professor in the college and a Bombay man to boot;" (१०)

या कॉलेजांत मराठी विषय शिकवीत, असा उल्लेख 'ज्ञानोदया' तहि आढळतो; परंतु हा विषय त्या ठिकाणीं अभ्यासक्रमांत नेमलेला होता कीं काय, हें त्यांत दिलेलें नाहीं. 'ज्ञानोदयां' तील उल्लेख असा आहे :—

"दिवाणी खात्यांतील उमेदवार साहेबांसाठीं विद्यालय". भरतखंडात दिवाणी कामासाठीं ज्या साहेबांस पाठवितात. ते हैलबरी नामक विद्यालयांत तयार होतात. तेथें मराठी, तैलंगी, बंगाली इत्यादि भरतखंडांतील भाषा शिकवितात. (११)

प्रो. ईस्टविक तेथें मराठी शिकवीत, यालाच अनुलक्षून हा निर्देश असावा असें दिसतें. मराठी शिकविण्याची माहिती दुसऱ्या एका ठिकाणींहि सांपडते. ती अशी:—

---

८ *The Bombay Quarterly Review. Vol. I.* 1855. p. 140.

९ Fredrick C. Danvers. *Memorials of Old Haileybury College.* p. 23.

१० *The Bombay Quarterly Review. Vol. I.* 1855. p. 141.

११ ज्ञानोदय. फेब्रुआरी १, सन १८५१. पृ. ४६, ४७.

"Until its close in 1858 when the last students passed out, it trained probationers in science, classical and general literature, history and political economy, general polity and law, besides the oriental departments which provided for hindu literature and the history of Asia, Arabic, Persian and Hindostani. Sanskrit, Bengali, Telugu and Marathi." (१२)

यावरून या कॉलेजमध्यें हिंदुस्तानांत नेमणूक झालेल्या अधिकाऱ्यांसाठीं निरनिराळ्या भाषा शिकण्याची सोय केली होती असें दिसून येतें; मात्र मराठी भाषा विषय हा सक्तीचा नसल्यानें त्याचा अभ्यास विद्यार्थ्यांकडून होत नसे. असें असलें तरी मराठी शिक्षणाचा फायदा घेणारा एक विद्यार्थी हेलिबरी कॉलेजच्या निकालपत्रांवरून दिसून येतो. या कॉलेजच्या सन १८२८ डिसेंबरच्या निकालपत्रांत या विद्यार्थ्याचें नांव जॉन एम्. जी. रॉबर्टसन, असें दिलें गेलें आहे. या कॉलेजांतून मराठी आणि इंग्रजी मधेंत प्राविण्य संपादन करून त्यांत बक्षीस मिळविणारा हा एकच विद्यार्थी दिसतो. या निकालपत्रांत रॉबर्टसनसंबंधीं पुढील उल्लेख आहे :

"John M. G. Robertson, prize for the best English essay, and highly distinguished in other departments, also a prize by a vote of council for creditable proficiency in Mahratta, in addition to his other attainments." (१३)

या कॉलेजांतील पास झालेले विद्यार्थी दरवर्षी मुंबईस अधिकारी म्हणून पाठविण्यांत येत. १८३३ मध्यें पास झालेले हेन्री बी. इ. फ्रीअर व सॅम्युअल मॅन्सफील्ड यांना मुंबईस पाठविण्यांत आलें होतें; (१४) परंतु मराठी विषयांत हे पास झालेले आहेत कीं नाहींत, यांचा उल्लेख करण्यांत आलेला नाहीं. अशाप्रकारें दरवर्षी या

---

१२ Sir Atul Chattarjee and Sir Richard Burn. *British Contributions to Indian Studies.* p 19.

१३ *The Asiatic Journal and Monthly Register.* Vol. XXVII. 1829. p. 113.

१४ *Asiatic Journal (New series).* Vol. XIII. 1834. p. 63, त्याचप्रमाणें Fredrick C. Danvers याचें *Memorials of Old Haileybury College.* p. 559 पहा. या पुस्तकांत १८०५ पासून १८५७ पर्यंत मुंबई इलाख्यांत आलेले जे सिव्हिल सर्व्हंट हेलिबरी कॉलेजांत शिकले त्यांची यादी दिली आहे. (पृ. ५३१–५७८) त्यांत जॉन बॅक्स, चार्लस नॉरिस, सर जॉन विल्सोबी, रॉबर्ट कॉटन मनी यांनी हिंदुस्थानी व इतर दुसऱ्या विषयांत बक्षिसें मिळविल्याचा निर्देश आहे.

कॉलेजांत पास झालेले विद्यार्थी मुंबईस पाठविण्यांत येत; परंतु त्यांचा मराठीशीं कांहीहि संबंध येत नसल्यामुळें त्यांची यादी येथें दिलेली नाहीं. या लोकांची नेमणूक मुंबई प्रांतांत झाल्याबरोबर सहा महिन्यांच्या आंत त्यांस परीक्षासमितीपुढें हजर होऊन भाषा-विषयक परीक्षा दिली पाहिजे असा त्यांच्यावर निर्बंध असे; पण या परीक्षेचें स्वरूप अगदीं व्यवहारी होतें. खालील मजकुरावरून त्याची कल्पना येईल.

"1stly : The Examinee is to be required to read a page of some accounts from a village, talooka or Hoozoor office, written in vernacular languages, and ordinary cursive character.

"2ndly : To read off in the Vernacular of the District, and explain *viva voce* in English, a deposition, or other exhibit, selected from a Magesterial case.

"3rdly : To render back into the Vernacular (from an English translation) an ordinary report by a native Revenue Officer. This must be rendered in a style substantially correct, and sufficiently intelligible to enable a native to read it out as written. It must be free from material errors in grammar and spelling, and the handwriting must be legible.

"4thly : To converse with two or three natives in such manner as to satisfy the Committee that he is able to understand, and make himself understood by, Natives of various classes, both in ordinary conversation, and the common business of a Cutcherry". (१५)

मुंबई सर्व्हिसच्या लोकांनी इंग्लंडांत मराठी भाषेचा अभ्यास केला नसल्यानें अर्थात् त्यांना ही परीक्षा देणें कठीण जाई. तशी मद्रास व बंगाल सर्व्हिसच्या लोकांची अडचण होत नसे. कारण बंगालमध्यें आल्यानंतर कॉलेज ऑफ कलकत्ता या ठिकाणीं ते भाषेचा अभ्यास पक्का करीत. (१६) मुंबई इलाख्यांतील सिव्हिल सर्व्हंटच्या अभ्यासाची अडचण ओळखून त्यांच्यासाठीं एक कॉलेज काढण्याचा प्रयत्न एल्फिन्स्टननें केला होता, त्याची माहिती पुढें येणारच आहे.

---

१५ Bombay Quarterly Review. Vol. I, 1855. p. 143.

१६ *Minutes of Evidences taken before the select committee on the affairs of the East India Company, Vol. I. Public.* 16th August 1832. p. XVII.

हेलिबरी येथील कॉलेजचा खर्च फार होतो व भाषाज्ञानाखेरीज या कॉलेजचा दुसरा कोणताहि फायदा होत नाहीं असें म्हणून ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टरांनीं हें कॉलेज बंद करण्याचें ठरविलें. त्यावेळीं या कॉलेजांत कांहीं सुधारणा करता येईल कीं काय, हें पाहण्यासाठीं त्यांनीं हिंदुस्थानांत काम केलेल्या अनेक जुन्या व अनुभवी सिव्हिल सर्व्हंटांच्या साक्षी घेतल्या. मात्र या सुधारणा सुचवितांना कोणाल्याहि मराठीची आठवण झालेली दिसत नाहीं. जॉन सुलिव्हन यानें संस्कृत, फारसी व अरबी या भाषांबरोबर गणित, एंजिनिअरिंग व पोलिटिकल इकॉनॉमि या विषयांचीहि दखल घेतली आहे. (१७) तसेंच हिंदुस्तानांत आल्यानंतर कोणत्याहि ऑफिसमध्यें नेमणूक झाली म्हणजे भाषा शिकण्याचें काम त्यांना सहज करता येईल, असेंहि सुलिव्हन आपल्या साक्षींत सुचवितो. युरोपियन लोक हे राज्यकर्ते असल्यानें भाषाविषयक सोयी त्यांना जास्त उपलब्ध होतील व कॉलेजमध्यें जें पुस्तकी ज्ञान मिळेल त्यापेक्षां हिंदुस्तानांत व्यवहारोपयोगी असें भाषाज्ञान मिळेल असें याचें कारण तो देतो.(१८)

जॉन सुलिव्हन याच्याप्रमाणें होल्ट मॅकेन्झी यानें आपल्या साक्षींत युरोपियन लोक हिंदुस्तानांत गेल्यानंतर त्यांना तेथील भाषा शिकणें सहजसाध्य होईल यासाठीं या भाषा शिकण्यासाठीं इंग्लंडमध्यें त्यांनीं वेळ घालवूं नये, असें सांगितलें आहे. (१९) होल्ट मॅकेन्झीनें हिंदुस्तानांत सन १८१६ ते १८३० या अवधींत फारसी व बंगाली भाषेच्या ट्रान्सलेटरचें काम केलें होतें. या दोघांप्रमाणेंच चार्लस लुशिंग्टन यानेंहि आपलें मत दिलें आहे. हेलिबरी कॉलेजमध्यें प्राथमिक व व्याकरणविषयक भाग शिकवून त्या भाषेचा पुढील अभ्यास कलकत्ता येथील कॉलेजांत किंवा दुसऱ्या शिक्षणसंस्थेंत चांगल्या रीतीनें करतां येईल, असें त्यानें प्रतिपादन केलें आहे.(२०) एकंदरींत हेलिबरी कॉलेजमध्यें भाषाभ्यास करण्यांत पैसा, श्रम व वेळ व्यर्थ घालवूं नये, या भाषा हिंदुस्तानात सहज शिकतां येतील, यापेक्षां नवीन असें या तिघांपैकीं कोणीहि सांगितलें नाहीं.

या तिघांप्रमाणें अलेक्झांडर डंकन याचेंहि मत होतें. हा हिंदुस्तानांत १८०४ मध्यें आला. १८२० ते १८२४ पर्यंत बेल्लारीचा कलेक्टर म्हणून यानें काम केलें. हिंदुस्तानांत असतांना तेलगू व हिंदुस्तानी यांत प्राविण्य मिळवून मराठी व तामीळ यांचेंहि भाषाज्ञान त्यानें करून घेतलें. तामीळ व मराठी या भाषा त्याला स्वतःला बोलतां येत नसत; पण या भाषांतून बोलणाऱ्यांचा आशय त्याला समजत असे.

---

१७ *Ibid.* p. 63.
१८ *Ibid.* p. 61.
१९ *Ibid.* p. 78.
२० *Ibid.* p. 107.

डंकननें मराठी भाषेचें ज्ञान तंजावर येथें मिळविलें होतें, असें दिसतें. कारण तेथें कांहीं काळ तो कलेक्टर होता. इंग्लंडमध्यें हेलिबरी कॉलेज स्थापन होण्यापूर्वी तो येथें आला होता. येथें आल्यानंतर कोर्टांतील कामकाज चालवितांना व निरनिराळ्या प्रसंगानें लोकांशीं भाषाव्यवहार करण्याची त्याला आवश्यकता वाटली व त्यामुळेंच तो या भाषा शिकला. या भाषांचा अभ्यास लोकांशीं संबंध आल्यानें कसा वाढला, हें सांगतांना तो म्हणतो,

"I have received the honorary reward for proficiency both in Hindostance and Telinga language, of which I have published a grammar and a dictionary, purchased by the government for 3000 l. I comprehend the Tamul, the Canarese and the Mahratta, sufficiently to understand what is said in common conversation on business, but I cannot speak those tongues. As Collector and Magistrate in Bellary and principal Collector and Magistrate at Tanjore, I had to maintain the most intimate daily intercourse with all classes of the native; and in my situation as judge of circuit and appeal, I had also occasion to use the native languages daily in the Court." (२१)

येथील भाषांचें संपूर्ण ज्ञान होण्यासाठीं लोकांबरोबर मिसळून त्यांच्याशीं भाषाव्यवहार केला पाहिजे, ही महत्त्वाची गोष्ट डंकननें आपल्या साक्षींत सांगितली आहे. भाषाविषयांत डंकनला जें प्राविण्य मिळवितां आलें त्याचें कारण हेंच असावें. हेलिबरी कॉलेजांतून जे विद्यार्थी येथें येत, ते एतद्देशीय लोकांत मिसळत नसल्यामुळें व त्यांच्याशीं संभाषण करण्यास उत्सुकता दाखवीत नसल्यानें, ते भाषाविषयांत कचे राहात. यामुळें हेलिबरी कॉलेजच्या अभ्यासक्रमावर ठपका आला. वास्तविक हा दोष त्या कॉलेजचा नसून युरोपियन लोकांच्या वागण्याचाच होता. हेलिबरी कॉलेजांतून जे लोक येथें येत ते दोषैक दृष्टीनें व कलुषित पूर्वग्रहानें येथील लोकांकडे पहात. यामुळें ते येथील लोकांत मिसळत नसत. ही जी युरोपियन लोकांची हिंदुस्तानांतील लोकांशीं वागण्याची प्रवृत्ति होती त्याबद्दल एकदां एल्फिन्स्टननें लॉर्डांच्या सभेपुढें मत प्रकट केलें होतें व त्याचा उल्लेखहि सुलिव्हननें आपल्या साक्षींत केला होता. (२२)

हेलिबरी कॉलेजच्या या चौकशींत अशा अनेक गोष्टी उघडकीस आल्या. येथील भाषाविषयांत युरोपियन लोक कचे राहतात हा मोठाच आक्षेप होता. हे विषय

२१ *Ibid.* p. 173.
२२ *Ibid.* p. 64.

कचे राहण्याचें एक कारण वर देण्यांत आलेंच आहे. दुसरें म्हणजे हे विद्यार्थी भाषेचें ज्ञान अर्धवट घेतात त्यामुळेंच त्यांना या भाषांचा उपयोग करतां येत नाहीं, अशीहि टीका त्यांच्यावर करण्यांत आली होती. त्याचप्रमाणें उत्तम कार्यक्षम अधिकारी तयार करावयाचे असल्यास राजकीय इतिहास, शास्त्र व गणित असे इतर विषय येथें शिकविले जावेत, असेंहि एक मत येथें मांडण्यांत आलें. एकंदरींत अभ्यासक्रम, विषय यांवर ज्याप्रमाणें टीका करण्यांत आली, त्याचप्रमाणें या कॉलेजच्या खर्चावर आक्षेप घेण्यांत आले.

अशा रीतीनें हें कॉलेज कसेंबसें १८५८ पर्यंत चाललें, तरी भाषाभ्यासासाठीं म्हणून या कॉलेजचें जें महत्त्व होतें, तें पुढें राहिलें नाहीं. इंग्लंडमध्यें राहण्याचे व अभ्यास करण्याचे कांहीं नियमसुद्धां ढील करण्यांत आले. याविषयीं पीटर ऑबर म्हणतो,

"The wants that called for the remedy having been supplied, the Act expired, and the exclusive system of passing through the college was reverted to; but to render it more palatable, and to give the service of India all the benefit of general education elsewhere, it was declared sufficient for a party to have resided either one or two terms, instead of four provided he passed the final examination." (२३)

एकंदरींत मुंबई इलाख्यांत जे युरोपियन अधिकारी येत, त्यांना तरी या कॉलेजचा फारसा उपयोग झाला नाहीं.

---

२३ Peter Auber. *Rise and Progress of the British Power in India.* (1837). *Vol. I.* pp. XXXI and XXXII.

## भाषाविषयक कॉलेज स्थापण्याचा एल्फिन्स्टनचा प्रयत्न.

हिंदुस्तानांत इंग्रजांची सत्ता प्रथम बंगालमध्यें स्थापन झाल्यानंतर त्या प्रांतांत राज्यकारभार करणारे अधिकारी देशी भाषा शिकले तर त्यांचा अधिक उपयोग होतो हें प्रथम लॉर्ड कॉर्नवॉलिसच्या ध्यानांत आलें होतें असें दिसतें. मद्रासमध्यें कॅप्टन रीड व इतर नऊ अधिकाऱ्यांना मुल्की खात्यांत नेमतांना त्यांस भाषाभ्यासाचा किती फायदा झाला, हें आपणांस पुढील उताऱ्यावरून दिसून येईल:—

"The civil servants at Madras, not possessing the requisite qualifications, Lord Cornwallis appointed Captain Read, with nine military assistants, to the revenue service, all of whom were well acquainted with the native languages, habits and manners of the people. Their zeal and ability, secured success to their labours. They applied themselves to acquire a knowledge of the native usages, as the only ground upon which they could rightly proceed in framing and settling a revenue system for the country." (१)

भाषाभ्यासाचें महत्त्व पटल्यानेंच लॉर्ड वेलस्लीनें कलकत्ता येथें फोर्ट विल्यम कॉलेज स्थापन केलें. १८०६ मध्यें हेलिबरी येथेंहि एक कॉलेज स्थापन झालें. मद्रासमध्येंहि याच सुमारास कॉलेज ऑफ सेंट फोर्ट जॉर्ज नांवाचें कॉलेज स्थापन झालें होतें. त्यांतहि निरनिराळ्या भाषा युरोपियन लोकांना शिकविल्या जाऊं लागल्या. एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीला इंग्रजांनीं जे प्रांत जिंकले होते, त्या प्रांतांची व्यवस्था करून इंग्रज अधिकाऱ्यांना देशी भाषेचें ज्ञान होण्यासाठीं ठिकठिकाणीं कॉलेजें उघडण्यांत आलीं होतीं. या शिक्षणविषयक घडामोडींचें वर्णन आपणांस पुढील उताऱ्यांत पहावयास मिळतें:—

"At the dawn of the present century the Government of India supported by the Court of Directors of the East India Company warmly espoused the necessity of their officers cultivating the acquaintance with Eastern literature and the knowledge of the local tongues." (२)

१ Peter Auber. *Rise and Progress of the British Power in India.* *(1837) Vol. II.* p. 421.

२ *The Monthly Miscellany of Western India. Vol. I. No. 7. Oct. 1850.* pp. 329-330.

अर्थात् कलकत्ता व मद्रास येथें अशी व्यवस्था एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीस झाली, याचें कारण त्यापूर्वी बरींच वर्षे हे प्रांत इंग्रजांच्या ताब्यांत आले होते. या काळांत मुंबई बेट हेंच काय तें इंग्रजांच्या ताब्यांत असून तेथें इंग्रजांची वखार होती, पण अद्यापि मुंबईला यावें तसें राजकीयदृष्ट्या महत्त्व आलें नव्हतें. मात्र १८१८ मध्यें पेशव्यांचें राज्य इंग्रजांनीं घेतल्यावर त्या मुलखाची व्यवस्था करण्याचें काम गव्हर्नर या नात्यानें एल्फिन्स्टनकडे आलें.

या नव्या मुलखाची व्यवस्था करण्याकरतां जे अधिकारी नेमावयाचे त्यांना आपल्या कामांत यश मिळवायचें असल्यास एतद्देशियांच्या आचारविचारांशीं विरोधी वर्तन त्यांनीं करतां कामा नये, असें एल्फिन्स्टनचें मत होतें. (३) यासाठीं त्यांनीं एतद्देशियांचे आचारविचार समजावून घ्यावेत तरच महाराष्ट्रांतील लोकांना त्यांच्या-बद्दल आपलेपणा उत्पन्न होईल व हे अधिकारी मराठी भाषा जाणणारे असतील तर राज्यकारभार सुकर होईल असें एल्फिन्स्टनचें धोरण असून तो स्वतः या धोरणानुसार वागत होता. यासंबंधीं त्याचा चरित्रलेखक लिहितो,

"In accordance with these principles, Elphinstone always advocated the importance of maintaining free intercourse with natives, on the terms of old Maratha simplicity; and he enforced the lesson by his own example." (४)

या धोरणानुसार चालणारा अधिकारीवर्ग त्यांला पाहिजे होता. तसेंच या अधि-काऱ्यानीं राज्यकारभार योग्य तऱ्हेनें चालवावा यासाठीं त्यांनीं काय शिकावें व त्यांचीं कर्तव्यें काय असावींत यासंबंधीं त्याचें मत पुढीलप्रमाणें होतें:–

"A practical knowledge of the languages, pure intentions, clear understanding and active habits of body and mind, were indispensable to make the ryots sensible of the vigilance and care of a collector under such as a system."(५)

याप्रमाणें वागल्यानुळेंच पुढें सिव्हिल सर्व्हंटना मुंबई प्रांतातील भाषाचा

३ George W. Forrest. *Selections from the Minutes, and other official writings of the Honourable Mountstuart Elphinstone.* p. 57.

४ J. S. Cotton. (Edited by–W. W. Hunter). *Rulers of India–Mountstuart Elphinstone and the Making of the South Western India.* pp. 190–191.

५ Peter Auber. *Rise and Progress of the British Power in India. Vol. II.* p. 425.

अभ्यास करावा लागला. याविषयीं माडगांवकर यांनीं 'मुंबईचें वर्णन' या पुस्तकांत पुढीलप्रमाणें लिहिलें आहे :—

"सनदी कामगारांस मराठी, उर्दू, गुजराती, कानडी, तुळवी किंवा कोणतीही मुलखी भाषा शिकल्याशिवाय कलेक्टरचें किंवा मोठ्या हुद्यांचें काम मिळत नाहीं आणि राजनीतीही हीच आहे कीं, ज्या लोकांवर अंमल करावा त्यांची भाषा त्या कामगारांस आली पाहिजे. म्हणजे त्याकडून बहुधा व्यवस्था नीट राहते." (६)

युरोपियन अधिकाऱ्यांनीं कोणत्या भाषेचा अभ्यास करावा, हें एल्फिन्स्टननें मुंबई प्रांताच्या मर्यादा पाहून ठरविलें. या सर्व प्रदेशाची भाषा मराठी असल्यामुळें अंत राज्यकारभार करणारे लोक मराठी भाषा शिकलेले असणें अवश्य होतें. मराठी भाषेची व देशाची हद्द एल्फिन्स्टननें गोवा ते वर्धा व कृष्णानदीपासून सातपुडा पर्वतापर्यंत ठरविली.(७) या अवाढव्य प्रदेशाची व्यवस्था करण्यासाठीं वसुली, न्याय, पोलिस व इतर खात्यांत जबाबदारीच्या जागेवर युरोपियन लोक असावेत असें त्याचें मत होतें.(८) त्यांना लोकांशीं भाषाव्यवहार सुलभ होऊन राज्यकारभार चांगल्या तऱ्हेनें चालावा या हेतूनें या सिव्हिल सर्व्हंटसाठीं मुंबईस एक कॉलेज काढण्याची योजना त्यानें तयार केली.(९) या कॉलेजच्या योजनेचा उल्लेख त्याच्या चरित्रांत पुढीलप्रमाणें आढळतो,

"One of his most cherished projects was to found a college at Bombay for young civilians, on a more modest scale than Wellesley's, Fort William College, but with a special department for the training of native officials." (१०)

एल्फिन्स्टननें युरोपियन सिव्हिल सर्व्हंटांसाठीं मुंबई कॉलेजची तयार केलेली योजना पहाण्यापूर्वीं मद्रास येथील फोर्ट सेंट जॉर्ज या कॉलेजांतील मराठी भाषाभ्यासाची माहिती घ्यावी लागेल. कारण मुंबईस हें कॉलेज काढण्याची योजना आंखण्यापूर्वीं मद्रास येथीच कॉलेजांत मराठी भाषा शिकून कांहीं युरोपियन अधिकारी तयार झाले होते असें आढळून येतें.

६ गोविंद नारायण. मुंबईचें वर्णन. १८६३ पृ. १०३.

७ George W. Forrest. *Selections from the Minutes and Other Official Writings of the Honourable Mountstuart Elphinstone.* p. 261.

८ *Ibid.* p. 318.

९ *Ibid.* p. 112.

१० J. S. Cotton. *Rulers of India. Mountstuart Elphinstone and the Making of the South Western India.* p. 193.

फोर्ट सेंट जॉर्ज या कॉलेजच्या इ. स. १८१५ च्या परीक्षेच्या रिपोर्टांत मराठी भाषेत दोन विद्यार्थी पास झाल्याचें नमूद करण्यांत आलें आहे. हे दोन विद्यार्थी म्हणजे मि. एच्. व्हिवेश व मि. एन्. एस्. कॅमेरॉन हे होत. (११) या नांवापुढे त्यांनी मराठी भाषेत प्राविण्य मिळविल्याचाहि उल्लेख करण्यांत आला आहे. तसेंच मराठी भाषेत पास होणारा पहिला विद्यार्थी म्हणून व्हिवेश याचा निर्देश करण्यांत आला आहे. (१२)

व्हिवेशसंबंधीं लिहितांना या कॉलेजच्या रिपोर्टांत मराठी भाषेच्या उपयुक्ततेसंबंधीं विचार व्यक्त झाले आहेत ते चिंतनीय आहेत. मद्रास इलाख्यांत कांहीं भागांतील सरकारी कामकाज मराठींतून चालत असे ही गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. या रिपोर्टांत या संबंधांत म्हटलें आहे तें असें :—

"...of the utility of this language, we deemed it sufficient to state, that in many of the collectorates under this Presidency it is the common medium of communication with the native servants in the revenue department ; and the language in which the accounts of the principal cutcherries are kept." (१३)

मराठी भाषेचें व्हिवेशचें ज्ञान, दोन्ही भाषेंत भाषांतर करण्याचें त्याचें कौशल्य व संभाषण करण्यांत त्यानें मिळविलेलें यश या सान्या गोष्टी या रिपोर्टांत दिल्या आहेत व त्याबद्दल पुढील शब्दांत समाधान व्यक्त केलें आहे :—

"We had great satisfaction in presenting Mr. Vivesh to the particular notice of the Right Honourable the Governor in Council, as the first student at the College who had attempted and made a most laudable proficiency in the study of the Mahratta language : ...Notwithstanding the want of elementary works, and other serious difficulties with which he has to contend, Mr. Vivesh, we observed, had acquired a knowledge of Mahratta little inferior to that which he possessed of the Tamil. He translated correctly both from

११ *Asiatic Journal and Monthly Register. Vol. III* 1817. p. 286.

१२ *Asiatic Journal and Monthly Register. Vol. II* 1816. p. 218.

१३ *Asiatic Journal and Monthly Register. Vol. III* 1817. p. 287.

and into this language, he read and explained official papers with facility, and conversed with great fluency." (१४)

मराठी मार्फत व्हिवेश यानें हें प्राविण्य मिळविल्याबद्दल गव्हर्नरनें एक हजार पॅगोडाचें जें बक्षीस ठेविलें होतें तें त्यांस देण्यांत यावें, अशी या रिपोर्टांत शिफारसहि करण्यांत आली आहे. (१५)

व्हिवेशप्रमाणेंच त्याच वर्षी कॅमेरान यानें तामीळ आणि मराठी या भाषांत जी प्रगति केली त्याबद्दल या रिपोर्टांत म्हटलें आहे तें असें :–

"Mr. Cameron and Mr. Meson had improved their knowledge of Tamil, and we had pleasure in observing that Mr. Cameron had made some progress in Mahratta also." (१६)

इ. स. १८१५ मध्यें हे दोन विद्यार्थी उत्तीर्ण झाले. (१७) त्याचप्रमाणें इ. स. १८१९ च्या परीक्षेंतहि मराठी मार्फत एलियट व थॉम्सन या नांवांचे दोन विद्यार्थी पास झाले. या दोघांबद्दल रिपोर्टांत पुढीलप्रमाणें शेरा आहे :–

"In Tamil, Mr. Elliott is next to Robertson, and his acquirements in Mahratta are highly respectable. ....Mr. Thomson has acquired a sufficient knowledge both in Hindoostanee and Mahratta to qualify him for the transaction of business in these two languages." (१८)

या नंतर या कॉलेजांतून सन १८२६ मध्यें एच. व्ही. कॉनोली हा विद्यार्थी मराठीच्या परीक्षेंत पास झाला. कॉनोलीच्या मराठी भाषाभ्यासाबद्दल रिपोर्टांत चांगलाच अभिप्राय व्यक्त करण्यांत आला आहे तो असा :–

"In Mahratta, Mr. Conolly has attained a very high degree of proficiency : He is well acquainted with the idiom of the language, and with the principles of its construction, and possesses a very extensive knowledge of words, which

१४ *Ibid.* p. 287.

१५ *Ibid.* p. 290.

१६ *Ibid.* p. 288.

१७ *Asiatic Journal and Monthly Register.* Vol. IX. 1820 p. 161.

१८ *Ibid.* pp. 161 and 162.

he used with readiness, and applies with judgment and discrimination. Mr. Conolly's translation of a difficult Mahratta paper was remarkable for its fidelity; the meaning, not only of every sentence, but of every word of the original, with one single exception, being fully expressed. Mr. Conolly was equally successful in translating from English into Mahratta. In conversation he expresses himself with correctness and propriety, and with a good pronunciation. He is also acquainted with the style of familiar and official letters." (१९)

कॉनोलीच्या या मराठी व हिंदुस्थानी भाषांतील प्राविण्याबद्दल त्याला १५०० रुपयांचें बक्षीस मिळावें अशीहि शिफारस या रिपोर्टांत करण्यांत आली आहे. (२०) यावरून युरोपियन लोकांना मराठी भाषेचा अभ्यास करण्यास उत्तेजन कसें मिळे हें दिसून येईल. अशा रीतीनें या भाषांच्या अभ्यासाला अधिक महत्त्व आलें.

मद्रास येथील कॉलेजमधून मराठी भाषेचा अभ्यास केलेले हे युरोपियन अधिकारी फारच थोडे होते असें दिसतें. याचें कारण मद्रास येथील कांहीं भागांत सरकारी कचेऱ्यांत मराठी भाषा चालू होती. पुढें मराठी राज्याचा सर्व कारभार इंग्रजांच्याकडे येऊन विस्तार वाढल्यानें मराठी भाषेचा अभ्यास केलेल्या अधिकाऱ्यांची एल्फिन्स्टनला गरज वाटूं लागली व त्यानें भाषाविषयक शिक्षण देणारें स्वतंत्र कॉलेज मुंबईस काढण्याचें ठरविलें.

यासाठीं एल्फिन्स्टननें फ्रॅन्सिस वॉर्डन, आर. एल्. गुडविन, मेजर व्हॅन्स केनेडी व जेम्स टेलर या चौघांची एक कमिटी नेमली व मद्रास कॉलेजच्या नियमांत बदल करून मुंबई इलाख्यास अनुसरून कोणते नियम करावेत, हें सुचविण्यास सांगितलें. या पत्रांत कॉलेजच्या अभ्यासक्रमांत कोणते ठळक फरक करावे त्यातील यासंबंधी एल्फिन्स्टननें आपले विचार मांडले आहेत. या कॉलेजांतील भाषाविषयक अभ्यासक्रमांत हिंदुस्तानी ही भाषा आवश्यक असें समजून तिचा सर्वांकडून अभ्यास केला गेला पाहिजे. तसेंच हिंदुस्तानी खालोखाल मराठी व गुजराती या भाषांना महत्त्व दिलें पाहिजे; सारांश, हिंदुस्तानी व मराठी किंवा गुजराती यांपैकीं एक भाषा अशा दोन भाषा तरी शिक्षित सर्वांना आल्या पाहिजेत व या तत्त्वावर कॉलेजची उभारणी झाली

१९ *Asiatic Journal and Monthly Register.* Vol. XXIII. 1827. p. 71.

२० *Ibid.* p. 71.

पाहिजे असें एल्फिन्स्टननें आपल्या पत्रांत म्हटलें आहे. (२१) या भाषांची आवश्यकता व महत्त्व पटवून देतांना एल्फिन्स्टन आपल्या पत्रांत लिहितो,

"On the other hand Hindustani is not enough to enable a man to understand the correspondence or what is of more importance, to converse with the Ryots of every part of the country : for these purposes Guzerattee or Mahratta are required, and the study of one of them in addition to Hindustani might either be made indispensable for promotion, or if that be thought to be imposing too great a burden on the students, they might be encouraged by additional allowances, or honorary rewards " (२२)

मराठी भाषेची आवश्यकता पटवून देऊन, ही भाषा शिकण्यासाठीं एल्फिन्स्टननें युरोपियन अधिकाऱ्यांना बक्षिसाचें प्रलोभनहि दाखविलें होतें. त्याचप्रमाणें फारसी, अरबी व संस्कृत या भाषांचाहि विचार करून, मराठी व हिंदुस्तानी या भाषांबरोबर या भाषांचा अभ्यास केल्यास त्याना योग्य तें बक्षीस देण्यांत येईल, असें त्यानें या कमिटीला लिहिलेल्या पत्रांत म्हटलें आहे. एकंदरींत सिव्हिल सर्व्हंटच्या भाषाविषयक शिक्षणांत मराठीला विशेष प्राधान्य देऊन त्यानें कमिटीचा रिपोर्ट मागविला असें दिसून येतें.

एल्फिन्स्टननें जेव्हां ही योजना या कमिटीकडे सोंपविली तेव्हां या कमिटीनें प्रथम कॉलेज स्थापन करण्याच्या खर्चाचा प्रश्न हातीं घेतला. व कॉलेजच्या इमारतीचें भाडें, हेडमास्तर इतर शिक्षक यांचा पगार व सिव्हिल सर्व्हंटचे भत्ते मिळून किती खर्च येईल, हें त्यास कळविलें. या अंदाजपत्रकावरून कमिटीनें युरोपियन सिव्हिल सर्व्हंटच्या शिक्षणाची योजना कशी केली होती, हें दिसून येईल. हें अंदाजपत्रक खालीलप्रमाणें होतें:—

| | |
|---|---|
| " कॉलेजच्या इमारतीचें भाडें :— | ...रु. १००. |
| ४ हेडमास्तर. १५० रु. प्रमाणें | ...रु. ६००. |
| ६ हिंदुस्तानी भाषा शिकविणारे शिक्षक<br>२ मराठी भाषा शिकविणारे शिक्षक<br>२ गुजराती भाषा शिकविणारे शिक्षक | यांचा पगार ३० ते<br>...रु. ७२०. ५० व ८० रुपयांच्या<br>दरम्यान. सरासरी ६०. |

२१ *G. D.* Vol. 9/10, 1821-1822 p. 42.

२२ *Ibid.* p. 43.

या नियमान्वये युरोपियन अधिकाऱ्यानें कॉलेजमध्यें प्रवेश केल्यानंतर भाषेची निवड करुन त्याचा अभ्यास करावयाचा. जो विद्यार्थी कॉलेजमध्यें शिकविल्या जाणाऱ्या पौर्वात्य भाषेंत प्राविण्य मिळवील त्याला सन्मानाची पदवी व एक सुवर्णपदक किंवा त्या सुवर्णपदकाच्या किंमतीएवढी पुस्तकें बक्षीस देण्यांत येतील अशी बक्षिसाची योजना, फोर्ट विल्यम कॉलेजप्रमाणें याहि कॉलेजमध्यें करण्यांत आली होती.

या कमिटीनें अभ्यासक्रमाचे एकंदर चार प्रकार ठरविले होते. पहिले तीन प्रकार भाषांसंबंधीं असून चवथा हिंदु व मुसल्मानी कायद्यांचा अभ्यास करण्यासंबंधीं होता. पहिल्या तीन अभ्यासक्रमामध्यें मराठी व गुजराती या भाषा, त्यांची लिपि व त्यांचें व्याकरण युरोपियन लोकांना शिकावें लागणार होतें. त्याची माहिती पहिल्या कोर्समध्यें पुढीलप्रमाणें देण्यांत आली आहे :—

"First Course"

"This will comprize the acquisition of an acquaintance with the Persian or Arabic alphabet and the various modes in which it is written, and with the Guzerattee or Marhatta alphabets including the Balbodh in which character Guzerattee and Marhatta books are very generally written. And also the study of Grammar of these languages and of such easy works as may be recommended by the College Council."(२७)

या लोकांना बाळबोध लिपींत गुजराती व मराठी पुस्तकें वाचावीं लागणार होतीं. यावरुन त्याकाळीं मराठी व गुजराती पुस्तकें बाळबोध लिपींत सामान्यतः लिहिलीं जात व ही लिपि दोन्ही भाषांकरितां उपयोगांत आणीत होते असें दिसतें. आरंभीं मुद्रित झालेलीं सरकारी गुजराती पुस्तकें देवनागरींत आहेत. (२८) पारशांमुळें गुजराती महाजन लिपि प्रगत झाली. सध्याची गुजराती लिपि त्याकाळीं आजच्याप्रमाणें ग्रंथलिपि म्हणून प्रचारांत नव्हती असें स्पष्ट दिसतें.

या अभ्यासक्रमाचा दुसरा भाग भाषांतर व संभाषण यांत प्राविण्य मिळविणें हा होता. या भागांतील अभ्यासक्रम असा होता कीं, ज्यामुळें युरोपियन लोकांना भाषांतर करतां यावें. तसेंच भाषेचें ज्ञान एवढें व्हावें कीं, दुसऱ्याच्या मदतीशिवाय

२७ *Ibid* pp. 147–148.

२८ वर्दिसनें "विद्येचे उपेग, लाभ आणि संतोष" हें गुजराती भाषेंतील पुस्तक देवनागरी लिपींत आहे.

त्यांना बोलतां व संभाषण करतां यावें आणि राज्यकारभारविषयक पत्रव्यवहार, अर्जासंबंधीं व्यवहार इत्यादि कारभाराची माहिती नीट व्हावी.

अभ्यासक्रमाच्या तिसऱ्या भागांत युरोपियन लोकांना पौर्वात्य वाङ्मयाचा अभ्यास करावा लागणार होता. त्या भाषांचें व्याकरण, छंदःशास्त्र व अलंकार हे विषय त्यांना शिकावे लागणार होते. या विषयांचा अभ्यास त्यांनीं फारशी व अरबी त्याचप्रमाणें मराठी, गुजराती व हिंदुस्तानी या भाषांतील वाङ्मय व ग्रंथ वाचून करावयाचा होता. (२९)

या अभ्यासक्रमांत व्याकरण व भाषांतर या दोन भागांतील दोन विषय प्रत्येक विद्यार्थ्याला आवश्यक असत. मात्र अभ्यासक्रमांतील वाङ्मयविषयक अभ्यास वैकल्पिक होता. जर हा अभ्यास आवश्यक व बंधनकारक असता तर युरोपियन लोकांच्या हातून मराठी वाङ्मयाचा सखोल अभ्यास झाला असता; परंतु हा नियम आवश्यक नसल्यामुळें किती लोकांनीं मराठी वाङ्मयाचें परिशीलन केलें असेल हें सांगतां येणें कठीण आहे. अर्थात् पुढें या कॉलेजची योजना डायरेक्टरांनीं अमान्य केल्यामुळें हें कॉलेज निघालें नाहीं; पण तत्कालीन राज्यकर्त्यांना मराठी भाषा व वाङ्मय यांचा अभ्यास युरोपियन लोकांनीं करावा असें मनापासून वाटत होतें असे दिसून येतें. या तिसऱ्या भागांतील नियम पुढीलप्रमाणें होता:-

"Third Course"

"This will comprize the study of Oriental Literature in general, the student will have it in his option to direct his studies to the Grammar, Prosody, and Rhetoric, of the Sunscrit, Arabic and Persian, and to the various compositions in these languages as well as the Marhatta, Guzerattee and Hindoostanee." (३०)

या कॉलेजांत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना शिक्षणकालांत महिन्यास १७५ रुपये भत्ता मिळणार होता व कॉलेज कौन्सिलनें एखाद्या बुद्धिमान विद्यार्थ्याच्या बाबतींत जर शिफारस केली तर तो भत्ता २५० ते २५० रुपयांपर्यंत वाढविला जावयाचा होता.

या कॉलेजांत जे विद्यार्थी नांव घालतील त्यांनी शिकण्याची मुदत जास्तींत जास्त तीन वर्षे ठेवावी, त्यापुढें त्यांना शिकण्याची परवानगी असूं नये असेंहि कमिटीनें शेवटीं मांडिलेलें होतें. त्याचप्रमाणें जे विद्यार्थी आपला अभ्यासक्रम पूर्ण न करतां

२९ *G. D. Vol 9/10* 1821-1822. p 149.

३० *Ibid.* p. 149.

कॉलेजमधून निघून जातील व यामुळें ज्यांना राज्यकारभागला उपयुक्त असें भाषाज्ञान झालें नसेल त्यांना फक्त २०० रुपयांपर्यंत पगार मिळून वरिष्ठ जागेसाठीं अपात्र ठरविलें जाणार होतें. मात्र या इलाख्यांतील दोन भाषांत राज्यकारभार चालविण्याइतपत भाषांचें ज्ञान त्यांना झालें आहे अशी गव्हर्नरची खात्री पटल्यास ते वरिष्ठ जागा मिळविण्यास पात्र होणार होते.

युरोपियन लोकांसाठीं 'बॉंबे कॉलेज' स्थापन करण्याच्या एल्फिन्स्टनच्या योजनेवर वर उल्लेख केलेले वॉर्डन, गुडविन, व्हॅन्स केनेडी व डॉ. टेलर या चौघांनी विचारपूर्वक रिपोर्ट तयार करून तो ता. १३ नोव्हेंबर १८२० रोजीं गव्हर्नरला सादर केला. "बॉंबे कॉलेजच्या" योजनेचा हा मसुदा एल्फिन्स्टननें पुढें कोर्ट ऑफ डायरेक्टर्स यांजकडे पाठविला; परंतु ही योजना मंजूर करण्याच्या बाबतींत त्यांचा निर्णय लौकर होईना, यामुळें एल्फिन्स्टनला ही योजना स्थगित-करावी लागली. यासंबंधीं 'बॉंबे कॉलेज' कमिटीचे अध्यक्ष फ्रॅन्सिस वॉर्डन यांना ता. २२ फेब्रुआरी १८२१ रोजीं एल्फिन्स्टननें पत्र लिहून कॉलेजची योजना स्थगित झाल्याचें लिहिलें आहे. तें पत्र असें आहे:—

"The Governor in Council has resolved to suspend the foundation of the College until the decision of the Hon'ble the Court of Directors can be received on the subject, and has directed me to refer to you the accompanying plan submitted by Mr. Chaplin for a college at Poona, for your opinion as to the improvements of which the whole may be capable." (३१)

"बॉंबे कॉलेज" स्थापण्याचा निर्णय जर लवकर झाला असता तर मराठी भाषेचें व वाङ्मयाचें स्वरूपच बदलून गेलें असतें असें वाटतें. कारण कॉलेज स्थापण्यानें युरोपियन लोकांकडून मराठी भाषेचा व वाङ्मयाचा अनेक प्रकारांनीं अभ्यास झाला असता तो थांबला व सरकारी आणि राज्यकारभारानें काम यापुरतेंच मराठी भाषेचें ज्ञान करून घ्यावयाचें एवढेंच मराठी भाषाभ्यासाचें संकुचित स्वरूप शिल्लक राहिलें.

हें कॉलेज स्थापन करण्याची योजना पुढें कायमची बंद पडली असें दिसतें. कारण ईस्ट इंडिया कंपनीचे डायरेक्टर्स व एल्फिन्स्टन यांच्यामध्यें पुढें पत्रव्यवहार झाला असल्यास तो मिळत नाहीं; परंतु त्यानें भाषाविषयक परीक्षा घेणारी कमिटी नेमली व त्या कमिटीचें कार्य चालू झाल्यानंतर त्यांतून अनेक युरोपियन अधिकारी मराठी भाषेची परीक्षा पास झाले.

३१ *Ibid.* p. 211

# युरोपियन लोकांची मराठी भाषेची परीक्षा

एल्फिन्स्टननें मुंबईस सिव्हिल सर्व्हंटना देशी भाषा शिकविण्याचें कॉलेज काढ ण्याचा प्रयत्न केला; परंतु कंपनीच्या डायरेक्टरांनीं त्याची ती योजना अमान्य केल्या- मुळें असें कॉलेज मुंबईस निघालें नाहीं. तरी पण मुंबई इलाख्यांत मराठी भाषा जाणणारे युरोपियन अधिकारी असावेत, यासाठीं त्यांनीं मराठी व त्याबरोबर हिंदुस्तानी व गुजराती या भाषांचा अभ्यास केल्यास त्यांना वरिष्ठ जागेवर बढती देण्यांत येईल, अशा आशयाचें पत्रक त्यानें सर्व सिव्हिल सर्व्हंटना उद्देशून काढलें.[1] याप्रमाणें या दप्तरांत दुसरेंहि एक पत्रक आहे. यांत हिंदुस्तानी, मराठी व गुजराती या भाषांचा स्पष्ट उल्लेख आहे. या पत्रकातील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणें आहे :—

"In the mean time, I have to acquaint you, in order that you may regulate your studies accordingly, that the Hindoostani language will be made an indispensable qualification for official advancement in all cases—

"The Mahratta or Guzerattee are those in the next degree useful under this Establishment at the same time that the acquisition of the Persian, Sanskrit or Arabic in addition to the Hindoostani and the Guzerattee or Mahratta cannot fail of strengthening the claims of a servant to the consideration of the Government."[2]

या भाषांची परीक्षा जानेवारी, मे व सप्टेंबर या महिन्याच्या १० तारखेस वर्षांतून तीनदां होत असे. त्यावेळीं सरकारनें जी परीक्षा-कमिटी नेमली असेल, त्या कमिटीपुढें परीक्षा देणाऱ्या उमेदवाराला हजर राहावें लागत असे. ही माहिती प्रत्येक उमेदवाराला सरकारी पत्रकाद्वारें कळविण्यात येई.[3] परीक्षेच्या कार्यक्रमाचें हें पत्रक प्रसिद्ध झाल्यानंतर, मुंबईसरकारनें ता. २३ एप्रिल १८२१ रोजीं एक परीक्षा-मंडळ नेमलें. या मंडळात प्रेसिडेंट म्हणून मि. वॅरिंग्टन व समासद म्हणून मेजर व्हॅन्स केनेडी व डॉक्टर टेलर यांची नेमणूक झाली होती. ज्यूनियर सिव्हिल सर्व्हंटची परीक्षा घेणारें हें पहिलेंच मंडळ असावें, असें वाटतें.

एल्फिन्स्टननें भाषाचा अभ्यास करण्यासाठीं पत्रक काढून परीक्षामंडळहि नेमलें; परंतु भाषा शिकण्याच्या या नियमाला कायद्याचें स्वरूप दिल्याशिवाय या भाषा चांगल्या शिकल्या जाणार नाहींत, असें त्याला वाटत होतें. याविषयीं तो लिहितो,

१ G. D. Vol. 9/10, 1821-1822, p. 395 and G. D Vol. 50/55, 1823. p 94

२ G D. Vol. 50/55, 1823, pp. 93-94 and G. D. Vol. 15/73, 1824. pp 25-26.

३ हें सरकारी पत्रक G. D. Vol. 9/10, 1821, p. 361 वर छापलेलें आढळतें.

"It has occurred to me to make it obligatory on every student to pass an examination in Marathi, or in Gujarathi, as well as in *Hindustani*; and *experience has shown that*, without such a rule, these languages will not be studied."[४]

लष्करी खात्यांतील अधिकाऱ्यांची भाषाशिक्षणाची जी जुनी पद्धति होती, ती कोर्ट ऑफ डायरेक्टरांनीं बंद केली होती. ती पुन्हां सुरू करावी, अशी त्यानें कोर्ट ऑफ डायरेक्टरांना विनंती केली. या लष्करी अधिकाऱ्यांना दुभाषांची (इंटरप्रीटरची) परीक्षा देतांना मराठी व हिंदुस्तानी या दोन भाषांत पास व्हावें लागत होतें, असें दिसतें. यासंबंधीं पुढील निर्देश पाहा:—

"Officers desirous of qualifying as "Interpreters" must pass a regular examination in two vernacular languages, the only two recognized in this Army being Hindustani and Marathi."[५]

सिव्हिल सर्व्हंटना या भाषा शिकण्यासाठीं उत्साह यावा म्हणून त्यांच्यासाठीं बक्षिसें ठेवण्यात आलीं होतीं. एकाद्या रायटरनें हिंदुस्तानी, मराठी, गुजराती, संस्कृत आणि फारसी यापैकीं कोणत्याहि भाषेंत प्रावीण्य संपादन केल्यास त्यास परीक्षा मंडळाच्या सहीचें एक शिफारसपत्र व आठशें रुपयांचें बक्षीस मिळेल,[६] तसेंच या भाषाविषयांत पारंगत होऊन हिंदु व मुसलमानी कायद्याचें स्पष्टीकरण करण्यासाठीं संस्कृत व अरबी या भाषांत त्यानें प्रावीण्य मिळविल्यास त्यास तीन हजार रुपयांचें बक्षीस देण्याचें अभिवचन एल्फिन्स्टननें दिलेलें आढळतें.[७]

परीक्षामंडळाची नेमणूक व बक्षिसाची योजना एल्फिन्स्टननें जाहीर केल्यानंतर, ही परीक्षा कोणत्या प्रकारें घेण्यात यावी, हें ठरविण्यासाठीं एल्फिन्स्टननें व्हॅन्स केनेडी यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमली. या कमिटीचे एन्. वर्नाड व थॉमस मॉरिस हे दोन सभासद होते. या कमिटीनें सिव्हिल सर्व्हंटच्या परीक्षेची योजना ता. २० नोव्हेंबर १८२४ रोजीं तयार करून ती गव्हर्नरच्या मंजुरीसाठीं पाठविली. यात सिव्हिल सर्व्हंटनीं भाषेचा अभ्यास करताना भाषेकडे कोणत्या दृष्टिकोनातून पाहावें, भाषांतर कसें करावें, त्यासाठीं कोणते पाठ निवडावे व कोणत्या लिपीचा अभ्यास करावा, या सर्व गोष्टींचा चिकित्सापूर्वक विचार केला आहे.

भाषांतराच्या अभ्यासक्रमासंबंधीं कमिटीनें आपलें मत पुढीलप्रमाणें सांगितलें

४ George W. Forrest. *Selections from the Minutes and other Official Writings of the Honourable Mountstuart Elphinstone*. p. 115

५ Arthur St. John Richardson. *Hints on the Examinations in the Vernacular Languages of the Western India* p 10.

६ G D Vol. 15/73, 1824 p 147

७ *Ibid*. p 149.

आहे. हें भाषांतर देशी भाषांतून इंग्रजींत करावयाचें असून तें अपरिचित गद्य पुस्तकांतील उताऱ्यांचें करावयाचें. हिंदुस्तानी, मराठी व गुजराती या भाषांतील काव्य हें गद्यापेक्षां वेगळें नसल्यामुळें त्याचें ज्ञान मिळविलें नाहीं तरी चालण्यासारखें आहे.[८] यावरून पद्याचें कमिटीला महत्त्व वाटत नव्हतें, असें दिसतें. गद्य धडे, सरकारी अर्ज, पत्रें व सरकारी कायदेकानूंतीं कांहीं कलमें एवढ्याचेंच भाषांतर करावें, ही कमिटीची मुख्य सूचना होती. याशिवाय इंग्रजींतून मराठींत एखाद्या संभाषणाचें भाषांतर करावयाचें असाहि भाषांतराचा एक भाग कमिटीनें ठेवला होता. या अभ्यासक्रमांत व्याकरणाचाहि एक भाग होता. व्याकरणाविषयीं नियमांचें ज्ञान विद्यार्थ्याला असलें पाहिजे आणि जो उतारा देण्यांत येईल त्याचें व्याकरण त्यांना बरोबर करतां आलें पाहिजे, असा नियम ठेवल्यानेंच मराठी भाषेचीं पहिलीं व्याकरणें युरोपियन लोकांनीं लिहिलीं असें दिसतें. व्याकरणानंतर लिपीसंबंधीं विचार करण्यांत आला आहे. फारशी अक्षरांचा व बाळबोध, मोडी व गुजराती अक्षरांचा व वर्णमालेचा परिचय पाहिजे. मोडी लिपीचा सर्व व्यवहारांत उपयोग होतो म्हणून ती आवश्यक आहे. यासंबंधीं कमिटीनें पुढील प्रमाणें मत व्यक्त केलें आहे :–

"A knowledge of the grammatical rules and principles of the native languages to be shewn by parsing quickly and correctly any passage which may be pointed out, or by answering at once any questions on the subject that may be proposed by the Examiners

"A conversancy with the Persian, and with the Balbodh, and common Maratha and Guzratı characters The latter is most requisite to be known as being always employed in business."[९]

एल्फिन्स्टनने देशी भाषांची परीक्षा घेण्याचा उपक्रम सुरू केल्यानंतर कित्येक युरोपियन लोक देशी भाषांची परीक्षा देऊ लागले. या सर्वांची माहिती आपणाला परीक्षेच्या रिपोर्टांवरून मिळते. हे युरोपियन लोक देशी भाषेची परीक्षा पास झाल्याचें या रिपोर्टांत नमूद करण्यांत आलें आहे;[१०] परन्तु ही देशी भाषा मराठी की काय, त्याचा स्पष्ट उल्लेख या रिपोर्टांत नाहीं. मात्र या लोकांपैकीं रॉबर्ट कॉटन मनी हा मराठी भाषेतील परीक्षाहि उत्तम तऱ्हेनें पास झाला होता. यासंबंधी ता. १३ ऑक्टोबर १८२१ च्या रिपोर्टांत परीक्षा मंडळाचे सेक्रेटरी वॉरिंग यांनें पुढील शेरा दिला आहे :

"The qualifications of Mr Money in the Maratha language

८ Ibid. p 178

९ Ibid p 180.

१० पुढील रिपोर्ट पहा.

G D Vol 9/10, 1821 p. 435. and *G D.* Vol. 50/55, 1823. pp. 29 and 85.

were found to be of an extent which entitles him, as prescribed by the Regulations to "Promotion to the second step in any line."[11]

मराठी भाषेत पास होऊन त्यांत प्रावीण्य मिळविल्याचे रिपोर्ट परीक्षामंडळाकडून मुंबई सरकारचे सेक्रेटरी यांकडे पाठविण्यांत येत. ता. २० ऑक्टोबर १८२५ रोजीं एन्. एम्. मॅथ्यू, व्हॅन्स केनेडी व मोल्सवर्थ या तिघांच्या परीक्षामंडळानें टाऊनशेंड व विल्किन्सन् या दोघांच्या परीक्षेबद्दल पुढीलप्रमाणें रिपोर्ट पाठविला आहे :

"We have this day examined Messrs. Townshend and Wilkinson in the Maratha language; and that both these gentlemen have displayed a proficiency in this language which is very creditable to them and which sufficiently qualifies them for the transactions of public business."[12]

यानंतरच्या एका पत्रांत हॅरिस व मि. माल्कम या दोघांची डब्ल्यू. डी. कॅप्टन व व्हॅन्स केनेडी यांच्या परीक्षामंडळानें मराठी भाषेची परीक्षा घेऊन त्यांत या दोघांनीं मराठींत प्रावीण्य संपादन केल्यानें ते वरिष्ठ जागेस पात्र असल्याचा उल्लेख आढळतो.[13] तसेंच मि. डब्ल्यू. डब्ल्यू. मॅलेट याची मराठीची परीक्षा कॅप्टन रॉबर्टसन, मि. प्रिंगल व कॅप्टन हॅमिल्टन यानीं घेऊन ता. १६ मार्च १८२६ रोजीं रिपोर्ट केला. तो असा—

" ...In conformity with your instructions, we this day examined Mr W. W. Malet of the Civil Service in his knowledge of the Mahratta language, according to the rules laid down by the committee of the Presidency, and that we consider him to have attained a proficiency fully qualifying him for the transactions of public business."[14]

यानंतर जमाबंदी खात्याखेरीज न्यायखात्यांत सुद्धां दोन भाषांत पास झालेल्या लोकांना वरिष्ठ जागेला लायक मानण्यात येईल असा ठराव १ फेब्रुवारी १८२६ पासून लागू करण्यांत आला.[15] न्यायखात्याश्ीं हा नियम लागू केल्यानंतर पुण्याच्या न्यायालयांतील ॲक्टिंग रजिस्ट्रार रिचर्डसन् यानें परीक्षा घेण्याबद्दल अर्ज केला[16] व त्याची मराठी भाषेची परीक्षा घेण्यात येऊन त्यात त्याला प्रावीण्य मिळाल्यामुळें, सरकारी कामकाज करण्यास त्यास पात्र ठरविण्यात आलें.[17]

अहमदनगर येथील कलेक्टरनें आपल्या ऑफिसमधील दोन असिस्टंट मि. लेटन व स्टीफन्स या दोघांच्या मराठी भाषेच्या परीक्षेसाठीं कमिटी नेमण्यांत यावी, असें मुंबई

११ G. D Vol. 10/143, 1827, pp 459–460.
१२ G. D Vol. 14/93, 1825 pp 451-452.
१३ G D. Vol. 14/122, 1826, p. 23.
१४ Ibid. p 55.
१५ Ibid p. 73
१६ Ibid. p. 161.
१७ Ibid. p. 169.

सरकारला कळविलें.[१८] त्याप्रमाणें मुंबई सरकारनें जॉन अॅन्ड्रयू डनलॉप, कलेक्टर, लेफ्टनंट वार्लो व लेफ्टनंट लॉग या तिघांचें एक परीक्षामंडळ नेमलें.[१९] या परीक्षामंडळानें या दोघांची परीक्षा घेऊन सरकारला एक रिपोर्ट पाठविला. यावरून ही परीक्षा कोणत्या पद्धतीनें घेत असत हें कळून येतें. या रिपोर्टांतील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणें आहे :—

"A story from the Hindee Story Teller was given to each of the gentlemen examined to translate and write out in Marathas, in the Moor character, without books or assistance of any kind each of them were afterwards called in singly and required to translate (viva voce) a dialogue from the 11th page of the Persian Moonshee, to hold a conversation in Marathas with a Carcoon, and to read each a Maratha story, a Letter, and Petition provided for the purpose, in different hands, and written in Moor character, none of which they had ever seen before. Clauses were then selected, from the Judicial, and from the Revenue Regulations for each gentleman respectively, to translate into Marathas, in the same manner as first, which have been since copied fair (but without alteration) and are enclosed for the inspection of Government."[२०]

यापुढील एका रिपोर्टांत ता. १३ ऑक्टोबर १८२७ च्या परीक्षेंत एक सिव्हिल सर्व्हंट मि. पी. स्कॉट यानें मराठी भाषेची परीक्षा देऊन त्यांत प्रावीण्य संपादल्याचा उल्लेख आहे.[२१] स्कॉटनें कलकत्त्यास जाऊन तेथें संस्कृत भाषेचा अभ्यास केल्याचें एका अर्जांत त्यानें नमूद केलें आहे.[२२] एकंदरीत पी. स्कॉट हा संस्कृत भाषेचा अभ्यास करणारा असा एकच युरोपियन यांत आढळून येतो. याच्याप्रमाणें रेव्हन्स्क्रॉफ्ट यानी मराठी भाषेची परीक्षा धारवाडचे कलेक्टर जे. निस्बेट व हेन्री वन या दोघांनीं घेऊन त्याच्यासंबंधींचा रिपोर्ट चिफ्रिन्स्न याला पाठविला आहे.[२३] या रिपोर्टांत रेव्हन्स्क्रॉफ्टबद्दल परीक्षामंडळानें पुढीलप्रमाणें लिहिलें आहे :

"Mr Ravenscroft was examined first in the printed "Balbord" which was read and translated with facility, some mistakes however occurring

"Mr Ravenscroft was next required to read a Mahratta Urzee written in the Moree character of the district which he also translated and was in general correct

१८ Ibid p 131
१९ Ibid pp 147 148
२० Ibid pp 148 149
२१ G D Vol 15/1[illegible] 1827 p 29
२२ G D Vol 11/20[illegible] 18[illegible] p 197
२३ G D Vol 10/187, 1830 p 413.

"Mr. Ravenscroft was next required to enter into a short conversation with a Native, in which he appeared to make himself understood, but did not profess any fluency.

"A few sentences, and the abstract of a Decree in English, were then given to Mr. Ravenscroft to put into Mahrattas—seven out of nine sentences were translated with correctness.

"Mr. Ravenscroft wrote his translation in the "Moree" character fluently."[24]

रेव्हन्स्क्रॉफ्टची वरीलप्रमाणें, भाषांतर, वाचन व संभाषण या पद्धतीनें परीक्षा घेऊन मराठी भाषेंत त्यानें प्रावीण्य मिळविल्याचें मत परीक्षामंडळानें व्यक्त केलें.

याशिवाय ता. १३ ऑक्टोबर १८२८ च्या रिपोर्टांत मि. विल्यम वॉर्डन वेल यानें मराठी भाषेची परीक्षा, ट्रव्हेन्स डब्ल्यू वेली, एन्. जी. थोरेल व जॉर्ज डेव्हिस या तिघांच्या परीक्षा कमिटीपुढें दिल्याचा व मराठी भाषेंत प्रावीण्य मिळविल्याचा उल्लेख आढळतो.[25] तसेंच मि. लुअर्ड या सिव्हिल सर्व्हंटची मराठीची परीक्षा जॉन डन्लॉप, प्रिंगल व पी. स्कॉट या तिघांच्या परीक्षामंडळानें घेऊन त्याला Degree of *Proficiency* मिळाल्याचें जाहीर केलेलें एक पत्र उपलब्ध आहे.[26] मि. ए. शॉ हाहि एक युरोपियन मराठींत पास झाल्याचें पत्र एल्. एन्. रेड, आर्. बॅट व जी. एस्. इलियट या तिघांच्या परीक्षामंडळानें रत्नागिरीहून चार्लस नॉरिस याला पाठविल्याचें आढळून येतें.[27] याप्रमाणें डब्ल्यू. बर्नार्ड, जॉन ए. डन्लॉप व व्हॅन्स केनेडी या तिघांच्या परीक्षामंडळाचें मि. डब्ल्यू. एस्कोंच यानें मराठी भाषेंत प्रावीण्य मिळविल्याचें नमूद केलेलें एक पत्र उपलब्ध आहे.[28]

यापुढें परीक्षामंडळाचा सेक्रेटरी जॉर्ज डेव्हिस याची पुण्यास नेमणूक झाल्यानें त्या रिकाम्या झालेल्या जागेवर रॉबर्ट मर्नी यास नेमण्यात येऊन वॉयेन, वेब व रॉबर्ट मर्नी या तिघांचें परीक्षामंडळ तयार करण्यांत आलें.[29] याप्रमाणें कांहीं युरोपियन सिव्हिल सर्व्हंटनीं आपली मराठीची परीक्षा घेण्यासाठीं परीक्षामंडळ नेमण्यांत यावें, अशीं लिहिलेलीं पत्रेंहि आढळून येतात. यात मि. माल्कम, मि. टाड्क, धारवाडच्या प्रिन्सिपल कलेक्टरचा असिस्टंट जॉर्ज माल्कम व जे. एल्. लॉ यांचीं पत्रें आहेत.[30] मि. डाड्क याची परीक्षा जे. निस्बेट, एन. कॉरेथॉल व पेंग्विन या तिघांच्या परीक्षामंडळानें घेतल्याचें दिसून येतें.[31] या परीक्षेचा रिपोर्ट उपलब्ध असून डाड्क याला

२४ *Ibid.* p 415
२५ G D Vol 15/168, 1828 p. 77
२६ G D Vol. 10/187, 1829 p. 357.
२७ *Ibid.* p 405
२८ *Ibid* p 429
२९ G. D. Vol. 11/203, 1830 p 161.
३० *Ibid.* pp. 205, 208, 226 and 222
३१ *Ibid.* p. 210

वाचण्यासाठीं व भाषांतरासाठीं इसापच्या गोष्टींचें पुस्तक देण्यात आलें होतें, एखदी एक नवीन गोष्ट आढळून येते. बाकी इतर परीक्षा नेहमींच्या पद्धतीनें घेतलेली आहे. हा रिपोर्ट असा :

"Mr. Dyke was examined first in Mahratta version of Aesop's Fables[32] which he read and translated with general correctness.

"A deposition in the Moree character was then given to Mr. Dyke which he read and translated quite satisfactorily.

"He then held a short conversation with a native of the country and expressed himself with correctness.

"He was next given to translate into Marathee, a portion of the Regulations (clause 1 sec. XII of Reg. XII of 1827) which he did with considerable accuracy.

"Out of a paper of questions and answers, in English he translated 4, and these with sufficient correctness."[33]

यापुढील परीक्षामंडळात मोल्सवर्थचें नांव असून त्याचें नांव परीक्षामंडळांत प्रथमच पुढें केलें आहे असें दिसतें. मोल्सवर्थसंबंधीं परीक्षामंडळाचा सेक्रेटरी रॉबर्टसनी पुढीलप्रमाणें लिहितो:—

"I can say that the presence of a person so intimately acquainted with oriental languages as Captain Molesworth and so peculiarly fitted for an examiner would be of most essential service in assisting to execute that duty efficiently."[34]

मोल्सवर्थची परीक्षामंडळांत नेमणूक झाल्यानंतर या मंडळानें आर्. एम्. लॉ व जी. मारक्रम या दोघांची मराठी भाषेची परीक्षा घेतली, तिचा रिपोर्ट उपलब्ध आहे. रिपोर्टांत लॉ यानें "पांडवप्रताप" हा ग्रंथ वाचल्याचा मंडळानें उल्लेख करून त्याबद्दल त्याला बक्षीस देण्यांत यावें, अशी शिफारस केली आहे. यांतील महत्त्वाचा भाग पहा:—

"Mr Low's examination throughout evinced considerable proficiency. Several difficult papers were readily persued and translated, the written translation was idiomatic and good..... We should indeed be wanting in justice to that gentleman if we did not mention in the higher terms his very great progress towards an almost perfect knowledge of this language He read several passages from the Pandav-Pratap a work of

३२ हें पुस्तक सदाशिव काशिनाथ छत्रे यांनी १८२८ मध्यें मराठीत भाषांतर केलें होतें असावें. या भाषांतराबद्दल छत्रे यांना दोन हजार रुपयांचें बक्षीस मिळालें. पहाः- G. D. Vol 18/237, 1831, p 81.

३३ G. D Vol. 11/203, 1830 p 211.

३४ Ibid p 266.

*no ordinary difficulty and seems to have advanced far in the* higher branches of the Mahratta tongue."[३५]

यांप्रमाणें या मराठी भाषेच्या परीक्षेला बसलेला दुसरा सिव्हिल सर्व्हंट मालकम नल्ला परीक्षा मंडळानें मराठी भाषेंत प्रावीण्य न दाखविल्यानें सरकारी कामकाज करण्यास अपात्र ठरविलें.

याच्या पुढच्या वर्षी अहमदनगरच्या असिस्टंट प्रिन्सिपॉल कलेक्टर आर्चिबाल्ड कँपबेल यानें मराठी भाषेची परीक्षा घेण्यांत यावी असा अर्ज दिला.[३६] तसेंच मि. एन्. डब्ल्यू. रिव्हज् या सिव्हिल सर्व्हंटनें मराठी भाषेंत प्रावीण्य मिळविल्याचें प्रमाणपत्र जॉर्ज जर्व्हिस, पी. स्कॉट व स्मिथ मॅरियट या तिघांच्या परीक्षामंडळानें दिलेलें उपलब्ध आहे.[३७]

मुलकी व लष्करी खात्यांतील या अधिकाऱ्यांप्रमाणें शिक्षणखात्यांतील अधिकाऱ्यांना मराठी भाषा शिकून परीक्षाहि द्यावी लागे. शिक्षणखात्यांतील मराठी भाषा पास झालेल्या लोकांचीं नांवें व इतर माहिती डिरेक्टरी ऑफ दि डिपार्टमेंट ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन यावरून मिळते. ही यादी खालीलप्रमाणें आहे :—

१ डब्ल्यू. ए. रसेल. २ डब्ल्यू. ट्रेपर. ३ जॉन न्यूजंट. ४ टी. सी. वर्कहॅम. ५ जे. सी. मूर. ६ रे. एन्. पी. कॅसिडे. ७ मेजर टी. कँडी.[३८] ८ मेजर टी. वॅडिंग्टन.[३९] ९ एच्. पी. डॅकोब. १० आर्थर बॅरेट.[४०] ११ जे. सी. पील. १२ एम्. हॅमिक. १३ एन्. एस्. वेलारिअस.[४१] १४ जे. एफ्. फ्लीट.[४२] १५ एन्. वॅडी.[४३] यांपैकीं डब्ल्यू. ट्रेपर यानें एज्युकेशनल इन्स्पेक्टरच्या जागेसाठीं अर्ज केला, त्यांत भाषेविषयीं उल्लेख करतांना तो म्हणतो :—

"I have passed the Interpreter's Examination in Marathi, the Principal language of the Central Division."[४४]

या यादींत नांव नसलेला युरोपियन म्हणजे रॉबर्ट मॅके हा होय.[४५] मराठी भाषेची परीक्षा घेण्याबद्दल यानें बोर्ड ऑफ एज्युकेशनचा सेक्रेटरी स्टोव्हेल यांस ता.

---

३५ *Ibid.* pp 262-263.
३६ *G. D.* Vol. 13-232, 1831. p 195
३७ *Ibid* p 197.
३८ *The Bombay Educational Record.* Vol. ii, 1866. pp. 335, 336 and 337.
३९ *Ibid* Vol IV. 1868 p 2.
४० *Ibid.* Vol. V 1869. p 5
४१ *Ibid* Vol. VI 1870 pp. 2, 4 and 5
४२ *Ibid.* Vol. IX 1873 p. 4.
४३ *Ibid.* Vol X 1874 p. 4
४४ *D. P. I Miscellaneous* Vol. XXIII 1861-1862. p. 757.
४५ याची सविस्तर माहिती पहा–रावबहादूर दादोबा पांडुरंग पृ. २०४.

७ जुलै १८४५ रोजीं लिहिलेलें एक पत्र उपलब्ध आहे.[४६] मॅकेच्या पत्राप्रमाणें जॉन हार्कनेस, ए. वी. ऑलेंचार, बाळशास्त्री, दोसाभाई सोराबजी मुनशी व इत्यादि मसवा या पांच जणांचें परीक्षामंडळ नेमण्यांत येऊन त्यांनीं मॅकेची ता. ११ ऑगस्ट १८४५ रोजीं परीक्षा घेऊन पुढीलप्रमाणें रिपोर्ट लिहिला. तो असा :—

"We have this day examined Mr. Robert Mackay touching his knowledge of Marathi, both viva voce and in writing and we find him fit and qualified to translate from English into Marathi, and vice versa; to read and write both the Balbodha and Modi character, and to converse and transact business in the Marathi language."[४७]

याचें नाव डिरेक्टरींत नसण्याचें कारण हा ता. १७ डिसेंबर १८४६ रोजीं माळाशिरस येथें मरण पावला.[४८] यासंबंधीं स्टोव्हेल यांचेंहि एक पत्र उपलब्ध आहे.[४९] याशिवाय वर दिलेल्या यादींतील "Examination of European Officers in Native Languages" या सदराखालीं फर्केहम, आर्थर बॅरेट, स्पेन्सर के. वेलास व डब्ल्यू. एच्. स्मिथ यांचीं मराठी भाषेची परीक्षा घेण्याबद्दलचीं पत्रें आहेत.[५०]

या परीक्षेच्या रिपोर्टांवरून जॉन हार्कनेस, ए. वी. ऑलेंचार या परीक्षामंडळाच्या सभासदांना मराठी भाषा येत असली पाहिजे, असें म्हणावयास हरकत नाहीं. सोलापूर येथील गव्हर्मेंट स्कूलचा सुपरिंटेंडेंट रॉबर्ड गॉर्डन याच्या कानडी म्हणींचें एक पुस्तक परीक्षणार्थ आलें असतांना त्यांतील कांहीं म्हणींचें मराठी भाषांतर करून व त्यावर शेरा देऊन त्यानें तें पत्र बोर्ड ऑफ एज्युकेशनच्या सेक्रेटरीकडे पाठवून दिलें.[५१] या म्हणी येथे देण्याचें कारण नाहीं. पण या प्रांताच्या शिक्षणाधिकाऱ्यास मराठी भाषा येत असे, हें दाखविण्याचा येथे उद्देश आहे.

बरेली येथेंहि भाषाविषयक परीक्षा होत असे, असें दिसतें. या ठिकाणीं फारशी, हिंदुस्तानी, गुजराती व मराठी या भाषांत पास झालेल्यांचीं नांवें आहेत. या शाळेची व परीक्षेची पुढीलप्रमाणें माहिती देण्यात आली आहे:

"The Bairelly School has been directed by the Lieutenant Governor N W Province to be in future designated a college, of which the Master, Mr. V. Tregar, has been nominated Principal

४६ *D P I Board of Education Superintendent III Division* 1845 p 565

४७ *Ibid* p 573.

४८ *Report of the Board of Education* 1846. p 8

४९ *D. P I Board of Education Superintendent, III Division*. 1847 p 19

५० *D P I Government*. Vol. II 1865-1866. pp. 641, 650, 653, 656 and 659

५१ *D P I Board of Education Miscellaneous* 1848. p. 172

"There was a special examination for candidates in the Native Languages held at the Town Hall on Wednesday the 27th ult., when the following gentlemen passed."[52]

या न्यार्ती निरनिराळ्या विषयांत पास झालेल्यांचीं नावें दिलीं आहेत. त्यांपैकीं मराठी भाषेंत पास झालेल्याचीं दोन नावें आढळतात तीं अशीं :—

१ मि. सी. एफ्. एन्. शॉ.        २ मि. आर्. एल्. पिन्हे सी. एस्.

या युरोपियन लोकांना मराठी भाषा शिकविण्याची स्थिति काय होती यासंबंधीं लोकहितवादींनीं पुढीलप्रमाणें लिहिलें आहे :—

"गंगाधर दीक्षित फडके हा मनुष्य इंग्रजांस शिकविण्याकरितां पंडित म्हणून सन १८२० पासून १८२५ पर्यंत मुंबईस कामावर राहात असे. पुढें तो पुण्यांत आला तेव्हां त्यास सर्वांनीं बहिष्कृत केलें होतें; आणि ते त्यांस म्हणत कीं, हा मुंबईस जाऊन तेथें चार वर्षें राहिला, तेव्हां हा बाटल्याशिवाय कसा आला असेल? शेवटीं तो संन्यास घेऊन मेला."[53]

दादोबांनीं आपल्या आत्मचरित्रांत मि. हेंडरसन याची माहिती दिली आहे. या युरोपियन गृहस्थांस व त्याच्या शिफारशीनें मर्फी यांस आपण मराठी शिकवीत असें असें दादोबांनीं लिहिलें आहे. ते म्हणतात :—

"पुढें आमचे मास्तर Mr. Henderson यांणीं माझी चाल व गरीबी जाणून उगीच निमित्त करून, "मला मराठी शिकवायास सकाळीं माझ्या बंगल्यांत येत जा, मी तुला दहा रुपये देत जाईन," असें म्हणून कांहीं महिने ते मला दहा रुपये देत असत आणि पुढें मि. Mr Murphy हे त्या वेळेस कुलाब्याच्या दांडीजवळ राहत होते आणि ते मोठ्या कोर्टाचे Chief Interpreter होते त्याची ओळख करून दिली आणि त्यांस माझी शिफारस केली, त्यावरून ते मजपाशीं कांहीं भक्तिविजयाचे अध्याय वाचूं लागले आणि मजवर फारच लोभ करूं लागले."[54]

दादोबांनीं मर्फी व हेंडरसन यांची मराठी भाषा शिकण्याची खटपट कशी सांगितली आहे तसेंच कॅप्टन फ्रेझर याच्या भाषाज्ञानाविषयीं लिहिलें आहे. ते असेः—

"हे लष्करी पेन्शनर साहेब होते. याजपाशीं कांहीं वर्षें यांस मराठी शिकविण्याकरितां धोंडु कृष्णाजी वेडेकर या नावाचे एक अल्पवयस्क पंडित होते."

तत्कालीन युरोपियन लोक मराठी भाषा शिकत असल्याचे उल्लेख असे दादोबांनीं

---

५२ *Times of India*, 12th September, 1951 (*Hundred Years Ago*).

५३ लोकहितवादी. ऐतिहासिक गोष्टी व उपयुक्त माहिती. भाग १ ला. पृ. ९१.

५४ अ. का प्रियोळकर. रावबहादूर दादोबा पांडुरंग. पृ. ८४.

५५ तत्रैव. पृ. ७६.

ले आहेत. तसे ते इतरत्रहि आढळून येतात. रावसाहेब मंडलिक यांच्या चरित्रांत दी व इंग्रज यांच्यातील भेद सांगितला असून तो सांगताना इंग्रज अधिकाऱ्यांच्या राठी भाषाज्ञानाबद्दल पुढील उल्लेख करण्यांत आला आहे :—

"रामभाऊ साठ्ये भेटले होते. ते म्हणाले मि. हंटर यांस मराठी चांगलें येतें. काणाची फारशी मदत घेतल्याशिवाय सर्व काम मराठींत लिहून घेतात. या देशीं येऊन त्यास २।४ महिनेच झाले. याचें नांव ॲंग्लो-सॅक्सन लोकांची काम करण्याची शक्ति व प्रीति."[५६]

मुलकीखातें, लष्करीखातें, न्यायखातें व शिक्षणखातें यांतील अधिकाऱ्यांप्रमाणें इंजिनियरिंग खात्यांतील अधिकाऱ्यांनीं नव्या जागेवर जाण्यापूर्वी देशी भाषांचा परिचय करून घेतला पाहिजे, असें मि. गुडविन यांचें एक टाचण उपलब्ध आहे.[५७] इंजिनियरिंग खात्यांतील अधिकाऱ्यांना हें भाषाज्ञान कां झालें पाहिजे याचीं कांहीं कारणें, गुडविन् यांनीं आपल्या टांचणांत दिलीं आहेत. तीं अशीं :—

"No persons can be more liable to impositions than officers, ignorant of the Languages, entrusted with Public Works. They can never satisfy themselves that their mistress frame their Estimates on the local prices of articles. They can never directly ascertain the rate of the daily hire paid to labourers. The mere statement of the facts in question will suggest remedy I would propose."[५८]

गुडविन याच्याप्रमाणेंच एल्फिन्स्टन यानें इंजिनियरिंग खात्यातील अधिकाऱ्यांनीं देशी भाषांचें शिक्षण घेतलें पाहिजे या धोरणाचा पुरस्कार केलेला आहे[५९] व हें शिक्षणविषयक धोरण त्या वेळचा चीफ इंजिनियर ले. कर्नल एस्. गुडफेलो याला जून १८२७ च्या एका पत्रानें कळविण्यांत आलें होतें. या खात्यांतील जर्व्हिस याच्याशिवाय मराठी शिकलेल्या इतर अधिकाऱ्यांची माहिती मिळत नाहीं.

देशी भाषांचें शिक्षण युरोपियन लोकांनीं घ्यावें, या एल्फिन्स्टनच्या धोरणामुळें अनेकांनीं मराठी व इतर भाषांचा अभ्यास केला. या भाषा शिकलेल्या युरोपियन लोकांची माहिती मिळते ती अशी :—

"मुंबई इलाख्यातील सिव्हिल सर्व्हंटची संख्या...१३०. यापैकीं चार किंवा जास्त भाषांत पास झालेले...३; दोनपेक्षा जास्त भाषांत पास झालेले...११; दोन

५६ ग. रा. हवालदार. रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक यांचें चरित्र, भाग २. पृ. १०४१.

५७ *G. D.* Vol. 10/143. 1827 p 431

५८ *Ibid* pp. 431-432.

५९ *Ibid.* p. 433.

भाषांत पास झालेले ९३, व एका भाषेंत पास झालेले २३, असे एकूण १३० सिव्हिल सर्व्हंट होते.[६०]"

मुंबई इलाख्यांतील लष्करी अधिकाऱ्यांची संख्या :—

| | | |
|---|---|---|
| "Commissioned Officers | .. .. | 1340 |
| Indian Navy | .. .. .. | 233 |
| Medical Establishment (Qualified Interpreters) | | 200"[६१] |

यापैकीं इंटरप्रीटर म्हणून एका भाषेंत पास झालेले २४७, दोन भाषांत पास झालेले १४५, तीन भाषांत पास झालेले ३७, व चार किंवा जास्त भाषांत पास झालेले १७ असे एकूण ४४६ अधिकारी मुंबई इलाख्यांत लष्करी खात्यांत होते.[६०]

यांत मराठी भाषा पास झालेल्यांचा निराळा उल्लेख नाहीं. तरीसुद्धां यांतील बरेच लोक मराठी भाषा पास झालेले असावेत. लष्करी खात्यांतील एका अधिकाऱ्यास पाच भाषांत पास झाल्याबद्दल, एक हजार रुपये बक्षीस देण्यांत यावें, अशा तऱ्हेचा कोर्ट ऑफ डायरेक्टरांच्या पत्रांतील एक उतारा आढळतो. तो असा :—

"We have much satisfaction in authorizing you to present the sum of one thousand Rupees (1,000) to Captain M. F. Gordon, as a mark of our approbation of his having passed a satisfactory examination in five Native languages"[६३]

यापुढें मराठी भाषेचा अभ्यास करण्यासाठीं जीं मराठी पुस्तकें युरोपियन लोक वापरीत त्यांची माहिती देण्यात येत आहे. ह्या परीक्षेची सुरुवात झाल्यानंतर मराठींत जीं पुस्तकें प्रथम छापलीं गेलीं त्याचा उपयोग भाषाभ्यासासाठीं युरोपियन लोकांनीं केलेला असावा या पुस्तकांची एक यादी उपलब्ध असून ती पुढीलप्रमाणें आहे. पुस्तकाच्या नांवापुढें त्या पुस्तकाच्या किती प्रती काढल्या त्याचाहि आंकडा दिलेला आहे.

मराठींत छापलेलीं पुस्तकें :—

" १ लिपीधारा[६४] (Leepedhara)—१००० प्रती

६० Richardson *Hints on the Examinations in the Vernacular Languages of the Western India.* pp. 4 and 5.
६१ *Ibid.* p 4
६२ *Ibid.* p 9
६३ *The Bombay Calendar and Central Directory* 1848 p. 287.

६४ या पुस्तकाची पुढील माहिती मिळते :

"Lipidhara A Modi Reader Compiled expressly for the use of accepted candidates for the Bombay Civil Service by F. P. Baker. pp 57 London 1860 ?"—(J F Blumhardt *Catalogue of the Library of the India Office* vol. II Part V p. 94) दुसऱ्या कॅटलॉगमध्ये "A Marathi and Modi writing book pp 57 London 1863 ?" असा उल्लेख आढळतो (पहा J F Blumhardt *Catalogue of Marathi and Gujarati Printed Books in the Library of the British Museum,* p 7) या पुस्तकाची पहिली आवृत्ति केव्हां निघाली हें समजत नाहीं.

२ संख्या (Numerals) [६५]—१००० प्रती

३ लहान वाक्यांत मुलांना उपदेश (Advise to Children in Short Sentences) [६६] —१००० प्रती

४ पंचोपाख्यान (Punchopakhyan)[६६]—१००० प्रती

५ विदुरनीति (Veedoor Neeti)[६७]—१००० प्रती"[६८]

याशिवाय 'सिंहासनबत्तिशी' हें पुस्तक छापण्यास मिळण्याबद्दलचें एक पत्र आहे.[६९] यावरून हेंहि पुस्तक सिव्हिल सर्व्हंटच्या मराठी भाषाभ्यासासाठीं उपयोगांत येत असावें.

या पुस्तकांशिवाय व्याकरण, भाषांतर यासाठीं आणखी कांहीं पुस्तकें उपयोगांत आणलीं जात होतीं. या पुस्तकासंबंधीं सिव्हिल एक्झामिनेशन कमिटीचे सेक्रेटरी मि. जी. पोप यांचें १९ ऑगस्ट १८३१ चें जनरल डिपार्टमेंटचे सेक्रेटरी जे. बॅक्स यांना लिहिलेलें एक पत्र उपलब्ध आहे.[७०] या पत्रांत सिव्हिल एक्झामिनिंग कमिटीला जीं मराठी पुस्तकें पाहिजेत त्या पुस्तकांची यादी दिली आहे. त्यापुढें त्या पुस्तकांच्या किती प्रती लागणार आहेत त्याचा आंकडाहि सापडतो. ही यादी पुढीलप्रमाणें:—

मराठी पुस्तकें (कंसात लागणाऱ्या प्रती दिल्या आहेत)

"१ विदुरनीति (२); २ सिंहासनबत्तिशी (२); ३ पंचोपाख्यान (२); ४ केनेडी यानें सुधारलेलें व्याकरण[७१]" (१)

---

६५ या दोन पुस्तकांची माहिती मिळत नाही.

६६ या पुस्तकाची एक प्रत एल्फिन्स्टननें माधवराव रास्ते यांना पाठविली व यासंबंधी एल्फिन्स्टनचे आभार मानतांना माधवराव रास्ते २१-१०-१८२१ च्या पत्रांत पुढीलप्रमाणें लिहितात: "अलिकडे गुरुजन शास्त्री छापखान्यांत महाराष्ट्र भाषेत पंचोपाख्यान बालबोध लिपीत पत्रें करून मुद्दे वाचावयास तयार केली आहेत (पहा. G S. Sardesai *Selections from the Peshwa Daftar*. Vol. 42 p 52. या पुस्तकाचा उल्लेख *G. D.* vol. 9/10 1821. p. 638 वरहि आहे याची प्रत पुण्याच्या महाराष्ट्र ग्रंथालयांत आहे. ६० सन १८२३ मध्ये प्रसिद्ध झालेली याची प्रत मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहे. पहा मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील दोलामुद्रितें (मुद्रणशोधन प्रकाशन) पृ. १. तसेच याचा उल्लेख G. D. vol 9/10 1821. p 634 वर आहे.

६८ G. D vol 8/63 1824 p 114

६९ G. D Vol 9/10 1821 p. 686

७० *G. D.* vol 13/232 1831 p 165

(यांत १०५ पद्यानंतर पुढील ११० पासून पुन्हा क्रमांक दिले आहेत. तेव्हां १७० पद्यानंतरचें हें १६० क्रमांकाचें पद्य आहे.)

७१ हें व्याकरण मराठी भाषेचें व्याकरण यानें लिहिलेलें असून केनेडीनें सुधारलें होतें. हें व्याकरण सन १८१४ मध्यें प्रसिद्ध झालेलें होतें.

### भाषांतरासाठीं इंग्लिश पुस्तकें

"1. Arabian Nights (2); 2. Regulation of Government (2); 3. Military Regulation and Supplement (2)."[७२]

यांपैकीं पहिल्या तीन मराठी पुस्तकांचा मागें उल्लेख आलेलाच आहे. केनेडीनें सुधारलेलें व्याकरण हें महंमद मखबाचें असून युरोपियन अधिकाऱ्यांना व्याकरण शिकविण्यासाठीं हें लावलें होतें असें दिसतें. व्याकरणाप्रमाणें लेफ्टनंट कर्नल केनेडी याचा मराठी शब्दकोश युरोपियन अधिकाऱ्याच्या अभ्यासासाठीं उपयोगांत आणीत असत असें दिसतें. याच्या मुंबई सरकारनें मागविलेल्या सदा प्रती पोहोंचल्याचें एक पत्र उपलब्ध आहे.[७३] वरील यादींतील सर्व पुस्तकें खपल्यामुळें बाहेर पुस्तकें मिळण्यास कठीण पडत आहे, अशा आशयाचें परीक्षामंडळाचा सेक्रेटरी पोप यानें मुंबईसरकारला लिहिलेलें एक पत्र उपलब्ध आहे.[७४] हीं पुस्तकें खपल्यामुळें खाजगी व्यक्तींकडून गरजेप्रमाणें पुस्तकें मिळवावीं लागत आहेत असेंहि त्यानें पत्रांत म्हटलें आहे. हीं छापलेलीं पुस्तकें त्या काळीं दुर्मिळ झालीं होतीं, असा अनुभव पोपच्या एका पत्रात व्यक्त झाला आहे.

### १ मराठा इंटरप्रीटर (Mahratta Interpreter)

युरोपियन लोकांच्या अभ्यासाला मदत व्हावी म्हणून Mahratta Interpreter या नांवाचें एक पुस्तक प्रसिद्ध करण्याची योजना कॅप्टन जेम्स मायकेल या युरोपियन गृहस्थानें आखली होती. त्यानें लंडन येथून ता. ७ ऑक्टोबर १८२४ रोजीं मुंबई सरकारला पत्र लिहून आपल्या या पुस्तकासंबंधीं माहिती कळवून या पुस्तकाला मुंबई सरकारचा आश्रय मिळावा, अशी विनंती केली होती.[७५] या पत्राबरोबर पुस्तकाची रचना आराखडा कशी करणार आहे यासंबंधीं त्यानें एक छापील पत्रक जोडलें होतें. त्यांत तो लिहितो :—

"It is proposed to publish by subscription a work in Mahratta, the Language of Tanjore, Berar, and Poonah, and very generally used in the Offices of the Revenue Department throughout a large portion of the South of India."[७६]

या पुस्तकाची रचना व्हॅन्स केनेडीच्या कमिटीनें सिव्हिल सर्व्हंटच्या परीक्षेची जी योजना तयार केली होती, त्यास अनुसरून करण्याचा लेखकाचा विचार दिसतो. त्या पुस्तकाचे तीन भाग होते. "पहिल्या भागांत पंच पत्राचे फॉर्म्स, करारपत्रें, अर्ज, इत्यादिकांचे नमुने असून त्यांचें इंग्लिश भाषांतर व समानार्थक मराठी वाक्प्रचार देण्यांत यावयाचे आहेत, असें लेखकानें म्हटलें आहे. पुढें तो म्हणतो,

७२ *G. D* Vol. 13/232. 1831. p. 166
७३ *G. D.* vol. 16/101. 1825 p 303
७४ *G. D.* vol. 13/232. 1831. p. 174.
७५ *G. D.* vol 16/101. 1825. p. 355.
७६ *Ibid.* p. 359.

"दुसऱ्या भागांत सहा विषयांची चर्चा होईल. यांत मराठी व इंग्रजी संभाषणाचे उतारे, संख्या, मुलकी खात्यांत नेहमीं प्रचारांत येणारे फारशी भाषेतून मराठींत आलेले वाक्प्रचार व शब्द, कालगणना मोजण्याची पद्धत इत्यादि विषय या भागांत येतील.

तिसऱ्या भागांत भाषांतरासाठीं साठ गोष्टी दिल्या असून या गोष्टी फारशी भाषेतून मराठी भाषेंत भाषांतर करून त्याबरोबर त्यांचें इंग्लिश भाषांतरहि असेल."[७७]

हें पुस्तक प्रसिद्ध झालेलें दिसत नाहीं. पुस्तक तयार करण्याचा एक प्रयत्न म्हणून याकडे पहावें लागेल.

**2 Guide to the Obligatory Test in Marathi. Part II. Captain C. Burrard—1849.**

हें पुस्तक कॅप्टन बरार्ड यानें लिहिलेलें असून मुंबई येथें १८४९ मध्यें प्रसिद्ध झालेलें आहे. हें पुस्तक बहुधा लष्करी अधिकाऱ्यासाठीं लिहिलेलें असावें. कारण यांत एका पानावर लष्करी अधिकाऱ्यास लिहावयाचे अर्जांचे नमुने देवनागरी लिपींत व त्या समोरच्या पानावर रोमन लिपींत दिले आहेत. पुढें कांहीं नमुने मोडी लिपींत व देवनागरी लिपींत दिले आहेत. असे एकंदर ३० अर्जांचे नमुने आहेत. पृष्ठें ५९.

**३ सरकारचे चाकर आणि हिंदुस्थानांतील साहेब लोक यांसी संभाषण...१८५०.**

हें पुस्तक १८५० च्या सुमारास प्रसिद्ध झालेलें असावें. हे पुस्तक कोठेंहि मिळत नाहीं; परंतु या पुस्तकासंबंधीं 'ज्ञानोदया'त माहिती सांपडते ती पुढीलप्रमाणें :—

"त्या पुस्तकांत लिहिलें आहे कीं, येथील भाषा साहेब लोकांनीं अवश्य शिकाव्या. नाहींतर ते पुष्कळ गोष्टींविषयीं गैरसमजूत धरतील आणि हे त्यांचें म्हणणें ठीकच आहे. जो साहेब येथील भाषा बराबर जाणत नाहीं त्यांस मुलकी वगैरे कामें देणें ठीक नाहीं, जो कोणी आळस करून शिकत नाहीं, तो फार दोषी आहे. तो मोठ्या कामांस योग्य नाहीं व त्याच्या हातून लोकसुधारणूक कांहींच होत नाहीं."[७८]

**4. Hints on Examinations in the Vernacular Languages of Western India.—Arthur St John Richardson.—1853.**

हें रिचर्डसन यानें लिहिलेलें पुस्तक असून सन १८५३ मध्यें प्रसिद्ध झालेलें आहे. हें पुस्तक आपण कां लिहिलें याविषयीं लेखक म्हणतो,

"The result of Public Examinations of late in Bombay confirms an idea which is rather prevalent, that the fact, that so many gentlemen neither deficient in natural ability nor in

७७ Ibid. pp 339 and 361.

७८ ज्ञानोदय. १ ऑगस्ट १८५०. पृ २७८.

mental application, fail to acquire the very limited knowledge of the Vernacular Languages contemplated in the Orders of Government, . . . with the hope of removing both these difficulties, the following pages have been compiled."[79]

**५. वाचनमाला**—रावसाहेब नारायणभाई दांडेकर. १८६७.

हें पुस्तक रावसाहेब नारायणभाई दांडेकर, एज्युकेशनल इन्स्पेक्टर यांनीं लिहिलेलें असून पुणें येथें १८६७ सालीं प्रसिद्ध झालें. या पुस्तकावर "सनदी नोकरांच्या उपयोगाकरितां अर्ज, जबान्या, रिपोर्ट वगैरे सरकारी कामासंबंधीं मोडी लिपींत लिहिलेल्या कागदांचा संग्रह करून तो मुंबई सरकारच्या आज्ञेवरून रावसाहेब नारायणभाई यांनीं छापला." असें लिहिलें आहे. यात अर्ज, यादी, पत्रें, जबान्या, रिपोर्ट, *किरकोळ* अशीं चार प्रकरणें आहेत. सर्व पुस्तक मोडींत आहे.

एल्फिन्स्टनला या परीक्षा फार सोप्या घेतल्या जात असें वाटत असे. याविषयीं तो एके ठिकाणीं म्हणतो,

"The examinations, I understand, are at present much easier than those in Calcutta. Something might be added to *the difficulty, but it ought not to be so great as either* to discourage the student or to detain him too long among the temptations of a Presidency, and at a distance from the active employments of the service."[80]

ब्रिग्ज यालासुद्धां या देशीभाषा एक वर्षाच्या अवधींत शिकतां येतील, असें वाटत असे. याविषयीं हिंदुस्तानांतील तरुणांना उद्देशून लिहिलेल्या एका पत्रांत तो त्यांना पुढीलप्रमाणें उपदेश करतो.

" . any young man of ordinary capacity ought to pass a creditable examination in a year from the time he begins, after which the current business of his office, and the intercourse he maintains with the people, will render him in another year qualified to translate any document with ease to himself, and to transact business, with facility."[81]

या परीक्षा एवढ्या सोप्या असल्या आणि भाषा शिकणें त्यापेक्षांहि सोपें असलें तरी भाषाचा अभ्यास करून तो पास होण्यापेक्षां लांचलुचपतीचा उपयोग करून व इतर वाममार्गानें पास होण्याचा कांहीं सिव्हिल सर्व्हंट प्रयत्न करीत असत, असें वाटतें. या-

७९ Richardson. *Hints on the Examinations in the Vernacular Languages of the Western India. Preface.* p V

८० George W Forrest. *Selections from the Minutes, and other Official Writings of the Honourable Mountstuart Elphinstone.* p 114

८१ Lieut-Col. John Briggs. *Letters Addressed to a Young Person in India.* p. 10.

मुळें ही परीक्षा नुसती सोपी राहिली होती एवढेंच नव्हे, तर तिचा दर्जाहि खाला-वला होता. परीक्षासमितीच्या या निष्काळजीपणानें चाललेल्या कारभारावर या मासिकांत पुढीलप्रमाणें टीका करण्यांत आली आहे:—

"These examinations were so carelessly conducted that the candidates were enabled to pass with little difficulty, owing it is said to the facility with which the native profes-(Pandits and Munshis) contrived to obtain the papers prepared by the General, by bribing his servants who were in the habit of abstracting them from the drawer in which he was accustomed to place them."[८२]

ही परीक्षा ओरिएंटल एक्झामिनेशन कमिटीकडून घेतली जात असे. या कमिटींत ओरिएंटल ट्रान्स्लेटर व निरनिराळ्या भाषा जाणणारे इतर चार गृहस्थ असत. या कमिटींत जनरल व्हॅन्स केनेडी याची नेमणूक ओरिएंटल ट्रान्स्लेटर म्हणून झाली होती व या कामाबद्दल त्याला वार्षिक एकंदर पंचवीस रुपये भत्ता मिळत असे.

अशा तऱ्हेनें पास झालेल्या युरोपियन अधिकाऱ्यांचें त्या भाषेंतील ज्ञान कांहीं शब्दांपलीकडे जात नसे. नुसती परीक्षा पास होऊन बढती होण्यासाठींच ते या परीक्षा पास होत; परंतु परीक्षा पास होऊन मराठीचा अभ्यास वाढविण्यासाठीं प्रयत्न करण्याचें ते अजिबात सोडून देत. या त्यांच्या भाषाभ्यासाच्या टाळाटाळीबद्दल Monthly miscellany मध्यें पुढीलप्रमाणें टीका प्रसिद्ध झाली आहे:—

"But in most cases no sooner is the examination over than the officer abandons further study, and the forgetfulness of the dialects he has hitherto grammatically studied merely for the sake of passing—is ambitiously, or it may be indolently, permitted. With the very large majority the acquaintance of any passed language does not extend beyond the few words in ordinary usance; and, it is painful to add, that the knowledge of the written character becomes oblivious in very brief time."[८३]

अशा तऱ्हेनें या परीक्षेनंतर मराठी भाषा विसरणारे असे बरेच युरोपियन अधिकारी असले तरी मुलकी व लष्करी खात्यांत असे कांहीं युरोपियन अधिकारी होते कीं, त्यांनीं मराठी भाषेचा अभ्यास वाढवून मराठी वाङ्मयाचें कार्य केलें. याचें सर्व श्रेय मात्र एल्फिन्स्टनला दिलें पाहिजे. कारण एल्फिन्स्टननें जर मुलकी, लष्करी, एंजिनियरिंग इत्यादि खात्यांतील अधिकाऱ्यांना मराठी भाषा शिकणें सक्तीचें केलें नसतें तर मराठी भाषेंत जे कांहीं ग्रंथ युरोपियन लोकांकडून झाले, तेहि झाले नसते.

एल्फिन्स्टनला युरोपियन लोकांनीं मराठी भाषा शिकावी, असे वाटत होतें. तसेंच एतद्देशीय लोकांनीं शिक्षण घेऊन ज्ञानसंपन्न व्हावें ही त्याची मनापासून इच्छा

८२ *The Monthly Miscellany of Western India, Vol. I. No. 7 Oct. 1850. p. 332.*
८३ *Ibid. p. 331.*

होती. मराठी भाषेंत पुस्तकें प्रसिद्ध व्हावीत व त्यांचा अभ्यास व्हावा यासंबंधीची लेफ्टनंट जनरल ब्रिग्ज यानें एल्फिन्स्टनविषयी सांगितलेली एक गोष्ट प्रसिद्ध आहे. त्याच्या मराठी भाषेच्या व्यासंगाच्या या गोष्टीचा उल्लेख सर पी. एम्. मेथा यानीं ईस्ट इंडिया असोसिएशनपुढें मुंबई इलाख्यांतील शिक्षणपद्धति हा प्रबंध वाचतांना केला आहे. ब्रिग्ज म्हणतो,

"*On my observing in the corner of his tent one day,*" says that officer, "a pile of printed Mahratta books, I asked him what they were meant for? 'To educate the natives', said he; 'but it is our high road back to Europe'. 'Then' I replied, 'I wonder, you, as a Governor of Bombay, have set it on foot.' He answered, 'We are bound, under all circumstances, to do our duty to them' ".[८१]

एल्फिन्स्टनला मराठी भाषेविषयीं एवढी आस्था कां वाटत होती, हें वरील उताऱ्यावरून दिसून येईल.

८१ *Journal of the East India Association. Report for* 1867-68. *No.* 1, *vol. II.* p. 103

जर्व्हिसनें एतद्देशीय लोकांच्या शिक्षणासाठीं व विशेषतः सरकारच्या शास्त्रीय खात्यासाठीं शिक्षण देऊन एतद्देशीय नोकरवर्ग तयार केला. जर्व्हिसची ही दीर्घकालीन व उत्कृष्ट सेवा कोर्ट ऑफ डायरेक्टर्स यांच्या निदर्शनास आणण्यांत आली. (Military letter from Bombay 14 March, 1851, No. 30). पुढें त्याला युरोपला जाण्यासाठीं फर्लो रजा देण्यांत आली. (G. O. 7 March 1851 and Military letter from Bombay 14 March 1851, No. 30). तेथें बुलोन याठिकाणीं तो १४ ऑक्टोबर १८५१ रोजीं मरण पावला. ("Times"; 17 Oct. 1851).[1]

जर्व्हिसच्या कार्याची माहिती करून घेण्यासाठीं आपणांस नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीचीही माहिती करून घेतली पाहिजे. या सोसायटीची पहिली बैठक ता. २१ ऑगस्ट १८२२ रोजीं पर्शियन सेक्रेटरीच्या ऑफिसमध्यें भरली होती. ऑनरेबल सर सी कोलव्हिल[2] हा अध्यक्षस्थानीं होता. या बैठकींत पुढीलप्रमाणें एक ठराव करण्यांत आला:—

"The attention of the Society shall be specially directed *to* the providing suitable books for the use of the Native schools in the several languages used in the territories subject to the Presidency of Bombay, as well as in English; and to the affording assistance in the preparation, and cheap or gratuitous supply of other works which may be deemed useful by the committee."[2]

या ठरावावरून या बैठकीचा हेतू आपणांस कळून येईल. या सोसायटीचा अध्यक्ष माऊंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन हा असून उपाध्यक्ष कोलव्हिल हा होता. या सोसायटीच्या कार्यासंबंधीं गोविंद नारायण पुढील माहिती देतात:—

"सन १८२१ त मेहेरबान मौंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन् साहेब मजकूर यांनीं पाहिलें कीं, राज्यांत दुसरा सर्व बंदोबस्त चालला आहे. परंतु या देशाच्या लोकांस स्वभाषेमध्यें पूर्णज्ञान होऊन इंग्रजी विद्या प्राप्त होण्याचीं साधनें करून ठेविल्याशिवाय त्यांच्या संपत्तीचें रक्षण करणें निष्फळ आहे, तर सरकारी नात्यानें मुंबईत एक विद्यालय स्थापावें. त्यांत संस्कृत, मराठी, गुजराती, उर्दू इत्यादि एतद्देशीय भाषा शिकवून त्यांजकडून इंग्रजी भाषेचा अभ्यास करावा म्हणजे त्याला युरोपखंडांतील अनेक विद्यांचें परिज्ञान होऊन ते योग्यतेस चढतील आणि हेंच कृत्य त्यांच्या वंशपरंपरें

१ जर्व्हिसची ही चरित्रविषयक माहिती कॉमनवेल्थ रिलेशन्स ऑफिस, लंडन यांच्या आर् २६६६।५२ या पत्रावरून देण्यांत आली आहे.

२ G. D. Vol. 44 40 1821-23 p. 69.

चालेल...द्रव्याची विपुलता झाल्यानंतर १८२२ ऑगस्ट २१ या दिवशीं नेटिव्ह एज्युकेशन् सोसायटी या नांवाची एक मोठी शाळा स्थापिली." [३]

वरील उताऱ्यावरून या विद्या पूर्ण होण्याचीं साधनें निर्माण करून ठेवावींत देशांतील लोकांना स्वभाषेचें पूर्ण ज्ञान व्हावें व इंग्रजी विद्या पूर्ण होण्याचीं साधनें निर्माण करून ठेवावींत हा मुख्य हेतु ही सोसायटी स्थापन करण्याच्या मुळाशीं होता, असें दिसून येईल. अर्थात् हीं साधनें म्हणजेच निरनिराळे ग्रंथ निर्माण करणें होतें. कारण ही सोसायटी स्थापन झाल्यानंतर तिचा सेक्रेटरी जर्व्हिस यानें मुंबईहून ८ एप्रिल १८२५ रोजीं ग्रंथाचीं भाषांतरें किंवा नवीन ग्रंथ करणारास बक्षिसाविषयींचें प्रसिद्धिपत्र काढलें. मुंबई सरकारनें केलेला जो ठराव वर दिला आहे, त्या ठरावास अनुसरूनच हें पत्रक काढलें होतें. या प्रसिद्धिपत्रकांतील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणें आहे :—

"ही मंडळी सर्वांस विदित करिते कीं, जो कोणी बालबोध ग्रंथ अथवा प्रौढ ग्रंथ यांचीं मराठी किंवा गुजराती बोलींत चांगलीं भाषांतरें करून आणील अथवा या दोहों भाषांत मान्य पडे असा आपल्ये कल्पनेनें नवीन ग्रंथ रचील किंवा पुढें सांगितले प्रकाराचे ग्रंथ हिंदुस्थानी भाषेंत करील त्यास बक्षीस देण्याविषयीं गवरनर कौंसल यांहीं उदार होऊन या मंडळीस समर्थ केलें आहे.

बक्षीस देण्याचा प्रकार असा आहे कीं बालबोध ग्रंथांचीं भाषांतरें करणारास अथवा नवीन बालबोध ग्रंथाचे करणारास शंभर रुपयांपासून चारशें रुपयांपर्यंत प्रतिपुस्तकीं बक्षीस मिळेल आणि प्रौढ ग्रंथाचीं भाषांतरें करणारास अथवा नवीन प्रौढ ग्रंथांचें करणारांस दोन हजार रुपयांपासून पांच हजार रुपयेपर्यंत बक्षीस मिळेल." [४]

या प्रसिद्धिपत्रकांत कोणत्या विषयावर पुस्तकें पाहिजेत व तीं कोणत्या भाषेंत पाहिजेत याचीहि माहिती दिलेली होती. त्यांत कोश व व्याकरणाचीं पुस्तकें, गणित, ज्योतिष, सिद्ध, कृत्रिम आणि यांत्रिक पदार्थांचें विज्ञान, रसायन, शारीर, वैद्यक, देशवृत्तांत आणि राजनीति इत्यादि विषयांचीं मराठी, गुजराथी व हिंदुस्तानी भाषेंत पुस्तकें मागविलीं होतीं. गणित या विषयावर डॉक्टर हटन याचें बीजगणित, ला क्रुवा (La Croix) याचें मूळ अंकमयत्वा गणित, मूळ बीजगणित, मूळ भूमिती, मूळ त्रिकोणमिति इत्यादि ग्रंथांचीं मराठी व गुजराती भाषांतरें मागविलीं होतीं. जर्व्हिसनें मराठी भाषेंत जीं गणितविषयक पुस्तकें लिहिलीं त्याला हें प्रसिद्धिपत्र अंशतःतरी कारणीभूत झालें असावें. कदाचित् गणित या विषयावर सोसायटीकडे कोणाचीं भाषांतरें न आल्यामुळें हीं गणिताचीं पुस्तकें जर्व्हिसलाच लिहावीं लागलीं असावीं. नेटिव्ह एज्यु.

३ गोविंद नारायण मुंबईचें वर्णन. पृ. २२७-२२८.

४ बॉंबे कूरिअर. ग्रंथांचीं भाषांतरें किंवा नवीन ग्रंथ करणारांस बक्षिसाविषयींचें प्रसिद्धिपत्र, पृ. १ व २.

कॅप्टन मोल्सवर्थच्या सेक्रेटरी असतांना जर्विसनें ज्युनियर सिव्हिल सर्व्हंटच्या परीक्षा-मंडळाचा सभासद व सेक्रेटरी म्हणून मराठी भाषेसंबंधीं जें कार्य केलें, त्याची माहिती मागील प्रकरणांत देण्यांत आलीच आहे.[५]

हें काम करीत असतांना जर्विस दुसरेंहि एक काम करीत होता, तें म्हणजे पुस्तकें छापण्यासाठीं जो छापखाना सरकारनें काढला होता त्यावर देखरेख करून पुस्तकें छापणें हें होय. यासंबंधीं जर्विसनें मुंबईसरकारच्या सेक्रेटरी जेम्स हॅंडरसन यांना लिहिलेलें पत्र उपलब्ध आहे, त्यांत जर्विस लिहितो,

"The Society deems it a great object to obtain a large supply of Mahratha Types, and a new fount of Guzerathee; the latter to be executed like the new Balbodh;..The Society would solicit moreover a lithographic press."[६]

यावरून गुजराती भाषेसाठीं प्रथम नवीन बाळबोध टाइप वापरीत होते, हें दिसून येतें. याशिवाय कलकत्त्यांत बाप्टिस्ट मिशनच्या मि. पियर्स यानें जे बाळबोध टाइप तयार केले होते, ते टाइप जर्विसनें मागवून घेऊन त्याप्रमाणें मुंबईसरकारच्या वळविले.[७] या छापखान्याचा उल्लेख गोविंद नारायणाच्या मुंबई वर्णनांत सांपडतो. तो असाः—

"पुस्तकें वगैरे छापण्याकरितां एक मराठी छापखानाही घातला. या छापखान्याची देखरेख कप्तान जर्विस यास नेमिलें, त्यांनीं हें काम मोठ्याच उत्साहानें चालविलें."[८]

या छापखान्यांत जर्विसनें अनेक पुस्तकें छापून घेतलीं.[९] 'महाराष्ट्र भाषेचा कोश' याच छापखान्यांतून बाहेर पडला.[१०] आपले स्वतःचे गणितविषयक ग्रंथ त्यानें येथेंच छापून घेतले. एवढेंच नव्हे तर सदाशिव काशिनाथ छत्रे व [illegible] यांस मराठी शाळेचें काम तपासण्यास नेमून आणि त्यांच्या हाताखालीं दुसरे कांहीं शास्त्री नेमून बाळमित्र, इसापनीतीच्या अशासारखे शालोपयोगी पुष्कळ ग्रंथ तयार केले. मराठी भाषेंत छापलेलीं हीं पहिलीं पुस्तकें पाहिलीं तर या छापखान्याचें व जर्विसच्या कार्याचें महत्त्व आपणांस सहज पटेल.

---

५ G. D. Vol. 10/143 1827 pp. 459-461; G. D. Vol. 15/168 1828 p. 29 and pp. 77-78, G. D. Vol. 10/187 1829 pp. 335, 345, & 363 D. G. Vol. 11/203 1830. p. 157

६ G. D. Vol. 8/63 1824. p. 93.

७ G. D. Vol. 6/203 1820. p. 282.

८ गोविंद नारायण मुंबईचें वर्णन, पृ. २२८.

९ W. P. Jervis. *Thomas Best Jervis. A Centenary Tribute.* p. 172.

१० G. D. Vol. 6/183 1829 p. 93

जर्व्हिसनें सन १८२२ पासून १८३० पर्यंत नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या सेक्रेटरी म्हणून काम केलें. पुढें इन्स्पेक्टिंग इंजिनियर म्हणून जर्व्हिसची पुण्यास नेमणूक झाल्यानें सोसायटीच्या सेक्रेटरीच्या जागेचा राजिनामा त्यानें दिला व सेक्रेटरी म्हणून रॉबर्ट कॉटन मनी यांची नेमणूक झाली. जर्व्हिस पुण्याला गेला तरी लिथोग्राफिक छापखाना पुण्यास नेण्याची त्याला परवानगी देण्यांत आली. अशा रीतीनें नेटिव्ह एज्युकेशनच्या छापखान्याचें काम त्याच्याकडेच राहिलें.'' इन्स्पेक्टिंग इंजिनियर या कामाबरोबर जर्व्हिसनें सुपरिंटेंडेंट ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन हेंहि काम केलें असें दिसतें. यासंबंधीं 'दर्पण' या पत्रांत माहिती मिळते, ती अशी.—

"Captain George Jervis having returned from the leave of absence granted him on 23rd of July last. is permitted to resume his situation on Superintendent of Public Instruction at Poona."[११]

जर्व्हिसची नेमणूक पुण्यास झाली, याबद्दल नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या कमिटीनें आनंद व्यक्त केला. एवढेंच नव्हे, तर जर्व्हिसनें सोसायटीचें जें एवढें कार्य केलें त्या कार्याचा मोठा गौरव केला.[१२] तसेंच जर्व्हिसच्या कार्याचा गौरव करण्यासाठीं मुंबईतील लोकांनीं तीन हजार रुपयांचें एक तबक त्याला बक्षीस देण्याचें ठरविलें व मुंबईतील प्रमुख अशा चोवीस गृहस्थांनीं हें तबक स्वीकारण्याची जर्व्हिसला पत्रद्वारें विनंती केली.[१३] या चोवीस लोकांत त्याकाळीं प्रसिद्ध असलेल्या अनेकांच्या सह्या आहेत. त्यापैकीं भाऊजी दादजी, जमशेटजी जिजिभाई, फ्रामजी कावसजी, कर्सेटजी माणिकजी, जहांगीर नसरवानजी, या प्रसिद्ध पारशी सद्‌गृहस्थांच्या सह्या असून जगन्नाथ शंकरशेट, सदाशिव काशिनाथ छत्रे यांच्याहि त्यावर सह्या आहेत. हें पत्र लिहितांना त्यांनीं जर्व्हिसच्या कार्याचा आढावा घेऊन या देशातील शिक्षणासाठीं त्याचें काम किती उपयुक्त ठरलें, हें सांगितलें आहे. आणि याबद्दल जर्व्हिसला हें बक्षीस देणें लोकांचें कर्तव्य आहे असें पुढे नमूद केले आहे. या पत्रांत ते म्हणतात:—

"To your unceasing exertions and unabated zeal is the Society chiefly indebted for the erection of the present commodious Buildings appropriated to it's use, on a spot of ground so judiciously selected for general convenience for the

११ G. D. Vol 6/203 1830 p 306

१२ दर्पण, १६ मार्च १८३२, पृ. ४४.

१३ G. D. Vol. 6/203. 1830 p. 309.

१४ याचा उल्लेख कॉमनवेल्थ रिलेशन्स आफीस, लंडन यांच्या आर्‌ २६६।५२ या पत्रांतहि करण्यात आला आहे (paras 3 & 4 of the Public Letter, 23rd June 1830)

publication of numerous and valuable works, written in or translated into the Native languages, for an useful and extensive library of Oriental and English works and more particularly for having induced the Native Princes, Chiefs, and other Gentlemen to create a fund of nearly two lacks and fifty thousand Rupees for producing necessary means of promoting among the native of this country a knowledge of the higher branches of science and literature. Nor ought to omit, among the benefits which the Society has derived from your zeal and abilities, your own translations into Maratha and Goojratee of a complete course of Arithmetic and Mathematics, as taught in Europe; the correctness and utility of which translations have been so gratifyingly testified by the great number of copies which have been already circulated and by the demand which still continues for them."[15]

या चोवीस गृहस्थांच्या सह्यांचें विनंतीपत्र कॅप्टन जर्व्हिसकडे गेल्यानंतर, सरकारनें जर हें तबक स्वीकारण्यास परवानगी दिली तरच त्याचा आनंदानें स्वीकार करतां येईल, असें त्यानें त्यांस उत्तर पाठविलें.[१६] अखेर हें प्रकरण मुंबई सरकारकडे जाऊन मुंबईचा गव्हर्नर माल्कम यानें एक टाचण लिहून, "कॅप्टन जर्व्हिस याची सेवा इतरांपेक्षां भिन्न असल्यामुळें, व सध्यांची शिक्षणपद्धति अंमलांत आणणारा जर्व्हिस हाच पहिला असल्यामुळें, त्याच्या परिश्रमी कार्याबद्दल देशांतील लोकांनीं हें जें बक्षीस देऊं केलें आहे तें कोर्ट ऑफ डायरेक्टरनीं त्यांस मान्यता दिल्यास जर्व्हिसनें स्वीकारावें", असें आपलें मत दिलें;[१७] परंतु बक्षीस स्वीकारण्याची गव्हर्नरनें दिलेली परवानगी कोर्ट ऑफ डायरेक्टरांनीं अमान्य केली.[१८]

नेटिव्ह एज्युकेशनचा सेक्रेटरी असतांना जर्व्हिसनें जीं पुस्तकें लिहिलीं त्याची माहिती नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या रिपोर्टांवरून मिळते. या सोसायटीचा सन १८२५–२६ सालचा तिसरा रिपोर्ट उपलब्ध आहे. त्यांत शिक्षणविषयक पुस्तकांच्या यादींत जर्व्हिसनें लिहिलेलीं पुस्तकें देण्यांत आलीं आहेत. तीं अशी :—

" 1 Gunnit; 1st Part. A system of Arithmetic on the

---

१५ G. D. Vol. 6/203. 1830. p. 328.

१६ *Ibid.*, p. 330.

१७ *Ibid.* p. 332.

१८ याची माहिती कॉमनवेल्थ रिलेशन्स ऑफिस, लंडन यांच्या आर्. २६६१–५२ या पत्रांत देण्यांत आली आहे.
(paras 77 & 78, *Public Despatch*, 16th *March* 1831).

European plan upto Compound Interest. (1st & 2nd Edition).

2. Gunnit; 2nd Part. Fractional & C. to the end of Practical Questions.
3. Tables of Logarithms.
4. Practical Geometry or Bhoomittee. Translated from course compiled by Col. Pasley of the Royal Engineers.
5. Elements of Geometry. Translated from Dr. Hutton's course of Mathematics.
6. Elements of Algebra. Translated from the works of Hutton and Bonnycastle.[१९]
7. Treatise on Plane Trigonometry, and Mensuration of Heights and Distances with Tables of Logarithms, Sines, Tangents.
8. Treatise on Mensuration of Planes and Solids."[२०]

सन १८३६ च्या बाँबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या नवव्या रिपोर्टांत जार्विसच्या पुस्तकांची यादी आहे. त्यांत वरील पुस्तकांचीं नांवें लॉगॅरिदम्, कर्तव्य-भूमिती, आदिकरण भूमिती, बीजगणित, त्रिकोणमिती, अशीं मराठींत दिलीं आहेत. या यादींत शिक्षामाला हें एकच नवीन पुस्तक असून त्याचें वर्णन "A course of Mathematics in 2 volumes" असें करून किंमत १५ रुपये देण्यांत आली आहे[२१]. मागच्या यादींत असलेल्या पुस्तकांत या दोन पुस्तकांचा समावेश केल्यास गणितविषया-वर जार्विसचीं दहा पुस्तकें झालीं. शिक्षामाला हीं पुस्तकें स्वतंत्र नसून पहिल्या खंडांत वर सांगितलेली गणितांचीं दोन पुस्तकें अंतर्भूत असून 'वहिवाटवही व नाण्याच्या तपासणीचें वर्तमान' ह्या दोन स्वतंत्र विषयांचा अंतर्भाव केला आहे. दुसऱ्या खंडांत उरलेलीं पुस्तकें एकत्रित केलीं आहेत. मात्र 'कर्तव्यभूमिति' या पुस्तकाचा समावेश

---

१९ Arith. Integral and Fractional, Practical Geometry and Logarithms या तीन पुस्तकांचें मराठींत भाषांतर केल्याबद्दल जार्विसला ३००० रुपयांचें बक्षीस मिळाल्याचें नमूद आहे. तसेंच Elements of Geometry व Elements of Algebra या दोन पुस्तकांच्या भाषांतराबद्दल ३००० रुपये मिळाल्याचें नमूद आहे. पहा *G. D. Vol.* 18/237. 1831. p 81.

२० *Third Report of the Bombay Native Education Society*, 1825-26. Appendix No. 3 pp. 31-32

२१ *The Ninth Report of the Bombay Native Education Society* 1836 Appendix K. pp 30-31.

थोड्याच दिवसांत झालेला दिसत नाही. या पुस्तकांशिवाय पुढें जर्व्हिसनें प्रो. डी. मॉर्गन यांच्या "The Elements of Arithmetic" व 'The Elements of Algebra" या दोन पुस्तकांचीं मराठींत भाषांतरें केलीं. जर्व्हिसच्या या पुस्तकांसंबंधी दादोबा आपल्या आत्मचरित्रांत लिहितात,

"त्यांणीं त्यावेळेस Hutton's Course of Mathematics या समग्र ग्रंथाचें जगन्नाथशास्त्र्यांच्या साहाय्यानें मराठींत भाषांतर केलें. याचे पूर्णांक, अपूर्णांक, बीजगणित, भूमिति, सिद्धांत, त्रिकोणमिति, लाघवरीत असे सर्व भाग जसजसे तयार होत तसतसे ते तेथेंच शिळाछापावर छापित असत. आणि त्या एक एक भागाचीं निराळीं पुस्तकें शिकून तीं मुलांस शिकवण्याकरितां निवडून देण्याचाहि कारखाना तेथेंच केला होता."[२२]

यावरून प्रथम एका एका भागाची निरनिराळीं पुस्तकें छापण्यांत आलीं. व नंतर हीं सर्व पुस्तकें विभागानुक्रमें एकत्रित करण्यात आलीं, असें दिसतें. जर्व्हिसनें गणित या विषयावर सात पुस्तकें भाषांतरित केल्याचा उल्लेख "T. B. Jervis" या पुस्तकांतहि आढळतो. तो असा :—

"We know of seven volumes on mathematics translated by Colonel George Jervis into Marathi, and eleven into Gujarati."[२३]

जर्व्हिसची जीं पुस्तकें आम्हां मिळवतां आलीं त्यांची तपशीलवार माहिती पुढें देण्यांत येत आहे :

१. ग्रंथांचीं भाषांतरें किंवा नवीन ग्रंथ करणाराम यांच्याविषयींचें प्रसिद्धिपत्र मुंबई, १८२५. पृष्ठें इंग्रजी १४+२०+२०.[२४]

इंग्रजी, मराठी व गुजराती या तीन भाषांत हें प्रसिद्धिपत्र छापलें आहे. वर्णाचे नियम, अपेक्षित विषय व इंग्रजी ग्रंथांच्या याद्या दिल्या आहेत. यांतील कांहीं नियम मागें देण्यांत आले आहेतच.

२. गणितकृति अथवा गणितमार्ग : मुंबई, १८२६. पृष्ठें १२५. (आवृत्ति २ री)[२५]

या पुस्तकाच्या आरंभींच मुखपृष्ठावर पुढील मजकूर आढळतो.

"या पुस्तकाचा कर्ता अव्वल डाक्तर हटन त्या पुस्तकाचें भाषांतर जार्ज जार्विस साहेब इंजिनेर सर्कार इंग्रेज मुंबई यांणीं जगन्नाथ शास्त्री क्रमवंत यांचे साहाय्यानें

२२ अ. का. प्रियोळकर–रावबहादुर दादोबा पांडुरंग (आत्मचरित्र व चरित्र). पृ. ७४–७५,

२३ W. P. Jervis. *Thomas Best Jervis—A Centenary Tribute*. p 184.

२४ मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील दोल्लामुद्रितें पृ. २.

२५ तत्रैव. पृ. ३. ( हें पुस्तक महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथेंहि आहे. )

महाराष्ट्र भाषेत केलें. मुंबई शके १७४७. इंग्रेजी सन १८२६. छापण्याची दुसरी आवृत्ति."

जर्व्हिसचा हा मराठी भाषेत भाषांतर करण्याचा पहिलाच प्रयत्न असल्यामुळे त्याला जगन्नाथशास्त्री यांचें साहाय्य घ्यावें लागलें, असें दिसतें. हटनच्या पुस्तकाचें भाषांतर करताना इंग्रजीला संस्कृत भाषेतील प्रतिशब्द दिले आहेत. यासंबंधीं जर्व्हिस म्हणतो,

"हा गणितमार्ग महाराष्ट्र भाषेत दाखवितो. यांत कितेक पदार्थांचीं नावें या भाषेत अप्रसिद्ध आहेत त्यांस संस्कृत शब्देंकरूनच लिहिलीं आहेत व या मुलकाचे व्यवहारांत अनेक भाषांचे शब्द येतात. परंतु यांत बहुतकरून महाराष्ट्र शब्दच लिहितो."

या पुस्तकाच्या शेवटीं "प्रथम भाग समाप्त" असें जर्व्हिस म्हणतो. कदाचित् भाग १ ला असें जें नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या रिपोर्टांत पुस्तकाचें नांव व माहिती दिली आहे, ती याच पुस्तकाविषयीं असावी. हें पुस्तक प्राथमिक शाळेंतील विद्यार्थ्यांकरितां लिहिलें असावें इतकें तें सोपें आहे.[२८]

३. गणित दुसरा भाग अपूर्णांक (A Maratha Treatise on Arithmetic) मुंबई, १८२६. पृ. २४७.

या पुस्तकाचें वर्णन मुखपृष्ठावर पुढीलप्रमाणें आढळतें: "गणितमार्ग—या मूळ पुस्तकाचा कवि व्हजम डाक्टर हटन त्या पुस्तकाचें भाषांतर जार्ज जार्विस साहेब इंजनेर सर्कार इंग्रेज बहादूर मुंबई यांनि जगन्नाथशास्त्री क्रमवंत यांचे साहाय्यानें महाराष्ट्र भाषेत केलें. मुंबई शके १७४८ इंग्रेजी सन १८२६. हे पुस्तक छापण्याची ही प्रथमावृत्ती बापू गंगाधर जोशी चिपळोणकर याचे हातानें लिहून दगडावर छापिली."

या पुस्तकाची सुरवात "हा अपूर्णांक गणितमार्ग महाराष्ट्र भाषेत दाखवितो." अशी करून महाराष्ट्र शब्दांसंबंधीं मागच्या पुस्तकाप्रमाणेंच लिहिलें आहे.

या पुस्तकाप्रमाणेंच "अंकगणित दुसरा भाग अपूर्णांक" या नांवाचें एक

२८ जर्व्हिसनें भाषांतर केलेलें 'पूर्णांक' (Purnank) या सन १८६३ मध्यें प्रसिद्ध झालेल्या पुस्तकाची माहिती कॅटलॉगवरून मिळते ती अशी:—

"Purnanka—Arithmatic of Integers (School Book) Poona 1863." पहा: Sir A Grant *Catalogue of the Native Publications in Bombay Presidency* (2nd Edition). p 94 हें पुस्तक उपलब्ध नसल्यामुळें वरच्या पुस्तकाची आवृत्ति आहे की काय तें समजत नाहीं. मात्र 'अंकगणित प्रथम भाग पूर्णांक-पुणें, ज्ञानप्रकाश छापखाना १८५२' पृष्ठ १३६ (अपूर्ण) हे पुस्तक महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें आहे.

पुस्तक पुणें विश्रामबाग वाडा येथें सन १८८० मध्यें छापलेलें आढळतें. या पुस्तका-वर सूचना आहे ती अशीः—

" जार्ज जार्विस साहेब यांनीं केलेला जो अपूर्णांक ग्रंथ त्याच्या आधारानें व कांहीं अन्य ग्रंथाच्या आधारानें हा ग्रंथ विद्याभ्यास करणारे मुलांसाठीं केला आहे. "

यावरून हें पुस्तक बर्डिमच्या पुस्तकाच्या आधारानें पाठशाळेंतील शास्त्री-पंडितांनीं तयार केलें असावें. यांत १७० पृष्ठें आहेत.

गणित विषयावरचें तिसरें एक पुस्तक उपलब्ध असून त्याचें नांव " अंकगणित दुसरा भाग अपूर्णांक " (Arithmetic Part II Apurnank) असें असून यावर " तिसरी आवृत्ति-मुंबई, सन १८५८ " असें लिहिलेलें आहे.[२७] यांत १७१ पृष्ठें आहेत. या पुस्तकावर पुढीलप्रमाणें माहिती देण्यांत आली आहेः—

" शिक्षामाला ह्या नांवाचें पुस्तक मेहरबान जार्ज जार्विस साहेब त्यांनीं मराठी भाषेंत उतरलें. त्यांतील हा अपूर्णांक भाग फेरफार केल्यावांचून घेतला आहे. "

यावरून शिक्षामाला खंड १ यांतील व्यवहारी अपूर्णांकावरून हें पुस्तक तयार केलेलें दिसतें.

४. कर्तव्यभूमिती. मुंबई, शके १७४८. पृ. १७२.

हें पुस्तक महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें आहे. या पुस्तकाची माहिती सुरवातीस पुढीलप्रमाणें देण्यांत आली आहेः—

"या पुस्तकाचा कवि अलजम कार्नेल पेडली साहेब इंजनेर त्या पुस्तकाचें भाषांतर जार्ज जार्विस साहेब इंजनेर सर्कार इंग्रेज मुंबई यांणि जगन्नाथशास्त्री क्रमवंत यांचे साहाय्यानें महाराष्ट्र भाषेंत केलें."

याच्या शेवटीं "प्रथम भाग समाप्त" असें लिहिण्यात आलें आहे. त्यावरून या पुस्तकाचा दुसरा भाग लिहिला गेला असावा.

या पुस्तकाचा उल्लेख नेटिव्ह पब्लिकेशनच्या कॅटलॉगांत "कर्तव्य भूमिति (Kartavye Bhumiti) 1826. pp. 143," असा संपादकानें केला असून[२८] दुसरीक

---

२७ ' अपूर्णांक ' या बर्डिमनें भाषांतरित केलेल्या सन १८६३ मधील पुस्तकाच माहिती कॅटलॉगमध्यें मिळते ती अशी:—"Apurnanka—Sub: Arithmetic of Fractions. Poona. 1863. pp 100." पहा—*Catalogue of the Native Publications in Bombay Presidency* (2nd Edition) p. 38. हें पुस्तक उपलब्ध नाहीं.

२८ *Catalogue of the Native Publications in Bombay Presidency* p. 72.

"Practical Geometry 1826. pp. 173" असाहि निर्देश केला आहे;[२९] परंतु एकाच पुस्तकाचा उल्लेख चुकून दोन ठिकाणीं झाला आहे असें दिसतें. हें पुस्तक जर्व्हिसनें मुंबई सरकारकडे परीक्षणार्थ पाठविलें, त्यावेळीं मुंबई सरकारचा सेक्रेटरी लम्सडेन याला ता. २५ मे १८४९ रोजीं लिहिलेल्या पत्रांत या पुस्तकाचा उल्लेख आहे.[३०] या पुस्तकाबरोबर जर्व्हिसनें गणित भाग १ व २ हीं पुस्तकें पाठविलीं होतीं. मुंबई सरकारनें हीं सर्व पुस्तकें अभिप्रायासाठीं त्यावेळचे गणिताचे प्रोफेसर जोसेफ पॅटन याजकडे पाठविलीं.[३१] या पुस्तकावर पॅटननें कोणतेंच मत व्यक्त केलें नाहीं. यामुळें असो अगर इतर कांहीं कारणांमुळें, या पुस्तकाची नवीन आवृत्ति निघालेली दिसत नाहीं.

५. शिक्षामाला. (A Course of Mathematics in the Maratha Language) मुंबई १८२७.[३२]

या नांवाचें पुस्तक जर्व्हिसनें १८२७ मध्यें लिहून प्रसिद्ध केलें. याचे सात भाग आहेत. या पुस्तकावर "शिक्षामाला—महाराष्ट्र भाषेंत—यात बीजगणित, लाग्राम, आदिकरण भूमिति, बीजभूमिति, संगतीकरण सरळरेष, त्रिकोणमिति, भूमापन आणि लाग्रतमाचे कोष्टक. याचें मूळ पुस्तक इग्रजी भाषेंत आहे. त्याचा कवि डाक्तर चार्लस हटन त्या पुस्तकाचें भाषांतर कपाटन जार्ज जार्विस साहेब इंजनेर यांणीं महाराष्ट्र भाषेंत केलें. मुंबई १८२७" असें लिहिलेलें आढळतें.

या शिक्षामालेचा पहिला भाग बीजगणित (Elements of Algebra) हा आहे. यांत पहिल्या प्रकरणाच्या आरंभीं जर्व्हिसनें "श्री" घातली आहे. या मंगलसूचक 'श्री' नें सुरुवात केल्यामळें पुष्कळ युरोपियन लोकांचा राग जर्व्हिसवर झाला होता. त्यापैकीं एक मिशनरी जर्व्हिसच्या या पद्धतीबद्दल पुढील उद्गार काढतात:—

" ...some of them, (books) which are advertised and translated by Europeans, bear on their titles a dedication to a heathen goddess, and from their contents appear a suitable offering to such a divinity."[33]

यावरून आपण एवढें समजावयास हरकत नाहीं कीं जर्व्हिसनें मराठी भाषा व शब्द यांबरोबरच हिंदुधर्माच्या कांहीं पद्धति उचलल्या होत्या. या पुस्तकाची १९ प्रकरणें असून एकंदर २३४ पृष्ठें आहेत.

२९ *Ibid*. p. 92.

३० D. P. I. *Board of Education. Government*. *1849* p. 247

३१ Ibid. p. 254

३२ मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील दोलामुद्रितें. पृ. २.

३३ *The Oriental Christian Spectator, Bombay*. March 1833 p. 115.

बीजगणितानंतर शिक्षामालेचा लाग्रतमें (Logrithms) हा दुसरा भाग आहे. यांत सात प्रकरणें असून २७ पृष्ठांत हा भाग संपविला आहे.

शिक्षामालेचा तिसरा भाग "भूमितीचें आदिकारण" (Elements of Geometry)[२४] हा असून यांत २१७ पृष्ठें आहेत. यांत व्याख्या, सिद्धांत व कृत्यें (Problems) दिलेलीं आहेत.

शिक्षामालेचा चौथा भाग "बीजगणिताचे भूमितीशीं संगतीकरण" (Application of Algebra to Geometry) असा असून याची एकंदर ३१ पृष्ठें आहेत. यांत बीजगणित भूमितीवर लागतें याची रीति फक्त दिली आहे.

शिक्षामालेचा पांचवा भाग "सरल रेष त्रिकोणमिति" (Plane Trigonomentry) हा आहे. याची ५७ पृष्ठें असून यांत दोन कृत्यें, चार सिद्धांत व त्यावरचीं उदाहरणें दिलीं आहेत.

या पुस्तकाचा सहावा भाग "भूमापन" (Mensuration) हा आहे. यांत दोनच प्रकरणें आहेत. पहिलें प्रकरण क्षेत्रफळ व दुसरें घनफळ होय. या दोन प्रकरणांत क्षेत्रफळाची व घनफळाची माहिती सांगून ४९ पृष्ठांत हा भाग संपविला आहे.

शिक्षामालेच्या सातव्या प्रकरणांत "कोष्टक लाग्रतमांचें इत्यादि" (Tables of Legarithms) दिलेले असून त्याची ४९ पृष्ठें आहेत.

जर्व्हिसनें शिक्षामालेचा महाराष्ट्रभाषेत केलेला ग्रंथ अशा तऱ्हेचा आहे. या ग्रंथावरून आरगांस त्याच्या मराठी भाषाभिमानाच्या अन्यान्य गोष्टी दिसून येतात. जर्व्हिसनें हा ग्रंथ लिहितांना भास्कराचार्यांच्या लीलावतीचा अभ्यास केलेला होता, हें या पुस्तकाच्या आरंभीं 'यावत् तावत्' चा उल्लेख केला आहे, त्यावरून दिसून येतें. गणिताधारख्या शास्त्रांत मराठीतील नवे पारिभाषिक शब्द योजून गणित तयार करणारा कॅप्टन जर्व्हिस हा पहिलाच माणूस होय." त्यांची देशभाषेवर फार आवड होती, "[२५] अशा शब्दांत दादोबांनीं जर्व्हिसला गौरविलें आहे. दुसराहि एक विशेष या शिक्षामालेंत दिसतो. ज्या ठिकाणीं इंग्रजी शब्दाना मराठी शब्द योजता आले नाहींत त्या ठिकाणीं जर्व्हिसनें तेच इंग्रजी शब्द कायम ठेविले आहेत, हें लाग्रतंम, स्फोटम, कुरली, लिम या व दुसऱ्या अनेक शब्दांवरून दिसून येण्यासारखें आहे. त्यावरून एवढेंच

---

२४ याचा उल्लेख 'Bhumiti, Elements of Geometry (course of Mathematics, Vol. II, pt III) pp 217, Bombay, 1827." असा केलेला आहे पहा.
*Catalogue of the Library of the India Office* Vol II Part V. p. 92.

२५ अ. का. प्रियोळकर, रावबहादुर दादोबा पांडुरंग (आत्मचरित्र व चरित्र). पृ. ७२.

म्हणतां येईल कीं, त्या काळीं शास्त्रीय विषयांतील असे मराठी शब्द तयार नव्हते. ते हळू हळू बनत होते. त्यामुळेंच जर्व्हिसला ज्या ठिकाणीं मराठी भाषेंतील व संस्कृत भाषेंतील शब्द या शब्दांना प्रतिशब्द म्हणून घेतां आले नाहींत, तेथें त्यानें इंग्रजी शब्द कायम ठेविले. या विषयीं हैंदशाळेच्या प्रसिद्धिपत्रकांत ग्रंथाचें भाषांतर कसें करावें या संबंधांत स्पष्ट दिग्दर्शन करणारा नववा नियम दिला आहे तो असा :—

"जा तिहीं चोल्यामध्यें ग्रंथांचीं भाषांतरें अथवा नवीन ग्रंथ करायास सांगितले आहेत त्यांत जी देशभाषा सर्व लोक समजतात ती ग्रंथास घ्यावी. प्रौढ भाषेचे शब्द घालून दाटून अवघड करू नये. आणि जर त्या भाषेंत हावेत तसे शब्द मिळत नाहींत तर ते त्याच्या मूळभाषेंतून घ्यावे. ते असे कि मराठी व गुजराथी यांस संस्कृतांतून आणि हिंदुस्तानीस असल पारसींतून शब्द घ्यावे. कदाचित् देशभाषेंत किंवा मूळ भाषेंतहि जा अर्थास रूढ अथवा यौगिक शब्द लागत नाहींत तेथें इंग्रेजी शब्दही घेतल्यास चिंता नाहीं."[३६]

जर्व्हिसनें दिलेल्या या नियमाप्रमाणें त्यानें स्वतःच गणितविषयक पुस्तकांचीं भाषांतरें केलीं, हें यावरून दिसून येणार आहे. हा नियम करण्यांत इंग्रजी पुस्तकांचीं मराठी भाषांतरें करतांना सर्व भर देशी भाषेवरच दिला पाहिजे, हा हैंदशाळेचा हेतु किती स्तुत्य होता, हें स्पष्ट समजून येतें.

६. शिक्षामाला. (A Course of Mathematics in the Maratha Language. Vol. I.) मुंबई, १८२८. पृष्ठें ४७०.

या पुस्तकासंबंधीं जी माहिती मुखपृष्ठावर दिली आहे ती अशी :—

"शिक्षामाला महाराष्ट्रभाषेंत प्रथम जांत गणित बहिर्वाटबहि आणि नाण्याचें तपासणीचें वर्तमान यांची मूळ पुस्तकें इंग्रजी भाषेंत आहेत त्याचे कवि डाक्तर चार्लेस हट्टन आणि जान्नि कास्टेवल साहेब त्या पुस्तकाचें भाषांतर कप्तान जार्ज जार्विस इंजनेर याणी महाराष्ट्र भाषेंत केलें. दगडावर छापलें. मुंबई १८२८."

वर दिलेल्या पुस्तकाच्या माहितीवरून या पुस्तकांत गणित, बहिर्वाटबहि व नाण्याचें तपासणीचें वर्तमान असे तीन विषय आहेत, हें दिसून येईल. एकंदर पृष्ठे ४७० असून नाण्याचे तपासणीचें वर्तमानाचा मोठा तक्ता शेवटीं जोडला आहे.

७. बीजगणित. पुणें, १८४३ (शके १७६४). पृष्ठे २४८.

ह्या पुस्तकाचा परिचय मुखपृष्ठावर पुढीलप्रमाणें करून देण्यांत आला आहे.

"याचें मूळ पुस्तक इंग्रजी भाषेंत आहे. त्याचें भाषांतर पूर्वी कप्तान जार्ज

३६ ग्रंथांचीं भाषांतरें किंवा नवीन ग्रंथ करणारांस पश्चिमविषयीचें प्रसिद्धिपत्र. पृ. ५ व ६.

जर्विस साहेब यांनी महाराष्ट्रभाषेत केलें, त्या भाषांतराची ही पुनरावृत्ति पाठशाळा खाता विश्रामबाग येथील छापखान्यांत छापिली "

शिक्षामालेंत बीजगणित हा जो पहिला भाग आहे, त्या भागांतील विषय व प्रकरणें या पुस्तकांत आहेत. मात्र शिक्षामालेंत २३४ पृष्ठें असून या पुस्तकाची २४८ पृष्ठें आहेत.

या पुस्तकाच्या सन १८४८ ची व १८५६ सालची अशा दोन आवृत्त्या महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें आहेत. यांतील सर्व प्रकरणें वरच्या पुस्तकाप्रमाणेंच आहेत. पण या पुस्तकांवर आवृत्ति कितवी याचा निर्देश केला नाहीं.

८. बीजगणित मूलपीठिका. (De Morgan's Elements of Algebra) पुणें. १८४८. पृष्ठें ३८६.[३७]

द मार्गन यांच्यावरील पुस्तकाचें मराठींत भाषांतर विष्णु सुंदर छत्रे, गंगाधरशास्त्री फडके आणि गोविंद गंगाधर फडके यांच्या साहाय्यानें जर्विसनें केल्यानें मुखपृष्ठावर नमूद करण्यात आलें आहे. हें पुस्तक त्यावेळच्या मुंबईच्या गव्हर्नर जॉर्ज रसेल क्लार्क यांना जर्विसनें अर्पण केलें आहे. या पुस्तकाला जी अर्पणपत्रिका जर्विसनें लिहिली आहे तिच्यावरून त्यावेळचे सरकारी अधिकारीसुद्धा युरोपियन शास्त्रांचें ज्ञान देशी भाषेतून द्यावें या मताचे होते, असें स्पष्ट दिसतें. कारण या अर्पणपत्रिकेंत जर्विस म्हणतो,

"To the Honorable George Russell Clerk, . . . who considers that the introduction into India of European knowledge and modern science, by translation from the languages of Europe into the languges of the East, is the true basis on which the Education of the mass of the Native population should be founded, this translation into Marathi of Professor De Morgan's pre-eminently lucid treatise on the elements of Algebra, is, dedicated, by . . . George Ritso Jervis."[३८]

या बीजगणिताचें तेरा अध्याय असून आरंभीं बीजगणिताचें विवरण देऊन शेवटीं गणितक्रिया सोपी करण्यासाठीं लघुतम कामात रीतीविषयीं माहिती दिली आहे.

---

३७ मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील ग्रंथसूचि पृ १५.

३८ या जर्विसच्या मताचा उल्लेख अर्किन पेरीनें आपल्या भाषणांत केलेला आढळतो. जेम्स मिल्स (भाषांतरकार) भाषण. मुंबई येथील शिक्षामंडळीचें रिपोर्ट तारीख २५ मार्च एप्रिल सन १८४८ चे दिवशीं सर अर्स्किन पेरी यांनी केलें, पृ. १५.

सन १८५१ मध्यें हें पुस्तक प्रसिद्ध झाल्याचा उल्लेख नेटिव्ह पब्लिकेशनच्या कॅटलॉगमध्यें आढळतो.[३९]

९. आदिकरण भूमिति. (Elements of Geometry) मुंबई १८४९. पृष्ठें १९६. (आवृत्ति तिसरी.)

या पुस्तकाच्या मुखपृष्ठावर जी माहिती देण्यांत आली आहे ती अशी :—

"याचें मूळ पुस्तक इंग्रजी भाषेत आहे. त्याचा कर्ता डाक्तर चार्लस हट्टन त्या पुस्तकाचें भाषांतर मार्जा क्यापटन जार्ज जर्विस साहेब इंजिनेर यांणीं महाराष्ट्रभाषेत केलें. आवृत्ति तिसरी मुंबई १८४९."

हें पुस्तक शिक्षामालेच्या तिसऱ्या भागांत भूमितीचें जें पुस्तक आहे तसेंच आहे; परंतु पृष्ठसंख्येंत बदल आहे. शिक्षामालेच्या भूमितीची एकंदर पृष्ठें २१७ आहेत. तर या पुस्तकाचीं १९९ आहेत. तसेंच शिक्षामालेंत 'भूमितीचें आदिकरण' असें नांव दिलें आहे, तर या पुस्तकाचें नांव वर लिहिल्याप्रमाणें 'आदिकरण भूमिति' असें आहे.[४०]

१०. अंकगणिताचा मूळपीठिका. (De Morgan's Elements of Arithmetic) मुंबई, १८५०. पृष्ठें २८०.

हें पुस्तक म्हणजे ड मार्गन याच्या वरील पुस्तकाचें जर्व्हिसनें केलेलें भाषांतर होय. जार्व्हिसनें हें भाषांतर छत्रे, गंगाधरशास्त्री फडके, व गोविंद फडके यांच्या साहाय्यानें

३९ हा उल्लेख असा आहे," "Bijaganit—Algebra (De Morgan's 1851 pp. 400) पहा. *Catalogue of the Native Publications in Bombay Presidency*. p 43.

४० याला व म. म. पोतदार 'अधिकरण भूमिति' असें चुकीचें नांव देतात. पहा. द वा. पोतदार. मराठी गद्याचा इंग्रजी अवतार (आवृत्ति १ ली) पृ १६. नेटिव्ह पब्लिकेशनच्या कॅटलॉगमध्यें याचा प्रसिद्धिकाल १८५५ दिला आहे ही पुढची आवृत्ति असावी. पहा. *Catalogue of the Native Publications in Bombay Presidency*. याच पुस्तकामध्ये 'Bhumiti' असा या पुस्तकाचा उल्लेख केला आहे. पहा.— *Ibid* p. 46 तसेंच 'Bhumiti' असा उल्लेख J F Blumhardt च्या *Catalogue of the Library of India office* Vol II. Part V p. 92 वर केला आहे परंतु हे दोन्ही उल्लेख चुकीचे दिसतात कारण नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या १८२५–२६ च्या रिपोर्टांत कर्नल पेरॉन्च्या Practical Geometry बद्दल 'Bhoomittee' हा शब्द उपयोगांत आणला आहे, हें मागें देण्यांत आलेंच आहे.

वेगवेगळीं पुस्तकें आहेत त्यांचीं भाषांतरें जशीं जशीं तयार होतील तशीं छापून प्रसिद्ध केलीं जातील." ४७

या माहितीवरुन अशा तऱ्हेच्या उपयोगी ज्ञानाची जीं कांहीं इंग्रजी भाषेत पुस्तकें होतीं, त्यांचीं भाषांतरें मराठींत करण्याचा जर्व्हिसचा हेतु दिसून येतो.

पाश्चात्य शास्त्रांचें ज्ञान एतद्देशीय लोकांच्या भाषांत देण्यांत यावें असें जर्व्हिसचें मत होतें. या विषयावर बोलतांना सर अर्स्किन पेरी यानें जर्व्हिसच्या मताला पाठिंबा दिला आहे. तो असाः—

"Translations of well prepared school books, and of useful treatises on various branches of knowledge are most desirable, perhaps essential, for the—improvement of active education in tongues so unendowed with literature as Marathi, Gujarathi and Canarese."[४८]

जर्व्हिसनें गणितविषयक व उपयोगी ज्ञानाचीं जीं कांहीं पुस्तकें भाषांतर केलीं त्याचें कारण तत्कालीन लोकांची वरीलप्रमाणें विचारसरणी होती हेंच असावें. त्याच्या या प्रयत्नाबद्दल 'दर्पण' पत्रानें सुद्धां समाधानाचें उद्गार काढले आहेत. भाषांतराच्या कार्यांत जर्व्हिसनें जी प्रगति केली, त्याबद्दल दर्पणमधील पुढील उतारा उपयुक्त होईल. पहाः—

"त्यांणीं सर्व लोकांस शिकवायाचें जें मनांत कार्य धरिलें आहे तें साध्य होण्याकरितां जी रीति चालविली आहे ती सर्वांत उत्तम आहे. तीमध्यें दुसरा हा गुण आहे कीं जा पदार्थांचे बोधक शब्द देशभाषांत नाहीं, ते शब्द आंत आल्यानें तिच्या योगानें देशाचा भाषा परिपूर्ण होतात आणि चागले रूपास येतात. अशी गोष्ट कांहीं काळानें घडेल हें जाणी जाणी येथील पूर्वीचे सरकारी कपतान जार्विस साहेब यांणीं दोन वर्षापूर्वी केलेली लॉर्ड ब्रहम साहेबाचे विद्योपदेशाची मराठी आणि गुजराथी भाषांतरें पहिली असतील, तें नाहीं म्हणणार नाहींत. त्या प्रथात गणित, शिल्प, रसायण, दर्शनानुशासन आणि सृष्टिविज्ञानाचे दुसरे भाग यांचे विषय आहेत. म्हणोन वाचणारास नव्या गोष्टी बहुत समजतात आणि नवे शब्दाचा परिचय होतो. जा शब्दाचा अर्थ त्या प्रथाचे शेवटीं कोश केला आहे त्यांत यथास्थित समजाया जोगा लिहिला आहे परंतु त्याच जातीचे आणि तसेच उपयोगी ग्रंथ मंडळीचे छापखान्यांत बहुत छापले आहेत आणि दुसरे तयार होत आहेत त्यातला हा एक." ४९

४७ बॉंबे कारिअर. विद्येचे उद्देश लाभ आणि संतोष. पृ १९९

४८ *The Oriental Christian Spectator*, Bombay p 199 "Speech at the Annual Examination of the Elphinstone Institute, at Bombay, April 25, 1848

४९. दर्पण. १६ मार्च १८३२. पृ.४५.

वरील उताऱ्यावरून मराठी भाषेत, जर्व्हिसनें केलेल्या कार्याचें महत्त्व आपणांस सहज दिसून येईल. जर्व्हिसच्या गणितविषयक पुस्तकाबद्दल कँडीनें जो अभिप्राय दिला होता तो जर्व्हिसनें एका पत्रांत उद्धृत केला आहे. तो असा :—

"Your work will I doubt not be much praised by native scholars, who have a taste for arithmetic and mathematics, and it will be very valuable as teaching them to think deeply, and to acquire a perfect knowledge of the principles of science."[50]

या उताऱ्यात जर्व्हिसच्या गणितविषयक पुस्तकांची ज्या एतद्देशीय पंडितांनीं स्तुति केली म्हणून उल्लेख आला आहे ते पंडित म्हणजे मोरेश्वरशास्त्री व शंकर जोशी होत. या पंडितद्वयाचें मतहि या पत्रांत पुढीलप्रमाणें नमूद करण्यांत आलें आहे :—

"We have gone through your works, and have found that the subject is grand and of very considerable importance, and that it imports great pleasure to the reader. These works have been prepared by you solely for the benefit of the natives of his country. You are capable of eliciting new and extensive ideas upon mathematical subject; while on the other hand, we with our limited knowledge of that science can only look on and admire. It is our great hope to read and study your books with deep meditation and thereby crown your labours with success."[51]

जर्व्हिसनें गणितविषयक लिहिलेल्या पुस्तकांच्या योग्यतेविषयीं वर काहीं युरोपीयन व एतद्देशीय लोकांचे अभिप्राय नमूद करण्यात आले आहेत. या वाङ्मयाप्रमाणें शिक्षणक्षेत्रांत त्यानें जे कार्य केलें त्याबद्दलहि असेच काहींचे उद्गार देणें योग्य ठरेल. एल्फिन्स्टननें नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीची स्थापना केल्यानंतर, एतद्देशीय लोकांच्या शिक्षण देण्याच्या कामात त्याला जर्व्हिसचें साहाय्य पुष्कळ झालें. यासबंधीं अर्स्किनला ता. १५ नोव्हेंबर १८२६ रोजी लिहिलेल्या पत्रात एल्फिन्स्टन जर्व्हिसविषयीं म्हणतो,

"…. .In the meantime we have got a most zealous advocate for education (Captain Jervis, of Engineers), in a situation which gives him a sort of superintendence of our arrangements for improving it."[52]

---

५० *D P I. Board of Education.* Government 1849. p. 240. (Back side)

५१ *Ibid*, p. 241

५२ Sir T. E Colebrooke. *Life of the Honourable Mountsturt Elphinstone.* Vol II. p 189.

जर्व्हिसच्या शिक्षणकार्याचा गौरव करणारे, कॅंडीचेंहि एक पत्र उपलब्ध आहे. त्यांतील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणें आहे :—

"To promote the cause of Education, I give you full credit for having been a most zealous labourer. Indeed the cause of education in our Presidency owes more to you than to anyone else."[53]

जर्व्हिसची देशभाषेवर आवडत होती असें जे दादोबानीं लिहिल्याचें मागें म्हटलें आहे,[54] त्यासंबंधीं एक गोष्ट उपलब्ध आहे. ती म्हणजे जर्व्हिसनें आपल्या पदरच्या खर्चानें गणित विषयाचीं कांहीं पुस्तकें छापून प्रसिद्ध केलीं होतीं ही होय. याविषयीं मुंबई सरकारला रिपोर्ट सादर करतांना तो म्हणतो,

"450 copies of the Marathi Treatise of Algebra, published at my own expence and now taken by Government at the actual outlay incurred viz. Rs. 750."[55]

'जर्व्हिसच्या वाङ्मयविषयक व शिक्षणविषयक कार्याविषयीं ही माहिती मिळते; पण त्याची वैयक्तिक अशी फारशी माहिती आढळत नाहीं. त्याचा धाकटा बंधु लेफ्टनंट कर्नल टी. बी. जर्व्हिस याचें चरित्र उपलब्ध आहे. त्यांत जॉर्ज जर्व्हिसचा आत्मपर खालील निर्देश आहे :—

"In 1829 I was placed in charge of the Government Lithographic Establishment, the Educational Society and Engineer Institute The Examination I held of this latter before the judges of the Supreme Court, the Governor and Commander-in-Chief, led the government to confide to me (at a subsequent period) the future examination of those educated at that institution."[56]

जर्व्हिसची चरित्रविषयक माहिती प्रारंभींच देण्यांत आली आहे. त्याची वैयक्तिक माहिती थोडीच मिळते, अर्थात् त्याचें विस्तृत चरित्र देण्याचा येथें उद्देश नाहीं. विशेषतः जर्व्हिसनें एल्फिन्स्टनच्या प्रेरणेनें गणितविषयक पुस्तकें लिहून मराठी वाङ्मयविषयक कार्य व शिक्षणकार्य केलें त्याचीच सविस्तर माहिती देण्याचा प्रयत्न या ठिकाणीं केला आहे.

---

५३ *D. P I Board of Education* Government 1849 p 246. (Back side)

५४ अ. का. प्रियोळकर. रावबहादूर दादोबा पांडुरंग (आत्मचरित्र व चरित्र). पृ. ७३.

५५ *D P I Board of Education* 1449. p 235.

५६ W. P. Jervis. *Thomas Best Jervis*—A Centenary Tribute, p 33

## मोल्सवर्थपूर्व कोशनिर्मितीचे प्रयत्न

मुंबई इलाख्यांत जे सिव्हिल सर्व्हंट व लष्करी खात्यांतील अधिकारी मराठी भाषेचा अभ्यास करूं लागले, ते या भाषेच्या अभ्यासासाठीं व्हॅन्स केनेडी यांचा शब्दकोश उपयोगांत आणीत असत, असा मागें एका प्रकरणांत उल्लेख करण्यांत आला आहे. मात्र व्हॅन्स केनेडीचा कोश प्रसिद्ध होण्यापूर्वीहि मराठी कोशनिर्मितीचे प्रयत्न झाले होते.

अशा तऱ्हेचा मुंबई इलाख्यांत शब्दकोशाचा किंवा शब्दसंग्रहाचा प्राथमिक स्वरूपाचा प्रयत्न ज्यानें केला, असा पहिला युरोपियन गृहस्थ म्हणजे डॉ. रॉबर्ट ड्रूमंड हा होय. रॉबर्ट ड्रूमंड हा कॉर्पोरेशन ऑफ सर्जनचें सर्टिफिकेट (C. C. S) सन १७९२ मध्यें मिळवून मुंबई इलाख्यात १७९३–९४ मध्यें आला. प्रथम सर्जन-मेट म्हणून काम केल्यानंतर, मुंबईचा असिस्टंट सर्जन म्हणून सन १७९७ मध्यें त्याची नेमणूक झाली. इ. स. १८०० मध्यें ॲबर्डीन येथील किंग्ज कॉलेजमधून तो एम्. डी. झाला व १८०३ मध्यें सर्जन म्हणून त्याला नेमण्यात आलें. १८०९ मध्यें 'लेडी जेन डडास' या बोटींतून इंग्लंडला जात असतां तो मरण पावला.[1] (*Service Army List-–Medical—Bombay*. Vol. 2 आणि Extracts from Crawford's "*Roll of the I.M.S.*"—1615-1930). याचें "Illustrations of the Grammatical Parts of Guzerattee, Mahratta and English Languages", हें पुस्तक इ. स. १८०८ मध्यें कुरियर छापखान्यातून छापून प्रसिद्ध झालें. हें पुस्तक मुंबई येथील रॉयल एशियाटिक सोसायटीच्या ग्रंथालयात आहे. मुख्यतः हें पुस्तक व्याकरणाचेंच आहे; परंतु यात ४५० शब्दांचे अर्थ ड्रूमंडनें दिले आहेत. शब्दसंख्येवरून पाहतां याला शब्दकोश म्हणण्याऐवजीं शब्दसंग्रह असे म्हणणेंच योग्य ठरेल. ड्रूमंडनें ह याला Glossary असेंच म्हटलें आहे. शब्दकोशाची निर्मिति होण्यापूर्वीं शब्दसंग्रह तयार करण्याच्या त्याच्या या प्रयत्नाला थोडेंफार तरी महत्त्व देणे भाग असल्यानें, त्याचा येथें उल्लेख करावा लागला.

डॉ. ड्रूमंड याच्यानंतर कॅप्टन गिडिऑन हचिन्सन यानें शब्दकोश तयार करण्याचा अयशस्वी प्रयत्न केला. हचिन्सनचा जन्म १८ मे १७८३ रोजी झाला (*Cadet Papers*, 1800. No 96). बॉंबे इन्फन्ट्रीमध्यें कॅडेट म्हणून त्यानें सन १८०० मध्यें प्रवेश केला, १८०२ मध्यें लेफ्टनंट, १८१४ मध्यें कॅप्टनलेफ्टनंट, १८१७ मध्यें कॅप्टन, १८२४ मध्यें मेजर अशा लष्करांतील हुद्याच्या जागा त्यास मिळाल्या. ३ ऑक्टोबर १८२४ रोजीं मोचा या गावीं तो मरण पावला. (*Bombay Army List*, 1753-1834) इंग्रज

१. ही माहिती कॉमनवेल्थ रिलेशन्स ऑफिस, लंडन यांच्या भार. ६३/१४ या पत्रावरून देण्यांत आली आहे.

मराठ्यांच्या युद्धात त्याने प्रत्यक्ष भाग घेतला होता. सन १८१८ मधील दक्षिण कोकणच्या लढाईत सेनापति कर्नल केनेडी प्रॉथर यांच्या हाताखाली त्याने दुभाषी म्हणून मोठीच कामगिरी बजाविली. या कामांत मराठी भाषाज्ञानाचा त्याला मोठा उपयोग झाला. पुढें सावंतवाडीच्या गादीच्या दरबारांत रेसिडेंट म्हणून त्याने थोडा काळ काम केलें. त्यानंतर मोचा येथें रेसिडेंट म्हणून त्याची नेमणूक झाली. तेथेंच तो मरण पावला. (*East India Military Calendar*, Vol. III. p.p. 306-7).[२]

कॅप्टन हचिन्सनने हा शब्दकोश १८१५ मध्यें रचण्याचा प्रयत्न केला. तेव्हां महाराष्ट्रांत पेशव्यांचें राज्य होतें. पेशवे व इंग्रज यांच्यांत राजकीय वैमनस्य वाढून युद्ध होण्याची परिस्थिति निर्माण झाल्यानेंच अशा शब्दकोशाची आवश्यकता वाटत होती.[३] यासाठींच हचिन्सनने शब्दकोश रचण्याचा प्रयत्न केला. या शब्दकोशाची प्रस्तावना मि. जॉन वॅर यानें एशियाटिक जर्नलच्या संपादकाकडे पाठविली होती. त्या प्रस्तावनेंत या शब्दकोशाचा उपयोग सांगतांना पुढीलप्रमाणें विचार मांडण्यात आले आहेत :

"On the usefulness of a work which would facilitate the acquirement of the Maharatta dilect, which is colloquially spoken between Delhi and Seringapatam, Bombay and Nagpore, and is the medium of intercourse with not less than four-fifths of the Bombay army, and the numerous native writers in the employ of the Government of that presidency, it is unnecessary to dilate, if, therefore, it be admitted that a more general knowledge of this language would be greatly conducive to the interests of the army, and adverting to our daily increasing political relations with the Mahratta Empire—to the public at large—the utility of a work by which this knowledge is made more accessible cannot be denied "[४]

मराठी भाषेचा उपयोग हिंदुस्थानांत बऱ्याच विस्तृत प्रदेशात होत असल्यामुळे व मराठ्यांशीं राजकीय संबंध वाढल्यानें युरोपियन लोकांना मराठी भाषेचें ज्ञान सुलभ व्हावें, अशा ग्रंथाची आवश्यकता वाटूं लागली. यामुळेंच कॅप्टन हचिन्सन याच्या मनांत शब्दकोश रचण्याची कल्पना आली. हचिन्सनला लष्करामध्यें कामकाज करीत असतांना मराठी

---

२. ही माहिती कॉमनवेल्थ रिलेशन्स ऑफिस, लंडन यांच्या आर ६२/५४ या पत्रावरून देण्यात आली आहे

३. *Asiatic Journal*, Vol II 1816. p 218.

४. *Asiatic Journal*, Vol. I 1815 p 321.

भाषेचा पुष्कळ अनुभव मिळाला व या कारणानें त्याचा मराठी भाषेचा अभ्यासहि पुष्कळच झाला होता. त्याच्या या अभ्यासासंबंधीं या प्रस्तावनेंत पुढीलप्रमाणें माहिती देण्यांत आली आहे:—

"As a linguist to the corps of Bombay Native infantry, in the performance of his official duties, the compiler has availed himself of the many—opportunities thus offered, to cultivate more particularly the Mahratta language, of which he has compiled a Dictionary, English and Mahratta, as also a very considerable collection of materials for a vocabulary Mahratta and English."

मराठी भाषेचा शब्दकोश तयार करण्याचें ठरवून इचिन्सननें त्याप्रमाणें शब्दकोशाची रूपरेषाहि ठरविली. शब्दकोशाची रचना जॉन्सनच्या शब्दकोशाप्रमाणें करावी: फक्त त्यांतील विज्ञानविषयक पारिभाषिक शब्द गाळावेत, असा त्यानें विचार केला. या शब्दांना मराठी भाषेत प्रतिशब्द नसल्यानें, ते गाळून जॉन्सनच्या शब्दकोशाची मराठींत भाषांतर करण्याची इचिन्सनची ही योजना होती. असे शब्द गाळून हा शब्दकोश तयार केला तर तो पुष्कळ चांगला व उपयुक्त होईल, अशी त्याची कल्पना होती. इचिन्सनच्या शब्दकोशाची ही योजना पुढील शब्दांत देण्यांत आली आहे:

"The original plan of the English and Mahratta Dictionary, is the quarto edition of Johnson's Dictionary abstracted by himself; and, with the exception of words merely technical, and the terms of science, in which the Mahratta language affords no response, is a copious and comprehensive translation of that work"[६]

इचिन्सननें ३० नोव्हेंबर १८१५ मध्यें शब्दकोशाचा जो नमुना तयार केला होता, तो त्यानें मुंबई सरकारच्या परीक्षणार्थ पाठविला. मुंबई सरकारनें या कोशाचा नमुना अभिप्रायासाठीं आर्. टी गुडविन, जॉन टेलर व एफ्. वॉर्डन या तिघांच्या समितीकडे पाठविला. या समितीनें एक रिपोर्ट तयार करून मराठी भाषा शिकण्यासाठीं इचिन्सनचा शब्दकोश फार उपयुक्त होईल, असें आपलें मत व्यक्त करून भाषाशास्त्रदृष्ट्या त्याच्या शब्दकोशाचें महत्त्व पुढीलप्रमाणें नमूद केलें:

५. Ibid. p. 321. इचिन्सनच्या भाषाज्ञानासंबंधी व मराठी भाषेच्या अभ्यासासंबंधी सरकारी दप्तरात भरपूर प्रकारची माहिती मिळते. पहा: *G D* Vol. 9/10, 1821 p 654

६ *G D Vol* 9/10 1821 p 653

"....The English and Mahratta Dictionary, which Capt. Hutchinson proposed to publish, will be an important acquisition to the stock of philological knowledge of this side of India, and must prove of great utility, as far as the Mahratta language is concerned."[७]

जॉन्सनच्या शब्दकोशाचा आदर्श पुढें ठेवून इंग्रजी-मराठी शब्दकोशाची योजना हचिन्सननें मुंबई सरकारकडे पाठविली होती. त्याप्रमाणें मराठी-इंग्रजी असाहि एक शब्दकोश रचण्याची त्यानें योजना तयार केली होती. या शब्दकोशांत पन्नास हजार शब्द, म्हणी व वाक्संप्रदाय यांचा अंतर्भाव करण्याचा हचिन्सनचा विचार होता. या शब्दकोशाची जी जाहिरात छापण्यात आली होती, त्यांत या शब्दकोशाचें वर्णन खालील शब्दांत देण्यांत आलें आहे :

"The Mahratta and English compilation is also on a very extended and comprehensive scale, and contains not fewer than fifty thousand words and idiomatical phrases, exclusive of words formed into adjectives by regular grammatical prefixes and affixes, or the common privative or alternative adjuncts, those only being included in the aggregate, as have the meanings materially altered, or distinct from the signification usually given by the adjunct word or particle."[८]

या शब्दकोशाच्या विस्तृतपणाची कल्पना देऊन या दोन्ही शब्दकोशांच्या प्रकाशनाला जवळजवळ पंचाहत्तर हजार रुपये खर्च येईल असा खर्चाचा अंदाजहि त्यानें दिला होता. एवढा खर्च करणें आपणांस अशक्य असल्यानें या शब्दकोशांच्या प्रकाशनास ईस्ट इंडिया कंपनीनें आर्थिक साहाय्य द्यावें, अशी विनंती त्यानें केली होती. एकंदरींत, हचिन्सननें पाठविलेल्या या शब्दकोशाची योजना पाहतां, हे शब्दकोश चांगल्या प्रकारें रचले गेले असते असें वाटल्यावांचून राहात नाहीं. एवढ्या मोठ्या शब्दकोशाचें प्रकाशन तोट्यात येईल, असें ईस्ट इंडिया कंपनीस वाटून त्यांना जर एवढी आर्थिक मदत देतां आली नाहीं, तर हा शब्दकोश वगैरे काढून संक्षिप्त स्वरूपांत छापतां येईल, अशीहि एक कल्पना हचिन्सननें सुचविली होती. हे दोन्ही शब्दकोश संक्षिप्त रीतीनें एकत्र करण्याचें लेखकाजवळ भरपूर साहित्य आहे व असें केलें असता या शब्दकोशाचा दर्जा मुळींच खालावणार नाहीं, असेंहि आश्वासन देण्यात आलें होतें. शब्दकोश तयार करण्यासाठीं जें साहित्य जमविलें होतें, तें वाया जाऊं नये, म्हणून हचिन्सननें ही संक्षिप्त शब्दकोशाची

७. *Ibid.* p. 653.

८. *Ibid* p 654

योजना तयार करून ती कोणत्या प्रकारें तडीस नेतां येईल याचा खुलासाहि त्या पत्रांत केला होता. तसेंच या शब्दकोशांची लिपि व शुद्धलेखनपद्धति कोणती असावी यासंबंधीहि हचिन्सननें या पत्रांत माहिती दिली आहे. पहा:—

"The type for the Mahratta character will be the *Balbhod*; and the Mahratta words will immediately follow in the Roman character.

"The orthography will be determined by etymology, the practice of the best writers, and the authority of Bramhuns competent to judge."

कॅप्टन हचिन्सनची शब्दकोशाची ही योजना मुंबई सरकारकडे आल्यानंतर मुंबई सरकारचे चीफ सेक्रेटरी एफ्. वॉर्डन यानें कमांडर-इन्-चीफ यास असें कळविलें कीं, हचिन्सननें शब्दकोशासाठीं मागितलेली रक्कम फार मोठी असल्यामुळें मुंबई सरकार या कोशाच्या दोनशें प्रती घेईल व त्या प्रतींची अर्धी किंमत बयाणा म्हणून आगाऊ देईल. म्हणून शब्दकोशाची किंमत किती होईल, हें कळविल्यास मुंबई सरकारला दोनशें प्रतींची अर्धी किंमत देण्यास बरें पडेल.[10] या पत्राचें उत्तर कॅप्टन हचिन्सननें पाठवून मराठी-इंग्रजी व इंग्रजी-मराठी या शब्दकोशांची किंमत जवळजवळ शंभर रुपये होईल, असें कळविलें.[11] हचिन्सनच्या या पत्राप्रमाणें त्याला बयाणा म्हणून दोनशें प्रतींचे दहा हजार रुपये देण्यांत येतील, असें मुंबई सरकारचे सेक्रेटरी सिम्सन याजकडून ता. ३ जुलै १८२१ च्या पत्रानें त्यास कळविण्यात आलें.[12]

या शब्दकोशासंबंधीं एवढा पत्रव्यवहार होऊनहि कॅप्टन हचिन्सनचा शब्दकोश प्रसिद्ध झाला नाहीं, असें दिसतें. मुंबई सरकारकडून जास्त मदत मिळण्याची आशा नसल्यानें त्याला शब्दकोश तयार करण्याचा प्रयत्न सोडून द्यावा लागला असावा, किंवा हचिन्सन हा १८२४ मध्यें दिवंगत झाल्यानें त्याच्या हातून शब्दकोश झालाच नाही, असें दिसतें. कारण आपला शब्दकोश तयार करीत असतां, हचिन्सनच्या शब्दकोशाचें साहित्य आपणास उपयोगी पडेल या हेतूनें मोल्सवर्थनें तें साहित्य कोर्ट ऑफ डायरेक्टर्सकडून मागविलें. त्यांत हचिन्सनसंबंधी Late Major Hutchinson असा उल्लेख आहे.[13] यावरून

९. *Ibid*, p. 654

१०. *Ibid* pp 657-658.

११. *Ibid*. p 651

१२. *Ibid* p 665

१३. G D Vol. 10/237 1831 p 63

एल्फिन्स्टन मुंबईचा गव्हर्नर झाल्यानंतर देशी भाषांचा अभ्यास सुरू होऊन, देशी भाषांना महत्त्व आलें होतें. यामुळें मराठी भाषेसंबंधीं मुंबई सरकारास कांहीं विचार कळवावे या हेतूनें रग्ने ता. १४ फेब्रुआरि १८२२ रोजीं मुंबई सरकारास एक पत्र लिहिलें.[१८] या वेळीं केपन हा लष्करात कॅप्टनच्या हुद्द्यावर असून मराठी भाषेचा दुभाषा होता. मराठी भाषा शिकतांना नवीन लोकांना काय अडचणी येतात हें त्याला अनुभवानें माहीत झालें होतें. यासाठीं मराठी भाषा शिकणाऱ्या लोकांना उपयोगी पडेल, असा त्या भाषेचा शब्द-कोश तयार करावा असें केपन यास वाटूं लागलें. मराठी भाषेचा अभ्यास पूर्ण न करतां बरेच युरोपियन त्या भाषेचा अभ्यास सोडतात, असेंहि त्यांस दिसून आलें असावें. तेव्हां मराठी भाषेचा अभ्यास करणें त्यांना शब्दकोशाच्या साहाय्यानें सोपें जाऊन, त्या भाषेचा अभ्यास ते वाढवितील, असे विचार व्यक्त करतांना केपन आपल्या पत्रांत लिहितो :

"I have often thought that a Dictionary of the Mahratta Language formed on principles of general utility would be of great value to students on the Bombay side of India; I have myself been a Mahratta Interpreter, and know full well the obstacles a beginner has to encounter at his outset in that language; he can procure no Elementary books, and his Pundit or Instructor (generally speaking) is unable to hold a converse in Hindustanee; the task of learning Mahrattas is therefore in most cases abandoned after every short trial"[१९]

शब्दकोशाच्या उपयुक्ततेची अशी मीमांसा करून आपण मराठी भाषेचा विपुल शब्दसंग्रह असलेला व अभ्यास करतांना वारंवार उपयोगी पडणारा असा शब्दकोश तयार करण्याच्या विचारात आहोंत, तेव्हा या कामांत मुंबई सरकारनें आपणांस मदत करावी, अशी त्यानें या पत्रात विनंती केली आहे. ही मदत कोणत्या प्रकारची असावी याचा खुलासाहि केपननें या पत्रात केला आहे. मराठी शब्दकोश तयार करण्यासाठीं त्यानें कांहीं सवलती मागितल्या होत्या. आपणांस बॅटॅलियनमधून रजा मंजूर होऊन दक्षिणेंत (महाराष्ट्रांत) व कोंकणात कुठेंहि संचार करण्यास परवानगी असावी; कारण या प्रांतातील निरनिराळ्या भागांतील एतद्देशियांशीं संबंध आल्याखेरीज मराठी भाषेचें योग्य ज्ञान होणार नाहीं, व निरनिराळ्या भागांत चालू असलेल्या मराठी बोलींची तुलना करून योग्य व सर्व प्रकारच्या शब्दांची निवड करणें शक्य होणार नाहीं, असें त्यानें त्यात म्हटलेलें आहे. त्याचबरोबर आपणास कोणत्याहि कोर्ट कचेरीस भेट देतां यावी व त्या कोर्टकचेरींतील निरनिराळे अर्ज पाहतां यावेत, त्याची तपासणी करण्याची परवानगी देण्यात यावी आणि या सर्वांचा कामाच

१८. G. D. Vol 9/10 1821 p 107

१९ Ibid p 707

तसेंच शब्दकोशाच्या तयारीस जे पंडित किंवा लेखक लागतील आणि जो प्रवासखर्च होईल तो मुंबई सरकारनें द्यावा, अशी पत्राच्या अखेरीस केपननें मुंबई सरकारास विनंती केली होती.

पत्राच्या या भागावरून मराठी शब्दकोश कसा तयार करावयाचा व त्यासाठीं कशा प्रकारें साहित्य गोळा करावयाचें याची बरोबर कल्पना केपन यास होती, असें दिसतें. कारण मोल्सवर्थनें आपला शब्दकोश तयार करतांना मुंबई सरकारला ज्याज्या प्रकारच्या सवलती मागितल्या होत्या व त्या मोल्सवर्थला मिळाल्याहि होत्या. तशा सवलती केपनला मिळाल्या नाहींत असें दिसतें. कारण त्यासंबंधींचा पत्रव्यवहार सरकारी दप्तरांत कोठेंच मिळत नाहीं. यामुळेंच कदाचित् केपनकडून मराठी भाषेचा शब्दकोश तयार झाला नसावा. केपनच्या हातून मराठीचा कोश तयार झाला नाहीं, तरी त्यानें ग्रँट डफच्या इंग्रजी बखरीचें दाजी माने यांच्या मदतीनें मराठींत भाषांतर केलें.

कॅप्टन केपननंतर ज्यानें शब्दकोश तयार केला व तो प्रसिद्धहि झाला, असा युरोपियन गृहस्थ म्हणजे व्हॅन्स केनेडी हा होय.

व्हॅन्स केनेडी याच्या वडिलांचें नांव रॉबर्ट केनेडी असें होतें. याचा जन्म सन १७८४ मध्यें झाला. यानें एडिंबरो, चर्कस्टेड, मन्माउथ या ठिकाणीं आपलें शिक्षण घेतलें व ईस्ट इंडिया कंपनींत नोकरी पत्करून सन १८०० मध्यें लष्करी खात्यांत दाखल होऊन तो मुंबईस आल्यानंतर त्यानें या प्रांतांतील निरनिराळ्या भाषा शिकून पेशव्यांच्या तैनाती फौजेंत सन १८०७ मध्यें दुभाषा म्हणून काम केलें. या वेळीं ही तैनाती फौज शिरूर येथें होती. या ठिकाणीं राहून त्यानें हें काम केलें. पुढें मुंबई आर्मीचे जज्ज व ॲडव्होकेट जनरल या कामावर त्याची १८१७ ते १८३५ पर्यंत नेमणूक झाली. पुढें १८३५ पासून १८४६ पर्यंत मुंबई सरकारचे ओरिएंटल ट्रॅन्सलेटर या हुद्द्यावर त्याला नेमण्यांत आलें. हा मुंबई येथें २९ डिसेंबर १८४६ रोजीं मरण पावला.[२०]

याच्या भाषाभ्यासाबद्दल गोविंद नारायण माडगांवकर 'मुंबईचें वर्णन' या पुस्तकांत पुढीलप्रमाणें लिहितात:

"कांहीं वर्षांमागें या शहरांत जनरल व्यान्स केनडी नांवाचा एक इंग्रज कामगार होता. यास पांचसहा मुलखी भाषा चांगल्या येत असून तो संस्कृतांत निपुण होता, असें सांगतात. सरकारास कोणी शास्त्री, पंडितांची गरज लागली असतां त्यांस या साहेबाकडे प्रथम परीक्षा देण्यास पाठवीत. कित्येक आमचे शास्त्री, पुराणिक व पंडित एखादा श्लोकाचा अन्वय चांगला लागला नाहीं, तर याजपाशीं जाऊन आपली शंका निवारण करून

२०. Buckland, *Dictionary of Indian Biography* pp 233-34

घेत. यानें मराठी आणि इंग्रजी, आणि इंग्रजी आणि मराठी असा एक कोश करून सन १८२४ त छापला होता. यांजकडे संस्कृत व दुसऱ्या देशभाषांतील पुस्तकांचा भरणा फार होता. सन १८४० च्या सुमारास त्याचा काळ झाला. त्या वेळीं त्याचें वय ९५ वर्षांचें होतें. तो एवढा वृद्ध होता, तरी संस्कृत व दुसरे ग्रंथ अवलोकन करणें यानें सोडलें नव्हतें. इतका विद्वान् असून तो सद्भाव अंतःकरणाचा व निःसीम उदार असून यास एतद्देशीय लोकांची कींव फार होती."[21]

मुंबई आर्मीचे जज्ज व ॲडव्होकेट जनरल म्हणून काम करीत असतांना, सिव्हिल सर्व्हंटच्या भाषाविषयक परीक्षा होत. त्या परीक्षामंडळांतहि व्हॅन्स केनेडीनें बरेच वेळां काम केलें, हें मागे सांगितलेंच आहे. बॉंबे लिटररी सोसायटी या संस्थेत सभासद या नात्यानें त्यानें बरेच कार्य केलें पुढें पुढें तो या सोसायटीचा सेक्रेटरी[22] व अध्यक्षहि झाला. बॉंबे ब्रॅंच ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी या ग्रंथालयांत नामावली तयार करण्याचें काम व्हॅन्स केनेडीनें केलें व नामावळींचीं दोन मोठीं पुस्तकें छापिलीं. या पुस्तकांच्यांतील बहुतेक ग्रंथांचीं नावें त्या विद्वान् गृहस्थाच मुखोद्गत होतीं[23].

व्हॅन्स केनेडी हा आपल्या मरणापर्यंत मोठा अभ्यासू संशोधक होता. त्याच्या अभ्यासू वृत्तीची साक्ष त्यानें लिहिलेल्या अनेक ग्रंथांवरून दिसते. विशेषतः मराठी भाषेचा शब्दकोश तयार करून मराठी भाषेंत शब्दकोशासारख्या वाङ्मयप्रकाराची त्यानेंच प्रथम सुरुवात केली. या योगानें युरोपियन लोकांना मराठी भाषेचा अभ्यास करण्याचें कार्य त्यानें सोपें करून दिलें. मराठी भाषा युरोपियन लोकांना शिकण्यास सुलभ होऊन तिचा त्यांनीं अभ्यास केला याचें कांहीं श्रेय व्हॅन्स केनेडीच्या या शब्दकोशाला द्यावें लागेल. याशिवाय त्यानें सदाशिव भागवत यानें तयार केलेलें मराठी भाषेचें एक व्याकरण सुधारून दिलें.[24] या ठिकाणीं व्हॅन्स केनेडी यानें तयार केलेल्या दुसऱ्या ग्रंथांचा उल्लेख करणें अनुचित होणार नाहीं. त्यानें पौराणिक कथा व पुराणें यांतील कित्येक महत्त्वाच्या प्रश्नांवर लेख लिहिलेले आहेत. तसेंच हिंदूंचें वेदांती तत्त्वज्ञान या विषयासहि त्यानें लिहिलें आहे. प्राचीन

---

२१. गोविंद नारायण. मुंबईचें वर्णन, पृ. १०२. याच पुस्तकांत पृ. २८७ वर व्हॅन्स केनेडीची त्रोटक माहिती देण्यांत आली आहे.

२२. G. D. Vol. 23/26 1821-23 p 61 सेक्रेटरी या नात्यानें २७ डिसेंबर १८२० चें व्हॅन्स केनेडीचें एक पत्र आहे

२३. गोविंद नारायण. मुंबईचें वर्णन, पृ. २८३

२४. हें व्याकरण १८२५ साली प्रसिद्ध झालें (मागें ११३ पृष्ठावर १८२४ असा उल्लेख चुकीनें दर्शविला आहे.)

शब्दग्रन्थासहित व आशियांतील प्रमुख भाषांची उत्पत्ति व त्यांचा संबंध दाखविणारे लिखाण त्याने केले आहे. धर्मविषयक लेखनाप्रमाणे लष्करी न्यायांतील महत्त्वाच्या बाबींवर एक कायदा करण्यांत आला होता. त्या कायद्यावर व मुसलमानी कायद्यावरहि त्याने लिहिले आहे. पर्शियाचा इतिहास लिहून इतिहासविषयक पुस्तकांतहि त्याने भर घातली आहे. अशा तऱ्हेचे विविध विषयांवर व्हॅन्स केनेडी याने लेखन केले आहे. डॉ. विल्सन वगळला तर एवढे विविध विषयावर लेखन करणारा व्हॅन्स केनेडीसारखा दुसरा लेखक त्या काळी झाला नव्हता, असे म्हटले तर ते चूक होणार नाही. हिंदु धर्मावर व्हॅन्स केनेडी याने पुष्कळच लिहिले आहे; पण हिंदु धर्माबद्दल केनेडीला सहानुभूति होती. यासंबंधी एक मनोरंजक आठवण बाबा पदमनजी यांनी 'अरुणोदय' या आपल्या आत्मचरित्रपर पुस्तकात दिली आहे. बाबा पदमनजी लिहितात :

"माझ्या वडिलांस जनरल व्हान्स केनडी यांची चांगली माहिती होती. हे मोठे विद्वान् गृहस्थ त्यांच्या तरुणपणी मुंबईत प्रसिद्ध होते. त्यांजविषयी ते मला असें सांगत की त्यांची हिंदु धर्मावर मोठी श्रद्धा होती. त्यांस गायत्रीमंत्र येत होता व ते गीता वाचीत. ब्राह्मणांस पुष्कळ द्रव्य देत व त्यांच्या संग्रहीं हिंदु धर्माच्या पुष्कळ पोथ्या होत्या."[२५]

व्हॅन्स केनेडीच्या शब्दकोशाबद्दल आतां येथें माहिती देऊं. व्हॅन्स केनेडीनें आपला शब्दकोश तयार करून तो परीक्षणासाठीं मुंबई सरकारकडे पाठविला. त्याचे दोन भाग असून पहिल्या भागांत मराठी–इंग्रजी शब्दकोश व दुसऱ्या भागांत इंग्रजी–मराठी शब्दकोश अशी त्याची रचना होती. यासंबंधीं व्हॅन्स केनेडी यानें ता. ७ जुलै १८२३ रोजीं मुंबई सरकारच्या चीफ सेक्रेटरी विल्यम न्यूनहॅम याला पत्र पाठवून त्याबरोबर शब्दकोशाला जी प्रस्तावना लिहिली होती तीहि पाठविली. ही प्रस्तावना पाहिली असतां व्हॅन्स केनेडीनें कोणत्या पद्धतीनें हा शब्दकोश तयार केला होता तें दिसून येईल.

प्रथमच या देशांतील भाषांसंबंधीं व्हॅन्स केनेडीनें चर्चा केली आहे. ती अशी : या अवाढव्य देशात सर्व ठिकाणीं भाषा सारखीच असून शुद्धलेखनपद्धति व उच्चार यामुळें कांहीं भागांत फरक पडला आहे; परंतु यामुळें निरनिराळ्या पोटभाषा निर्माण न होतां, भाषा बोलण्याच्या तीन पद्धति निर्माण झाल्या आहेत. त्या म्हणजे प्राकृत भाषा, विद्वान् एतद्देशीय लोक बोलत असलेली भाषा व शेतकरी वर्गांत प्रचलित असलेली भाषा. या भाषा कोणत्या ठिकाणीं उपयोगांत आणल्या जातात यासंबंधीं व्हॅन्स केनेडी म्हणतो :

"The first or Pracrit is employed in books only, and abounds in Sanscrit words The second is the language spoken by all well educated natives, and particularly by such as are

२५ बाबा पदमनजी अरुणोदय. पृ. २३२.

employed in any situation Civil or Military under Government. It admits less frequently of Sanscrit words but adopts freely such as belong to Arabic, Persian, or Hindi. The third style is peculiar to the cultivators and lower classes."[२८]

भाषेच्या या तीन प्रकारांची कल्पना वर लिहिल्याप्रमाणें सांगितल्यानंतर दुसऱ्या प्रकारांत जी भाषा वर्णन करण्यांत आली आहे, त्या भाषेचाच फक्त शब्दकोश तयार करणार आहोंत, असें व्हॅन्स केनेडी म्हणतो. पहिल्या प्रकारची भाषा 'शब्दकोशांतून वगळ- ण्याचें कारण तो असें देतो कीं, मराठी काव्यांतील संस्कृत शब्द जर शब्दकोशांत घातले तर कॅरेच्या शब्दकोशांत जो दोष निर्माण झाला आहे तो यांतहि होईल. तसेंच तिसरा प्रकार वगळण्याचें कारण तो असें देतो कीं, सर्व ठिकाणीं दुसऱ्या प्रकारची जी भाषा सांगितली आहे तिचा उपयोग होतो व सर्वांना ती समजते. यासाठीं शेतकरी व त्यांच्या वर्गाची भाषा बोलतात ती तिसऱ्या प्रकारची भाषा शब्दकोशांतून वगळल्यास मोठें नुकसान होणार नाहीं. एकंदरींत जी भाषा सुशिक्षित एतद्देशीय लोक बोलतात व जिचा उपयोग सरकारच्या मुलकी व लष्करी खात्यांत होतो, त्याच भाषेच्या शब्दकोशाची रचना व्हॅन्स केनेडीनें करण्याचें ठरविलें होतें, असें त्याच्या या निवेदनावरून दिसून येतें. अर्थात् हा शब्दकोश किती मर्यादित स्वरूपाचा झाला याचें निराळें दिग्दर्शन करावयास नको.

हा शब्दकोश तयार करण्यासाठीं जें साहित्य व्हॅन्स केनेडीनें उपयोगांत आणिलें, त्याची माहिती त्यानें यापुढें दिली आहे. प्रथम एका विद्वान् ब्राह्मणाकडून त्यानें अमर- कोशाचें मराठी भाषांतर तयार करवून घेतलें. त्याशिवाय त्यानें त्याच्याकडून मराठी क्रियापदांची एक यादी तयार करून घेतली. स्वतः व्हॅन्स केनेडीनें निरनिराळे ग्रंथ, निरनिराळीं कागद- पत्रें व पुष्कळसे अर्ज पाहून मराठी शब्द गोळा केले. इंग्रजी शब्दकोशाचें मराठी भाषांतर करण्यापेक्षां, असे शब्द गोळा करण्याची पद्धत व्हॅन्स केनेडीस पसंत होती. या पद्धतीचा अंगीकार आपण कां केला हें सांगतांना त्यानें खालीलप्रमाणें विचार मांडले आहेत :

"This mode appears to me to afford the best means of ascertaining the precise ideas which the Marathas themselves attached to each word, while on the contrary, by proposing English words and endeavouring to find equivalent terms for them in Maratha it was impossible to determine how far the term given might express correctly the idea intended, or how far it might have been affected by the accessory ideas used in its explanation."[२९]

---

२८. G. D. Vol. 50 of 1825 pp [illegible]

२९. Ibid p. 131

व्हॅन्स केनेडीनें शब्दकोश तयार करण्याचा चांगला आदर्श पुढें ठेवला असें म्हटलें तर तें वावगें होणार नाहीं. कारण तत्पूर्वीच्या जॉन्सनच्या शब्दकोशाची पद्धत मागें पडून स्वतंत्र रीतीनें मराठी भाषेतील शब्द गोळा करून शब्दकोश तयार करण्याचे प्रयत्न पुढील काळांत करण्यात आले असें आपल्यास दिसून येतें.

केनेडीनें शब्दकोश तयार करण्यासाठीं अमरकोशाच्या मराठी भाषांतराशिवाय दोन हस्तलिखित शब्दकोशांचें साहाय्य घेतलें, असें त्यानें या प्रस्तावनेत नमूद केलें आहे. हे दोन शब्दकोश अर्थात यानें स्वतः लिहिले इंग्लिश-मराठी व मराठी-इंग्लिश असे होते. या शब्दकोशाच्या लेखकाची माहिती मात्र व्हॅन्स केनेडीनें दिली नाहीं; परंतु हे शब्दकोश उत्कृष्ट होते असा अभिप्राय त्यानें दिला आहे. या शब्दकोशाचें साहाय्य त्यास बरेंच झालें असावें. या शब्दकोशांची माहिती व त्यांचे लेखक जरी अज्ञात राहिले तरी यावरून आरंभीं एवढी गोष्ट कळते कीं, त्या काळीं बरेच युरोपियन लोक अशा निरनिराळ्या प्रकारचे शब्दकोश तयार करीत असावेत, किंवा करवून घेत असावेत. यांनीं असे शब्दकोश सरकारदरबारी परीक्षणासाठीं पाठविले, त्यांतील माहिती पण उपलब्ध होते. पुणें हिंदुस्थानांतील लष्करी खात्यांतील एका प्रमुख अधिकाऱ्याचा दुभाषी कॅप्टन बॉक यानें मराठी हिंदुस्थानी असा एक हस्तलिखित शब्दकोश दोन मुनशींकडून तयार करून घेतला होता, त्याचाहि केनेडीनें उपयोग केला. युरोपियन लोक स्वतःच्या उपयोगासाठीं असे शब्दसंग्रह तयार करवीत, यावरून त्या काळीं युरोपियन अधिकाऱ्यांस व इतर लोकांस शब्दकोशाची गरज किती भासत असेल, हे निराळें सांगण्याची गरज नाहीं.

शब्दकोश तयार करतांना आपण कोणत्या गोष्टींचें साहाय्य घेतलें, हे व्हॅन्स केनेडीनें सांगितल्यानंतर आपल्या शब्दकोशाच्या गुणदोषांची त्यानें चर्चा केली आहे. या शब्दकोशाची शब्दसंख्या-ही अगदीं थोडी असून त्यांत ८००० शब्द आहेत हा एक मोठाच दोष आपल्या शब्दकोशात आढळून येईल, असें शब्दसंख्येच्या बाबतींत व्हॅन्स केनेडीनें म्हटलें आहे. हा शब्दकोश अशा थोड्या शब्दांचा असण्याचें कारण, व्हॅन्स केनेडीनें सुशिक्षित लोक जी भाषा बोलतात तीच प्रमाण मानून त्याचा शब्दकोश तयार केला, हें मात्र पाहण्यांत आलेलें आहे. ह्या मुद्दीचा दृष्टिकोण त्यानें मांडलेल्या पुढील शब्दांत दिसून येतो. पाहा :

"....It must be observed that the Maratha is merely a spoken language, and that it has never been cultivated or refined by authors either in prose or verse. Its formation took place—amongst a people solely engaged in agriculture, and as all terms relating to law and religion were adopted from another language, and as the vernacular tongue was not em-

ployed in composition, it will be obvious that under such circumstances a language could never become copious."

वरीलप्रमाणें आपलें मत केनेडीनें मांडलें याचें कारण मराठी भाषेंत शब्द फार नाहींत, अशी त्याची दृढ कल्पना होती. मोल्सवर्थनें चाळीस हजार शब्द गोळा करून मराठी भाषेचा शब्दकोश तयार केलेला पाहून, आठ हजार शब्दांत मराठी भाषेंतील सर्व शब्द आले आहेत, असा अभिप्राय बाळगणाऱ्या केनेडीला मोठाच धक्का बसला. जी भाषा नुसती शेतकऱ्यांत असून ज्या भाषेंत गद्य व पद्य ग्रंथ कांहींच नाहींत, त्या भाषेंत एवढे शब्द असणें अशक्य आहे, असे उद्गार व्हॅन्स केनेडीनें मोल्सवर्थच्या शब्दकोशावर अभिप्राय देतांना काढलेले आढळतात. ते असे :

"To any person, however, in the least acquainted with philology it must appear quite impossible that a language could have become thus copious amongst a people principally devoted to agriculture and arms and amongst whom it was never cultivated and improved by authors in either verse or prose."[२९]

मराठी भाषेत शब्दसंख्या कमी आहे, हें सिद्ध करतांना केनेडीनें वर सांगितल्याप्रमाणें जशीं कांहीं कारणें दिलीं आहेत, तशींच या भाषेंत सामासिक शब्द नाहीत, शब्दसिद्धि नाहीं, अशीं दुसरीं काहीं कारणें दिली आहेत. एवढें असूनसुद्धां या भाषेंत आठ हजार शब्द तरी कसे आहेत हें सांगतांना तो म्हणतो,

"It must rather excite surprise that Maratha should contain so many words, than that it should not be more copious. But the Marathas though possessing only a limited number of ideas, have been wonderfully ingenious in devising names for every shade of distinction comprised in the primitive idea."[३०]

व्हॅन्स केनेडीनें वर दिलेल्या आपल्या म्हणण्याच्या समर्थनासाठीं कांहीं उदाहरणें दिलीं आहेत. गाई किंवा तारठें या शब्दाचें उदाहरण देऊन त्याचें प्रमाण, आकार व उपयोग जसे असतात, तशीं प्रत्येकाला निरनिराळीं नावें दिलेलीं असतात, असें त्यानें म्हटलें आहे. सापमारणेंच पोशाख, दागिने यांना अनेक नावें असून अर्थच्छटा दाखविणारे

२८. Ibid p 133

२९. G D Vol. 18/237 1831 p 67

३० G D Vol 50/55 1823 p 134

अनेक शब्द आहेत. तसेंच या ग्रंथांत रत्नगर्भ व नामानें ग्रंथ इ. शब्दविकारें शब्दांचे पुष्कळ आहेत, त्यांची कांहीं उदाहरणेंहि त्यानें दिलीं आहेत. अर्थात् केनेडीला ज्याप्रमाणें मार्गें, वाटेनें इत्यादि वरच्या समानार्थक व विविध अर्थांच्या छटा दाखविणारे पुष्कळ शब्द आढळले, तसेंच दुसऱ्या प्रत्येक शब्दाला व वस्तूला समान अर्थाचे शब्द मांडलेले असते व त्याचा शब्दकोश तयार करविता आला असता; परंतु एकाच वस्तूच्या समानार्थक असणाऱ्या निरनिराळ्या शब्दांकडे नीट लक्ष देऊन ते शब्द समजावून घेणें, ही युरोपियन लोकांना मोठी अवघड गोष्ट आहे, असें त्यानेंच पुढें म्हटलें आहे.[31] यावरून स्पष्ट दिसतें कीं, खुद्द केनेडी यानेंसुद्धा अशा निरनिराळ्या अर्थच्छटा दाखविणाऱ्या शब्दांकडे बारकाईनें लक्ष न देतां, मराठी भाषेंत शब्दसंख्या कमी आहे असें विधान केलें.

शब्दकोशासंबंधीं हें सर्व विवेचन करून शब्दकोशाच्या लिपीकडे केनेडी वळला आहे. देवनागरी व मोडी या दोन्ही लिपींच्या गुणदोषांची चर्चा करून या शब्दकोशासाठीं बाळबोध किंवा देवनागरी लिपि त्यानें पसंत केली आहे. देवनागरी लिपि ही छपाईला सोपी असून, त्यांत प्रत्येक वर्ण वेगवेगळा असतो व प्रत्येक व्यंजन त्या वर्णानें बरोबर दाखविलें जातें, अशा तऱ्हेचे देवनागरी लिपीचे फायदे त्यानें सांगितले आहेत. तर मोडी लिपि ही जरी सर्वसामान्य लोकांची आहे, तरी त्या लिपींतील पुष्कळ अक्षरें एकमेकांपासून वेगळीं काढून ओळखतां येत नाहींत व एखादें व्यंजन शब्दज्ञान चांगलें असल्याशिवाय समजत नाहीं, असे त्या लिपींतील दोष सांगितले आहेत. यावरून शब्दकोश तयार करतांना व्हॅन्स केनेडीनें लिपीचा काळजीपूर्वक विचार केलेला दिसून येतो. एवढेंच नव्हे तर कुरियर छापखान्याशिवाय मराठी व फारशी टाइप दुसरीकडे कोठें मिळतील याची खात्री नसल्यानें त्या छापखान्यांत हा शब्दकोश छापला जावा व तपासणीच्या कामावर आपण देखरेख करूं, असें त्यानें मुंबई सरकारचा सेक्रेटरी हेंडरसन याला लिहिलेलें एक पत्र उपलब्ध आहे.[32] या शब्दकोशाबद्दल व्हॅन्स केनेडीला ५००० रुपये देण्याचा ठराव व या शब्दकोशाच्या एक हजार प्रतींच्या छपाईचा खर्च १२००० रुपये होईल, अशा अंदाजाचा निर्देश एका पत्रात आढळतो.[33]

व्हॅन्स केनेडीनें वर दिलेल्या योजनेप्रमाणें मराठी भाषेचा शब्दकोश रचला. तो कुरियर छापखान्यात छापण्यात येऊन सन १८२४ मध्यें दोन भागांत प्रसिद्ध करण्यांत आला. पहिल्या भागांत १२८ पृष्ठें असून मराठी शब्दांना इंग्रजी प्रतिशब्द दिलेले आहेत. दुसऱ्या भागांत ९७ पृष्ठें असून त्यात इंग्रजी शब्दांचे मराठींत अर्थ दिले आहेत. हा ग्रंथ

---

३१. *Ibid* p. 135

३२. *Ibid* p 145

३३. *Ibid*. p. 165

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहे.[३४] या शब्दकोशाच्या स्वरूपासंबंधानें स्वतः व्हॅन्स केनेडीनें विस्तृत विवेचन केलेलें असल्यामुळें, त्यासंबंधीं वेगळें असें लिहिण्याचें कारण उरत नाहीं.

मात्र आपला हा शब्दकोश, कमी शब्द असल्यामुळें दोषपूर्ण आहे याची जाणीव केनेडीला असावी असें वाटतें; परंतु हा दोष त्यानें मराठी भाषेच्या माथीं मारला आहे व कोणत्याहि परिस्थितींत शब्दकोशकर्त्यांना या भाषेचा व्यापक असा शब्दकोश करतां येणार नाहीं, असें प्रस्तावनेच्या शेवटीं त्यानें पुढीलप्रमाणें नमूद केलें आहे :

"That the following will be found defective I am perfectly aware. But in no instance can a first lexicographical attempt aspire to fullness or correctness, and must especially in a language which has been hitherto considered by the natives themselves as merely adapted for domestic purposes, and quite unworthy to be employed in even the slightest literary composition."[३५]

एकंदरीत शेवटींसुद्धा मराठी भाषेविषयीं चुकीची कल्पना करून घेऊन आपला दोष लपविण्याचा प्रयत्न व्हॅन्स केनेडीनें केलेला दिसतो! परंतु त्याच्या शब्दकोशाचा अपुरेपणा हा पुष्कळांना जाणवूं लागला. या अपुऱ्या शब्दसंग्रहाबद्दल स्टीव्हन्सन यानेंच कशी टीका केली आहे ती पाहा :

"I have no hesitation however in saying that Col Kennedy's work does not in any degree answer the purpose of proper help to the students of Murathee language, because not to mention—innumerable omissions of common and useful words and defective explanations of many of those given.

व्हॅन्स केनेडीचा हा शब्दकोश जरी प्रसिद्ध झाला, तरी त्यांतहि बऱ्याच उणिवा राहिल्या होत्या. या उणिवा व्हॅन्स केनेडीनें चुकीनें करून घेतलेल्या समजुतीमुळें राहिलेल्या होत्या याचें वर दिग्दर्शन करण्यात आलेंच आहे. विशेषतः मराठी भाषेबद्दल, ही भाषा साहित्यिक भाषा नव्हे, अशी चमत्कारिक कल्पना केनेडीनें करून घेतल्यामुळें या कोशाला व्यापक स्वरूप न देतां, आठ हजार शब्दांतच त्याला आपला प्रयत्न आटपता घ्यावा लागला. या शब्दकोशाचा फारसा उपयोग होणार नाहीं, हें उघड दिसूं लागल्यामुळें पुढें दुसऱ्या शब्दकोशाची आवश्यकता भासूं लागली आणि विस्तृत व परिपूर्ण असा मराठी भाषेचा शब्दकोश तयार करण्याचें काम मोल्सवर्थनें पत्करलें.

३४. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील दोनप्रति. १ १.

३५. G D Vol. 50/55 1823 pp 137 33

३६. G D Vol. 18/237, 1831 p 136 (Back Side)

# मोल्सवर्थचें मराठी भाषेचें कार्य

मराठींत प्रसिद्ध असलेला मोल्सवर्थचा मराठी-इंग्रजी शब्दकोश हा सन १८३१ मध्यें प्रसिद्ध झाला. मोल्सवर्थच्या पूर्वायुष्याची माहिती कॉमनवेल्थ रिलेशन्स ऑफिस, लंडन यांजकडून मिळते ती अशीः—

"मोल्सवर्थच्या वडिलांचें नांव ऑनरेबल रिचर्ड मोल्सवर्थ व आईचें नांव कॅथराइन असें होतें. त्याचा बाप्तिस्मा १५ जून १७९५ मध्यें सरे येथें झाला. एक्सेटर (डेव्हन) येथें त्याचें शिक्षण झालें (*Cadet Papers*, 1810 No. 160).

शिक्षणानंतर लष्करी खात्यांत तो दाखल झाला (G. O. 15th April 1812). व नेटिव्ह इन्फंट्रीच्या ९ व्या रेजिमेंटमध्यें भाषाभिज्ञ (Linguist) म्हणून त्याची नेमणूक झाली (G. O. 27th May 1814). पुढें सब असिस्टंट कॉमिसरी म्हणून दक्षिणेंत तो नेमला गेला (G. O. 30th Nov. 1818). त्यानंतर १६ जून १८२१ रोजीं जडोदें येथेंहि त्याची नेमणूक झाली. इलाख्याच्या ठिकाणीं राहून मोल्सवर्थला शब्दकोश पुरा करण्याची परवानगी देण्यांत आली (G. O. 19th May 1825). मराठी-इंग्रजी शब्दकोशाचा पहिला भाग पूर्ण झाल्यानंतर सरकारनें त्याचा गौरव केला (*Public Letter from Bombay*, 7th Sept. 1831) व कोर्ट ऑफ डायरेक्टरांनीं याचा दुसरा भाग लिहिण्यासाठीं त्यांस मंजुरी दिली (*Public Despatch*, 5th Dec. 1832); परंतु पुढें मोल्सवर्थ आजारी पडल्यामुळें त्यास युरोपला परत जाण्याची परवानगी मिळाली (*Gazette*, 31st December 1835). २४ एप्रिल रोजीं त्याच्या नोकरीचा राजिनामा स्वीकारण्यांत येऊन त्याला निवृत्ती-नंतरचा संपूर्ण पगार मंजूर करण्यात आला (*M. C.* 3rd May & *Despatch* 28th June 1837). मराठी-इंग्रजी शब्दकोशाची दुसरी आवृत्ति काढण्यासाठीं मोल्सवर्थ परत मुंबईस आला (*M. C.* 17th March 1851) ... [*Bombay Service Army List*. Vol 2]."[1]

मोल्सवर्थला लष्करांत पुढीलप्रमाणें अधिकाराच्या जागा मिळाल्या. "कॅडेट–१८१०; एन्साइन ३ एप्रिल १८१२; ६ वी नेटिव्ह इन्फंट्री लेफ्टनंट–४ एप्रिल १८१६; कॅप्टन १ मे १८२४, ११ वी नेटिव्ह इन्फंट्री. इंग्लंडमध्यें सेवानिवृत्त– ३ मे १८३७.

---

१. मोल्सवर्थची चरित्रविषयक माहिती कॉमनवेल्थ रिलेशन्स ऑफिस, लंडन यांच्या नंबर २६६६/५२ या पत्रान्वयें देण्यांत आली आहे.

"मोल्सवर्थला सेवानिवृत्तीनंतर दररोज १०॥ शिलींग पेन्शन मिळत होतें व तें त्यानें ३१ जुलै १८३१ पर्यंत घेतल्याची नोंद आहे; परंतु या नोंदीपुढें "Omitted. Former warrants cancelled"; असा शेरा आहे. त्यावरून मोल्सवर्थच्या निवृत्तीनंतर फार काळ पेन्शन मिळालें नाहीं असें दिसतें, व आपणांस कंपनीकडून नोकरीबद्दल कांहींहि घेण्याची इच्छा नाहीं असें जें त्यानें म्हटल्याचें नमूद आहे त्याला या रेकॉर्डमधील नोंदीवरून बळकटी मिळते.[२]

हिंदुस्थानांत आल्यानंतर मोल्सवर्थनें मराठी व हिंदुस्तानी या दोन भाषांचा अभ्यास करून या भाषांची परीक्षा सन १८१४ मध्यें दिल्याचा उल्लेख आढळतो तो असा:—

"Mr. Molesworth, its principal and responsible author, we believe, we are correct in saying, passed his examination in the Marathi and Hindustani languages in the year 1814...."[३]

मोल्सवर्थच्या भाषाज्ञानाबद्दल 'ज्ञानोदय' कार म्हणतात, "ह्या गृहस्थांस महाराष्ट्रभाषेचें उत्कृष्ट ज्ञान होतें. इतकेंच नाहीं तर संस्कृत, हिंदुस्तानी, फारशी, ग्रीक, लॅटीन इ. भाषा त्यांस अवगत होत्या व त्यांची स्वभाषा जी इंग्रजी तिच्यांतील बहुतेक विद्यांची व शब्दांची त्यांस साधारण माहिती होती."[४]

लष्करी खात्यांत असतांना मोल्सवर्थला मराठी व हिंदुस्तानी भाषांचा चांगला परिचय झाला. सन १८२२ मध्यें सोलापूर येथें असतांना त्यानें थॉमस कँडी यांच्या साहाय्यानें भाषांतराच्या कामास उपयोगी पडावा म्हणून एक शब्दसंग्रह तयार केला होता.[५] यामुळेंच सन १८२४ मध्यें मोल्सवर्थनें मुंबई सरकारला मराठी शब्दकोशाची योजना कळवून शब्दकोश तयार करण्याचें काम अंगावर घेतलें[६] व १८३१ मध्यें हा शब्दकोश त्यानें पुरा केला. या शब्दकोशाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या वेळीं मोल्सवर्थ हिंदुस्थानांत आला होता. तो सन १८७२ मध्यें दिवंगत झाला.[७]

---

२. ही माहिती श्री. पी. एम्. लाड आय्. सी. एस. यांनी इंडिया ऑफिस लंडन, मधून उपलब्ध करून दिली. मोल्सवर्थनें लष्करी नोकरी सोडून लष्करी पदवी व पगार यांचा त्याग केला असें रे. मरे मिचेलनेंहि लिहिलें आहे. पहा, J Murray Mitchell *In Western India* p. 262.

३. *The Bombay Quarterly Review*. Vol. VI. 1857. p. 315.

४. ज्ञानोदय. १ ऑक्टोबर १८७२. पृ. २९६.

५. *The Bombay Quarterly Review*. Vol. VI. 1857. p 316.

६. *G. D* Vol. 15/73. 1824. p 35.

७. ज्ञानोदय ता. १ ऑक्टोबर १८७२. पृ. २९५.

आपला रचलेला शब्दकोश अपुरा आहे याची जाणीव व्हॅन्स केनेडीस होतीच. एवढेंच नव्हे तर "दुसऱ्या कोणी विस्तृत शब्दकोश रचण्याचा जर प्रयत्न केला व त्यांत या शब्दकोशाची मदत झाली, तर हा शब्दकोश रचण्याचे श्रम वायां गेले नाहींत, असें मी समजेन,"[८] असे उद्गार त्यानें आपल्या प्रस्तावनेच्या अखेरीस काढले होते. यामुळें शब्दकोश तयार करण्याचे प्रयत्न पुन्हां सुरू होऊन मोल्सवर्थनें मराठी-इंग्लिश व इंग्लिश-मराठी हा शब्दकोशासंबंधीं योजना मुंबई सरकारास पाठविली. यांत त्यानें युरोपियन लोकांना मराठे लोकांची भाषा समजावी व त्या भाषेचा त्यांना उपयोग करता यावा असा मराठी-इंग्लिश शब्दकोशाचा उद्देश सांगून, त्या कोशाच्या रचनेसंबंधीं तीन गोष्टी सांगितल्या आहेत. त्या अशा :—

"By arranging alphabetically all the words they use—all, of whatever origin, of whatever application,—all of which the Brahmins of Poona acknowledge the fitness and currency in Marhata.

"By affixing to each word, its grammatical designation, its gender and its derivation—of its primitive significations, *the whole*, and of its idiomatic acceptations, sufficient to enable the students to recognise it, and to apprehend its import throughout its numerous and diversified applications

"By inserting and explaining some of the common adages, saws and sayings."[९]

मोल्सवर्थनें वर सांगितल्याप्रमाणें आपल्या शब्दकोशाची रचना केली आहे, हें आपणांस त्याचा शब्दकोश पाहिल्यानंतर कळून येईल. ब्राह्मणांस विचारून त्यांना मान्य असतील असे चालू शब्द घेतले पाहिजेत, असें जें त्यानें म्हटलें आहे, त्याप्रमाणें पुढें कोंकणांत राहून बऱ्याच ब्राह्मणांशी विचारविनिमय करून त्यानें शब्द गोळा केले व वाक्संप्रदाय, म्हणी असें मराठी भाषेचें साहित्य जमवून मराठी–इंग्लिश शब्दकोश रचला.

या शब्दकोशाप्रमाणें इंग्लिश-मराठी या शब्दकोशाची योजना समजावून देतांना त्यानें या शब्दकोशाचा उद्देश सांगितला आहे तो असा,

"To enable the student to express in Marhata his wants and his wishes, his thoughts and his feelings. To facilitate to the scholar the version into Marhata of books from the English."[१०]

८. G. D Vol. 50/55. 1823 p 138
९. G D Vol. 15/73 1824 p 35
१०. *Ibid.* p. 36.

या शब्दकोशाचा उद्देश सांगून, याची रचना कशी करावयाची हें सांगतांना त्यानें तीन मुद्दे मांडले आहेत, ते असे :—

"By inserting all the colloquial English terms.

"By annexing to each, *all* the corresponding terms in Marhata the more common and the more closely corresponding *first*, for the benefit of the Learners—the less common and the less exactly corresponding *after* to refreshen the memory of the Translator.

"By rendering into Marhata, some of our common idioms and popular phrases."[११]

या शब्दकोशांची वरीलप्रमाणें कल्पना देऊन, मोल्स्वर्थनें पुढें विस्तारानें शब्दकोशासंबंधीं आपल्या काय अपेक्षा आहेत हेंहि नमूद केलें आहे. त्याचें हें निवेदन पाहिलें असतांना, शब्दकोश तयार करण्यासंबंधीं व त्याचा उपयोग कोणत्या प्रकारें व्हावा, यासंबंधीं त्यानें दूरवर विचार केला होता असें दिसून येतें. मोल्स्वर्थची शब्दकोशासंबंधीं ही विचारसरणी महत्त्वाची असल्यानें ती पुढें देण्यात आली आहे :—

"....and if it be desirable to enable persons to proceed deeply into Marhata—to express themselves, not only on the exigencies and affairs of common life, but also on abstract subjects—on Religion, on Morals, on Science : to express themselves not only intelligibly, but neatly and elegantly : if it be desirable to promote the communication, to the natives of India, of vital knowledge, practical instruction on the arts of life, and correct information on the state of the Globe and its multifarious occupants, then will it be desirable that a Dictionary should be compiled of the nature and extent above detailed."[१२]

मोल्स्वर्थनें ही विचारसरणी स्पष्ट करून हा शब्दकोश तयार करण्याची मनीषा व्यक्त करतांना जर ह्या शब्दकोशांत काहीं दोष निघाले तर झालेला खर्च सोसण्याची तयारी दाखविली. तसेंच दोन वर्षांच्या मुदतींत व २००० रुपयांत शब्दकोश तयार करून मुंबईसरकारला कायम देण्याचेंहि अभिवचन दिलें.

मोल्स्वर्थच्या वर दिलेल्या या पत्राला मुंबईसरकारनें ७ फेब्रुआरी १८२४ रोजी उत्तर लिहून त्यानें शब्दकोशाचा नमुना पाठविल्यानंतर २००० रुपये देण्याची तयारी

११. *Ibid.*
१२. *Ibid.* p. 37.

दर्शविली.[१३] यानंतर मोल्सवर्थनें लिहिलेलें २२ एप्रिल १८२५ चें पत्र उपलब्ध आहे.[१४] या पत्रांत शब्दकोश तयार करण्यांत किती प्रगति झाली हें देण्यांत आलें आहे. या कालावधींत मोल्सवर्थनें १८००० शब्द गोळा केले होते. या अठरा हजार शब्दांपैकीं पंधरा हजार शब्दांचा अर्थहि त्यानें लावला होता. शब्दकोशाचें साहित्य सारखें वाढत होतें. शब्द गोळा करणारे लोक निरनिराळ्या ठिकाणीं शब्द गोळा करीत असल्यामुळें, त्या सर्वांनीं पाठविलेल्या शब्दांची संख्या पन्नास हजार झाली होती. तरी त्यांतील पुनरावृत्ति झालेले शब्द, फार विद्वत्तापूर्ण व खालच्या वर्गांत वापरले जाणारे अश्लील शब्द, असे शब्द वगळल्यास बाकीचे कोशांत देण्यासारखे असे २२००० शब्दांचें काम शिल्लक राहणार होतें.

हें काम पुरें करण्यासाठीं आपणास मुंबईत राहण्याची परवानगी देण्यांत यावी, अशी विनति या पत्राच्या अखेरीस मोल्सवर्थनें मुंबई सरकारला केली आहे. जर लष्करी कामांतून मुक्त होण्याची परवानगी देण्यांत आली नाहीं, तर रजेतील सर्व पगार सोडण्याची तयारी, एवढेंच नव्हे तर राजीनामा देण्याचीहि तयारी मोल्सवर्थनें दाखविली आहे[१५]. मोल्सवर्थनें आपल्या हितसंबंधावर पाणी सोडण्याची तयारी दाखविली. त्याशिवाय नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीकडे येणारे भाषांतरित मराठी ग्रंथ तपासण्याचें मुंबई सरकारास आश्वासन दिलें.

मोल्सवर्थच्या वरील विनंतीप्रमाणें त्याला हा शब्दकोश पुरा करण्यासाठीं मुंबईस राहण्याची परवानगी देण्यांत आली[१६]. ही परवानगी मिळाल्यानतर मोल्सवर्थनें शब्दकोशाचें काम जोरांत सुरू केलें असें दिसतें. कारण आपल्या कामाचा वृत्तांत मुंबई सरकारला वारंवार देऊन त्यानें आपल्या अडचणी कळविल्या आहेत. शब्दाची निवड किती कसोशीनें व काळजीपूर्वक करावी लागते, हें सांगतांना एका पत्रांत मोल्सवर्थ म्हणतो,

"The boundless chaos of a living speech is to be reduced to order : words are to be collected from every book, from every writing, and from every tongue : choice is to be made without an established or generally satisfactory principle of selection;—corruptions are to be detected and branded though there is no test of purity; significations are to be ascertained from the mouth of the people;...."[१७]

---

१३. Ibid p. 45
१४. G. D Vol. 16/101. 1825. p. 369
१५. Ibid. p. 370.
१६. Ibid. p. 373.
१७. G. D Vol. 21/129. 1826. p 125.

शब्दकोश तयार करीत असतांना शब्दांची निवड करण्याच्या बाबतींत व त्यांचा अर्थ लावण्यासाठीं मोल्सवर्थला केवढा खटाटोप करावा लागत होता, हें यावरून दिसून येईल. मोल्सवर्थच्या पद्धतीप्रमाणें त्याच्या हाताखालील ब्राह्मणांना मुद्दां काम करतां येत नव्हतें व त्यांची त्याला फारशी मदत होत नव्हती, असें दिसतें. कारण त्यांच्याविरुद्ध तक्रार करतांना मोल्सवर्थ पुढीलप्रमाणें लिहितो:—

"For so backward are the Brahmins in adopting the principle I have prescribed, that to this moment, they would *reject words expressive of ideas and corresponding* to terms, which though abstract and learned, are *to us* familiar and of which the occurence will be constant in translations from English; whilst they would receive readily high Sanskrit names for sun and moon, wood, water and stone...."[19]

मोल्सवर्थच्या ब्राह्मणांची मदत असतांनामुद्दां खूप श्रम घ्यावे लागत होते. यामुळें उत्तरोत्तर त्याची प्रकृति खालावत चालली व त्यास कामांत उत्साह वाटेनासा झाला. अशा परिस्थितींत कँडी बंधूंची मदत आपणांस मिळावी, अशी त्यानें मुंबई सरकारास विनंती केली. या दोन बंधूंनीं लष्करामध्यें अधिकारी म्हणून काम करीत असतांना मराठी शब्द व म्हणी गोळा करून त्यांपैकीं कित्येक शब्दांचा अर्थ लावला होता, अशी त्यांच्याविषयीं मोल्सवर्थनें माहिती देऊन या दोघांची मदत मिळाल्यास अपेक्षेपेक्षां लवकर शब्दकोश पुरा करण्यांत येईल, अशी खात्री त्यानें या पत्रांत दिली आहे."[20]

मोल्सवर्थच्या या विनंतीप्रमाणें, कँडी बंधूंना लष्करी नोकरींतून मुक्त करण्यांत तयार आहांत काय, असें मुंबई सरकारच्या सेक्रेटरीकडून पत्रद्वारें ॲड्ज्यूटंट जनरल यांस विचारण्यांत आलें."[21] मुंबई सरकारच्या या पत्राचें उत्तर ॲड्ज्यूटंट जनरल यांजकडून ६ एप्रिल १८२६ रोजीं पाठविण्यांत आलें व कँडी बंधूंना शब्दकोश तयार करण्यासाठीं मोल्सवर्थ यांस साहाय्य करण्यास मान्यता देण्यांत आली."[22] यामुळें कँडी बंधूंची मदत मिळून मोल्सवर्थनें काम पुढें चालू केलें.

यानंतर हें काम करीत असतां, मुंबईची हवा मानवत नसल्यामुळें शब्दकोश तयार करण्यास बाणकोट येथें राहण्याची परवानगी देण्यांत यावी, अशा आशयाचें पत्र मोल्सवर्थ यानें ता. ८ नोव्हेंबर १८२६ रोजीं मुंबई सरकारास लिहिलें."

१८. *Ibid.* p 130
१९. *Ibid* p. 129
२०. *Ibid* p. 135
२१. *Ibid* p. 137.
२२. *Ibid.* p. 143.

ही त्याची मागणी मान्य करण्यांत येऊन त्यास बाणकोट येथें राहण्याची परवानगी देण्यांत आली.[२३]

मोल्सवर्थ बाणकोट येथें राहून कँडी बंधूंच्या साहाय्यानें मराठी शब्दकोशाचें काम करीत असतांना, कँडी बंधूंनीं लष्करी खात्यांत पूर्वीच्या जागांवर रुजू व्हावें असें मुंबई सरकारकडून त्यांस २२ फेब्रुआरी १८२७ रोजीं कळविण्यांत आलें.[२४] म्हणजे एप्रिल १८२६ पासून जवळजवळ दहा महिने त्यांनीं कोशाच्या कामास मोल्सवर्थ यांस साहाय्य केलें. याबद्दल या दोघांना प्रत्येकीं एक हजार रुपये देणगी म्हणून देण्यांत यावेत असा ठराव मुंबई सरकारनें करून तसा हुकूमहि त्यांजकडून देण्यांत आला.[२५]

कँडी बंधू गेल्यानंतर मोल्सवर्थनें एकट्यानेंच शब्दकोशाचें काम केलेलें दिसतें; परंतु पुढें थॉमस कँडी हा लष्करी नोकरीतून निवृत्त होऊन युरोपास परत जाणार असल्याचें त्यास समजलें. त्यावेळीं थॉमस कँडी याच्या अनुमतीनें त्यानें त्यावेळचा मुंबईचा गव्हर्नर जॉन माल्कम यास लिहिलें कीं, हा शब्दकोश पुरा करण्यास मदत करण्यासाठीं कँडी येथें राहावयास तयार आहे, तेव्हां सरकारनें त्याला आपल्याबरोबर काम करण्यासाठीं ठेवून घ्यावें. मोल्सवर्थनें हें पत्र दापोलीहून ता. २१ जानेवारी १८२८ रोजीं लिहिलें आहे.[२६] या वेळेपर्यंत या शब्दकोशाचें 'ब' या वर्णापर्यंत काम झालें होतें व त्यापुढील वर्णांचे शब्द गोळा करून त्यांच्या अर्थनिर्णयाचेंहि काम चाललें होतें. हें झाल्यानंतर छापखान्यासाठीं एक प्रत तयार करणें एवढेंच काम या शब्दकोशासंबंधीं राहिलें होतें. मोल्सवर्थच्या या पत्राप्रमाणें थॉमस कँडीला एक वर्षपर्यंत शब्दकोशाचें काम करण्याची परवानगी देण्यांत आली व तसें मोल्सवर्थला कळविण्यांत आलें.[२७]

थॉमस कँडी पुन्हा शब्दकोशाच्या कामासाठीं मोल्सवर्थकडे आला; परंतु कामाच्या दगदगीनें प्रकृति बिघडल्यामुळें त्याला शेवटपर्यंत राहतां आलें नाहीं व मध्यंतरींच युरोपला जाणें भाग पडलें. ही हकिकत मोल्सवर्थनें ३ फेब्रुआरी १८२९ रोजीं मुंबईसरकारला कळवून थॉमस कँडीची जागा घेण्यास जॉर्ज कँडी तयार असून त्यांस या कामासाठीं देण्यात यावें अशी पत्रद्वारें विनंति केली. कलकत्याहून जे मोठे टाइप मागविले होते, ते आल्याबरोबर हा शब्दकोश छापण्यासाठीं छापखान्यात पाठविण्यात येईल व जीं मुद्रें छापखान्यातून येतील तीं तपासण्याच्या कामांत जॉर्ज कँडीचा उपयोग होईल हे मुद्दां या पत्रांत मोल्सवर्थनें कळविलें होतें.[२८]

---

२३. *Ibid*. p 149.
२४. G. D. Vol 16/149. 1827. p. 149.
२५. *Ibid*. p. 155.
२६. G. D. Vol. 18/171. 1828. pp 239-240.
२७. *Ibid* p 247.
२८. G D. Vol. 13/190 1829. pp. 151-152

शब्दकोश लवकर पुरा होण्याच्या दृष्टीनें सरकारनें जॉर्ज कँडी यांस मोल्सवर्थच्या साहाय्यास दिलें होतें असें दिसतें. कारण याचा निर्देश मुंबई सरकारास माल्कमपेठ येथून ता. २१ मे १८३१ रोजीं पाठविलेल्या पत्रांत केला आहे. या पत्रात कँडी शब्दकोशाच्या छपाईच्या कामावर देखरेख करीत असून १५ जूनपर्यंत हा शब्दकोश तयार होऊन सरकारास सादर करण्यांत येईल असें या पत्रांत मोल्सवर्थनें कळविलें आहे.[२९] शब्दकोश संपूर्ण तयार झाल्याचें कळवीत असतांना शब्दकोश कसा तयार करण्यांत आला त्याचा १८२५ पासूनचा पाठिमागचा इतिहासहि मोल्सवर्थनें थोडक्यांत दिला आहे.

मोल्सवर्थनें आपल्या शब्दकोशाबद्दल कोणतेंहि मत व्यक्त केलें नाहीं. तसेंच आपल्या या कार्याबद्दल अहंतेचे उद्गारहि काढले नाहींत. तर आपल्या शब्दकोशाचे गुणदोष पाहण्याचें काम त्यानें वाचकावर सोपविलें आहे. तो म्हणतो,

"Of the magnitude of the work undertaken, and of the quality of the work executed, the work itself shall be left to speak: We, (the two Lieuts, Candy and myself) have simply to state, that we have laboured (they at interrupted portions, I, uninterruptedly), with undivided and unremitting deligence, through the period of six years; and, that we indulge the hope, for this product of our labour, of obtaining the approbation of Government."[३०]

मोल्सवर्थनें सरकारी उपयोगासाठीं हा शब्दकोश बॉंबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या हवाली करून त्याचे सर्व हक्क नीस देऊन टाकले. तसेंच इंग्लिश मराठी या दुसऱ्या शब्दकोशाची योजना मोठी व विस्तृत असल्यानें तो कोश रचावयास तीन वर्षे लागतील; जर मुंबई सरकारनें या शब्दकोशाचें काम आपणाकडे दिलें नाहीं तर प्रकृति सुधारल्यानंतर आपण कॉमिसारियेट खात्यांत पुन्हां कामास सुरुवात करूं असें मोल्सवर्थनें त्यांस कळविलें. मोल्सवर्थनें हा शब्दकोश तयार करण्यासाठीं एवढे परिश्रम घेतले कीं, त्यास प्रकृति सुधारण्यासाठीं सहा महिन्याची रजा घ्यावी लागली.[३१]

मोल्सवर्थनें हा शब्दकोश तयार करून मुंबई सरकारकडे पाठविल्यानंतर मुंबई सरकारचा सेक्रेटरी जॉन बक्स यानें या शब्दकोशाच्या सुरुवातीपासून तो प्रकाशनापर्यंत एक अहवाल तयार करून तो गव्हर्नर क्लेअर यांस सादर केला.[३२] यानंतर या शब्द-

२९. *G. D.* Vol. 18/237. 1831. p 55.
३०. *Ibid.* p. 55.
३१. *Ibid.* p. 58.
३२. *Ibid.* pp. 62-63.

कोशाचें परीक्षण करण्यासाठीं मुंबई सरकारनें कर्नल व्हॅन्स केनेडी, लेफ्टनंट पोप व मि. रॉबर्ट कॉटन मनी या तिघांची एक समिति नेमली.[33] मोल्सवर्थचा शब्दकोश या तिघांच्या समितीपुढें आल्यावर, त्यापैकीं व्हॅन्स केनेडी व पोप या दोघांनीं शब्दकोशाच्या विरुद्ध अभिप्राय देऊन कडक टीका केली तर उलट रॉबर्ट कॉटन मनी यानें या शब्दकोशाची तरफदारी करून मोल्सवर्थचा गौरव केला.

व्हॅन्स केनेडीनें मोल्सवर्थच्या शब्दकोशावर जो अभिप्राय दिला आहे तो अत्यंत काळजीपूर्वक परीक्षण करून दिला असल्याचें त्यानें स्वतःच म्हटलें आहे.[34] म्हणून व्हॅन्स केनेडीच्या अभिप्रायाकडे विशेष लक्ष देणें भाग पडतें.

मोल्सवर्थनें ज्या पद्धतीनें हा शब्दकोश तयार केला आहे ती पद्धति भाषाशास्त्राच्या तत्त्वाशीं विसंगत असल्यामुळें हा शब्दकोश व्यवहाराच्या दृष्टीनें निरुपयोगी आहे, अशी आरंभींच व्हॅन्स केनेडीनें टीका केली आहे. तो म्हणतो,

"For if the plan which he had followed, be found to rest on grounds at variance with the just principles of philology, it must necessarily follow that this work can be neither accurate nor well adapted for practical use."[35]

व्हॅन्स केनेडीनें याप्रमाणें अभिप्राय देऊन कोशाच्या शब्दसंख्येवर जोराची टीका केली आहे. हें सांगतांना केनेडीनें मोल्सवर्थच्या म्हणण्याचा आधार घेतला आहे. मोल्सवर्थनें मराठी भाषेविषयीं असें म्हटलें होतें कीं, ही भाषा नुसती बोली भाषा आहे. या भाषेंत कांहीं धार्मिक, ऐतिहासिक व थोडेसे काव्यग्रंथ आहेत. त्याचें मराठी भाषेविषयीं मत बरोबर असूनसुद्धा त्यानें शब्दकोशाची संख्या मात्र चाळीस हजार पर्यंत नेली आहे. केनेडीनें मुख्य हा आक्षेप घेऊन असें म्हटलें आहे कीं, ज्या भाषेंत काव्य, कथा या विषयांवर एकहि ग्रंथ नाहीं व जी शेतकऱ्यांची व सैनिकांची भाषा आहे त्या भाषेचे चाळीस हजार शब्द मोल्सवर्थनें दिले आहेत, ही मोल्सवर्थची मोठीच चूक होय.

मोल्सवर्थनें या शब्दकोशांत शब्दांची संख्या कशी वाढविली आहे, तेंहि केनेडीनें पुढें दाखविलें आहे. त्याचें म्हणणें असें कीं, फारशी, अरबी व हिंदुस्थानी या भाषांतील शब्द या कोशांत घेतले गेले आहेत; परंतु बहुसंख्य मराठे लोक बोलतांना या शब्दांचा उपयोग करीत नाहींत. तसेंच संभाषणांत क्वचितच उपयोगी येतात अशा पुनरुक्तिवाचक शब्दांचा यांत भरणा आहे आणि शब्दसंख्या वाढण्याचें तिसरें कारण म्हणजे ज्या

---

३३. *Ibid.* p. 65
३४. *Ibid.* p. 67.
३५. *Ibid.* p. 67.

शब्दांचा अर्थ असभ्य व ग्राम्य असतो, असे शब्द देण्यांत आले आहेत. मोल्सवर्थनें असे शब्द देतांना हे शब्द मराठे लोकांच्या बोलण्यांत येवात, इतकेंच नव्हे तर सभ्य लोकसुद्धां असे शब्द वापरतात, असें समर्थन या शब्दांचा समावेश करतांना प्रस्तावनेंत केलें होतें. परंतु मोल्सवर्थचें हें म्हणणें अमान्य करून केनेडीनें त्यावर टीका केली आहे.

मोल्सवर्थनें शब्दांचे जे अर्थ दिलेले आहेत ते अनिश्चित आहेत अशी केनेडीनें टीका केली आहे. ही टीका पटवून देण्यासाठीं त्यानें 'आटपणें', 'कांटा' व 'सधि' हे तीन शब्द उदाहरणादाखल देऊन मोल्सवर्थनें 'कांटा' या शब्दाचे दिलेले निरनिराळे पंधरा अर्थ व 'सधि' या शब्दाचे अकरा अर्थ उद्धृत करून या शब्दांचे वाच्यार्थ व अलंकारिक असे जे अर्थ मोल्सवर्थनें दिले आहेत ते असंदिग्ध व अनिश्चित आहेत, अशी टीका केली आहे. त्या शब्दाच्या अर्थाची योग्य व थोडक्यांत इंग्रजींत कल्पना देण्यांत तो मुळींच यशस्वी झाला नाहीं, असें सांगताना व्हॅन्स केनेडी पुढीलप्रमाणें लिहितो,

"Examples such as these might be extracted from this Dictionary *ad infinitum*, and they too clearly show that however well acquainted with Maratha Captain Molesworth may be, he has not succeeded in expressing in English correctly and intelligibly the precise idea which each Maratha word conveys"[36]

व्हॅन्स केनेडीनें मोल्सवर्थच्या शब्दकोशावर विचार करून सद्यस्थितींत हा शब्दकोश निरुपयोगी आहे, असा सरतेशेवटीं आपला अभिप्राय दिला आहे तो असा,

"For it seems to us that in its present form it can be of scarcely any practical utility to the learned and that as a philological work the explanations are *too diffuse and inaccurate*, while at the same time the arrangement in general and the introduction of so many foreign words must prevent any just conclusions being formed from it with respect to the real genius and affinities of the Maratha language."[37]

व्हॅन्स केनेडीच्या मताशीं जॉर्ज पोपनें पूर्ण सहमत होऊन व्हॅन्स केनेडीच्या सहीखालींच आपली सही केली; परंतु या समितींतील तिसरा सभासद रॉबर्ट कॉटन मनी यानें केनेडीच्या मताविरुद्ध आपलें मत नोंदविलें. रॉबर्ट मनीनें जें मत व्यक्त केलें आहे तें फारच थोड्या शब्दांत व्यक्त केलें आहे. रॉबर्ट मनीचें हें मत महत्त्वाचें असल्यानें तें पुढें दिलें आहे:—

३६. *Ibid* p. 69
३७. *Ibid.* p 70

"I am of opinion that Capt. Molesworth's Maratha Dictionary is a most valuable work. My opinion is formed as a student—as such I have found it of essential service, filling a void, which, in acquiring the Mahrattha language the learner has long felt,........

"I consider it to be copious and accurate, exhibiting, an extensive and extraordinary knowledge of the Mahrattha language—a product which (under all the trouble of composing such a book in a country like this) merits the highest praise from Government,......"[३८]

शब्दकोशांतील गुणावगुणावर समितींतील तिघांचें एकमत झालें नाहीं व दोघांनीं शब्दकोशाविरुद्ध व एकानें अनुकूल मत दिलें. तरी मध्यंतरींच्या काळांत या शब्दकोशाची एक एक प्रत सतरा विद्वान् गृहस्थांकडे पाठविण्यात आली होती. या सतरा गृहस्थांपैकीं काहींनीं मोल्सवर्थ यांस व काहींनीं मुंबई सरकारास शब्दकोश उत्कृष्ट असल्याबद्दल आपापलीं मतें कळविलीं. अशा रीतीनें या सतरा गृहस्थांचे व रॉबर्टसनी याचे असे एकंदर अठरा अभिप्राय मोल्सवर्थच्या शब्दकोशाला अनुकूल मिळाले. ज्या गृहस्थानीं पत्रांनीं आपले अभिप्राय कळविले, त्यांचीं नांवें व पत्र पाठविल्याची तारीख पुढील प्रमाणें आहे.

(१) मि. मिचेल, पुणें, १९ जुलै १८३१. (२) रे. जॉन विल्सन, मुंबई, १२ जुलै. (३) रे. सी. स्टोन, अमेरिकन मिशन, १५ जुलै. (४) रे. डी. ओ. ॲलन, अमेरिकन मिशन, १२ जुलै. (५) रे. जॉन काफ्टन-मुंबई सरकारचा इंटरप्रीटर, ११ जुलै. (६) ले. शॉर्टीड, सर्व्हे डिपार्टमेंट, १८ जुलै. (७) ले. ऑस्टन, १५ जुलै. (८) ले. इर्स्कीन, २० जुलै. (९) रे. रॉबर्ट नेस्बिट, पुणें, १५ जुलै. (१०) रे. सी. फरार, चर्च ऑफ इंग्लंड मिशन, मुंबई, १८ जुलै. (११) जे. फॅरिश, सिव्हिल ऑडिटर, १६ जुलै. (१२) आर. जी. वेब, रजिस्ट्रार, १६ जुलै. (१३) रेव्हिन्यू कमिशनर, पुणें, २९ जुलै. (१४) मि. मॅरिएट, पुण्याचे जज, १२ जुलै. (१५) कॅप्टन हॅमिल्टन, डेप्युटी जज, १५ जुलै. (१६) मि. स्टीव्हन्सन्-मिशनरी, १२ जुलै. (१७) मि. पी. स्कॉट, पुणें, कलेक्टरचा असिस्टंट, १३ जुलै. (१८) मि. मनी, असिस्टंट पर्शियन सेक्रेटरी, ११ जुलै."[३९]

मोल्सवर्थच्या शब्दकोशावर या लोकांनीं दिलेले अनुकूल अभिप्राय जवळ जवळ एकाच धर्तीचे आहेत; परंतु त्यांपैकीं काहीं अभिप्राय फार मार्मिक आहेत, ते येथें देणें

३८. Ibid p. 71.
३९. Ibid. p 89.

योग्य ठरेल. त्यामुळें मोल्सवर्थच्या शब्दकोशाचें महत्त्व व त्याचें स्थान आपोआप स्पष्ट दिसून येईल.

याविषयीं विल्सनचा अभिप्राय फार महत्त्वाचा आहे. विल्सननें या शब्दकोशाची दुसऱ्या भाषेंतील शब्दकोशांशीं तुलना करून मोल्सवर्थचा शब्दकोश उत्कृष्ट असल्याचें दाखवून दिलें आहे. तसेंच मोल्सवर्थचें हें कार्य फार महत्त्वाचें ठरवून त्याचा मोठा गौरव केला आहे. विल्सन म्हणतो,

"I not only express my highest approbation, but my highest admiration of the work. With the exception of Dr. Wilson's Sanskrit Dictionary, it is undoubtedly the best executed lexicography of any of the Indian languages. In regard to copiousness of collection, fullness and accuracy of rendering and propriety of illustration, it will stand an honourable and advantageous comparison with the most approved compilations connected with any language."[19]

शब्दकोशाबद्दल वरीलप्रमाणें अभिप्राय देऊन, शब्दकोशांत चाळीस हजार शब्द मोल्सवर्थनें दिले याबद्दलहि विल्सननें चांगले उद्गार काढले आहेत. जे शब्द युरोपियनाच्या दृष्टीनें सहज सुटले असते असे शब्द त्यानें गोळा केलेले आहेत; अनावश्यक शब्दांचा जास्त भरणा त्यांत मुळींच नाहीं; फारशी, अरबी व हिंदुस्तानी या भाषांतील शब्द या शब्दकोशांत दिसतात ते शब्द मराठी भाषेंत चालू असून विद्वान् लोकांच्या लेखनांत व खालच्या वर्गांतील लोकांच्या बोलण्यांत येतात; शब्दांचा अर्थ देतांना मोल्सवर्थचा अचूकपणा दिसून येतो; तसेंच तो अर्थ देतांना प्रथम वाच्यार्थ, मग गौण अर्थ व अलंकारिक अर्थ असा अर्थ देण्याचा क्रम योग्य असून हा अर्थ पटविण्यासाठीं भाषेंत चालू असलेल्या म्हणींतूनच त्यानें उदाहरणें दिलीं आहेत; अशा रीतीनें या शब्दकोशाचे निरनिराळे गुण विल्सननें सांगून, या शब्दकोशानें अभ्यासकांच्या सर्व अडचणी दूर होऊन व्युत्पत्ति, व्याकरण, अर्थ या दृष्टीनें याचा चांगला उपयोग होईल, असें त्यानें स्पष्टपणें सांगितलें आहे. अशा शब्दकोशाची फार मोठी उणीव मराठी भाषेंत होती ती या शब्दकोशानें भरून निघाली. अशा तऱ्हेचे उद्गार आपल्या अभिप्रायाच्या शेवटीं या शब्दकोशाबद्दल विल्सननें काढलेले आहेत. पहा:—

"A full Murathee Dictionary was a great desideratum: and the Government of Bombay have alike consulted and secured their own interests, and those of many Europeans

१९. *Ibid.* pp. 94-95.

and Natives by the publication of the work to which these remarks refer. I have not the slightest doubt that, by competent and unprejudiced oriental scholars, generally it will be pronounced an undertaking of the highest merit. The authors have displayed a patience of research and application, during six years, which has scarcely had a parallel in India;......"[४१]

डॉ. विल्सनप्रमाणें इतरांनीं या शब्दकोशावर एवढे विस्तृत अभिप्राय दिलेले नाहींत. विल्सननें शब्दकोशांतील जे गुण दाखविले आहेत[४२], त्यापैकीं एकेका गुणाचा उल्लेख त्यांच्या अभिप्रायांतून दिसून येतो. ले. शॉर्टोड यानें मोल्सवर्थनें शब्दाचे जे अर्थ दिले आहेत, त्याविषयीं पुढीलप्रमाणें मत व्यक्त केलें आहे:—

"I am of opinion that it is in every respect all that a student of the language can require. The primary meanings of the words are given clearly and distinctly, in the first place; and then follow the figurative uses of them so copiously that the learner never fails to find all that he can desire to make his master of the word in all its variety of application."[४३]

ले. शॉर्टोड याच्याप्रमाणेंच ले. एच्. ऑस्टन यानें या शब्दकोशावर अभिप्राय दिला आहे तो असा:—

"In fine, and to express the *sum total* of my opinion in few words, I think the Dictionary contains all the words, with all their meanings which can be required to be known by any European in any situation in India."[४४]

वरील अभिप्रायाप्रमाणें मोल्सवर्थच्या शब्दकोशाविषयीं बहुतेकांचे अभिप्राय आहेत. तेव्हां त्याची येथें पुनरावृत्ति करण्याचें कारण नाहीं. पुण्याच्या रेव्हिन्यू कमिशनर मि. डन्लॉप यानें शब्दकोशाचें परीक्षण कोणत्या पद्धतीनें आपण केलें, त्याचीच माहिती पत्रामध्यें दिली आहे. डन्लॉप यानें काही शब्दाचे अर्थ विद्वानांकडून विचारून घेऊन त्या शब्दांचे

---

४१. Ibid. p. ७8.

४२. विल्सननें या शब्दकोशावर *Oriental Christian Spectator* मध्यें विस्तृत परीक्षण केलें आहे. पहा. *O.C.S* July 1831, p 248 व *O.C.S.* August 1831, pp. 289-293.

४३. *G. D* Vol. 18/237. 1831 p. 104.

४४. *Ibid* p. 107.

अर्थ निरनिराळ्या जातींचे व धंद्यांचे लोक, व्यापारी, शेतकरी व दलित वर्गांच्या अनेकांना विचारले. तसेंच शब्दकोशांतील निरनिराळे शेकडो शब्द निवडून ते प्रत्येकाला विचारले. तेव्हां विशिष्ट वर्गांतील लोकांना विशिष्ट शब्द माहीत आहेत, हें त्याला दिसून आलें व या लोकांनीं जे अर्थ दिले आहेत तसेच शब्दकोशांत दिल्याचें त्याला आढळून आलें. यावरून सर्व वर्गांतील लोक ज्या शब्दांचा उपयोग करतात तेच शब्द मोल्सवर्थनें गोळा केलेले असून त्यांचे अर्थसुद्धां अगदीं बिनचूक व बरोबर दिले आहेत असा अभिप्राय त्यानें दिला आहे.[४५] तसेंच या शब्दांबरोबर कोंकणांत व देशावर जेथें शब्दांत थोडासा फरक आढळतो असे शब्द देऊन शब्दकोशाचा व्यापकपणा दाखविला आहे. तो असा:—

"It appears also that the work embraces the various *dialects* spoken in the Konkuns, and different parts of the Dukhun in which there are considerable varieties as well as terms, and even forms of expression peculiar to different sects, and trades."[४६]

या परीक्षकांपैकीं स्टीव्हन्सन याचा अभिप्राय महत्त्वाचा आहे. स्टीव्हन्सन हा मराठी भाषेचा अभ्यासक होता. मोल्सवर्थच्या शब्दकोशावर अभिप्राय देण्यापूर्वी त्यानें कॅरेच्या व व्हॅन्स केनेडीच्या अशा दोन कोशांबरोबर मोल्सवर्थच्या शब्दकोशाची तुलना करून हे दोन्ही शब्दकोश मराठी अभ्यासकांना निरुपयोगी आहेत व मराठी भाषेच्या दृष्टीनें त्यांचें कांहींहि महत्त्व नाहीं, असें आपलें मत देऊन मोल्सवर्थच्या कोशासंबंधीं पुढीलप्रमाणें अभिप्राय दिला आहे:—

"I have no hesitation in giving it as my opinion that Capt. Molesworth has produced a work which not only supplies the deficiencies, and corrects the errors of his predecessors; but which is in every respect all that a student can desire."[४७]

मोल्सवर्थच्या शब्दकोशांतील पांच गोष्टींचें स्टीव्हन्सननें परीक्षण केलें आहे. त्यांपैकीं क्रियापदाचे जे अर्थ मोल्सवर्थनें दिले आहेत ते अगदीं बरोबर आहेत, असें क्रियापदांसंबंधीं लिहितांना स्टीव्हन्सननें नमूद केलें आहे. याचें उदाहरण सांगतांना 'लागणें' या क्रियापदाचे मोल्सवर्थनें ४५ अर्थ दिले आहेत. त्यांपैकीं ४४ अगदीं बरोबर दिले असून कोणताहि अर्थ अनाठायी दिलेला नाहीं, असें त्यानें म्हटलें आहे.

---

४५. *Ibid.* p. 128.
४६. *Ibid.* p. 128.
४७. *Ibid.* p. 136.

तसेंच 'घालणें,' 'धरणें,' 'मारणें,' 'लाणें,' 'घेणें,' या क्रियापदांचीं उदाहरणें देऊन यांचे योग्य असे अर्थ मोल्सवर्थनें दिले आहेत, असें स्टीव्हन्सननें सांगितलें आहे.[४८]

मराठीमधील बरोबर एकाच अर्थाचे दिसणारे जे शब्द आहेत त्यांमधील सूक्ष्म छटा व त्यांतील फरक मोल्सवर्थनें स्पष्ट दिले आहेत, हें स्टीव्हन्सननें नमूद केलें आहे; व उदाहरणादाखल 'बोलणें' 'सांगणें,' 'सांगणें' हे तीन शब्द देऊन त्यांचे अर्थ देतांना मोल्सवर्थनें बारिकसारिक छटा व्यक्त केल्या आहेत, हें सांगितलें आहे. तसेंच 'नव्हे' व 'नाहीं', आणि 'नये' व 'नको' यामध्यें मोल्सवर्थनें जो फरक दाखविला आहे त्याचें दुसरें उदाहरण या गोष्टीचें विवेचन करतांना स्टीव्हन्सननें दिलें आहे.[४९]

मोल्सवर्थच्या शब्दकोशाचें एवढें विस्तृत परीक्षण करून स्टीव्हन्सन यानें या शब्दकोशासंबंधीं जो निष्कर्ष काढला आहे तोहि अतिशय महत्त्वाचा आहे. पहा:—

"On the whole every student of the Muratha language must feel himself highly indebted to the Bombay Government for their patronage of this great work, and to the author for the able manner in which he has accomplished the duty instructed to him: and I have no doubt but that his name will be handed down to posterity among the first of lexicographers, and that he will be esteemed as forming a star in that bright constellators of Englishmen who by their indefatigable labours have opened up the communication between the inhabitants of India and the enlightened nations of Europe; forming a passage by which the sciences human and Divine may follow back into their primitive channel and diffuse their healthful influences over the religion of Eastern Asia."[५०]

मोल्सवर्थच्या शब्दकोशावर स्कॉट याचा अभिप्रायहि वाचण्यासारखा आहे. या शब्दकोशासंबंधीं, "It is one of the most complete, and correct dictionaries ever published",[५१] असें मत देऊन या कोशाची उपयुक्तता व योग्यता सांगतांना स्कॉट आपल्या अभिप्रायाच्या शेवटीं म्हणतो,

"In conclusion, I should consider the work in question both calculated to afford every help to the student of the

४८. *Ibid.* p. 137.
४९. *Ibid.* p. 137.
५०. *Ibid.* p. 138.
५१. *Ibid.* p 139.

Maratha tongue, by the clearness, and copiousness of its explanations, and to add permanency to the language itself, by rendering it to a fixed and accurate standard."[७२]

मोल्सवर्थच्या शब्दकोशावरील वीस इसमांचे अभिप्राय मुंबईचा गव्हर्नर क्लेअर यांजकडे पाठविण्यांत आल्यानंतर त्यांचा विचार होऊन मोल्सवर्थच्या शब्दकोशासंबंधी ता. ५ ऑगस्ट १८३१ रोजीं गव्हर्नरच्या सहीचें एक टांचण काढण्यांत येऊन मोल्सवर्थचा शब्दकोश हा अत्यंत उपयुक्त ठरविण्यांत आला. यासंबंधी टांचणांतील महत्त्वाचा उतारा पुढीलप्रमाणें आहे:—

"Believing as I do this Dictionary to be one of the most useful Books which has ever been published in this country, I think it incumbent upon Government to give the compilers a suitable reward, but as it cannot be completed for two and a half or three years, I think it more advisable to submit an opinion for the decision of the Court of Directors....

"I consider the authors entitled to a handsome remuneration believing as I do the work to be a very valuable one."[७३]

शब्दकोशासंबंधी मुंबई सरकारचा निर्णय मोल्सवर्थला मुंबई सरकारचे सेक्रेटरी जॉन बक्स यांजकडून कळविण्यांत आला.[७४] अशा रीतीनें सुरवातीस ठरविल्याप्रमाणें मोल्सवर्थनें आपला संकल्प तडीस नेला.

यापुढें मोल्सवर्थच्या पुस्तकांची तपशीलवार माहिती पुढें देण्यांत देण्यांत येत आहे.

१. *A Dictionary Murathee and English.* 1831.

(मराठी-इंग्लिश शब्दकोश)

मोल्सवर्थनें सहा वर्षें परिश्रम करून हा शब्दकोश तयार केला. त्यांत त्याचा उद्देश काय होता तो त्यानें आपल्या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत सांगितला आहे. तो असा:—

"It was undertaken, not from a thirst after honour or emolument, but from a humble desire of promoting the propagation of the glorious Gospel; and it was continued, by the energy of this desire, through sickness and weakness,

७२. *Ibid.* p 139 (Back side)
७३. *Ibid.* pp. 85-86.
७४. *Ibid.* p. 145.

and against troubles, and difficulties, and grievous discouragements."[५५]

परमेश्वराच्या कृपेनें हा शब्दकोश तयार झाला, म्हणून मोल्सवर्थनें त्याचें श्रेय परमेश्वराला दिलें आहे. याचें कारण परमेश्वरावर असलेली त्याची अढळ श्रद्धा व धार्मिक वृत्ति हें होय. या वृत्तीविषयीं 'ज्ञानोदय'कार म्हणतात,

"हे साहेब फार परोपकारी व उदार होते. बहुत गरीब लोकांचें ह्यांनीं सहाय करावें व त्यांचा दानधर्म बहुधा गुप्त होता. त्यांच्या ठायीं आणखी बहुत विराजित सद्‌गुण होते व त्या सर्वांचें मूळ त्यांच्या धर्मांत होतें. ते निस्सीम ईश्वरभक्त असून त्यांचा तारणारा प्रभु येशु खिस्त यांजवर पूर्ण भाव होता."[५६]

मोल्सवर्थच्या या शब्दकोशाची पहिली आवृत्ति अत्यंत दुर्मिळ असून त्याची एक प्रत मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत व दुसरी प्रो. प्रियोळकर यांच्या खासगी संग्रहांत आहे. पृष्ठें ११६२.

**मराठी-इंग्लिश शब्दकोश**—दुसरी आवृत्ति. मुंबई. बॉंबे एज्युकेशनल प्रेस. १८५७. पृष्ठें XXX + ९२० + १.

या शब्दकोशाची ही आवृत्ति पुष्कळ ठिकाणीं पहावयास मिळते. या शब्दकोशावर भाषेचें महत्त्व पटवून देणारें एक अवतरण छापलेलें आहे. तें असें:–

"Language is the armoury of the human mind, and it contains at once the trophies of its past, and the weapons of its future conquests."

हा शब्दकोश [दुसरी आवृत्ति] कोर्ट ऑफ डायरेक्टर्स यांना अर्पण केला आहे. या शब्दकोशाचा प्रमुख विशेष म्हणजे डॉ. जॉन विल्सन यानें मराठी वाङ्मयाचा घेतलेला आढावा हा होय. हा आढावा प्रस्तावनेंत पृष्ठ २२ पासून ३० पृष्ठापर्यंत म्हणजे ९ पृष्ठें आहे. त्याचें शीर्षक "Notes on the constituent elements, the diffusion, and the application of the Marathi Language."[५८]

५५ Capt. J T Molesworth. *A Dictionary Marathi and English* (1st Ed. 1831) *Preface*. p XVIII

५६. ज्ञानोदय. ता- १ ऑक्टोबर १८७२. पृ. २९६.

५७. मार्च १८३० मध्यें या शब्दकोशाची १६०० पृष्ठें होतील या अंदाजानें याची किंमत ९० रुपये ठेवण्यात आली होती; परंतु पुढें या शब्दकोशाची ११०० पृष्ठें झाल्यानें ६५ रुपये किंमत करण्यात आली. याच्या १०१६ प्रति छापण्यांत आल्या होत्या. पहा— G. D. Vol 18/237 1831 p 149

५८. Capt. J. T. Molesworth *A Dictionary Murathee and English* (2nd Ed ) *Preface*. pp. XXII-XXX.

असें आहे. हा आढावा देण्याचा हेतु व उद्देश काय याचा खुलासा या कोशाच्या प्रस्तावनेंत आरंभीं केला आहे. तो पुढील प्रमाणेः—

"As prefaces to dictionaries are ordinarily introduced with a statement of the boundaries of the country of which the language has been digested; with a history or a notice of the people inhabitating it; and with an account of the language—its rise, progress, constitution, and character; and these several particulars having been instructively treated by the Rev. Dr. Wilson of Bombay; we thankfully present to the public the determinations and suppositions of that competent investigator."[५९]

या शब्दकोशाचा हा जगा एक महत्त्वाचा विशेष आहे; तसाच दुसरा महत्त्वाचा विशेष म्हणजे वाढविलेली शब्दसंख्या. पहिल्या आवृत्तींत ही शब्दांची संख्या ४० हजार होती ती या आवृत्तींत ६० हजार करण्यात आली.[६०] अशा तऱ्हेनें हा शब्दकोश पूर्वीपेक्षांहि मोठा व परिपूर्ण करण्यात आला.

मोल्सवर्थच्या या शब्दकोशाच्या दुसऱ्या आवृत्तीबद्दल 'ज्ञानोदया'त पुढील अभिप्राय आला आहेः—

"हा मराठी शब्दकोश सरकारनें सन १८३१ वर्षामागें छापला होता. आणि त्याच्या प्रति सर्व खपून गेल्या. सबब सरकारनें या कामाकरितां पुन्हा मोल्सवर्थ साहेबाला विलायतेंहून येथें आणविलें. हल्लीं हा कोश गवर्मेंट छापखान्यांत छापून तयार झाला आहे. मोल्सवर्थ साहेबानें यात पूर्वीपेक्षां पुष्कळ फेरफार केला आहे. याच्या आरंभीं डाक्तर विल्सन साहेब यांनीं कांहीं अभिप्राय घातला आहे. मोल्सवर्थ साहेबाच्या हातून असें मोठें काम ईश्वराच्या कृपेनें तयार झालें हें पाहून आम्हास फार संतोष वाटतो या कामावरून मोल्सवर्थ साहेबाची कीर्ति भरतखंडात अक्षय राहील यात अगदीं संशय नाहीं."[६१]

या शब्दकोशाच्या प्रस्तावनेंत कोशावर जे अनेक आक्षेप घेण्यात आले होते त्याना समर्पक उत्तर देण्यात आलेलें आढळतें.

---

५९. *Ibid.* Preface. p V.

६०. *Ibid.* Preface. p XXI

६१ ज्ञानोदय, १ सप्टेंबर १८५७, पृ. २०२.

## २ महाराष्ट्र भाषेचा कोश १८२९.

मोल्सवर्थचा मराठी–इंग्लिश शब्दकोश १८३१ मध्यें मुद्रित झाला. त्याच्या पूर्वी दोन वर्षे सन १८२९ मध्यें मुंबईच्या शिक्षामंडळीचे आज्ञांकित पंडित यांनीं तयार केलेला मराठी–मराठी शब्दकोश प्रसिद्ध झाला होता. शिक्षामंडळींचे आज्ञेवरून जगन्नाथशास्त्री क्रमवंत, बाळशास्त्री घगवे, गंगाधरशास्त्री फडके, रामचंद्रशास्त्री जन्हवेकर, सखारामशास्त्री जोशी, दाजीशास्त्री शुक्ल व परशुरामपंत गोडबोले या सात पंडितांनीं जरी हा मराठी–मराठी कोश केला असला तरी याचें कर्तृत्व मोल्सवर्थकडेहि जातें, असें म्हणावयास जागा आहे. मोल्सवर्थनें हा शब्दकोश तयार करावयाला घेतला होता व त्यासंबंधीं त्यानें आपल्या रिपोर्टांत कांहीं ठिकाणीं याचा उल्लेख केला आहे. एका ठिकाणीं हा शब्दकोश केव्हां पूर्ण होईल हें मुंबई सरकारास कळवितांना तो लिहितोः—

"The Nat: Marh: Dic: may be completed in two years."[६२]

तसेंच कडीबंधूंची मदत मागतांना मोल्सवर्थनें याच रिपोर्टांत या शब्दकोशासंबंधीं लिहिलें आहे तें असेंः—

"If these be associated with me, the completion of the Dictionary—i.e. Nat: Marh: Dict: and of the Marh: and Engl: Dict: may be expected within half of the period computed."[६३]

हा शब्दकोश व मराठी–इंग्लिश शब्दकोश असे दोन शब्दकोश आपण तयार करीत असून त्यापैकीं महाराष्ट्र भाषेचा शब्दकोश पूर्ण होऊन छापखान्यात गेला आहे, असेंहि मोल्सवर्थनें पुढील एका रिपोर्टांत कळविलें आहे. यासंबंधी तो म्हणतो,

"I do myself honor of addressing you on the subject of the Marhata and the Marh: and Engl: Dictionaries now under compilation by me for the service of Government. Of these the first Dictionary wholly Marhata, has entered the press."[६४]

मोल्सवर्थनें वरील आशयाचें पत्र दापोलीहून मुंबईचा गव्हर्नर माल्कम यास ता. २१ जानेवारी १८२८ रोजीं लिहिलें आहे. यावरून महाराष्ट्र भाषेचा शब्दकोश मोल्सवर्थनें रचून पूर्ण केला यात शंका राहात नाहीं. वर दिलेल्या उताऱ्यांत दोन ठिकाणीं

६२. *G. D.* Vol. 1826. p. 129.
६३. *Ibid.*
६४. *G D* Vol 18/171 1828 p 238.

नेरिट्स मराठी शब्दकोश व मराठी शब्दकोश असे जे दोहरा मोल्सवर्थने केले आहेत ते या महाराष्ट्र भाषेच्या कोशासंबंधी होत, हें स्पष्टपणे दिसून येतें.

मोल्सवर्थने आपल्या मराठी–इंग्रजी शब्दकोशाच्या पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत पंडितांच्या साहाय्यानें आपण हे दोन शब्दकोश कसे तयार करीत असू, यासंबंधी माहिती देतांना या दोन शब्दकोशांचा स्पष्ट उल्लेख केला आहे. तो पुढीलप्रमाणें :—

"To the above observations, we add a brief notice respecting *the manner*, in which we compiled our two dictionaries (*viz.* the *Murathee* and *English* dictionary, and the *Murathee* dictionary in the—*Murathee* language)."[६५]

वरील उताऱ्यांत जे दोन शब्दकोश रचले आहेत, असें म्हटलें गेलें आहे, त्यांची नांवेंमुद्दाम देण्यांत आलीं आहेत. तीं म्हणजे मोल्सवर्थचा मराठी–इंग्लिश कोश व सध्या पंडितांच्या नांवें उपलब्ध असलेला कोश. या कोशाबद्दल ब्रिटिश म्युझियमच्या कॅटलॉगमध्यें माहिती देतांना या कोशाचें कर्तृत्व मोल्सवर्थकडेच आहे याचा उल्लेख करण्यांत आला आहे तो असा :—

"A note is attached to the fly-leaf stating that this Dictionary was compiled by Captain J T. Molesworth with the assistance of Lieuts. G and T. Candy, and the Pandits named in the title-page."[६६]

हे दोन शब्दकोश तयार करण्यासाठीं तीन निरनिराळीं खातीं उघडलीं होतीं व प्रत्येक खात्यात पंडित कामास होते. मराठी प्रांतांतून व त्या प्रांतांतील निरनिराळ्या भागांतून शब्द, म्हणी, वाक्प्रचार गोळा करण्यासाठीं मोल्सवर्थनें कित्येक ब्राह्मण कामास लावले होते. हे शब्द गोळा झाल्यानंतर त्यातले दोनदा आलेले शब्द, जे चालू शब्द नाहीत असे, तसेंच अतिशय विद्वत्तापूर्ण व अतिशय ग्राम्य असे शब्द गाळून सुमारें पंचवीस हजार शब्द गोळा झाले. या गोळा झालेल्या शब्दांची यादी घेऊन हे पंडित बसत व त्याचें व्याकरण, मूळ अर्थ व अलंकारिक अर्थ, प्रचलित अर्थ अशा अनेक तऱ्हेनें शब्दाची छाननी करीत व सर्व गोष्टी लगेच निश्चित करून मराठी व इंग्रजी भाषेंत उतरीत. कोशाचें हें अगदीं प्रारंभीचें कार्य असून हें पहिलें खातें होतें. अशा तऱ्हेनें या खात्यांत दोन्ही कोशांचें काम एकदमच चालत होतें.

---

६५. Capt. J. T. Molesworth. *A Dictionary Murathee and English* (1st Ed.) *Preface*. p. XVI.

६६. J. F Blumhardt. *Catalogue of Marathi and Gujarati Printed Books in the Library of the British Museum*. p. 10.

शब्दकोश तयार करण्याचें दुसरें खातें म्हणजे एका खोलींत कँडी बंधू किंवा मोल्सवर्थ यांपैकीं कोणाबरोबर तरी एक ब्राह्मण बसून निरनिराळ्या पुस्तकांतून, पत्रांतून, अर्जांतून व दुसऱ्या शब्दकोशांतून उपयोगी शब्द निवडून काढीत असे व त्या शब्दांचा नवीन अर्थ आधारासहित पहात. मोल्सवर्थचें हें दुसऱ्या प्रकारचें काम असे.

शब्दकोश तयार करण्याचें तिसरें खातें म्हणजे मोल्सवर्थ व कँडी या तिघांपैकीं एका खोलींत एक जण बसत असून त्याच्याबरोबर एक अत्यंत विद्वान् ब्राह्मण असे. याचें काम शब्दांची तुलना करणें, तो नक्की करणें, क्रमानें लावणें व हे सर्व लिहून शब्दकोशाचें साहित्य तयार करणें असें महत्त्वाचें असे. अशा रीतीनें हे दोन शब्दकोश तयार होत होते. शब्दकोश तयार करणारे मोल्सवर्थ व कँडी बंधू हे तिघे असल्यानें तिघांनीं तीन खातीं सांभाळलीं होतीं व शब्द नक्की करण्याचें अखेरचें काम मोल्सवर्थकडे होतें, असें म्हणावयास हरकत नाहीं.

शब्दकोश तयार करीत असतांना पंचवीस हजार शब्दाचे चाळीस हजार शब्द झाले; परंतु मराठी इंग्लिश शब्दकोश छापण्यासाठीं टाईप येण्यास पुष्कळ वेळ लागल्यामुळें मराठी मराठी शब्दकोश शिळेवर मुद्रित करण्यांत येऊन तो मराठी-इंग्लिश शब्दकोशाच्या अगोदर प्रसिद्ध झाला.

मोल्सवर्थचा हा महाराष्ट्र भाषेचा शब्दकोश व मराठी-इंग्रजी शब्दकोश हे दोन्ही शब्दकोश एकाचवेळीं कसे तयार करण्यांत आले हें आतांपर्यंतच्या विवेचनावरून दिसून येणार आहे. हे शब्दकोश मोल्सवर्थ व त्याच्या सहकाऱ्यांनीं केले; परंतु महाराष्ट्र भाषेच्या कोशावर मुंबईचे शिक्षामंडळीचे आज्ञांकित पंडित यांनीं केला असा जो निर्देश केला गेला होता, त्यासंबंधींचा खुलासा मोल्सवर्थच्या मराठी-इंग्रजी शब्दकोशाच्या इ.स. १८५७ मध्यें प्रसिद्ध झालेल्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत केलेला आहे. तो असाः—

"From the notice in the text—which, being reprinted from the preface to the Edition of 1831, has been before the public twenty and six years—it appears that the Title-page (prepared by the Secretary, B N.E S) to our Marathi Kosh or Marathi Dictionary in the Marathi language erroneously says "compiled by Pandits in the service of the Bombay Native Education Society" This Kosh or dictionary was compiled, from the first word to the last, in our own house, under the never—intermitted direction and management of our own selves, and by the three Pandits of the B.N.E S. in conjunction with our own Pandits The two dictionaries were "simultaneously complied."[६७]

६७. Capt. J. T. Molesworth *A Dictionary Marathi and English (2nd Edition). Preface.* p. XXI.

या खुलाशावरून शिक्षामंडळीच्या पंडितांनीं हा कोश स्वतंत्र रीतीनें केला नसून, शिक्षामंडळीकरिता मोल्सवर्थ व कँडीबंधू यांच्या नेतृत्वाखालीं हा शब्दकोश तयार करण्यात आला असें स्पष्ट होतें. तसेंच फक्त तीनच पंडित शिक्षामंडळीचे असून बाकीचे पंडित मोल्सवर्थचे होते, असें दिसून येतें.

या दोन्ही शब्दकोशांचें अंतरंगहि अगदीं एकसारखें आहे हें दोन्ही कोशांतील शब्दाचे अर्थ पाहिले असतां ध्यानीं येणार आहे. महाराष्ट्र भाषेच्या शब्दकोशांतील शब्दांची तुलना मराठी–इंग्लिश कोशांतील अर्थाशीं केली असता हे अर्थ इतके एकसारखे व बरोबर दिले आहेत कीं, हे दोन्ही कोश एकाच व्यक्तीच्या मार्गदर्शनाखालीं व देखरेखीखालीं तयार झाले आहेत याविषयीं मुळींच शंका राहात नाहीं. ही तुलना करण्यास जास्त सुलभ जावें म्हणून महाराष्ट्र भाषेच्या कोशांतील 'अभि' या या शब्दापासूनचे सुमारें दहा शब्द (यात पृष्ठाचा अंक दिला नाहीं) व मोल्सवर्थच्या मराठी-इंग्लिश कोशातील ४३ पृष्ठावरचे 'अभि' पासूनचे शब्द पुढें देण्यात आले आहेत. त्यांतील शब्द व अर्थ यांच्यांत किती सारखेपणा आहे तो पहा :—

| महाराष्ट्र भाषेचा शब्दकोश १८२९ | मोल्सवर्थचा मराठी–इंग्लिश शब्दकोश १८३१ |
|---|---|
| अभि, अ० सं० हा उपसर्ग आहे. | अभि *ind* S A preposition and particle implying 1 Similarity, (so thus) 2 Presence, (before.) 3 Separation, (severally.) 4 Conjunction, particularization, (to, with respect to). |
| अभिघार, पु० सं० होमद्रव्यावर घृतानें जो संस्कार करितात तो. | अभिघार *sm* (S) Dropping clarified butter upon the offerings at sacrifices Hence, dropping, scantily and niggardly, clarified butter upon the food set before guests. |
| अभिचार, पु० स० कोणेकातें उद्देशून जारणमारणादि फलक होमादि कर्माचा एक प्रकार आहे. | अभिचार *sm* S Incarnation to destroy or injure. |
| अभिचारी, ३ लिं० स० अभिचारकर्म करितो तो. | अभिचारी *sm* S. A Magician |

अभिजन, पु० सं० जाचे वाडवडील जा देशीं नादत आले तो देश त्याचा.

अभिजन *sm* S Native country. 2 Family, Race.

अभिजात, ३ लिं० सं० कुलीन.

अभिजात *a* S Noble, well born.

अभिजित्, पु० न० सं० उत्तराषाढांचा अंत्यपाद आणि श्रवणाचे आदीचा पंधरावा अंश मिळून मुहूर्तोपयोगी अठ्ठाविसावें नक्षत्र शास्त्रक्लृप्त आहे तो तें; २.३ लिं० ला० आपण यद्विषयीं यत्न न करितां प्राप्त होईल इ० रूप पूर्वी संभावनाही नसतां जे अकस्मात् कदाचित् कांहीएक उपस्थित होतें त्यास ह्म०; उ० आम्हीं आहे म्हटलें यांस पुरायाजोगी वर्षाचे खर्चाची बेगमी केली आहे. आतां मध्येंच अभिजित् एखादा खर्च उभा राहिल्यास पुरणार नाहीं नवें घेतलें पाहिजे.

अभिजित् *smn* S The space of time occupied by the last quarter of the 21st *Nukshutru* and the 15th part of the 22d; amounting to 19 *Dundus'*; and reckoned as the 28th *Nukshutru*. Also the space of 48 minutes; *viz* the 24 immediately preceding and the 24 following mid-day. 2 Hence, *fig.* Contingent adventitious, supervenient; applied to the dropping in of an additional guest at a feast; to the arising of an additional call upon the purse, to an item or point in general beyond those expected and provided for

अभिजिन्मुहूर्त, पु० सं० दिनमानाचे पंधरा विभाग करून आठवा जो विभाग तो.

अभिजिन्मुहूर्त *sm* S (अभिजित्+मुहूर्त) The eight *Moohoortt* of the day, the period comprising 24 minutes before and 24 after mid-day.

अभिधान, न० सं० जा शब्दानें जा अर्थाचा वाच्य मर्यादेनें बोध होतो तो शब्द त्याचें; २, अभिधान स्पष्टोच्चारानें अभिधेय अर्थाचें जें बोधन होतें तें; उ० घट हा शब्द पृथुबुध्नादिमान् जो व्यक्तिविशेष त्याचें अभिधान करितो.

अभिधान *sn* S A name, an appellation 2 Specification, mention; the signification or discrimination effected by a name or by naming. *Ex* घट हा शब्द पृथुबुध्नादिमान् जो व्यक्ति विशेष त्याचें अभिधान करितो.[१४]

[१४] Capt. J. T. Molesworth. *A Dictionary Murathee and English* (1st Ed.) p. 45.

या दोन शब्दकोशांशिवाय शिक्षणविषयावर एक पुस्तक व धार्मिक विषयावर तीन पुस्तकें मोल्सवर्थनें लिहिल्याचें उल्लेख सांपडतात. तीं पुस्तकें अशीं:—

१. शालापद्धति : १८२४.

या पुस्तकाची माहिती नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या रिपोर्टांत पुढीलप्रमाणें मिळते:—

"A treatise on the Management of Schools according to the Lancasterian system of Education."[६९]

या पुस्तकाची मराठी भाषेंतील प्रत मिळत नाहीं. [७०]

२ पापपीडितांस शांति : (Relief to the Sin-Burdened). ट्रॅ. सो. १८२९. पृ. १९.

३ ज्ञानमार्गाची सूचना...भाषांतर. ट्रॅ. सो. १८४९. पृ. ५०.

४ —God Being Compassionate, why does man suffer ?

स्वतंत्र. ट्रॅ. सो. १८५०. पृ. १२.

यापैकीं 'पापपीडितांस शांति' हें एकच पुस्तक अहमदनगरयेथील अमेरिकन मिशनमध्यें पाहावयास मिळतें. तेथें या पुस्तकाची १८२७ सालची १३ पृष्ठांची एक आवृत्ति असून आणखी १८३९ सालची १९ पृष्ठांची तिसरी आवृत्ति आहे.

या पुस्तकांतील भाषेचें स्वरूप कसें आहे हें समजण्यासाठीं पुढील काहीं उतारे येथें देण्यात येत आहेत.

"पापाचा जे अंगिकार करितात पापाचे भाराखालीं जे तळमळतात पापामुळें जे व्याकूळ व खिन्न असतात असे जे तुह्यांमध्यें आहेत अहो या याहो लक्ष्य द्या ऐका विचार पाहा मान्य करा."[७१]

---

६९. *The Third Report of the Native Education Society*. 1825-26 Appendix 3. p. 32.

७० या पुस्तकाचें गुजराती भाषांतर जगन्नाथशास्त्री क्रमवंत यांनी केलें होतें. त्याची प्रत ब्रिटिश म्युझियममध्यें आढळली. तिची मायक्रोफिल्म नकल करवून मराठी संशोधन मंडळाकरितां आणण्यांत आली आहे. याची लिपी मात्र देवनागरी आहे. एकंदर पृष्ठें ३९+१ अशीं आहेत, हें पुस्तक 'निशाळनी पद्धति' या नांवानें संपादित करून व त्याला इंग्लीशमध्यें एक निबंध जोडून मराठी संशोधनमंडळाचे डायरेक्टर प्रा. अ. का. प्रियोळकर यांनी मुंबई विद्यापीठाच्या जर्नलमध्यें (सप्टें. १९५४) पुस्तक रूपानें प्रसिद्ध केलें आहे.

मोल्सवर्थ—पापपीडितांस शांति. पृ. १.

"प्रसन्नता साधावी आणि अंतःकाळीं देवाला पावावें आणि अनंतकाळीं भोगावें हीं तुम्हांला कामें करायाचीं आहेत.[७२]

"हे दयाळु देवा ह्या पापसागरांत राहावें पापपीडित असावें आणि पुढें पापपरिणाम पावावा ही नव्हे तुझी इच्छा आणि येशूनें जर माझे पापाचा भार उचलिला असला आणि माझे पापाचें शासन जर आपल्या अंगीं सोसिलें असलें आणि माझे नांवावर जर संपादिलेलें पुण्य लिहिलें असलें तर हीं असीं असतांना कसी माझी अर्जी निष्फळ पडेल. माझे आशेची कसी निराशा होईल. मी कृपा व करुणा व प्रीति व प्रसन्नता हां न पावूं.[७३]

"हे देवा ही माझी प्रार्थना तूं स्वीकार आणि दया कर क्षमा कर बुद्धि दे शांति दे.[७४]

मोल्सवर्थ याची खिस्ती धर्मावर श्रद्धा होती तीच त्याच्या या धार्मिक पुस्तकांत दिसत आहे. मोल्सवर्थचें नांव त्याच्या शब्दकोशामुळेंच जास्त प्रसिद्ध होऊन राहिलेलें आहे. या त्याच्या प्रसिद्धीविषयीं 'ज्ञानोदय'कर्ता पुढीलप्रमाणें माहिती देतो:

"मोल्सवर्थ साहेबांचें नांव महाराष्ट्र देशांतील अबालवृद्धांस माहीत असलें पाहिजे, कारण ह्यांच्या हातून महाराष्ट्र भाषेचे मोठमोठाले कोश प्रथम तयार झाले. जेव्हां महाराष्ट्र व इंग्लिश कोशाची प्रथम आवृत्ति छापून निघाली तेव्हांपासून जुन्या लोकांत हे मोरेश्वरशास्त्री ह्या नांवानें प्रसिद्ध झाले. ज्यास इंग्लिश येत नव्हतें किंवा अर्धवट येत होतें ते मोल्सवर्थ ह्या शब्दाचे मोलेसर, मोरेश्वर असे अपभ्रंश करीत असत.

"ज्यांनी ह्या कोशाच्या द्वितीय आवृत्तीचें अवलोकन व वापर केला आहे त्यांसच त्याच्या कर्त्यांची विद्वत्ता किती होती हें दिसून येईल. त्याविषयीं एथें आम्हास विशेष सांगण्यास जागा नाहीं. इतकेंच सांगतों कीं, महाराष्ट्र भाषारूप समुद्रांत ह्या कोशाचा कर्ता मोठा पटाईत पोहणारा होता."[७५]

शब्दकोशाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या वेळीं मोल्सवर्थ येथें परत आला होता. तो सुमारें १८६० मध्यें परत इंग्लंडास गेला व तेथें सन १८७२ मध्यें मरण पावला. त्याच्या मृत्यूविषयीं 'ज्ञानोदयांत' पुढील उतारा सांपडतो:—

७२. तत्रैव. पृ. ७.
७३. तत्रैव. पृ. १८-१९.
७४. तत्रैव. पृ. १९.
७५. ज्ञानोदय. ता. १ ऑक्टोबर १८७२, पृ. २९०.

"हे गृहस्थ सुमारें १२ वर्षांमागें हा देश सोडून स्वदेशीं गेले...ते ह्या देशाला विसरले नाहींत. एथें ते ४० वर्षें होते, आणि त्यांस एथील बहुत परोपकाराच्या व धर्माच्या कामांची माहिती होती; म्हणून विद्येकरितां त्यांनीं वारंवार बहुत द्रव्य पाठविलें. त्यांच्या मरणाचें दुःखदायक वर्तमान गेल्या महिन्यांत आलें तेव्हां त्यांचें वय ७७ वर्षांचें होतें. त्याविषयीं त्यांच्या एका कोशाच्या संक्षेपाच्या ग्रंथांत जें लिहिलें आहे तें येथें उतरून आम्ही हा दुःखाचा विषय पुरा करितों. "ह्या देशांत यावत् महाराष्ट्र व इंग्लिश भाषांचा अभ्यास व उपयोग करतील तावत् त्यांस मोल्सवर्थ ह्या नामाभिधानाचें विस्मरण होणार नाहीं." [७६]

मोल्सवर्थनें मराठी भाषेचें जें कार्य केलें, त्याचें महत्त्व आम्हांस या उताऱ्यांत दिसून येईल.

---

७६. सर्वेन पृ. २९६-२९७

# थॉमस कँडीची मराठी वाङ्मयाची सेवा

मराठी भाषेत मराठी-इंग्रजी शब्दकोश रचून मोल्सवर्थनें मोठा लौकिक मिळविला तसेंच मराठी शब्दकोशरचनेच्या कार्यांतील त्याचा एक सहकारी ले. थॉमस कँडी यानें हिंदुस्तानांत पन्नास वर्षांपेक्षांहि अधिक काल राहून मराठी भाषेसंबंधीं मोठें कार्य केलें. इंग्रजी-मराठी या शब्दकोशामुळें कँडीचें हें कार्य अद्यापिहि आपल्या डोळ्यांपुढें उभें राहतें. एल्फिन्स्टन हा मुंबईचा गव्हर्नर झाल्यानंतर, युरोपियन अधिकाऱ्याना मराठी भाषेचा अभ्यास करतां यावा म्हणून शब्दकोश, व्याकरण वगैरे ग्रंथ तयार करण्याचे जे प्रयत्न झाले त्याचें फळ म्हणजे मोल्सवर्थ व कँडी यानीं तयार केलेले शब्दकोश होत. या कार्याशिवाय निरनिराळ्या सुधारणा करून व कित्येक पुस्तकांचीं परीक्षणें करून मराठी लेखनपद्धतीला एकसूत्रीपणा आणण्याचेंहि काम कँडीला करावें लागलें. त्यानें केलेल्या वाङ्मयसेवेची सविस्तर माहिती या प्रकरणांत द्यावयाची आहे.

थॉमस कँडी याचा जन्म ता. १३ डिसेंबर १८०४ रोजीं झाला व त्याचें शिक्षण मॅग्डालेन कॉलेज स्कूल, ऑक्सफोर्ड येथें झालें. (*Cadet Papers*, 1820, No. 28) यानंतर त्यास लष्करी खात्यांत घेण्यांत येऊन 'एन्साइन' या जागेवर त्याची बढती करण्यांत आली. (*G. O.* 16th July 1821). हिंदुस्तानी भाषेची परीक्षा चांगल्या प्रकारें पास झाल्यानें १० व्या नेटिव्ह इन्फंट्रींत २ ऱ्या बॅटॅलियनमध्यें त्याला दुभाषी व क्वॉर्टरमास्टर नेमण्याची शिफारस करण्यात आली. (G. O. 30th Oct. 1821). मराठी भाषेची परीक्षा कँडीनें दिल्यानें त्याची दुभाषी म्हणून नेमणूक झाली. (G O. 21st May 1823) पुढें इंग्रजी-मराठी शब्दकोश तयार करण्याच्या कामांत मोल्सवर्थला कँडीनें मदत केली[1]. (G. O. 14th April 1826) ता. ११ फेब्रुआरी १८२९ रोजीं आजारी पडल्यामुळें फर्लो रजेवर इंग्लंडला गेला व १४ डिसेंबर १८३२ रोजीं मुंबईस परतला (G. O. 26th Dec. 1832) मुंबईस परतल्यानंतर मोल्सवर्थच्या विनंतीवरून मराठी शब्दकोशाचा दुसरा भाग तयार करण्यासाठीं मदत करण्यास त्यास सांगण्यांत आलें[2]. (Publication consultations, 23rd & G O 24th January 1833).

---

१ शब्दकोश तयार करण्याच्या कामीं कँडी बंधूंची मदत आपणांस मिळावी, अशा आशयाचें मोल्सवर्थनें मुंबई सरकारास पाठविलेलें पत्र उपलब्ध आहे. *G D.* vol. 21/129. 1826 p 129 सन १८२८ मध्यें पुन्हां एक वर्ष थॉमस कँडीला मोल्सवर्थबरोबर काम करण्यास सांगण्यांत आलें. *G D* vol. 18/171 1828. p. 247.

२ सन १८३२ पासून कँडीला इंग्लिश-मराठी शब्दकोशासाठीं मोल्सवर्थला साहाय्य करावें लागलें. हें काम त्यानें १८३५ च्या मध्यापर्यंत केलें, J. T. Molesworth and T. Candy. *A Dictionary English-Marathi Preface*, p 1.

पुढें मोल्सवर्थला इंग्लंडला जाणें भाग पडल्यामुळें हा शब्दकोश तयार करण्याचें काम लांबणीवर पडलें; परंतु शब्दकोश तयार करण्यांत कँडीची मोल्सवर्थला जी मदत झाली, त्याबद्दल मोल्सवर्थनें जाताना पुढीलप्रमाणें उद्गार काढले आहेत:—

"Lieut. Candy possesses an extensive and ready knowledge of the Maharattan language and this attainment together with all his abilities and energies he has, in the strictest and most emphatic sense, devoted to this work." (*Public consultations*, 2nd Dec. No. 174 and *Public letter from Bombay*, 9th Dec. 1835. No. 37).

रेग्युलेशनच्या मराठी भाषांतरांत कांहीं चुका राहिल्यामुळें, त्या दुरुस्त करण्याचें काम कँडीकडे देण्यांत आलें. (*India consultations* Sept. No. 28 and 31st Dec. 1835 No. 34). कँडीच्या या विशिष्ट योग्यतेमुळेंच पुणें येथील हिंदु कॉलेज व दक्षनमधील सरकारी शाळांचा सुपरिंटेंडेंट म्हणून त्याला नेमण्यांत आलें. (*Indian Public cons. March, July and Dec.* 1837, and *Public Letters from India*, 18 Oct. 1837 No. 28 (106) and 27 June 1838, No. 20. (68) and *Public Despatch to India* 23rd February 1842 No. 3. (110 & 126). पुढें इंग्लिश–मराठी शब्दकोश पूर्ण करण्याचें काम त्यानें सुरू केलें. (*Public Letter*, 31st March 1841, No. 21. Paras 23-25).

१८३९-४० मधील त्याच्या ताब्यातील दक्षिणेंतील शाळांचा, पुण्यांतील संस्कृत-कॉलेजचा व पुरंदी जिल्ह्यांतील शाळांचा व इतर मराठी शाळांचा रिपोर्ट समाधानकारक आहे. त्या कार्यकुशलतेनें व बुद्धिमत्तेनें हे सुपरिंटेंडंटचें काम कँडीनें केलें तें गौरवास्पद आहे (*Public Letter*, 28th August 1844, No. 35). ता. ३१ मे १८५० पासून त्याच्या स्वतःच्या विनंतीवरून त्याची 'इन्व्हालिड एस्टॅब्लिशमेंट' मध्यें बदली करण्यात आली (*G. O* 31st May 1850). त्यानंतर नेटिव्ह व्हेटरन् बॅटॅलियन मध्यें त्याला नेमण्यांत आलें (*G. O.* 1st July, 1850). (*Bombay Service Army List*. vol. 3)

कँडी २६ फेब्रुआरी १८७७ मध्यें मरण पावला. व माल्कमपेठ येथें त्याचें दफन करण्यांत आलें (Bom : 51/75).

कँडीला लष्करांत पुढीलप्रमाणें अधिकारांच्या जागा मिळाल्या होत्या[३]:— कॅडेट

---

३ कँडीला लष्करात ज्या अधिकाराच्या जागा मिळाल्या त्याची माहिती देण्यांत आली आहे ती अशी: 20th Regiment Native Infantry Ensign 11 Feb 21; Lieut- 11 Dec 22. Captain 20 Apr. 39 Remark :—Superintendent Govt. Schools— —*The Bombay Calender and General Directory for the year* 1848 P 447.

१८२०; एन्सादन ११ फेब्रुआरी १८२१; लेफ्टनंट १४ डिसेंबर १८२२, १० वी नेटिव्ह इन्फंट्री; कॅप्टन ११ फेब्रुआरी १८३६."[४]

पुणें पाठशाळेचा मुख्याध्यापक म्हणून १८३७ मध्यें कँडीची नेमणूक झाल्यानंतर त्याच्या स्वतंत्र कार्याचा प्रारंभ झाला व येथून पुढें त्याच्या मराठी वाङ्मयकार्याला खरी सुरुवात झाली, असें म्हणावयास हरकत नाहीं. यापुढें त्यानें ३०।३५ वर्षें मराठी वाङ्मयाचें कार्य सतत केलें.

पुणें पाठशाळेचा मुख्याध्यापक झाल्यानंतर कँडीनें कॉलेजमध्यें अन्याच सुधारणा घडवून आणल्या. येथील लोकांचे आचारविचार, भाषा व रीति यांचा कँडीला चांगला परिचय असल्यानें मुख्याध्यापक झाल्यानंतर त्यांत सुधारणा करण्याची संधि त्यास मिळाली. वैद्यक व ज्योतिष हीं दोन शास्त्रें पाठशाळेंत युरोपियन पद्धतीवर शिकविण्यांत येत होतीं; परंतु पुढें लवकरच या दोन शास्त्रांच्या शिक्षणाची पुनर्घटना करण्यांत येऊन विद्यार्थ्यांना त्यांचें स्वतःचें वैद्यकीय शास्त्र शिकण्याची सोय झाली. ही जी पुनर्घटना त्यानें केली, त्यासंबंधानें तो म्हणतो,

"Soon after my appointment it was re-established, and the students were directed to combine with the study of their own medical shastras, the study of the medical treatises translated into Marathee by Dr. McLennan".[५]

कँडीनें वैद्यकशास्त्रावरील मराठी भाषेंत भाषांतरित झालेलीं पुस्तकें नेमून त्याप्रमाणें वैद्यकीय शास्त्रांत सुधारणा केली, त्याप्रमाणें पाठशाळेंतील मराठी व इंग्लिश विभागाकडे लक्ष देऊन सुधारणा केल्या.[६] मात्र या सुधारणा कोणत्या त्यासंबंधीं स्पष्ट उल्लेख नाहीं. पाठशाळेचा मुख्याध्यापक असताना इंग्लिश-मराठी शब्दकोश, वाचन-पाठमाला, भूगोल, शाळांतील मुलांकरितां पाठ्यपुस्तकें, मायग सांप्रदायिक वाक्यांचें पुस्तक अशीं अनेक पुस्तकें लिहून मराठी वाङ्मयात त्यानें महत्त्वाची भर घातली.

पुणें पाठशाळेच्या मुख्याध्यापकाप्रमाणें, गव्हर्मेंट स्कूलचा सुपरिंटेंडंट म्हणूनहि त्यानें काम केलें. तें करीत असताना शाळांसाठीं जीं पुस्तकें लागतील तीं स्वतः भाषांतर करणें व दुसऱ्या पंडितांकडून भाषांतर करवून तीं तपासून शुद्ध करणें तसेंच ज्या पुस्तकांच्या प्रति संपल्या असतील तीं पुस्तकें पुन्हा सुधारून त्यांची नवीन आवृत्ति छापून प्रसिद्ध करणें, अशीं विविध प्रकारचीं कामें कँडीला करावीं लागत. थोडक्यांत सांगावयाचें

४ कँडीची चरित्रविषयक माहिती कॉमनवेल्थ रिलेशन्स ऑफिस, लंडन यांच्या नंबर आर. २६६६/-२ या पत्रान्वयें देण्यांत आली आहे.

५ *D. P. I. Poona College*, vol. XVIII. 1856. p. 432.

६ *Report of the Board of Education for the year 1843* p. 40.

म्हणजे या काळांत जी जी पुस्तकें सरकारी आश्रयानें प्रसिद्ध झालीं, त्यांचें कँडीच्या परहस्ताशिवाय मुळींच चाललें नाहीं, असें म्हटलें तर अतिशयोक्तीचें होणार नाहीं.

हें काम करीत असतांना व पुढें त्यांना नेमणूक मुंबई सरकारचा ट्रान्सलेटर म्हणून झाली तेव्हां त्यांच्याकडे जी मराठी पुस्तकें व नियतकालिकें परीक्षणासाठीं येत त्यावर त्यानें आपले अभिप्राय व्यक्त केले आहेत. कँडीनें दिलेले अभिप्राय पुढें देण्यांत येतीलच. त्यावरून व्याकरणविषयक भाग तो किती काळजीनें पहात असे व लेखन-पद्धतींत एकसूत्रीपणा आणण्यासाठीं त्याचे प्रयत्न किती कारणीभूत झाले, हें सहज दिसून येईल.

कँडीची यापुढची कामगिरी म्हणजे त्यानें मराठींत लिहिलेलीं धार्मिक चोपडीं हीं होत. हीं लहान लहान पुस्तकें त्यानें घरीच लिहिलीं आहेत याचें कारण त्याची धार्मिक वृत्ति होय. त्याच्या मराठी भाषेच्या व वाङ्मयाच्या या विविध कामगिरीचा यापुढें क्रमानें विचार करण्यांत यावयाचा आहे.

प्रथम कँडीनें जीं पुस्तकें स्वतः तयार केलीं, त्याचा आढावा घेऊं :

### १ इंग्लिश-मराठी शब्दकोश (A Dictionary—English and Marathi)

या शब्दकोशाची योजना मोल्सवर्थनें केली होती. हा शब्दकोश तयार करण्यांत कँडी त्यास साहाय्य करीत होता; परंतु पुढें मोल्सवर्थ आजारी पडल्यानें या शब्दकोशाचें काम तसेंच अपुरें राहिलें. अखेर मुंबई सरकारनें हा शब्दकोश पुरा करण्याचें काम कँडीवर सोपविलें. या संबंधात मुंबई सरकारचा सेक्रेटरी मॉरिस यानें बोर्ड ऑफ एज्युकेशनचा सेक्रेटरी बर्ड याला ता. ८ ऑक्टोबर १८४० रोजीं लिहितांना कँडीच्या शब्दकोश-रचनेच्या योग्यतेविषयीं पुढील उद्गार काढले आहेत:—

"The Governor in Council conceives that no one is capable of doing much justice to the work as Captain Candy who alone perhaps could take up the work in its present unfinished state and knowing the principles observed, could without aiming at completing the work on these principles more easily attainable uniform with what has been already done"[7]

याप्रमाणें कँडीला शब्दकोशाचें काम सुरू करण्यास सांगण्यांत आलें व त्याचें शाळा तपासण्याचें फिरतीचें काम हॅझडेल याच्याकडे देण्याची व्यवस्था झाली.[8] कँडीनें या शब्दकोशाचें काम सुरू केल्यानंतर तो पूर्ण करण्यास त्यांस सात वर्षें लागलीं. हें काम

७ D P I Board of Education Vol 1840 p 421

८ Ibid p' 437 and G D Vol 23/540 1840 pp. 191 and 193

किती परिश्रमाचें होतें, याविषयीं त्यानें स्वतःच लिहून ठेवलें आहे.[९] अशा रीतीनें मोल्सवर्थच्या नादुरुस्त प्रकृतीमुळें अपुरा राहिलेला हा कोश कँडीनें पुरा केल्यानंतर १८४७ मध्यें सरकारमार्फत तो प्रसिद्ध झाला. आपल्या दृष्टीपुढें या देशातील इंग्रजी भाषा शिकणारे एतद्देशीय लोक व मराठी भाषा शिकणारे युरोपियन लोक ठेवूनच कँडीनें या शब्दकोशाची रचना केली आहे. इंग्रजी भाषेंतील फळें, फुलें, पशु व पक्षी या गोष्टी मराठी भाषेंत नाहींत व ज्या शब्दांना मराठी भाषेंत प्रतिशब्द नाहींत असे शब्द या शब्दकोशांतून कँडीनें गाळले आहेत. अशा प्रकारच्या शब्दकोशाचा उद्देश व हेतु काय असतो, हेंहि कँडीनें पुढीलप्रमाणें सांगितलें आहे: —

"The inexperienced student is cautioned against supposing that this Dictionary will enable one who is ignorant of Marathi to compose correctly in that language. The object of a work of this kind is not to supersede a diligent study of the language, but to facilitate it, and to assist him who has acquired the language, by presenting to him a number of words from which he may select the particular one that he wants, thus saving his time and trouble."[10]

मराठीच्या शुद्धलेखनपद्धतीबद्दल कँडीचा गोंधळ झाला होता, हें त्यानें स्वतःच प्रस्तावनेंत कबूल केलें आहे. मात्र एकदां मराठीचें शुद्धलेखन ठरवून तेंच त्यानें खंबीरपणें अमलांत आणलें. कँडीनें अनेक पुस्तकांचीं जीं परीक्षणें केलीं, त्यांत शुद्धलेखनदृष्ट्या सुचविलेली सुधारणा व दुरुस्त्या यांवर त्याचा फार रोख असल्याचें जें दिसून येतें, त्याचें मुख्य कारण शब्दकोश तयार करीत असताना मराठी शुद्धलेखनासंबंधीं त्यानें ठरविलेलें विशिष्ट धोरण हें होय. मराठी लेखनपद्धतींत एकसूत्रता आणण्याचें फार मोठें श्रेय कँडीला द्यावयास पाहिजे.

मोल्सवर्थच्या शब्दकोशाला ज्याप्रमाणें डॉ. विल्सननें लिहिलेला मराठी भाषेसंबंधी निबंध आहे, त्याप्रमाणें या शब्दकोशाला डॉ. स्टीव्हनसननें मराठी भाषेवर लिहिलेला एक निबंध जोडला आहे त्याचें नांव "An Essay on the points of similarity and dissimilarity between the English and Marathi languages."[11] हा निबंध वाचकांनीं मुळांतूनच वाचावा हें बरें.

या शब्दकोशाचें विस्तृत परीक्षण डॉ. विल्सननें ओरिएंटल ख्रिश्चन स्पेक्टेटर या

९ *D. P. I Poona College Vol. XVIII. 1856 p 434.*

१० J. T. Molesworth and T Candy *A Dictionary English-Marathi Preface* p 4.

११ *Ibid.* pp 9-19

मासिकामध्यें केलें आहे. मोल्सवर्थ व कँडी यांचे शब्दकोशाचे प्रयत्न गौरवून विल्सन या दोघांबद्दल म्हणतो,

"The most important arrangement of this kind, was the appointment of three officers; Captain Molesworth and the Messrs. Candy, to compile and publish its Dictionary, a work, which after several years of incessant labour, they brought to a close in a manner the most satisfactory to their employers and the public, and which will long remain a monument of zeal, industry, and scholarship, connected with language to which it is devoted, such as could not have been expected. To their philanthropic views, directed to the preparation of the way not only for the social and civil improvement of the Maratha people, but for their spiritual enlightenment and conversion to God, are we indebted for its remarkable excellencies."[12]

विल्सननें या शब्दकोशाचें परीक्षण कोणत्या दृष्टीनें केलें आहे, हें वरील उताऱ्यावरून स्पष्ट होईल. कसेंहि असलें तरी कँडीच्या या शब्दकोशाचें महत्त्व कमी होत नाहीं. या कोशाचें महत्त्व पटवून देणारा 'ज्ञानोदयांत' आलेला अभिप्राय पुढीलप्रमाणें आहे:—

"हा ग्रंथ साहेब लोकांच्या उपयोगी आहे व जे एतद्देशीय लोक इंग्लिश भाषा शिकणारे त्यांच्या तर फारच उपयोगी आहे. हा कोश सरकारनें तयार करविला हें मोठें कार्य केलें. कारण असलीं मोठ्या खर्चाचीं व मेहनतीचीं पुस्तकें दुसऱ्या कोणाच्यानें तयार करवत नाहींत."[13]

कँडीच्या या इंग्लिश–मराठी शब्दकोशाच्या १४०० प्रति छापल्या होत्या. त्यापैकीं १८५२ सालापर्यंत १०१३ प्रति संपल्या व ३८७ प्रति उरल्या तेव्हां या शब्दकोशाची नवी आवृत्ति काढण्याचा सरकारनें विचार सुरू केला.[14] त्यावेळचे ऑफिशियेटिंग मराठी ट्रान्सलेटर शंकर दामोदर यांनीं कँडी परत आल्यावर शब्दकोशाची योजना त्याच्याकडून होईल व पुण्याला वर्षाला ८ प्रति खपत असल्यामुळें पुन्हां छापण्याची घाई नको असें कळविलें.[15] यावर डी. पी. आय्. यांनीं सरकारला असें कळविलें कीं, स्वतःचा शब्दकोश व इंग्लिश–मराठी शालेय शब्दकोश कँडीच करूं शकेल. शालेय शब्दकोशाची किंमत एक रुपयापेक्षां जास्त असूं नये.[16]

---

१२ *Oriental Christian Spectator* December 1848 p 437.

१३ ज्ञानोदय ता. २० जानेवारी सन १८४८. पृ. २१

१४ D P I. Elphinstone Institute Vol. XII 1857. p 144.

१५ *Ibid* [illegible]6-147

१६ *Ibid* [illegible]7-148

यासंबंधीं इंग्लंडांत पत्रव्यवहार होऊन भारतमंत्र्यांकडून एक सूचना आली व त्यांत कँडीचा शब्दकोश सुधारून पुनर्मुद्रित करण्याऐवजीं एक लहान शालेय शब्दकोश तयार करावा या योजनेस मान्यता देण्यात यावी, असेंहि नमूद करण्यांत आलें.[१७]

अशा प्रकारें कँडीच्या इंग्लिश–मराठी शब्दकोशाची नवी आवृत्ति काढण्याचा बेत मागें पडला व शाळेसाठीं लहान इंग्लिश–मराठी शब्दकोश तयार करण्याची योजना पुढें आली. हा शब्दकोश तयार करण्याचें काम कँडीनें श्रीकृष्ण तळेकर यांचेकडे सोपविलें व तशा अर्थाचें पत्र डी. पी. आय. हॉवर्ड याला लिहिलें.[१८] हा शब्दकोश सरकारी विद्याखात्यातर्फे मुंबई येथें सन १८६१ मध्यें प्रसिद्ध झाला.[१९] कँडीच्या शब्दकोशाची दुसरी आवृत्ति सन १८७३ मध्यें प्रसिद्ध करण्यांत आली.[२०]

शाळेसाठीं जो शब्दकोश १८६१ मध्यें प्रसिद्ध झाला, त्याचा थोडासा पूर्वेतिहास येथें दिला पाहिजे. इ. स. १८४७ मध्येंच कँडीच्या इंग्लिश–मराठी शब्दकोशाची शाळेसाठीं एक संक्षिप्त आवृत्ति काढावी, अशी सूचना रामचंद्रशास्त्री यांनीं कँडीला केली होती, जर अशा तऱ्हेनें शब्दकोश तयार झाला तर तो उपयुक्त होईल असेंहि कँडीनें बोर्डाचे सेक्रेटरी स्टोव्हेल यांना त्यावेळीं लिहिलें होतें.[२१] यावर स्टोव्हेलनें त्याची सूचना मान्य करून अशा तऱ्हेचा शाळेसाठीं लागणारा शब्दकोश कँडीनें इन्स्पेक्टर रामचंद्रशास्त्री यांच्या साहाय्यानें तयार करावा असें त्यांस कळविलें होतें.[२२] यावरून शालेय शब्दकोश तयार करण्याचा प्रयत्न १८४७ पासून सुरू झाला होता, असें म्हणतां येईल. तो प्रयत्न मूर्त स्वरूपाला येऊन पुढें १८६१ मध्यें तळेकरांनीं हा लहान शब्दकोश तयार केला. मराठी भाषेचे जे शब्दकोश तयार झाले त्यांच्या निर्मितींत कँडीचें अंग किती आहे, हें यावरून स्पष्ट होतें.

## २. नीतिशास्त्राची परिभाषा : (१८४८)

या ग्रंथाचें मूळ पुस्तक इंग्रजी भाषेंत डी. जे. इझडेल यानें रचिलें व त्याचें भाषांतर मेजर कँडी यानें केलें. या पुस्तकाविषयीं कँडी यानें कार्टर याला जें पत्र लिहिलें आहे त्यावरून या पुस्तकाचा विषय कळून येईल. कँडी या पत्रांत म्हणतो,

---

१७ D. P I Book-Depot Vol XXII 1859 p 131

१८ Ibid. p 136

१९ श. ग. दाते, मराठी–ग्रंथ–सूचि. पृ. ११३.

२० तत्रैव पृ. ११२.

२१ D P I Board of Education, Superintendent. I Division. 1847. p. 443.

२२ Ibid p 443

"I have taken pains to make it plain and easy of comprehension, but as the subject is one which is above the level of ordinary thought and conversation, there will be found some words which may seem uncommon and high, though they are not higher in Murathee than their corresponding terms are in English. They are moreover explained by the context."[२३]

या पुस्तकाची पहिली आवृत्ति पाठशाळेकडील छापखान्यांत छापली जाऊन पुणें येथें सन १८४८ मध्यें प्रसिद्ध झाली.[२४] याची सन १८५१ मध्यें दुसरी आवृत्ति प्रसिद्ध झाली ती महाराष्ट्र-ग्रंथालय, पुणें, येथें उपलब्ध आहे. यांत परमेश्वरासंबंधी माणसांची कोणतीं कर्तव्यें आहेत तें सांगितलें आहे. यांतील सारांश दिला आहे, तो असा :—

"ह्या सर्व गोष्टींचा सारांश इतकाच आहे कीं, मनापासून परमेश्वरावर भाव ठेवावा. त्याचें भय बाळगावें. त्याच्यावर प्रीति ठेवावी. त्याचें भजन करावें. त्याचे उपकार आठवून त्यास स्तवावें. आपला सर्व भरवसा त्यावर ठेवावा. त्याचा धावा करावा. त्याच्या पवित्र नामाचा सन्मान राखावा. आणि भक्तिपूर्वक त्याच्या सेवेंत आपलें आयुष्य घालवावें हीं कर्तव्यकर्में आपण परमेश्वराची लागतो."[२५]

यानतर आपणांस लक्षून कर्तव्यकर्में प्रकार २, इतर मनुष्यास लक्षून कर्तव्यकर्में प्रकार ३, धनी चाकराचीं कर्तव्यकर्में मनुष्याच्या परस्पर संबंधापासून जीं कर्तव्यकर्में निष्पन्न होतात तीं व कृपेच्या कोटींत जीं कर्तव्यकर्में येतात त्याचा विचार केला आहे.

या धड्याचे शेवटीं तात्पर्य दिलें आहे, त्यांतील कांहीं भाग असा : "परमेश्वराची प्रार्थना केली असतां आपलीं कर्तव्यकर्में कोणकोणतीं आहेत हें जाणण्यास तो आपणांस सुबुद्धि देईल. आणि तीं कर्में आचरावयास सामर्थ्यहि आपणांस देईल."[२६]

3. *An Address to Native Nobility and Gentry.* १८४८.

मराठे सरदार व राजेरजवाडे यांच्या मुलांसाठीं एक वर्ग काढण्यांत आला होता, असें दिसतें. त्यांना उद्देशून हें व्याख्यान कँडीनें लिहिलें. या व्याख्यानाचा उद्देश व

२३ *D P I Board of Education Poona Sanskrit College 1848 p 258*

२४ शं. ग. दाते मराठी-ग्रंथ-सूचि. पृ. ३९.

२५ मेजर टी. कँडी. नीतिशास्त्राची परिभाषा. पृ. १४—१५

२६ तत्रैव. पृ. ६१.

यांतील विषय काय होता, यासंबंधी कँडीनें कार्टर यांना एक पत्र लिहिलें आहे. हें व्याख्यान १८४८ मध्यें लिहिलें असावें, असें दिसतें. कँडीच्या पत्रात याविषयी माहिती मिळते ती अशी :

"With reference to the class recently formed in the College under the sanction of Board for Instruction of the children of the Native Nobility and Gentry I beg to state that my Pundit, Purshurampant Gurbole, and myself have written an address to these class of Native society, setting forth the advantages and pleasures attendant on the acquisition of knowledge, and recommending the acquisition to them."[27]

अशा आशयाचें पत्र लिहून बोर्डानें जर मान्यता दिली तर याच्या पांचशें प्रति छापाव्यात, असें कँडीनें कळविलें.[२८] पुढें हें व्याख्यान मराठी व इंग्रजी या भाषात छापण्यास बोर्डानें मंजुरी दिल्याचें कार्टरनें कँडीस कळविलें. या व्याख्यानाचा इंग्रजी तर्जुमा सरकारी दप्तरात सांपडतो, पण मूळ मराठी व्याख्यान सापडत नाही. मात्र आपल्या कामाचा अहवाल डी. पी. आय्. यांस सादर करतांना या पुस्तकाचा उल्लेख कँडीनें केलेला आढळतो.[२९]

## ४. विरामचिन्हांची परिभाषा; १८५०.

हें शुद्धलेखनावरील पुस्तक कँडीनें सन १८५० मध्यें तयार केलें, असें दिसतें. या पुस्तकाचा बोर्ड ऑफ एज्युकेशनच्या रिपोर्टांत उल्लेख आढळतो.[३०] हें पुस्तक सावंतवाडी प्रथालयांत होतें. तें मुंबई येथील मराठी संशोधनमंडळाला नुकतेच उपलब्ध झालें आहे. या पुस्तकाविषयीं 'ज्ञानोदया'त जी माहिती आली आहे, ती पुढीलप्रमाणें:—

"'विरामचिन्हांची परिभाषा' या नांवाचें नवीन १६ पृष्ठाचें मराठी पुस्तक हल्लीं मेजर क्यांडी साहेबानें रचलें आहे. तें विद्यार्थ्यांस फार उपयोगी पडेल आणि सर्वांनी विरामचिन्हाविषयीं जाणावें हें बरें आहे. हल्लीं एतद्देशीय लोक विरामचिन्हांविषयीं फार चुका करतात. परंतु जर या पुस्तकाचा अभ्यास करतील तर मग अशा चुका होणार नाहींत. हें पुस्तक करण्याचा उद्देश कोणता याविषयीं प्रस्तावनेंत येणें प्रमाणें लिहिलें आहे.

२७ *D. P. I Board of Education Poona Sanskrit College* 1848 p. 282
२८ *Ibid* p 290
२९ *D P I Miscellaneous Vol* XIII 1856 p 61
३० *Report of the Board of Education No.* IX 1850-51. p 75 तसेंच Sir A Grant *Catalogue of the Native Publications in the Bombay Presidency*. p. 116 आणि *D. P. I Miscellaneous Vol* XIII 1856 p 61 यावर पहा.

"मराठी भाषेतील ग्रंथांत विरामचिन्हें घालण्याची चाल मागें नव्हती. परंतु युरोपखंडांतील इंग्लिश वगैरे भाषांमध्यें हा चिन्हांपासून बहुत उपयोग होतो, हें पाहून मराठी भाषेनेंहि हीं चिन्हें घालण्याची चाल पडावी असी इच्छा अलीकडे बहुतांस झाली आहे. म्हणून इंग्लिश भाषेतील हीं चिन्हें मराठी भाषेंत ध्यावयाजोगीं आहेत तीं घेऊन त्यांचें ज्ञान सर्व लोकांस व्हावें या हेतूनें, ही परिभाषा केली आहे."[३१]

या प्रस्तावनेवरून शुद्धलेखनाविषयीं कँडीनें जें पुस्तक तयार केलें तें मराठी भाषेमध्यें विरामचिन्हांची योग्य पद्धत सुरू होऊन शुद्धलेखनामध्यें चुका होतात त्या होऊं नयेत या उद्देशानें त्यानें तयार केलें, असें स्पष्ट दिसून येतें. या पुस्तकाच्या एक हजार प्रती कँडीनें छापल्याचें स्टोव्हेल यांना लिहिलेलें ता. ६ मे १८५० चें पत्र उपलब्ध आहे.[३२]

५ वाचनपाठमाला (व्हर्नाक्युलर रीडर नं. १.) १८५०.

या पुस्तकाची पहिली आवृत्ति १८५० मध्यें निघाली व दुसरी १८५५ मध्यें प्रसिद्ध झाली. कँडीनें हें पुस्तक रचल्याचा उल्लेख दोन ठिकाणीं आढळतो.[३३] कँडीनें जी पुस्तकें लिहिलीं त्यापैकीं बरींच पुस्तकें शाळेच्या उपयोगासाठीं व विद्यार्थ्यांना इंग्रजी व मराठी या भाषांचें ज्ञान व्हावें या उद्देशानें तयार करण्यात आलीं होतीं. विशेषतः वाचनपाठमाला हें पुस्तक कसें तयार झालें याची माहिती महत्त्वाची आहे. मेजर कँडी हा आपल्या विद्यार्थ्यांना मराठी भाषांतरासाठीं इंग्रजी उतारे देत असे. विद्यार्थ्यांनीं भाषांतर केल्यानंतर तो ते तपासून त्यांतील चुकलेल्या भागावर खूण करी व पुढें त्याचें स्वतःच भाषांतर करीत असे. नंतर जेव्हां वर्ग चालू होई तेव्हां मूळचा उतारा, विद्यार्थ्यांचें भाषांतर व स्वतःचें भाषांतर याची काळजीपूर्वक तुलना केली जाई. अशा तऱ्हेनें मॅकलक्च्या तिसऱ्या पुस्तकांतील बरेच उतारे भाषांतरित झाले व वाचनपाठमाला हें पुस्तक तयार झालें.[३४]

या पुस्तकाची सन १८५० ची आवृत्ति उपलब्ध आहे. या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत कँडीचें मनोगत व्यक्त झालेलें दिसून येतें. हें पुस्तक तयार का केलें याविषयीं तो प्रस्तावनेंत म्हणतो,

"इंग्रजीमध्यें सिरीज ऑफ् लेसन्स आणि थर्ड रीडिंग बुक ह्या नांवाचीं दोन

३१ ज्ञानोदय सन १८५० पृ. १९७.

३२ *Board of Education Elphinstone Institute* 1850. p. 8.

३३ *Report of the Board of Education No.* IX 1850-51. p 75 व D. P. I *Miscellaneous* Vol. XIII. 1856. p 61.

३४ *Report of the Board of Education. No* IX 1850-51. p 76.

पुस्तकें मकलक नांवें साहेब ह्यांनीं केलीं आहेत, त्यांतील बहुतेक गोष्टींचीं भाषांतरें या पुस्तकांत आहेत."[३५]

"हीं भाषांतरें पुणें पाठशाळेंतील विद्यार्थी, जे इंग्रजी भाषेचा व मराठी भाषेचा अभ्यास करितात, त्यांस इंग्रजी भाषेचें मराठी भाषांतर कसें करावें हें समजण्याकरितां केलीं होतीं, तीं हल्लीं एकत्र जमवून त्यांचें एक वाचण्याचें पुस्तक मेहरबान बोर्ड ऑफ एज्युकेशन यांच्या हुकुमावरून केलें आहे."

"ह्या पुस्तकांतील गोष्टींपैकीं 'सहल करून येणें' 'दोन रुपयांची योग्यता' व 'वेळ लौकर जाण्याचा उपाय' ह्या तीन गोष्टी कृष्णा निपळोणकर पाठशाळेंतील एक विद्यार्थी ह्यानें इंग्रेजी पुस्तकांतील विषय मनांत आणून इकडील रीतीप्रमाणें रचिल्या."

"हीं भाषांतरें करतांना परशुरामपंत गोडबोले ह्यांचें साहाय्य उत्तम रीतीनें मिळालें हें भाषांतरकर्ता संतोषानें लिहितो."[३६]

ह्या पुस्तकांतील भाषा व वाक्प्रचार कशा तऱ्हेचे होते हें समजण्यासाठीं पुढें कांहीं नमुने दिले आहेतः—

मुलांस उपदेशः—"अन्न आणि वस्त्र आणि रात्रीं निजावयाकरितां उबेचें अंथरूण ह्यांची पुरवणी तुमच्यासाठीं कोण करितात." पृ. १.

माझें नांव काय? :—"त्वां बिछान्यावर राहून झोंप घ्यावी म्हणून मी प्रकाश देत नाहीं तर त्वां उठून खपावें, वाचावें, आणि रपेट करावी म्हणून प्रकाश देतो." पृ. ५

मानवी कुटुंबः—"तीं नाना बोल्यांनीं देवाची प्रार्थना करितात, तरी तो सर्वांच्या बोल्या समजतो. ज्यांचें संरक्षण देव न करी इतकीं हलकीं कोणीं नाहींत." पृ. ९.

मनुष्यजातीचे प्राणीः—"पायांत शेपटी घालून भ्यालेपणा दाखवितो." पृ. १४.

प्रासीचा अर्धा वाटाः—"सरदार आणि ते मेजवान लोक ह्यास तें मोठें नवल वाटलें," पृ ६१.

## ६ शाळांतील मुलांकरितां पुस्तकें (एक ते सहा).

मराठी शाळांतील मुलांकरितां मराठी पहिलें, दुसरें, तिसरें, चवथें, पांचवें,

---

३५ अशा प्रकारची माहिती *Report of the Board of Education No VIII 1849* p ४५ यावरहि मिळते.

३६ मेजर टी. कँडी वाचनपाठमाला-प्रस्तावना.

सहावें हीं पुस्तकें तयार केल्यावर व या मालेमधील सातवें अथवा शेवटचें पुस्तक तयार करीत असल्याचा उल्लेख कँडीनें एका रिपोर्टांत केला आहे तो असा :—

"Personal Transaction :—(1) I carried through the press the Fifth Book of the Marathi series which I stated in my last Report was ready. (2) I completed the preparation of the Sixth Book and carried it through the press. (3) I revised the First, Second, Third and Fourth Books and carried a New Edition of each through the press. (6) I have made good progress in the preparation of the Seventh or last book of the Marathi Series."[37]

या पुस्तकांपैकीं पहिलीं सहा पुस्तकें उपलब्ध होतात. यावरून सातवें किंवा शेवटचें पुस्तक कँडीकडून तयार झालेलें दिसत नाहीं. मात्र पहिल्या पुस्तकाचे दोन भाग मिळून कँडीनें या पुस्तकाचा उल्लेख यांत केला असला, तर तीं पुस्तकें एकंदर सात होतात.

लहान मुलांकरितां पहिलें पुस्तक सन १८५८ मध्यें प्रसिद्ध झालें. या पुस्तकाचा दुसरा भाग त्याच वर्षी प्रसिद्ध झाला. पहिल्या भागाची दुसरी आवृत्ति १८६० मध्यें व दुसऱ्या भागाची दुसरी आवृत्ति १८६१ मध्यें प्रकाशित झाली. ही आवृत्ति उपलब्ध आहे. हें पुस्तक कँडीनें सुधारल्याचा उल्लेख वरी वर दिलेल्या रिपोर्टांत आहे, तरी पुस्तकावर रावसाहेब भास्कर दामोदर पाळंदे यांचें नांव आहे. कदाचित् यांत कँडी व त्याचे हाताखालील भाषांतरकार यांचाहि थोडासा हात असावा.

दुसऱ्या पुस्तकाचें नांव थोडेसें बदललें आहे तें शाळांतील मुलांकरितां दुसरें पुस्तक असें आहे. यावर मेहरबान डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन यांच्या हुकुमावरून मराठी ट्रान्स्लेटर व त्याच्या हाताखालची मंडळी यांनीं केलें, असें नमूद आहे. याची पहिली आवृत्ति १८५८ मध्यें प्रसिद्ध झाली. दुसरी १८६० ची आवृत्ति उपलब्ध आहे.

शाळांतील मुलांकरितां तिसरें पुस्तक याची पहिली आवृत्ति १८५८ ते ६० च्या दरम्यान प्रसिद्ध झाली असावी. या पुस्तकाची १८६३ मधील चवथी आवृत्ति उपलब्ध आहे. हें पुस्तक कोणी केलें याचा खुलासा मागच्याप्रमाणें या पुस्तकांत केला आहे.

शाळांतील मुलांकरितां चवथें पुस्तक याची पहिली आवृत्ति १८५८ ते ६० च्या दरम्यान प्रसिद्ध झाली असावी. या पुस्तकाची १८६१ मधील तिसरी आवृत्ति मिळत असून त्यावर पुस्तक कोणी केलें याचा खुलासा मागच्याप्रमाणेंच आहे.

३७ D. P. I. Translation Department. Vol. XIX 1861-62. p. 125.

शाळांतील मुलांकरितां पांचवें पुस्तक हें याच सुमारास म्हणजे १८५८–६० मध्यें प्रथम प्रकाशित झालें असावें. तिसरी आवृत्ति १८६५ ची पाहावयास मिळते. पुस्तक कोणी केलें याचा खुलासाहि तींत मागच्याप्रमाणेंच आहे.

शाळांतील मुलांकरितां सहावें पुस्तक याची पहिली आवृत्ति १८६१ मध्यें प्रसिद्ध झाली व ती उपलब्ध आहे. हें पुस्तक कोणी केलें याचा खुलासा मागच्याप्रमाणें याहि पुस्तकावर आहे.

कँडीच्या या पुस्तकाच्या पुढें पुष्कळच आवृत्त्या निघाल्या.[३८] हीं सर्व पुस्तकें १८५८ ते १८६१ या कलांत रचिलीं गेलेलीं दिसतात. पत्रयें पुस्तक कोणत्या हेतूनें व कसें तयार केलें, हें कँडीनें हॉवर्ड यांना हेंच पुस्तक तयार करीत असतांना कळविलें इतें. तेंच धोरण हीं सर्व पुस्तकें तयार करण्याच्या बाबतींत कँडीनें अवलंबिलें होतें असें दिसतें. तो लिहितो,

"The translations from English books that have been made by myself and by the translation exhibitioners are not simply translations, but are adaptations of the original pieces I have a good hope, therefore, that this book will prove very acceptable to the native public

"I have carefully revised the pieces that I have admitted into the book. The work done under my orders by the translation Exhibitioners I have altered and corrected whenever it seemed necessary to do so, but the work of others I have altered only so far as was necessary to secure consistency and uniformity in the work[३९]"

कँडीच्या वर दिलेल्या पत्रांतील उताऱ्यावरून हीं पुस्तकें तयार करण्यांत कँडीचें अंग किती व दुसऱ्या भाषांतरकाराचें अंग किती, हें दिसून येईल.

या पुस्तकांच्या अंतरंगाचा नीट विचार केला तर असें दिसून येईल कीं, कँडीचा कल मनोरंजनापेक्षा बोधाकडे अधिक झुकतो. मुलाच्या मनावर लहानपणापासून चांगल्या गोष्टींचा ठसा उमटला पाहिजे या दृष्टीनें यात धड्याची निवड केली आहे.

३८ या पुस्तकांच्या निरनिराळ्या आवृत्तींची माहिती *The Bombay Educational Record* Vol. V. 1869 pp 97, 152, 320 Vol VI 1870 p. 134 : Vol. VII 1871. p 172 · Vol VIII 1872 p 207 · Vol. IX. 1873 pp 59, 108 यावरून मिळते.

३९ D P I. Book-Depot Vol XXII 1859 p. 182.

बोधप्रद निबंध राहूं द्या, पण ज्या मनोरंजक अशा गोष्टी यांत घातल्या आहेत त्यांतून कांहींना कांहीं तरी बोध काढलाच पाहिजे असें कँडीचें धोरण त्याच्या सर्व पुस्तकांतून दिसून येतें. तसेंच मराठी भाषेचें ज्ञान, त्या भाषेचें सौंदर्य व इतर गुणविशेष हे माहित होण्यासाठीं वाङ्मयीन धडे घालण्यापेक्षां, सर्वसामान्य माहिती विद्यार्थ्यांना व्हावी व त्यांना सर्व विषयांचें ज्ञान व्हावें, या हेतूनें हीं पुस्तकें रचतांना त्यांत धडे घातले आहेत. यामुळें इतर धड्यांबरोबर विद्यार्थ्यांना माहिती होण्याच्या दृष्टीनें प्राणीशास्त्र, वनस्पतिशास्त्र व प्रवासवर्णनपर असे पुष्कळ धडे त्यांत आहेत.

या पुस्तकांतील भाषेचें स्वरूप, वाचनपाठमालेंतील भाषेचे कांहीं नमुने दिले आहेत त्यावरून समजून येण्यासारखें आहे. बाळाजी पांडुरंग[४०] यांनीं कँडीच्या दुसऱ्या पुस्तकावर जी टीका केली आहे ती अशी :—

"Allow me to take this opportunity to bring to your notice, in connection with the above this practice of writing which Major Candy has succeeded in introducing in all the books with which he had anything to do. That it has been mischievous cannot be doubted from the murmur that is unanimously raised by all the best judges of the languages. It is not only contrary to all respectable usage, but it is opposed to that principles of Grammar which discards the use of words which are hard of utterance and harsh to the ear."[४१]

कँडीच्या पुस्तकांतील भाषा व्याकरणशास्त्रदृष्ट्या सदोष असल्याची टीका तत्कालिन लोकांकडून होत होती, एवढेंच वरील उताऱ्यावरून दिसून येईल.

## ७. हिंदुस्थानचें वर्णन (General Account of India)

याची पहिली आवृत्ति सन १८६० मध्यें प्रसिद्ध झाली. ह्या आवृत्तीची प्रत उपलब्ध आहे. त्यानंतर याच पुस्तकाची त्या वर्षी सुधारून नवीन आवृत्ति काढल्याचें कँडीनें आपल्या रिपोर्टांत नमूद केलें आहे.[४२] या पुस्तकाविषयीं माहिती देतांना कँडी म्हणतो,

"Marathi work entitled Hindustanchen Warnan or a general account of India which I think would be a very use-

४० बाळाजी पांडुरंग यांचे आडनांव भालेराव. मुंबईतील एक कार्यकर्ते कै. अनंत नारायण भालेराव यांचे हे आजोबा. दादोबांचे ते विद्यार्थी. म. का. प्रियोळकरकृत रावबहादूर दादोबा पांडुरंग-पृ. १५०-१५१ वरील टीप पहा.

४१ *D P I Miscellaneous. Vol. XX 1857. p 157*

४२ *D P. I. Translation Department Vol. XIX. 1861-62 p. 125.*

ful book for the senior classes of vernacular schools and for the Vernacular classes of English school.

"It is the first part of 'India' in my unfinished work on the Geography of Asia. I had occasion to refer to it some time ago when it struck me that it was very suitable for publication by itself and that it was pity to keep it back.

"I have now gone over it again and have made the alterations that have been rendered requisite by the mutiny and by the transfer of the Government from the Company to the Crown."[43]

या पुस्तकांत भूगोलाची माहिती देऊन शेवटीं हिंदुस्तानचा थोडक्यांत इतिहासहि दिला आहे. कलाकौशल्य, लोक व जाती, लोकसंख्या, भाषा, लिपि, विद्या, धर्म यासंबंधीहि माहिती या पुस्तकांत आहे. यांत इंग्रजी राज्याचा परिणाम सांगितला आहे तो उल्लेखनीय आहे. त्यावरून इंग्रज सरकारचें देशी भाषेविषयीं काय धोरण होतें, हें समजून येतें. हा भाग कँडीनें पुढीलप्रमाणें लिहिला आहे,

"इंग्लिश लोकांच्या हातीं हें राज्य आल्यामुळें दिवाणी, फौजदारी, मुलकी, वगैरे कामांची वहिवाट देशभाषेंत होऊं लागली. ही गोष्ट लोकास मोठी सुखावह झाली. मुसलमानांच्या वेळेस मुसलमानी भाषेंत होत असे. देशभाषेंत होत नसे. तेणेंकरून लोकांस फार अडचण पडे. इंग्लिश लोकांच्या हातीं प्रथम राज्य आलें तेव्हा त्यांनी तीच रीति ठेवली होती. पुढें ही गोष्ट लोकांस दुःखाची व नडीची आहे असें वाटल्यावरून सरकारी कामाची वहिवाट देशभाषेंत व्हावी असा सरकारनें नियम ठरविला."[४४]

राज्याचा परिणाम देशभाषेवर कसा झाला, हें कँडीनें यांत सांगितलेलें दिसून येतें. एकंदरींत या पुस्तकांत भूगोल व अन्य बऱ्याच विषयांची माहिती आहे.

## ८ कँडीचीं कायदेविषयक दोन पुस्तकें.

कँडीनें कायदेविषयक दोन पुस्तकांचीं मराठींत भाषांतरें केलीं आहेत. मुंबई सरकारसाठीं 'न्यू पीनल कोड'चें भाषांतर करून छापलें असा त्यानें रिपोर्टांत उल्लेख केला आहे.[४५] 'दि इंडियन पीनल कोड'—हिंदुस्तानच्या अपराध्यास शिक्षा करण्याविषयीं कायदा, असें एक पुस्तक ग्रंथांच्या कॅटलॉगात नमूद केलें आहे. हें पुस्तक १८६०

---

४३ D. P. I. Book-Depot. XXII 1859 pp 246-247 वरील माहिती कँडीनें या पुस्तकास 'Notice' या मथळ्याखाली दिली आहे.

४४ मेजर टी. कँडी—हिंदुस्तानचें वर्णन. पृ. १२०.

४५ D. P. I. Translation Department Vol. XIX 1861-62 p. 125.

मध्यें प्रसिद्ध झाल्याचें दिसतें.[४६] हें पुस्तक व 'न्यू पीनल कोड' हें पुस्तक दोनही एकत्र असावीं असें वाटतें.

या पुस्तकाप्रमाणेंच 'दिवाणी काम चालविण्याच्या रीतीविषयीं कायदा' हें दुसरें पुस्तक कँडीनें भाषांतर केल्याचा उल्लेख सांपडतो. हें पुस्तक मुंबई येथें १८५९ मध्यें प्रसिद्ध झाल्याचें दिसतें.[४७] हीं दोनहि पुस्तकें उपलब्ध नाहीत.

## ९. कँडीचीं भूगोलविषयक पुस्तकें.

भूगोलावरील पुस्तक आपण लिहित असल्याचें कँडीनें १८५१ व १८५२ च्या रिपोर्टांत नमूद केलें आहे;[४८] परंतु त्याऐवेन तरी हें पुस्तक तयार झाल्याचें दिसत नाहीं. हें पुस्तक तयार करण्यांत कां येत आहे, त्यासंबंधीं कँडीनें एके ठिकाणीं खुलासा केला आहे, तो असाः—

" भूगोल खगोल इत्यादि विषयक संवाद " [४९] नांवाचें एक शालेय पुस्तक होतें. तें आगदींच लहान असल्यामुळें सुधारून वाढवावें, असें मीं ठरविलें; परंतु हें काम समाधानकारक होणार नाहीं असें वाटून भूगोलावर एक नवीन पुस्तक लिहिण्याचें निश्चित केलें. प्रथम मोजें साहित्य थोडें असल्यानें तो विषयहि लहान झाला, पण नंतर बरेंच साहित्य मिळवून विषय व्यापक करण्यांत आला. हें पुस्तक हॅमिल्टन, थॉर्नेन मॅकन्क, एवर्ट व भूगोल विषयक पुस्तकें लिहिणारे इतर लेखक यांच्या ग्रंथांवरून तयार केलें आहे.[५०] अशा रीतीनें हें पुस्तक तयार होत असतांना त्याचा उल्लेख, 'स्कूल जॉग्रफी' असा कँडीनें केला आहे. हें पुस्तक लिहिण्यांत आपण प्रगति केल्याचें सांगून त्यांतील दोन भागांत कोणकोणते विषय येणार यांचीहि माहिती त्यानें दिली आहे.[५१] यावरून या तयार होणाऱ्या पुस्तकास स्कूल जॉग्रफी असें नांव यावयाचें त्याच्या मनांत होतें असें दिसतें. परंतु ह्या पुस्तकाचा १८६२ मध्यें पहिला भाग तयार झाल्यानंतर 'शाळांतील मुलांकरितां व इतरांकरितां, हें पुस्तक तयार करण्यांत आलें असल्याचें लिहून त्यास "A Manual of Geography for Scools and Young Persons" असें नाव त्यानें दिलें.

---

४६ Sir A. Grant. *Catalogue of the Native Publications in the Bombay Presidency* p. 66.

४७ *Ibid*. p. 56

४८ *Report of the Board of Education*. No IX 1850-51 p 75 and No X 1852 p 46.

४९ हा ग्रंथ प्रश्नोत्तर स्वरूपांत असून भूगोल आणि खगोल वर्णनाशिवाय मुसलमानी व इंग्रज अमलाचा छोटक इतिहासहि यांत आहे. मुंबई मराठी ग्रंथालयांतील मराठी दोन्ही मुद्रितें (सुवर्ण महोत्सव प्रकाशन) पृ. ५

५० D P I. *Miscellaneous* Vol. XIII. 1856 p. 59

५१ D P I *Translation Department* Vol. XIX 1861-62 p 125

ह्या पुस्तकाविषयीं माहिती देतांना आरंभींच्या 'सूचनें'त कँडी लिहितो,

"ह्या भागांत भूगोलाचें सामान्य वर्णन आणि भूगोलाच्या चार खंडांपैकीं आशिया खंडाचें वर्णन आहे. हें वर्णन आशिया खंडांतील लोकांकरितां मुख्यत्वें आहे, म्हणून इतर तीन खंडांच्या वर्णनापेक्षां आशिया खंडाचें वर्णन थोडेंसें विस्तारानें केलें आहे. तसेंच आशिया खंडांतील इतर देशांपेक्षां हिंदुस्तान देशाचें वर्णन विस्तारानें केलें आहे. त्यांतहि मुंबई इलाख्याचें वर्णन इतर इलाख्यांच्या वर्णनाहून अधिक विस्तारानें केलें आहे."[५१]

या पुस्तकाचा दुसरा भाग मुंबई येथें सन १८६५ मध्यें प्रसिद्ध झाला. यांत कोणते विषय आहेत याची माहिती 'सूचनें'त कँडीनें खालीलप्रमाणें दिली आहे:

"ह्या दुसऱ्या भागांत यूरोप, आफ्रिका, आणि अमेरिका हीं तीन खंडें, व ओशियानिका (पॅसिफिक महासागरातील बेटें) ह्यांचें वर्णन केलें आहे."[५२]

एकंदरीत दुसऱ्या भागाची ही कल्पना त्यानें १८५९ मध्यें 'हिंदुस्तानचा भूगोल' या नांवानें दिली होती, तो भूगोल अखेर १८६५ मध्यें वरील नांवानें प्रसिद्ध झाला.

१० भाषणसांप्रदायिक वाक्यें (Idiomatic Sentences. English and Marathi).

कँडीच्या या पुस्तकाची पहिली आवृत्ति केव्हां निघाली, तें निश्चित समजत नाहीं. या पुस्तकाची तिसरी आवृत्ति सन १८५८ मध्यें प्रसिद्ध झालेली उपलब्ध आहे. एका पानावर इंग्रजी व शेजारच्या पानावर मराठी अशा स्वरूपाची या पुस्तकाची मांडणी आहे. या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत आपण हें पुस्तक कां लिहिलें आहे, याचा खुलासा करतांना कँडी लिहितो,

"This collection is not merely a collection of grammatically correct sentences; but the aim of the compiler has been to give sentences involving some point of idiom, or nicety of language. The point involved is sometimes in the English, sometimes in the Marathi"[५३]

पुष्कळ ठिकाणीं मराठी वाक्य हें इंग्रजी वाक्याचें शब्दशः भाषांतर नाहीं. मराठी भाषेंत तें जसें बोललें जाईल तसेंच दिलें आहे. यावरून मराठी भाषेच्या दृष्टीनें या वाक्यांची रचना केली आहे. शेवटीं, हें पुस्तक इंग्लिश लोकांना मराठी भाषा शिक

५१ मेजर टी. कँडी. भूगोलाचें वर्णन. भाग १ ला, 'सूचना.'

५२ मेजर टी. कँडी. भूगोलाचें वर्णन. भाग २ रा, 'सूचना'. अप्राप्य प्रकाशाची माहिती *D P I Book Depot Vol XXII 1859 p 247* वर मिळते.

५३ मेजर टी. कँडी. भाषणसांप्रदायिक वाक्यें. (३ री आवृत्ति), *Preface p 3*

ल्याला व मराठी भाषा अवगत असणाऱ्या लोकांस इंग्रजी शिकण्यास उपयोगी पडेल, अशी आशा कँडीनें व्यक्त केली आहे.

कँडीनें इंग्रजी वाक्यांचें मराठींत भाषांतर कसें केलें आहे, याची कांहीं उदाहरणें पाहिलीं असतां या पुस्तकाचें स्वरूप आकलन होईल. कांहीं इंग्रजी वाक्यांचें कँडीनें केलेलें भाषांतर पहा:— "I was quite taken aback when I heard that"— तें ऐकून माझी बुद्धि चरक झाली.

"They abhor the very name of him."— त्याच्या नांवानें ते थोटे फोडतात. त्याच्या नांवानें पाणी तापतें.[४४] "See he is quite absent; he does not hear what any one says." पहा–तो देहावर नाहीं (किंवा त्याला देहमान नाही) तो कोणाचें ऐकत नाहीं."[४५]

इंग्रजी वाक्याच्या या भाषांतराप्रमाणें इंग्रजी शब्दाचे मराठी अर्थहि पहाण्यासारखे आहेत:

"Accomplished —तडीपार झाले. Responsible for it मोहरा मजकडे आहे.[४६] According to order —बमूजिबी हुकुम, [४७] came to blows— हातापल्लीस आले."

अशीं आणखी अनेक उदाहरणें दाखवितां येतील; पण वर दिलेल्या उदाहरणांवरून या पुस्तकाचें स्वरूप समजेल.

### कँडीनें इतरांच्या पुस्तकांत केलेल्या सुधारणा:

आतांपर्यंत कँडीनें जी पुस्तकें स्वतः लिहिलीं व भाषांतरें केलीं त्यांचा आढावा घेतला आहे. यापुढें दुसऱ्यांनीं लिहिलेल्या पुस्तकांत सुधारणा करून कँडीनें तीं प्रसिद्ध केलीं अशा पुस्तकांची माहिती द्यावयाची आहे. जुनी आवृत्ति संपल्यानंतर नवीन आवृत्ति काढतांना त्यांत जर कांहीं सुधारणा करावयाची असेल तर ती सुधारणा करण्याचा अधिकार कँडीस असे. अशा पुस्तकांत कोणत्या सुधारणा करावयाच्या यासंबंधीं सरकारचें धोरण ठरलेलें असे. तें असें:—

"With a view of still further weeding our depositories, if necessary, we have called the attention of Major Candy to the subject, requesting him to examine very carefully each of our Mahrahta publications, with a view of removing everything that may be found objectionable, previous to passing new editions through the press, and of striking off

४४ तत्रैव. पृ. ६-७

४५ तत्रैव. पृ. ८-९.

४६ तत्रैव. पृ १०-११.

४७ तत्रैव. पृ. ४१ ३३.

the list any work which may be found to contain either false morality or false science." [५९]

या धोरणास अनुसरून कँडीनें जी अनेक पुस्तकें सुधारलीं तीं पुढीलप्रमाणें :—

१ इसापनीति कथा : [६०]

हें पुस्तक (Aesop's Fables चें भाषांतर) सदाशिव काशिनाथ छत्रे यांनीं लिहिलेलें १८४७ मध्यें प्रसिद्ध झालें होतें, त्यावरून कँडीनें सुधारून तयार केलें. त्यांतील मुद्यांतील कांहीं गोष्टी काढून टाकून नवीन गोष्टी घालण्यांत आल्या. तसेंच म्हणी, व्याकरण व तात्पर्यविषयक भाग सुधारण्यांत आला. मूळच्या भाषांतरकर्त्यानें पुस्तकांतील ग्रीक देवतांबद्दल हिंदु देवतांचीं नांवें घातलीं होतीं. तीं गोष्टींतील कथानकांशीं विसंगत असल्यानें ग्रीक देवतांनीं नांवें पुन्हां त्या पुस्तकांत घालण्यांत आलीं. त्याचप्रमाणें इसापच्या नवीन ३५ गोष्टींचें भाषांतर करून व त्याला इसापचें चरित्र जोडून त्यानें हें पुस्तक पूर्ण केलें. [६१] ह्या सुधारलेल्या पुस्तकाची नवी आवृत्ति १८५१ मध्यें निघाली. [६२]

२ हिंदुस्तानचा इतिहास (बाळशास्त्री यांचा Introduction to the History of India). [६३]

या पुस्तकाचें परीक्षण १८४५च्या रिपोर्टांत सांपडतें. या पुस्तकांतील प्रत्येक प्रकरणावर आपलें मत देऊन व्याकरणदृष्ट्या व ऐतिहासिक दृष्ट्या कँडीनें चुका काढल्या आहेत. [६४] पहिल्या प्रकरणांतील दुसऱ्या परिच्छेदाबद्दल लिहितांना, "The construction of this para is very obscure and scarcely grammatical," [६५] असा कँडीनें शेरा मारला आहे. तिसऱ्या परिच्छेदाबद्दलहि त्यानें असेंच मत प्रदर्शित केलें आहे. याचें कारण देतांना या परिच्छेदांतील सुरवात 'परंतु' या उभयान्वयी अव्ययानें करण्यांत आल्याचें त्यानें सांगितलें आहे. सातव्या परिच्छेदाविषयीं तो लिहितो, "A very inelegant and bad phrase occurs in this para" [६६]

---

५९ *Report of the Board of Education* Vol. VIII. 1849 p 43

६० हें पुस्तक सुधारल्याचा उल्लेख *Report of the Board of Education* Vol IX, 1851. p 75 वर आहे.

६१ *Report of the Board of Education* Vol IX 1851 p 76

६२ मुंबई मराठी ग्रंथसंग्रहान्तील मराठी ग्रंथ मुद्रितें. पृ १०.

६३ पुस्तक सुधारल्याचा उल्लेख *Report of the Board of Education* Vol IX 1851. p 75 वर आहे.

६४ D P I Board of Education Miscellaneous Vol II 1845 pp. 307-327

६५ Ibid p 309

६६ Ibid p 310

एवढें लिहून चुकीच्या शब्दसमूहाचें उदाहरण त्यानें दिलें आहे तें असें: "No knowledge is known" याचें 'कांहीं माहीतगारी कळत नाहीं,' असें लेखकानें केलेलें भाषांतर आहे. त्याऐवजीं "कांहीं कळत नाहीं किंवा कांहीं माहीतगारी नाहीं" असें पाहिजे, असें कँडीनें म्हटलें आहे.[६७]

या सर्व पुस्तकाचें विस्तृत परीक्षण करून कँडीनें General observation या सदराखालीं या पुस्तकावर आपलें मत प्रदर्शित केलें आहे तें असें:—

"I feel very great difference in expressing an opinion on a composition by so distinguished a scholar as Bal Shastree; but my opinion having been required I feel it my duty to say that to render this book worthy of the high character of Bal Shastree and of adoption by the Board of Education it should undergo a very *careful* revision; the faults I have pointed out should be corrected, and the style should be simplified."[६८]

यावरून पुढें ही आवृत्ति सुधारून कँडीनें या पुस्तकाची नवी आवृत्ति १८५२ मध्यें प्रसिद्ध केली असावी.[६९]

### २ हिंदुस्थानांतील इंग्लिशांच्या राज्याचा इतिहास:[७०]

बाळशास्त्री जांभेकर यांचें हें पुस्तक तपासून या पुस्तकाचा पहिला भाग कँडीनें सुधारला, परंतु कँडीनें ज्या दुरुस्त्या केल्या त्या आपल्या रिपोर्टांत न देतां दुरुस्त केलेली प्रत छापखान्यांत पाठवून दिली असावी. या विषयीं तो म्हणतो,

"I have not thought it necessary to note down all the corrections and alterations I have made. They can be seen at once by a comparison of the works as written out for the press with the original MS"[७१]

बाळशास्त्र्यांच्या या इतिहासाचा दुसराहि भाग कँडीनें सुधारून छापण्यासाठीं लिहून काढला. या विषयीं कँडी म्हणतो,

"Second part of Bal Shastree's 'History of British India' revised and written out ready for the press."[७२]

याहि भागांत काय सुधारणा केल्या त्या कँडीनें दिल्या नाहींत. याची पहिली

---

६७ *Ibid* p. 310.

६८ *Ibid* p. 327

६९ शं. ग. दाते मराठी-ग्रंथसूचि, पृ. ९५३.

७० हें पुस्तक सुधारून छापण्यासाठीं तयार केल्याचा उल्लेख *D P I Miscellaneous* Vol. XIII 1856, p. 60 वर आहे.

७१ *D P I Board of Education Poona Sanskrit College* 1849, p. 17

७२ *Ibid* p. 183

आवृत्ति १८४९ मध्यें निघाली व दुसरी आवृत्ति १८५४ मध्यें प्रसिद्ध झाली.

### ४ बाळमित्र, भाग १ व २.[५४]

सदाशिव काशिनाथ छत्रे यांनीं भाषांतर केलेला बाळमित्राचा पहिला भाग सन १८२८ मध्यें प्रसिद्ध झाला होता. या पुस्तकाची नवीन आवृत्ति काढतांना त्यांत सुधारणा काय कराव्या लागतील, या संबंधीं कँडीनें एच्. ए. कार्टर यांना २१ डिसेंबर १८४८ च्या पत्रानें पुढीलप्रमाणें कळविलें आहे:—

"I find that this very idiomatical and nice school book is most *wretchedly punctuated*, and that it contains a number of *concanisms*, and that here and there a passage might be made plainer by substitution of an easy word for a hard one, or by the addition of a word or two more fully to bring out the meaning."

"I beg therefore to request the Board's sanction to my correcting the punctuation, altering the provincialisms, omitting unnecessary words and making passage plain, as the work is passing through the press, without any reference to the Board."[५५]

कँडीनें शुद्धलेखन, वाक्प्रचार, विरामचिन्हें इत्यादि बदलण्यास परवानगी मागितली, एवढेंच नव्हे तर मूळच्या बाळमित्रांत काय सुधारणा केल्या आहेत याचा नमुनाहि त्यानें यासोबत पाठवून दिला. हा बदल काय केला आहे, हें समजण्यासाठीं बाळमित्राच्या प्रस्तावनेंतील दुसऱ्या परिच्छेदांतील मूळचा एक उतारा व कँडीनें दुरुस्त केलेला उतारा पुढें दिला आहे :–

"हा ग्रंथकर्त्यानें दोन गोष्टी मनांत आणून ग्रंथ केला आहे. एकतर मुलांचें रंजन. दुसरें, त्यांस सद्‌गुण सहज लागावे. प्रतिगोष्टींत, सदाचरण, सुजनता, यांची प्रशंसा आहे; यांत मोठ्या मोठ्या अघटित घटनेच्या गोष्टी सांगितल्या नाहींत, त्यांस जे सद्‌गुण लागावे म्हणून योजिले आहेत ते त्यांचे सामर्थ्यांबरोबर नाहींत; गोष्टी सांगितल्या आहेत. त्या त्यांचे सारिख्या मुलांच्या, त्यांचे खेळगड्यांच्या, त्यांचे आईबापांच्या त्यांचे चाकरमाणसांच्या : ज्यांशीं त्यांस नित्यप्रसंग असतो"...[५६] (–बाळमित्रांतील मूळ उतारा)

"हा ग्रंथकर्त्यानें दोन गोष्टी मनांत आणून ग्रंथ केला आहे; एकतर मुलांचें

---

५३ शं. ग. दाते. मराठी-ग्रंथसूचि. पृ. ९९६. तसेंच मुंबई मराठी ग्रंथसंग्रहांतील मराठी दोलामुद्रितें. पृ. १५-१६ पहा.

५४ बालमित्र भाग १ व २ ची पुस्तकें सुधारल्याचा उल्लेख D P I Miscellaneous Vol XIII 1856, p. 60 वर आढळतो.

५५ *D P I Board of Education, Poona Sanskrit College, 1849 p 193*

५६ *Ibid p 200*

रंजन; दुसरी, त्यांस सद्‌गुण सहज लागावे. प्रतिगोष्टींत, सदाचरण व सुज्नता, यांची प्रशंसा आहे; ह्यांत मोठ्या मोठ्या अघटित घटनेच्या गोष्टी सांगितल्या नाहींत. त्यांस जे सद्‌गुण लागावे म्हणून योजिले आहेत ते त्यांचे सामर्थ्याच्या बाहेर नाहींत. ज्या गोष्टी सांगितल्या आहेत, त्या त्यांचे सारिख्या मुलांच्या, त्यांचे खेळगड्यांच्या, त्यांचे आईबापांच्या, त्यांचे बहिण भावंडांच्या, ज्यांशीं त्यांस नित्यप्रसंग असतो..."[७६]

ह्या पुस्तकाची नवी आवृत्ति सन १८५४ मध्यें प्रसिद्ध झाली. हें पुस्तक मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहे. तसेंच सन १८५७ ची आवृत्तीहि तेथें आहे.

कँडीनें 'बालमित्र' व 'इसापनीति' हीं पुस्तकें सुधारलीं खरीं; पण सुधारणेच्या नांवाखालीं कँडीनें जी ढवळाढवळ केली ती कित्येकांस न आवडून त्यांनीं कँडीविरुद्ध बऱ्याच तक्रारी सरकारकडे केल्या. यांपैकीं बाळाजी पांडुरंग भालेराव यांनीं कँडीच्या या पुस्तकांवर पुढील आक्षेप घेतला आहे:—

"When I say that all the lovers of the Murathee language prefer the old editions of बालमित्र and इसापनीति to the new ones revised by Major Candy, I am stating the fact"[७७]

याचा परिणाम होऊन यानंतर १८५९ मध्यें बालमित्राची जी आवृत्ति निघाली ती छत्रे यांच्या मूळप्रतीवरून काढण्यांत आली.

'बाळमित्र' भाग २ रा या पुस्तकाची टी. गेरफोर्ड यानें भाषांतर केलेली पहिली आवृत्ति सन १८३३ मध्यें निघाली होती. याची कँडीनें तपासलेली आवृत्ति सन १८५१ मध्यें व पुढील आवृत्ति सन १८५७ मध्यें प्रसिद्ध झाली. ह्या आवृत्तींत सुधारणा केल्याचें या पुस्तकाच्या 'नोटीस'मध्यें नमूद केलें आहे. तें पुढीलप्रमाणें :—

"The chief alterations which have been made in this edition of Captain Gaisford's excellent work, consist in a substitution of easy words for some hard ones, in a simplification of the construction here and there, and in replacing Concunee forms by pure Desh ones The title of the last piece has been changed."[७८]

५ भूगोल खगोल म्हणजे भूगोल आणि खगोल विद्येचीं मूलतत्त्वें.[७९]

मो. सलिव्हन याचें हें 'भूगोल खगोल' या नांवाचें पुस्तक कँडीनें सुधारलेलें

७७ D P I Miscellaneous Vol. XX 1857, p 157

७८ टी. गेरफोर्ड. मराठी बालमित्र. भाग २ रा. Notice

७९ हें पुस्तक सुधारल्याचा उल्लेख D P I Miscellaneous Vol XIII 1856 P 61 वर आहे.

इ. स. १८५४ मध्यें प्रसिद्ध झालें.[८०] या पुस्तकाचा कांहीं भाग महादेवशास्त्री पुराणिक, पुना कॉलेजचे ट्रान्सलेशन एक्झिबिशनर यांनीं भाषांतरित केला होता; परंतु त्यांनीं कॉलेज सोडल्यानंतर तें पुस्तक सुधारण्याचें व छापण्यासाठी प्रत तयार करण्याचें काम कँडीनें केलें. याविषयीं पुस्तकाच्या नोटमध्यें कँडी म्हणतो,

"As he left the College, (to be acting Head Master of the School at Kurachee), immediately on giving it to me much extra labour has devolved on me in revising it and carrying it through the press." [८१]

६ नीतिबोधकथा[८२]

'नीतिकथा' व 'बोधकथा' यांतील कथा घेऊन हें पुस्तक कँडीनें तयार केलें आहे. यापैकीं 'बोधकथा' या पुस्तकाची शिळा-छापावरील १८३१ सालची दुसरी आवृत्ति मिळते. यांत प्रथम कांहीं मनोरंजक व बोधपर कथा दिल्या असून नंतर दान, जिव्हानियमन, सुखाचें मूळ आदि विषयांवर लहानसे निबंध आहेत.[८३] 'नीतिकथा' या पुस्तकाच्या १८३८ मधील तिसऱ्या आवृत्तीचा उल्लेख मिळतो.[८४] नीतिबोधकथा हें पुस्तक १८५६ मध्यें प्रसिद्ध झाल्याचा उल्लेख आढळतो;[८५] परंतु तें उपलब्ध झालें नाहीं.

७ नवीन लिपिधारा.[८६]

कँडीनें पहिलें वाचनपुस्तक म्हणून नवीन लिपिधारा हें पुस्तक रचल्याचें नमूद केलें आहे;[८७] परंतु हें पुस्तक उपलब्ध नसल्यामुळें तें केव्हां प्रसिद्ध झालें, तें समजत नाहीं.

---

८० मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील मराठी शिलामुद्रितें. पृ. २४.

८१ महादेव शास्त्री पुराणिक. भूगोल खगोल म्हणजे भूगोल आणि खगोल विषयीं मूलतत्त्वें, Note

८२ हें पुस्तक तयार केल्याचा उल्लेख *D P I Miscellaneous* Vol XIII 1856, pp 60-61 वर आहे.

८३ मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील मराठी शिलामुद्रितें. पृ. ४.

८४ शं. ग. दाते. मराठी-ग्रंथ-सूचि. पृ. ८१९.

८५ तत्रैव. पृ. ८१९.

८६ हें पुस्तक तयार केल्याचा उल्लेख D P I Miscellaneous Vol XIII 1856, p 62 वर आहे.

८७ सदर पृ. ६१. लिपिधारा या नांवाने मराठी व कानडी भाषा शिकणारांसाठीं केलेलें दुसरें निराळें पुस्तकही उपलब्ध आहे. सन १८८१ (मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय).

८ महाराष्ट्र देशाचें वर्णन आणि इतिहास यांचा प्रश्नोत्तररूपरूप ग्रंथ[८८]

कुव्हाना लिमये यांचें हें पुस्तक १८४०[८९] व १८४७[९०] मध्यें छापल्याचा उल्लेख सांपडतो. कँडीनें जें पुस्तक सुधारून छापलें ती १८६० ची आवृत्ति असावी, असें वाटतें. कारण १८६० मध्यें या पुस्तकाची ७ वी आवृत्ति प्रसिध्द झाल्याचें नमूद करण्यांत आलें आहे.[९०] ही आवृत्ति उपलब्ध नाहीं.

### कँडीनें केलेलीं पुस्तकांचीं परीक्षणें :

कँडीनें मराठी भाषेंत कांहीं पुस्तकांचीं भाषांतरें केलीं व इतर बरींच पुस्तकें सुधारून नवीन आवृत्ति छापण्यासाठीं तयार केलीं. या कामासाठीं कॉलेजच्या सुपरिंटेंडट याबरोबरच ट्रान्सलेटर म्हणून त्याची नेमणूक झाली होती. कॅंडीनें शब्दकोश पुरा केल्याबरोबर भाषांतराच्या कामाकडे लक्ष द्यावें अशा आशयाचें पत्र बोर्डाचे सेक्रेटरी स्टोव्हेल यांनीं लिहिलेलें आढळतें. मराठी शिक्षणाच्या व वाङ्मयाच्या कार्यांत कँडीचें महत्त्व दाखविणारें असें हें पत्र पुढीलप्रमाणें आहे:—

"Greatly as the Board of Education value your services as a Superintendent of Schools and important as it is to vernacular education that a vigilant superintendence should be expected, they are nevertheless of opinion that your time would be more valuably bestowed in literary labours and in personal superintendence of the Poona College than in any other way. The Board, therefore desire me to request that you will be kind enough as soon as your Dictionary is completed to devote yourself exclusively to the work of translation (keeping in view of the completion of the School Course laid down by the Board in the accompanying memorandum) with supervision of translation, and personal superintendence of the Poona College."[९१]

स्टोव्हेलच्या या पत्राप्रमाणें या नेमणुकीला मान्यता देऊन ट्रान्सलेटरच्या कामास आपण तयार आहोंत, असें कँडीनें स्टोव्हेल यांस कळविलें.[९२] ट्रान्सलेटर झाल्यानंतर त्याला शाळेसाठीं जी पुस्तकें लिहावीं लागलीं वा भाषांतर करावीं लागलीं, त्यांची माहिती पेयवर दिली आहे.

---

८८ हे पुस्तक तयार केल्याचा उल्लेख *D P I Translation Department Vol XIX 1861-62. p. 125* वर आहे.

८९ मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील मराठी दोलामुद्रितें पृ. १०.

९० शं. ग. दाते. मराठीग्रंथ-सूचि. पृ. ९९१.

९१ *D P I Board of Education Poona Sanskrit College 1847. p 121*

९२ *Ibid p 123.*

या शिवाय ट्रान्सलेटर असतांना कँडीनें या काळांत कांहीं पुस्तकांचें परीक्षणहि केलें आहे. पुढें कांहीं वर्षांनीं प्रिन्सिपॉल व ट्रान्सलेटर हीं दोन्ही कामें एकाच माणसाला झेंपत नसल्यामुळें त्याची विभागणी करावी, अशी कँडीनें डी. पी. आय. अर्स्किन यांना विनंती केली.[१३] यानंतर कँडी रजा घेऊन इंग्लंडमध्यें गेला. ही रजा संपल्यानंतरसुद्धां त्यानें सहा महिने पुन्हां रजा वाढविली.[१४] मध्यंतरीं कँडीनें केलेल्या विनंतीचा विचार होऊन त्याला पूना कॉलेजच्या प्रिन्सिपॉल या जागेवरून निवृत्त करण्यांत आलें व मराठी ट्रान्सलेटर म्हणून त्याची नेमणूक झाली.[१५]

या जागीं आल्यावर निरनिराळ्या अनेक पुस्तकांचें परीक्षण करून त्यांवर मत देण्याचें काम मुख्यत्वेंकरून त्यानें केलें. नाटक, कादंबरी, व्याकरण, इतिहास व भूगोल इत्यादि विविध विषयांचीं पुस्तकें त्याचप्रमाणें ज्ञानप्रसारक, सर्वसंग्रह, विविधज्ञान-विस्तार अशीं मासिकें यांचीं परीक्षणें करून त्यांतील त्याला वाटलेल्या चुका त्यानें दाखविल्या. यांपैकीं कांहीं पुस्तकें हस्तलिखित स्वरूपांत त्याच्याकडे परीक्षणासाठीं येत, असें दिसतें. कारण त्याच्याकडे अभिप्रायासाठीं आलेल्या अशा कांहीं पुस्तकांच्या परीक्षणाचे रिपोर्ट उपलब्ध आहेत; परंतु त्यांपैकीं कांहीं पुस्तकें कुठेंच प्रसिद्ध झालेलीं आढळून येत नाहींत. तरीपण त्या काळीं कोणकोणत्या विषयांवर पुस्तकें लिहिलीं जात होतीं याची माहिती आपणांस त्यावरून कळून येते. त्याचप्रमाणें कँडीकडून कशा रीतीनें या पुस्तकांचें परीक्षण होत असे, वाक्यरचना, भाषेचे प्रयोग इत्यादि व्याकरणविषयक भागांकडे त्याचें किती बारीक लक्ष होतें, हेंसुद्धां या परीक्षणांवरून आपणांस आढळून येतें. यासाठीं कँडीनें परीक्षण केलेल्या कांहीं पुस्तकाची माहिती पुढें देण्यांत येत आहे :

**१ कर्नल केपनचें तयार होत असलेलें** Part of a Marathi work ·

या पुस्तकाचें नांव दिलेलें नाहीं. कदाचित् पुस्तक तयार होत असतांना त्याचा कांहीं भाग कँडीकडे पाठविण्यांत आलेला दिसतो. हें पुस्तक तयार करण्याची केपनची मुख्य कल्पना अशी कीं, शास्त्रीय विषयावर हें पुस्तक रचावें व त्यामुळें देशांतील लोकांना सर्व विषयांचें सामान्यज्ञान व्हावें. या पुस्तकावर कँडी याच्याप्रमाणेंच बाळशास्त्री, महंमद इब्राहिम मखबा, हरी केशवजी यांनीं आपापले अभिप्राय दिले आहेत. कँडीनें या पुस्तकावर पुढीलप्रमाणें अभिप्राय दिला आहे :

> "I think it would make an interesting class book in General knowledge and that it is therefore worthy of the patronage of the Board of Education."[१६]

बाळशास्त्री यांनीं या पुस्तकाची माहिती देऊन या पुस्तकावर पुढील अभिप्राय दिला आहे :

---

१३ D P I Poona College Vol XVIII 1856. pp. 445-446

१४ D. P I. Miscellaneous Vol XIV 1857 p 220

१५ D P I Board of Ed[illegible] 1842 292-293

"I have read the greater portion of Col. Capon's work Though it adds nothing to the stock of books, which have already been translated and published in the Marathi language, yet as it presents a great number of facts in geography, astronomy, chemistry, etc., in a popular and aggreable form, it may serve as a useful and interesting class-book in general knowledge.....

The language in which the work submitted to the committee is written, is at once correct, idiomatic and easy....." [१५]

कर्नल केपनचें हें पुस्तक पुढें प्रसिद्ध झालेलें दिसत नाहीं.

२ *Treatise on Etymology.*

मराठी व्युत्पत्तीवरील हें पुस्तक कँडीकडे आलें असतांना त्यानें पुढीलप्रमाणें अभिप्राय दिला आहे:

"I think that the treatise on Etymology of the Murathee language is a work of considerable labour and research, and that it reflects credit on the compilers. It is calculated to be useful particularly to those who have some little acquaintance with Sanskrit" [१६]

ज्या पुस्तकावर कँडीनें अभिप्राय दिला आहे तें पुस्तक बहुधा विनायकशास्त्री दिवेकर यांचें 'शब्दसिद्धि निबंध' असावें. कारण हें पुस्तक १८४३ मध्यें प्रसिद्ध झाल्याचें नमूद आहे.[१७]

३ रे. वर्जेस यानें तयार केलेलें मराठी व्याकरण.

हें व्याकरण वर्जेस यानें तयार करून त्याचा पुरस्कार सरकारनें करावा या हेतूनें तें बोर्ड ऑफ एज्युकेशन यांचेकडे पाठवून दिलें. हें पुस्तक कँडीकडे आल्यावर त्यानें या पुस्तकावर खालीलप्रमाणें अभिप्राय दिला:

"I did not doubt that the Board of Education would be happy to patronize it provided it was suitable for schools, and was approved of by the class book Committee." [१८]

हें व्याकरण पुढें १८५४ मध्यें प्रसिद्ध झालें हें व्याकरण मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहे. [१९]

४. परशुरामपन्त गोडबोले यांचें *Outlines of Astronomy* मराठी खाद्येला हें पुस्तक उपयुक्त आहे असा अभिप्राय देऊन क्लास बुक

१६ *D P I Board of Education. Circular Book* 1843. p 259

१७ शं. ग. दाते. मराठी-ग्रंथसूचि. पृ. २२५.

१८ *D P I Board of Education Poona Sanskrit College* 1845. p. 3

१९ मराठी दोलामुद्रितें, पृ २४.

कमिटीकडे हें पुस्तक कँडीनें पाठवून दिलें.[१००] नंतर हें पुस्तक एल्फिन्स्टन कॉलेजचे गणित व खगोल शास्त्राचे प्रोफेसर ए. बी. ऑर्लेबार यांचेकडे अभिप्रायासाठीं पाठविण्यांत आलें.[१०१] त्यांनीं या पुस्तकावर अभिप्राय दिला आहे तो असाः—

"The intention of the author appears to have been to give some first idea in the science to school boys; a work of which description is undoubtedly a desideratum both in our English and vernacular schools"[१०२]

हें पुस्तक प्रसिद्ध झालें कीं काय तें समजत नाहीं; पण १८६४ मध्यें 'पंचांग दर्शन किंवा पंचांग समजण्याची रीत' हें परशुरामपंत गोडबोले यांचें पुस्तक प्रसिद्ध झालेलें आढळतें.[१०३]

### ५ दादोबांनीं तयार केलेलें मराठी नकाशाचें पुस्तक.

या पुस्तकावर अभिप्राय देतांना कँडी म्हणतो कीं, हें नकाशाचें पुस्तक दादोबांना गौरवास्पद आहे. तरी त्यांत कांहीं चुका झाल्या आहेत. मराठी शब्द लिहिण्यांत एकवाक्यता राहिली नाहीं. उदा. केव्हां केव्हां 'अयर्लंड' असें लिहिलें आहे तर केव्हां 'एलंड' असें लिहिलें आहे. दुसरा दोष म्हणजे नांवांत एक पद्धत नाहीं. अर्धा शब्द मराठी व अर्धा शब्द तसाच इंग्रजी ठेवला आहे. हा दोष दाखविण्यासाठीं कँडीनें 'न्यू हॉलंड' चें भाषांतर 'नवें होलंड' व 'न्यू पोर्ट' या शब्दाचें भाषांतर न करतां 'न्यू पोर्ट' अशीं नांवें लिहिण्याचीं कांहीं उदाहरणें दिलीं आहेत. शेवटीं जो अभिप्राय दिला आहे तो पुढीलप्रमाणें :—

"As a school atlas I think this is too small, and the names too crowded, for it to be very useful. It will do for reference for those who are acquainted with geography, but beginners will be puzzled by it .. This atlas however is an improvement on what we had before."[१०४]

मराठी नकाशाचें हें दादोबांचें पुस्तक सन १८३६मध्यें प्रथम प्रसिद्ध झालें.[१०५] १८४७ सालीं याची एक दुसरी नवी आवृत्ति निघाली.[१०६]

### ६ दादोबांचें मराठी भाषेचें व्याकरण.

या व्याकरणाची 'महाराष्ट्र भाषेचें व्याकरण' या नांवानें सन १८५० मध्यें

---

१०० D P I Board of Education Poona Sanskrit College 1845 p 9
१०१ Ibid p 13
१०२ Ibid p 21.
१०३ शं. ग. दाते. मराठी–ग्रंथ–सूचि. पृ. ३६३.
१०४ D P I Board of Education Miscellaneous 1847 pp 369-371
१०५ अ. का. प्रियोळकर. रावबहादूर दादोबा पांडुरंग. पृ ३३४.
१०६ शं. ग. दाते मराठी-ग्रंथसूचि. पृ. ८४३.

दुसरी आवृत्ति निघाली. या पुस्तकाची १८३६ सालीं पहिली आवृत्ति निघाली होती. या नव्या आवृत्तीवर कँडीनें अनुकूल अभिप्राय दिला होता. पहा:

"I beg to report very favourably of the work upon the whole. I think it does the author great credit, and that it is deserving of the patronage of Government. It would be useful work for the senior classes of Government Muratha Schools,and would be a suitable present to deserving scholars at the annual examination." [१०७]

१८३६ सालची ही पहिली आवृत्ति या दुसऱ्या आवृत्तीशीं ताडून पाहिली तर ही दुसरी आवृत्ति म्हणजे केवळ नवीनच ग्रंथ आहे असें वाटावें, इतकें या नव्या आवृत्तीचें स्वरूप पालटलेलें आढळतें. दादोबांच्या पहिल्या आवृत्तीच्या सर्व प्रती डिसेंबर १८४५ मध्यें संपत आल्या. त्यावेळीं बोर्ड ऑफ एज्युकेशननें त्यांना "तुमचें व्याकरण पुन्हां छापणें अवश्य आहे. त्यांत तुमच्या मनाप्रमाणें कांहीं फेरफार करावयाचा असल्यास तो करून तुम्ही दुसरी आवृत्ति तयार करावी," असें कळविलें. या सूचनेप्रमाणें दादोबांनीं व्याकरण तयार करून बोर्डाकडे पसंतीसाठीं पाठविलें. तें परीक्षणासाठीं १८४८ मध्यें कँडीकडे आलें. त्यावर कँडीनें खालीलप्रमाणें अभिप्राय दिला:

"I may say here, in general, that I think a simpler, clearer, and at the same time shorter scheme of Murathee Grammar might be drawn up. The great increase of bulk of this revised copy is not attended with a corresponding increase of worth Some of the knotty points have been very unsatisfactorily handled by Dadoba.

What I particularly wish to point of is Dadoba's vicious Marathi composition... Even though his rules of grammar were most excellent his style and composition would still be bad. His book abounds with solecisms and barbarisms of various kinds. .Another great fault of Dadoba's style is his unnecessary use of high Sanskrit words." [१०८]

कँडीच्या या अभिप्रायाप्रमाणें व्याकरणांत सुधारणा करण्याविषयीं कार्टर यानें दादोबांना ६ एप्रिल १८४८ रोजीं पत्र लिहून, कँडीच्या म्हणण्याप्रमाणें तें सुधारण्यास सांगितलें.[१०९]

कँडीच्या व्याकरण सुधारण्याच्या या सूचनेमुळें दादोबांना फार पेंच पडलेला दिसतो. त्यामुळें त्यानीं त्यावेळचा मराठी भाषेचा एक व्याकरणकार डॉ. स्टीव्हन्सन् याची

---

१०७ *G D Vol 23/540 1840 p 106* तसेंच अ. का. प्रियोळकर, रावबहादूर दादोबा पांडुरंग. पृ. २९५ पहा

१०८ *D P I Board of Education Miscellaneous 1848 p 155* (Back Side).

१०९ *Ibid p 160*

मदत घेतली. स्टीव्हन्सन् व आपण असे दोघे मिळून या व्याकरणावर विचारविनिमय करून योग्य वाटतील त्या सुधारणा करूं असें दादोबांनीं बोर्डास पत्र लिहिलें. या पत्रांतील मजकूर खालीलप्रमाणें आहे:—

"Myself and Dr. Stevenson have carefully examined Major Candy's remark on my Marathi Grammar and have adopted such of his suggestions as we thought would add to the improvement of the work in its second edition." ११०

या पत्रासोबत स्टीव्हन्सन यानें दादोबांना लिहिलेलें पत्रहि दादोबांनीं जोडलेलें आढळतें. दादोबांनीं व्याकरणांत सुधारणा केल्यामुळें आतां हें व्याकरण छापावयास द्यावें असें स्टीव्हन्सननें या पत्रात म्हटलें आहे. दादोबांसारख्या 'मराठी भाषेच्या पाणिनीला' सुद्धां कँडी सांगेल त्याप्रमाणें दुरुस्त्या कराव्या लागल्या व त्या करतांना-सुद्धां स्टीव्हन्सन्सारख्या युरोपियनाचा आश्रय घ्यावा लागला. मराठी भाषेसंबंधी कँडीचें केवढें प्रस्थ होतें तें यावरून स्पष्ट दिसतें. त्या दृष्टीनें डॉ. स्टीव्हन्सन यानें दादोबांना लिहिलेल्या पत्रांतील पुढील उतारा पहा:—

"Having examined your grammar both alone and with yourself, and spent sometime in aiding you with the suggestion as to the best mode of obviating Major Candy's objections in cases where he had not intimated the mode of doing so, I think, I can say you have now by additions, omissions and amendments freed the work from blemishes on which he animadverted and that it is extremely desirable it should go to the press without further delay." १११

## ७. दादोबांचें बोर्डाच्या नियमांचें भाषांतर.

बोर्डाच्या नियमाचें मराठी भाषांतर दादोबांनीं केलें होतें. तें छापण्यासाठीं बोर्डाकडे आलें. त्यावर कँडीनें त्यांतील चुका दाखवून आपला अभिप्राय दिला आहे. 'Principle' या शब्दाचें 'विचार' असें केलेलें भाषांतर चूक असून तें 'Consideration' या शब्दाचें भाषांतर होईल, असें कँडीनें म्हटलें आहे. 'Institute' याचा अर्थ 'कारखाना' असा दादोबानीं केला आहे, त्याऐवजी एल्फिन्स्टन इन्स्टिटयुट असाच शब्द ठेवणें बरें, असा कँडीनें अभिप्राय दिला आहे. तसेच 'Main Principle' याचें 'मुख्य मतलब' हें केलेलें भाषांतर निष्काळजीपणाचें आहे, असें कँडी म्हणतो.

अशा प्रकारच्या अनेक चुका दाखवून कँडीनें या भाषांतराविषयीं स्टोवेल यांना एक खाजगी पत्र लिहिलें, त्यांत कँडी म्हणतो,

"I was at my desk all day to look into the translation of

११० Ibid p 161

१११ Ibid p 162

the Rules of the Board. It is *very bad*. I of course lithograph it if the Board wish it, but I feel my duty to bring to their notice how erroneous it is." [१११]

यानंतर हें भाषांतर सुधारून दादोबांनीं पुन्हां बोर्डाकडे पाठविलें, त्यांतहि कँडीनें पुष्कळच दोष दाखविले आहेत. [११२] दुसऱ्या नियमाचें भाषांतर निष्काळजीपणाचें आहे म्हणून तो नियमहि कँडीनें बारीकसारीक खोडून दुरुस्त केला आहे; परंतु सोयीसाठी दादोबांचें मराठी भाषांतर प्रथम देऊन त्यानंतर कँडीनें त्यांत सुधारणा केलेलें भाषांतर पुढें देण्यांत येत आहे:—

"बोर्ड ऑफ एज्युकेशन यांचा ताब्यांत जा शाळा आहेत त्यांबाबत कायदे."

"सरकारनें लोकांची नीति चांगली व्हावी म्हणोन जे प्रयत्न मांडिले आहेत यांत मोठेमोठे जे एतद्देशीय गृहस्थ त्यांची मदत असावी व तद्वारा सर्व देशांत विद्या प्रसृत होऊन सर्वांस फायदे व्हावे असा बोर्डाचा मुख्य मतलब आहे." [११३] (दादोबांचें भाषांतर)

यांत कँडीनें दुरुस्ती केल्यानंतरचा नियम पुढें देण्यांत येत आहे. तो असा,

"बोर्ड ऑफ एज्युकेशन यांच्या ताब्यांत ज्या शाळा आहेत त्याविषयींचे कायदे."

"सरकारनें लोकांची नीति चांगली व्हावी म्हणोन जे प्रयत्न मांडिले आहेत त्यांत मोठेमोठे जे एतद्देशीय गृहस्थ त्यांचें साहाय्य असावें, व तद्वारा सर्व देशांत विद्या प्रसृत होऊन सर्वांचे हित व्हावें असा बोर्डाचा मुख्य हेतु आहे." [११४]

या नियमात दुरुस्ती करून, पुढें स्वतःच त्या नियमाचें भाषांतर कँडीनें करून दाखविलें आहे. तें असें,

"या सर्व देशांत शिक्षालाभ प्रसृत करण्यास जे बोर्ड पाहतात त्यांस मुख्य आधार मिळून लोकांची नीतिसंबंधीं अवस्था सुधारण्याकरितां सरकारनें जे प्रयत्न मांडले आहेत त्यांत एतद्देशीय वजनदार गृहस्थांचें साहाय्य संपादनार्थ यत्न करणें..." [११५]

दादोबांनीं केलेलें भाषांतर कँडीस मुळींच पसंत पडलें नाहीं, व त्यानें स्वतःच सर्व नियमांचें भाषांतर करून तें बोर्डाच्या सेक्रेटरीकडे पाठविलें. [११६] या मराठी भाषांतरानें या रिपोर्टांची वरीच पृष्ठें व्यापलीं आहेत. [११७] हें मराठी भाषांतर "शाळाविषयींचे कायदे बोर्ड ऑफ एज्युकेशन ह्यांनीं केलेले—बोर्ड ऑफ एज्युकेशन ह्यांच्या

१११ *D P I Board of Education Miscellaneous 1847 pp 60-62.*
११२ *D P I Board of Education Miscellaneous 1848 pp 73-123*
११३ *Ibid p 85.*
११४ *Ibid p 117 (Back Side)*
११५ *D P I Board of Education, Poona Sanskrit College 1849. pp 127-128.*
११६ *Ibid pp 128-378.*

असत्यारांतल्या ज्या विद्याशाला त्या विषयींचे कायदे," या शीर्षकाखालीं कँडीनें केलें आहे. हें भाषांतर सादर करतांना आपण या भाषांतरांत काय सुधारणा केली तेंहि त्यानें सांगितलें आहे. याविषयीं तो म्हणतो,

"In submitting my translation to the Board I beg to say that I have endeavoured not to deviate further from the construction of the original than the idiom of the Marathee requires. My aim has been to give a version that should be found faithful at the same that it is clear and idiomatical. I venture to hope that I have not altogether failed"[११८]

कँडीनें या नियमांचें भाषांतर पाठविलें, पण त्याअगोदरच निरनिराळ्या खात्यांत बदल होणार असल्यानें हें भाषांतर छापून प्रसिद्ध करतां येत नाहीं, असें कार्टर यानें त्यांस कळविलें[११९] व त्याचा हा खटाटोप वांया गेला.

## ८. 'स्कॉलर' या पुस्तकाचें परीक्षण.

या लहानशा पुस्तकाचें कँडीनें परीक्षण केल्याचा फक्त उल्लेख सांपडतो;[१२०] परंतु परीक्षणाचा रिपोर्ट मिळत नाहीं. किंवा या पुस्तकासंबंधींहि कांहीं माहिती मिळत नाहीं.

## ९. *An Introduction to Physical Science*, पंदनामा व पद्यात्मक *Principles of Morality*.

या तीन पुस्तकांच्या परीक्षणाचे रिपोर्ट उपलब्ध आहेत.[१२१] यांपैकीं पंदनामा हें पुस्तक प्रसिद्ध झालें असून[१२२] ते महाराष्ट्र ग्रंथालय पुणें येथें आहे. या पुस्तकाचा लेखक लोकहितवादी हे असावेसें कळतें. पहिल्या दोन पुस्तकांबद्दल कँडी म्हणतो,

"The two first works are translations One from English and the other from Persian by a Native gentleman of considerable talent and of much fluency both in English and Marathi, but who has not sufficient knowledge of the niceties of the English language and who is very careless both as a composer and as a translator."[१२३]

यांतील मराठी भाषेच्या चुका कँडीनें दाखविल्या आहेत त्या अशा:—

"'उष्ण हा शब्द 'उष्ण' पाहिजे. 'इलेक्ट्रिसिटी' याचें भाषांतर 'तेजज्ञान' केलें आहे तें चूक असून त्या ऐवजीं 'तेजोज्ञान' अशी सुधारणा पाहिजे. 'कीर्णाचा डोळा अनुमानावा' या वाक्यांत कीर्ण या शब्दानें कांहीं बोध होत नाहीं. त्याऐवजीं

---

११८ *Ibid* p 179

११९ *Ibid* p 187

१२० *Report of the Board of Education No IX 1851*, p 75

१२१ *D P I Board of Education Miscellaneous 1850* pp 92-99

१२२ शं. ग. दाते. मराठी–ग्रंथ–सूचि. पृ. ८१९.

१२३ *D P I Board of Education Miscellaneous 1850* pp 92-99

'किरण' असा शब्द घालून 'किरणांचा डोळा अनुमानाचा' असें वाक्य केलें तरी त्याचा कांहीं अर्थ लागत नाहीं, असें कँडी म्हणतो.[१२४]

'पंचनामा' या पुस्तकावर त्यानें अशीच टीका केली आहे.[१२५] पद्मानक 'Principles of Morality' या पुस्तकावर टीका करतांना तो म्हणतो,

"It is utterly unfit for use as a school book. Grown up persons will be unable to make out the meaning of it in many places."[१२६]

१०. मनोगुणित गणित—*Mental Arithmetic.*

रे. कॅलॅग्राइन यांनी *"An Introduction of Mental Arithmetic"* हें पुस्तक १८५४ मध्यें लिहिल्याचें आढळतें.[१२७] कँडीनें याच पुस्तकाचें परीक्षण केलें होतें कीं काय तें समजत नाहीं. या पुस्तकाविषयीं तो म्हणतो,

"It would make the Government schools more popular with shopkeepers, to whom Mental Arithmetic is particularly valuable. It should not supersede the present system of Arithmetic but should be additional."[१२८]

हें पुस्तक महाराष्ट्र-ग्रंथालय पुणें येथें आहे.

११. इंग्लिश प्रायमरचें मराठी भाषांतर—वासुदेव बाळाजी.

कँडीनें भाषांतर करून, या पुस्तकांतील कांहीं चुका दाखविल्या आहेत. 'आमच्यानें जाऊं शकवत नाहीं' हें वाक्य कँडीनें चूक म्हटलें असून 'आम्ही जाऊं शकत नाहीं किंवा आमच्यानें जाववत नाहीं' हें व्याकरणदृष्ट्या बरोबर होईल, असें आपलें मत त्यानें दिलें आहे.[१२९]

१२. *Pleasant stories in the Persian Munshee*—लक्ष्मण नरसिंह जोशी.

या पुस्तकाचें कँडीनें परीक्षण केलें आहे व यांतील कांहीं गोष्टी मराठी वाचना पुस्तकांत घेतल्याचें नमूद केलें आहे.[१३०] हेंहि पुस्तक प्रसिद्ध झालेलें दिसत नाहीं.

१३. *Pocket Dictionary of the Words contained in the different Marathi Text-Books of the Government Vernacular Schools.*

---

१२४ *Ibid* pp 93 and 94.

१२५ *Ibid* p 96 (*Back Side*)

१२६ *Ibid* p. 98 (*Back Side*)

१२७ *Memorial Papers of the American Marathi Mission* p 115.

१२८ D P I *Miscellaneous* Vol. XIII. 1856, p 6

१२९ D P I Book-Depot Vol XXII. 1859 pp. 577 and 578.

१३० *Ibid* p 600

गोविंद विठ्ठल[131] यांनीं या शब्दकोशाचा नमुना कँडीकडे पाठवून दिला होता. यावर कठीण शब्दाचा अर्थ सोप्या शब्दांत देण्याचा पुस्तककर्त्याचा उद्देश सफल झाला नाहीं. उलट सोप्या शब्दांना लेखकानें कठीण शब्द दिले आहेत, अशी कँडीनें टीका केली[132] आहे. हा शब्दकोश पुढें छापण्यांत आलेला दिसत नाहीं.

**१४. सर्व देशांतील निवडक म्हणी**—*Green's English Phrases with Marathi Renderings,*[133] सदाशिव विश्वनाथ.

या पुस्तकांवर मत देतांना कँडीनें कांहीं चुका दाखविल्या आहेत. त्या अशा : "What are you all about here?" याचें लेखकानें केलेलें 'तुम्ही सर्व मिळून एथें काय करतां?' या ऐवजीं 'तुम्ही सर्व येथें काय करतां?' हें म्हणणें बरें दिसेल, असें त्यानें लिहिलें आहे. "Call upon me this evening." '*आज संध्याकाळीं मला भेटा*' यामध्यें '*संध्याकाळीं माझ्या भेटीला या*' अशी सुधारणा करावी असें त्यानें म्हटलें आहे.[134]

हें पुस्तक १८६५ मध्यें प्रसिद्ध झालें आहे.[135] तें मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहे.[136]

**१५. नारायण बोध**—रामजी गणोजी चौगुले.

या पुस्तकाचें परीक्षण केल्याचें कँडीनें नमूद केलें आहे;[137] परंतु हें परीक्षण कोठें उपलब्ध नाहीं. हें पुस्तक १८६० मध्यें प्रसिद्ध झाल्याचें दिसतें.[138]

**१६. हॉवर्डच्या इंग्लिश दुसऱ्या पुस्तकाचें भाषांतर.**

या पुस्तकाचें भाषांतर चौघांनीं केलेलें आढळतें. नारायण विष्णु, गणेश हरी व विनायक नारायण भागवत. या तिघांनीं जीं भाषांतरें केलीं त्यांच्या परीक्षणाचे रिपोर्ट उपलब्ध आहेत.[139] रघुनाथ सदाशिव व बापुजी एकनाथ या दोघांनीं मिळून जें भाषांतर केलें त्याचें कँडीनें परीक्षण केल्याचा उल्लेख आढळतो;[140] परंतु परीक्षणाचा

१३१ गोविंद विठ्ठल म्हणजे भाऊ महाजन असावेत असें वाटतें.
१३२ D P I Book-Depot Vol XXII 1859 pp 649-652
१३३ या पुस्तकाचें भाषांतर कृष्णनाथ गोविंद याने केल्याचा उल्लेख रिपोर्टांत आढळतो, पण कँडीच्या प्रतिकूल अभिप्रायामुळें हें पुस्तक प्रसिद्ध झाल्याचे दिसत नाहीं. पहा:—
१३४ D P I Book-Depot Vol XXII 1859 p 510
१३५ शं. ग. दाते, मराठी-ग्रंथ सूचि. पृ. ३१०.
१३६ मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील मराठी दोलामुद्रितें. पृ. ३३.
१३७ D P I Translation Department Vol XIX 1861-62 p. 123
१३८ शं. ग. दाते. मराठी-ग्रंथ-सूचि. पृ. १०५४.
१३९ D P I Book Depot Vol. XVII 1861-62 pp 221-22 241-42 and 259-57
१४० D P I Translation Department Vol. XIX 1861-62 p 123

रिपोर्ट सांपडत नाहीं. या चार पुस्तकांपैकीं एकहि पुस्तक प्रसिद्ध झाल्याचें दिसत नाहीं.

**१७. हिंदुस्थानचा भूगोल**—बापू पुरुषोत्तम जोशी.

या हस्तलिखितावर कँडीनें चांगला अभिप्राय दिल्यामुळेंच [१४१] पुढें हें पुस्तकरूपानें १८६१ मध्यें प्रसिद्ध झाल्याचें दिसून येतें.[१४२]

**१८. मराठी शुद्ध लिहिण्याविषयीं अनुगम**—रामचंद्र विनायक ओक.

या पुस्तकावर कँडीनें पुढीलप्रमाणें अभिप्राय दिला आहे:

"Most of the contents are in grammars, and if grammar were carefully taught and well learnt this book would be unnecessary, but under present circumstances this will be useful as a reminder." [१४३]

हें पुस्तक सन १८६२ मध्यें प्रसिद्ध झाल्याचें दिसून येतें. [१४४]

**१९. पिनल कोडा मराठी भाषांतर**—रामचंद्र मोरेश्वर पाटणकर.

या भाषांतराच्या भाषेबद्दल कँडी म्हणतो,

"Mr. Ramchandra Moreshwar's Marathi is in general flowing and pleasing." [१४५]

कँडीनें भाषेबद्दल जरी अनुकूल मत दिलें तरी, शाळेंतील पुस्तकांत मोलाची भर या पुस्तकामुळें पडणार नाहीं, असें पुस्तकाबद्दल पुढें त्यानें म्हटलें आहे. यामुळेंच हें पुस्तक प्रसिद्ध झालेलें नसावें.

**२०. 'दुश्चिन्ह' या नाटकाचा पहिला अंक.**

नारायणराव पेशवे यांच्या वधावर हें नाटक रचण्यांत आलें होतें. कँडीनें या पुस्तकावर पुढील प्रमाणें मत दिलें आहे:

"There is considerable naturalness and tenderness displayed by Gangabai, which shows that the author possesses some power but on the whole there does not seem to be much skill in this act

There are numerous faults in the composition; both in poetry and in the prose. But I need not point them out. I think a few copies might be taken for presentation to the libraries of the Colleges" [१४६]

---

१४१ D P I Book Depot Vol XVII 1861-62 pp 271-272

१४२ शं. ग. दाते. मराठी-ग्रंथ-सूचि. पृ ८८०.

१४३ D P I Book Depot Vol XVII 1861-62 p 415

१४४ शं ग दाते. मराठी-ग्रंथ-सूचि. पृ. ११२.

१४५ D P I Miscellaneous Vol XXIII 1861-62 p 631

१४६ Ibid pp 625-626

या नाटकाच्या लेखकाचा उल्लेख कँडीनें केला नाहीं; पण सन १८७० मध्यें वीरेश्वर सदाशिव छत्रे यांचें नारायणराव पेशवे हें नाटक प्रसिद्ध झालेलें आहे.[१४७] तें हेंच असावें कीं काय हें समजत नाहीं.

**२१. सुबोध लघुव्याकरण.** नारायण रामचंद्र शास्त्री.

हें व्याकरण बोर्डाकडे सादर करतांना प्रस्तावनेंत व्याकरणकर्ता म्हणतो, "दादोबा व गंगाधरशास्त्री यांची मोठी व अवघड व्याकरणाचीं पुस्तकें आणि बाळशास्त्री यांचें लहान व अपुरें व्याकरण यांमध्यें या पुस्तकाला स्थान मिळेल, असा उद्देश हें व्याकरण रचण्यांत आहे."[१४८]

लेखकानें या उद्देशानें हें पुस्तक लिहिलें असलें तरी कँडीनें या पुस्तकांत पुढीलप्रमाणें चुका काढल्या आहेत :

"The answer given to the question 'What is grammer ?" is व्याकरण म्हणजे शुद्ध शब्दांचा विचार i.e. Grammar is the consideration of correct words. But this is not the correct definition of Grammar.

"Page 10. The answer to the question 'What is a wibhakti or case of Noun ?' is प्रत्येक स्थानाचें वेगळे प्रत्यय दाखविणारी ती विभक्ति होय. This will be considered a strange विभक्ति."[१४९]

अशा चुका दाखवून कँडीनें पुढीलप्रमाणें शेरा मारला आहे :

"The author uses unnecessarily high words; some of the definitions he gives are incorrect, other definitions are unintelligible, and his own language is occasionally ungrammatical."[१४९]

हें पुस्तक प्रसिद्ध झालेलें दिसत नाहीं.

**२२. हिंदुस्तानचा इतिहास**—रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक.

रावसाहेब मंडलिक यांनीं एल्फिन्स्टनच्या 'हिस्ट्रि ऑफ इंडिया' या पुस्तकाचें हें भाषांतर केलें आहे. या भाषांतराविषयीं कँडी म्हणतो,

"If this translation had been the special work of the translater it would have been a performance creditable to him; but viewed as a work done in the intervals of business, I think it redounds to his honor."[१५०]

एवढें लिहून कँडीनें कांहीं चुका दाखविल्या आहेत त्या अशा : "जा टीपा सर्व-

---

१४७ य. ग. दाते. मराठी–ग्रंथ–सूचि. पृ. ६५४.

१४८ D P I. Miscellaneous Vol. XXIII 1861-62 p 603

१४९ Ibid. pp 603-603

१५० Ibid p 549

साधारण वाचणारांच्या उपयोगी नाहींसा दिसल्या." There seems to be three errors in this passage. टीप should be टिप, उपयोगी should be उपयोगीं & नाहींसा should be नाहींतसा."[150]

"वरील नद्यांच्या वायव्येकडील प्रांत "Elphinstone, says," to the South-West of rivers." page 5. The word वायव्य (North-West) is a mistake for नैऋत्य."[151]

हें पुस्तक सन १८६१ मध्यें प्रसिद्ध झालें.[152]

२३. **मुक्तामाला**—लक्ष्मण मोरेश्वर हळवे.

लक्ष्मणशास्त्री हळवे यांनीं लिहिलेल्या मुक्तमाला या कादंबरीवर कँडीनें अनुकुल असें मत दिलें आहे. तें पुढीलप्रमाणें:—

"I have carefully read the book, and I am happy to say that I think it fully deserves the commendation which Rao Saheb Mahadeo Shastri, the acting Curator, bestows on it in his letter. The story is interesting; the style is in general pure and idiomatic, and the tendency of the whole is good. There is much tenderness in some passages; and in no part is there any indelicacy. The book is altogether creditable to Lakshuman Moreshwar Shastri. I think that it is suitable for presentation as a prize, and to put into libraries."[153]

हें पुस्तक याच सुमारास प्रसिद्ध झालें असावें. याची तिसरी आवृत्ति १८७१ मध्यें निघाली.[154]

२४. *A Plain and Short History of England*—गंगाधर रामचंद्र टिळक.

या पुस्तकाचें कँडीनें परीक्षण केल्याचा उल्लेख मिळतो.[155] पण त्यासंबंधीं रिपोर्ट मिळत नाहीं व हें पुस्तक प्रसिद्ध झाल्याचें दिसत नाहीं.

२५. पद्यात्मक व्याकरण—वामनजी गोविंदजी लिमये.

ह्या पुस्तकाचें कँडीनें परीक्षण केल्याचा उल्लेख उपलब्ध आहे.[156] तसेंच हें पुस्तक १८६१ मध्यें प्रसिद्ध झाल्याचें यादवरून येतें.[157]

---

१५१ *Ibid.* p. 550

१५२ शं. ग. दाते मराठी-ग्रंथ सूचि. पृ. ५५७.

१५३ *D P I Book Depot* Vol. XVIII 1861-62 p 353-355

१५४ शं. ग. दाते. मराठी-ग्रंथ-सूचि. पृ. ५०७.

१५५ *D P I Translation Department* Vol XIX 1861-62 p 125

१५६ *Ibid.* p. 128.

१५७ शं. ग. दाते. मराठी-ग्रंथ-सूचि. पृ. ११५.

२६. *Summary of English History.*

खंडेराव बाळाजी व रामचंद्र मोरेश्वर या दोघांनीं लिहिलेल्या दोन पुस्तकांचीं परीक्षणें केल्याचा उल्लेख सांपडतो.[१५८] यापैकीं खंडेराव बाळाजी फडके यांचें हें पुस्तक 'इंग्लिश इतिहाससार' या नांवानें प्रसिद्ध झाल्याचें दिसतें.[१५९]

## २७. बेळगांव कलेक्टोरेटच्या भूगोलाचें भाषांतर.

याचें परीक्षण केल्याचा उल्लेख सांपडतो.[१६०] हें पुस्तक प्रसिद्ध झाल्याचें दिसत नाहीं.

२८. *Help to Marathi Students and Authors*—बाबा पद्मनजी.

याचें परीक्षण केल्याचा उल्लेख सांपडतो;[१६१] पण हें पुस्तक प्रसिद्ध झाल्याचें दिसत नाहीं.

## २९. दुर्दैवी मुराद व दैववान् सलाउद्दीन—विनायक नारायण भागवत.

या पुस्तकाचें परीक्षण केल्याचा उल्लेख मिळतो;[१६२] पण परीक्षण केलेला रिपोर्ट मिळत नाहीं. हें पुस्तक सन १८६२ मध्यें प्रसिद्ध झालें.[१६३] हें मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहे.[१६४]

३०. *A Glance at the Past and Present of India* याचें मराठी भाषांतर.

काशीनाथ रघुनाथ यांनीं याचें भाषांतर केलेलें कँडीकडे आलें व त्यावर कँडीनें अभिप्रायहि दिला;[१६५] परंतु पुढें हें पुस्तक प्रसिद्ध झाल्याचें दिसून येत नाहीं.

## ३१. मराठी मासिकांचें परीक्षण.

'सर्वसंग्रह' या मासिकाच्या जानेवारी १८६१ ते डिसेंबर १८६१ या बारा अंकांचें कँडीनें परीक्षण केलेलें आढळून येतें.[१६६] हें परीक्षण करतांना त्यांतील व्याकरणाच्या कांहीं चुका त्यानें दाखविल्या आहेत.

'ज्ञानप्रसारक' या मासिकाच्या नोव्हेंबर, डिसेंबर १८६० व जानेवारी १८६१

---

१५८ *D P I Translation Department* Vol XIX 1861-62 p 128

१५९ Sir A. Grant *Catalogue of the Native Publications in the Bombay Presidency* p 70

१६० *D P. I Translation Department* Vol XIX 1861-62 p 126

१६१ Ibid. p. 123

१६२ *Ibid* p 128

१६३ शं. ग. दाते. मराठी-ग्रंथ-सूचि. पृ. ८२५

१६४ मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील मराठी दोलामुद्रितें. पृ. ४२

१६५ *D P I Miscellaneous* Vol XXIII 1861-62 p 711

१६६ *D P I Translation Department* Vol XIX 1861-62 pp 137-140 & 143-154.

ते जानेवारी १८६२ अशा पंधरा अंकांचें कँडीनें परीक्षण केलें आहे.[१६५] त्यांतील काहीं अंकांतील शुद्धलेखनाकडे लक्ष देण्याबद्दल कँडीनें इशारा दिला आहे.

'आनंदलहरी' (वेव्ह ऑफ जॉय) या मासिकासंबंधानें कँडीनें पुढीलप्रमाणें माहिती दिली आहे :—

"Pamphlet is the first number of a periodical for children. It is entitled Anand Lahari or Wave of Joy. Price 2¼ as for a quarter of a year in advance or an anna for single number. The Editor states his object to be the direction of the minds of Children to learning and to their special duty."[१६६]

या मासिकासंबंधानें त्यानें पुढीलप्रमाणें अभिप्राय दिला आहे :

"The number is generally speaking written in fluent and correct Marathi and shows ability and numerousness." [१६७]

यापुढें कांहीं चुका दाखविल्या आहेत त्या अशा :—

"जर तुझे घरचा तो कुत्रा अजून जिवंत असता तर हा तुझे समोर निजलेल्या कुत्र्याहून छान झाला असता. Here छान should be छानदार and झाला असता should be असता. असाहस दुःख is quite wrong. The word असाह्य should be असह्य."[१६८]

३२. राजा मदन—बाबाजी कृष्ण गोखले.

या कादंबरीवर अभिप्राय देतांना कँडीनें याच्या गुणदोषांची चर्चा केलेली आहे. ती करीत असतांना कथानक व शैली यासंबंधीं तो लिहितो,

"With regard to the merits of the work, I think that the plot is simple, and the incidents interesting. The style in general is easy and good, and the composition with some expectations idiomatical and correct." [१६९]

या गुणांप्रमाणें दोषाचीहि चर्चा करून कांहीं दोष दाखविले आहेत. त्यानें या कादंबरींत पुष्कळ प्रकरणें व्यर्थ आहेत हा एक दोष दाखविला आहे. तसेंच वर्णनामधील अतिशयोक्ति हा दुसरा दोष सांगितला आहे. त्याचें उदाहरण म्हणून 'कटि इतकी बारीक कीं तिच्या मोंवती मदनाचा हात सहज पुरे' हें वाक्य दिलें आहे. या पुस्तकाचें व्याकरण व शुद्धलेखन या भाषाविषयक बाबतींत कँडीनें टीका करून पुढीलप्रमाणें मत व्यक्त केलें आहे :

"The author or his copyist has been *very careless as re-*

१६७ *Ibid.* pp. 126-140 & 142-154.

१६८ *D P I Miscellaneous* Vol. XXIII. 1861-62 pp 610-611.

१६९ *D P I Book Depot* Vol. XVIII 1863-64 p 112.

gards orthography. There is a constant confusion of the long and short vowels; for example: ति for ती, स्त्रि for स्त्री, अधीक for अधिक, उशिर for उशीर The is abundantly given where it is wrong, and is wanting where it should be, as असें for असे, ,and again असे where it should be असें. I have corrected many for these errors with a red pencil but not all." [१७०]

ही कादंबरी मुंबई येथें सन १८६५ मध्यें प्रसिद्ध झाली. [१७१]

**३३. विजापूरचा इतिहास २ भाग**–नारायणराव विठ्ठल उर्फ बाबा पारसनीस.

या पुस्तकाचें नांव 'इतिहास-कल्पद्रुम' (दि विरिंग–ट्री ऑफ हिस्ट्री) असें दिलें आहे. हें पुस्तक स्वतंत्र नसून नारायणराव विठ्ठल उर्फ बाबा पारसनीस यांनीं बुसातीन सलातीन या फारशी ग्रंथावरून भाषांतर केलें आहे, अशी माहिती प्रारंभीं देऊन मराठी भाषांतराबद्दल आपला अभिप्राय कँडीनें खालीलप्रमाणें नमूद केला आहे.

"The Marathi version is in many places so obscure that the meaning can only be guessed at; and in many places the style is so involved that plain and simple readers will be quite at a loss. The construction is in many places both unidomatical and ungrammatical and incorrect words abound." [१७२]

कँडीनें उदाहरणादाखल 'मतेस' for 'मतीस', 'विद्येनी' for 'विद्येनें', 'आज्ञेनी' for 'आज्ञेनें' व 'भापाचा' for 'भाषेचा' असे चुकीचे शब्दहि दाखविले आहेत. हें पुस्तक प्रसिद्ध झाल्याचें दिसत नाहीं.

**३४. अर्वाचीन बखर**—सदोबा भागोबा पवार.

'पिनॅकल कॅटेकिझम् ऑफ मॉडर्न हिस्ट्री' या पुस्तकाचें सदोबा पवार यांनीं हें भाषांतर केलें आहे. कँडीनें यावर अनुकूल मत दिलें आहे, तें असें :—

"This book is I think very creditable to Mr Sadoba Bhagoba. The style of it is in general easy, fluent and grammatically correct." [१७३]

हें पुस्तक मुंबई येथें सन १८७० मध्यें प्रसिद्ध झालें. [१७४]

---

१७० Ibid. p 114

१७१ शं. ग. दाते. मराठी-ग्रंथ-सूचि. पृ. ७७४.

१७२ D P. I Book Depot Vol XVIII 1863-64 p 338

१७३ *D P I Miscellaneous* Vol XXII. 1865-66 p 390.

१७४ शं. ग. दाते. मराठी-ग्रंथ-सूचि. पृ. ८३९.

### ३५. ठाणें जिल्ह्याचें वर्णन.

कँडीनें या पुस्तकावर प्रतिकूल मत व्यक्त केलें आहे. तें असें :

"The book is very poor as a composition. A good deal of informaion is collected but from want of punctuation, or from some other cause, it is not clearly and pleasingly given. There are also some other errors."[१७५]

या पुस्तकाबद्दल अभिप्राय देतांना, लेखकाचा उल्लेख करण्यांत आला नाहीं. सखाराम बापूशेट दांडेकर यांनीं लिहिलेलें या नांवाचें एक पुस्तक मुंबई येथें १८६५ मध्यें प्रसिद्ध झालें.[१७६] तें बहुधा हेंच असावें असें वाटतें.

### ३६. 'पुरुषसूक्तव्याख्या' यावर मराठी टीका—वैद्य सखाराम.

या मराठी पत्रकावर लिहितांना कँडी म्हणतो,

"It is a commendable effort on the part of the author and the publishers to supply young Brahmans, who are in danger of falling into disbelief of Hinduism ,with the means of knowledge what is taught by that system of religion."[१७७]

हें पत्रक स्वधर्महितेच्छु या नांवानें मुंबई येथें १८६४ मध्यें प्रसिद्ध झाल्याचें दिसतें.[१७८]

**३७. श्री भिल्लिणी नाटक.** गणपत पांडुरंग कमलाकर व रघुनाथ सदाशिव.

याच कर्त्यांच्या नळनाटकावर आपण अभिप्राय दिल्याचा प्रथम उल्लेख करून वाक्यपीनदृष्ट्या यांत फार चुका आहेत, असें कँडीनें आपलें मत दिलें आहे. वाक्यरचनेमुळें कांहीं दोष—ऱ्हस्वदीर्घांच्या चुका—दाखवून त्यांचीं कांहीं उदाहरणें दिलीं आहेत.[१७९] हें नाटक विनायक महादेव नातु यांच्या नांवावर नमूद असून मुंबई येथें सन १८६५ मध्यें प्रसिद्ध झालें.[१८०] हें नाटक मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहे.[१८१]

### २८. 'श्री भूषण' मासिक—सदाशिव जगन्नाथ.

स्त्रीशिक्षणाचा पुरस्कार करणाऱ्या या मासिकासंबंधीं कँडीनें आपले विचार पुढील-प्रमाणें व्यक्त केले आहेतः

---

१७५ D P I Miscellaneous Vol. XXII. 1865-66 p. 328

१७६ शं. ग. दाते. मराठी ग्रंथ-सूचि. पृ. ८९१.

१७७ D P I Miscellaneous. Vol. XXII. 1865-66 p 219

१७८ शं. ग. दाते. मराठी ग्रंथ-सूचि. पृ १०७.

१७९ D P I Miscellaneous Vol. XXII. 1865-66 p. 237.

१८० शं. ग. दाते. मराठी-ग्रंथ-सूचि. पृ. ६४०

१८१ मराठी दोलामुद्रितें. पृ ४९.

"The desire of promoting female education and of rendering aid in improving the Native female minds is so commendable, that I took up this pamphlet with an earnest hope that I should be able to report very favourably of it. I must regret to say that this hope has been realized.

The plan of the work is good, but performance is altogether inferior. The composition is very bad, in some places not intelligible except by omission of a part of sen-. tence. The punctuation is wretched calculated to misled rather than to help. The orthography is very faulty." [१८२]

३९. दलालांची ठकबाजी—नारायण विष्णु जोशी.

हें पुस्तक शाळेला लावण्यास अयोग्य आहे असा जरी कँडीनें या पुस्तकाविषयीं शेरा दिला आहे, तरी शेवटीं "The composition is good, ideomatical and grammatical and the aim of the writer is good," असेंहि नमूद केलें आहे. [१८३] हें पुस्तक पुणें येथें १८६४ मध्यें प्रसिद्ध झालें. [१८४]

४०. नरतनु—विनायक रंगो मुधोळकर.

या पुस्तकाविषयीं कँडी म्हणतो,

"The language is in general good, grammatical and idiomatical. Some of the terms the author has invented are good; others are I think objectionable."[१८५]

हें पुस्तक प्रसिद्ध झालें कीं काय तें समजत नाहीं. कारण त्र्यंबक रंगो कद्री यांच्या नांवानें असें एक पुस्तक सन १८७१ मध्यें प्रसिद्ध झाल्याचें नमूद आहे. [१८६]

४१. जयपाळ—विनायक जनार्दन कीर्तने.

यांतील कल्पना बायबलमधील जोसेफवरून घेतली असली तरी यांतील पात्रें हिंदु आहेत व गोष्ट मात्र जोसेफची आहे अशी माहिती देऊन कँडी नाटकाबद्दल म्हणतो,

"The drama possesses considerable merit, and is very creditable to the author, some of the scenes are very interesting. Jaypal is a good character, and consistent throughout.

The author has made the inferior personages, speak a very barbarous and almost unintelligible language, which seems to me to be a blemish. There is no doubt that some

---

१८२ D. P. I Miscellaneous Vol XXIII 1865-66 pp 278-282

१८३ Ibid p 363

१८४ शं. ग. दाते. मराठी-ग्रंथ-सूचि. पृ. १०४०,

१८५ D. P. I Miscellaneous Vol. XXII 1864-65. p 374 .

१८६ शं. ग. दाते. मराठी-ग्रंथ-सूचि. पृ. ३८३.

rustics of Maharashtra do speak a barbarous language,.... but this is not much the case I think with those who come in contact with educated persons."[१८७]

हें नाटक पुढें प्रसिद्ध झालें.[१८८]

४२. विधवाविवाह—विष्णु परशरामशास्त्री पंडित.

बाबू ईश्वरचंद्र विद्यासागर यांच्या 'रिमॅरेज ऑफ विडोज' या इंग्रजी ग्रंथाचें विष्णु परशरामशास्त्री यांनीं भाषांतर केलें, अशी या पुस्तकाविषयीं माहिती देऊन कँडी अभिप्रायांत म्हणतो :

"The book is an interesting and able one showing much research and learning on the part of the author. The translator has performed his part well. His style is clear, idiomatical, and grammatical A good deal of Sanskrit is quoted in the book, but it is translated so that the book is easy to unlearned readers."[१८९]

हें पुस्तक मुंबई येथें सन १८६५ मध्यें प्रसिद्ध झालें.[१९०] हें पुस्तक मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहे.[१९१]

४३. सुलोचना आणि माधव—रामचंद्र भिकाजी गोखले.

या पुस्तकाविषयीं लिहितांना कँडी म्हणतो,

"Why the author calls his work a 'Romance' rather than a novel or a tale, I do not know. Excepting the vision of Goddess Ambika, which is not essential of the story there is little or nothing that jumps over nature or probability.

The book possesses considerable merit, and is I think creditable to the author. The style is in general easy, simple, and flowing and the construction is for the most part correct.'[१९२]

हें पुस्तक मुंबई येथें सन १८६५ मध्यें प्रसिद्ध झालें.[१९३]

४४. घाशीराम कोतवाल—मोरोबा कान्होबा.

या पुस्तकावर अभिप्राय देतांना, पुढीलप्रमाणें कँडीनें रिपोर्टांत लिहिलें आहे:

---

१८७ Ibid p 393

१८८ शं. ग. दाते. मराठी-ग्रंथ-सूचि. पृ. ६२८.

१८९ *D P I Miscellaneous* Vol. XXII 1864-65. pp 403-405

१९० शं. ग. दाते, मराठी-ग्रंथ-सूचि. पृ. ३०३.

१९१ मराठी दोलामुद्रितें. पृ ४०.

१९२ *D P I Book Depot.* Vol. XX 1864-65 pp 125-128

१९३ शं. ग. दाते. मराठी-ग्रंथ-सूचि. पृ ७५४.

"'Ghashiram Kotwal' is a book written by Moroba Cannoba, Judge of the Small Cause Court of Ahmednagar, with the view of providing for his vernacular reading countrymen a book in which instruction should be combined with amusement.

A part of the work is, as said before, composed of tales about Ghashiram current among the people, but the greater part is composed of dialogues. The matter of these dialogues is the fruit, I presume, of Mr. Moroba Cannoba's English reading."[१५४]

हें पुस्तक पुणें येथें १८६३ मध्यें प्रसिद्ध झालें.[१५५] यांत घाशीरामाविषयीं आख्यायिका दिल्या आहेत. त्यांतून सवाई माधवरावाच्या वेळच्या महाराष्ट्राचें व विशेषेंकरून पुण्याचें किंचित् दर्शन होतें. हें पुस्तक मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहे.[१५६]

**४५. संक्षिप्त भूगोलवर्णन**—परशुराम बल्लाळ गोडबोले.

परशुरामपंत गोडबोले हे कँडीचे खाजगी पंडित होते. कँडी 'भूगोलाचें वर्णन' हें पुस्तक लिहीत असतांना, त्याची संक्षिप्त आवृत्ति गोडबोले यानीं तयार केली. परशुरामपंतांचें हें संक्षिप्त भूगोलवर्णन कसें तयार झालें याची कँडीनें माहिती दिली आहे ती अशी:—

"This work is very much the kind of work I was intending to prepare in accordance with the instructions contained in the letter of D. P. I. No. 1559 dated 18th April 1865 as soon as the completion of the manual would enable me to set about it. In the meantime Mr. Parshuram Pant anticipated me when I mentioned to him the kind of work Mr. Howard suggested in the letter above referred to. He thought that he would try his hand at it and so while I was preparing matter for a future portion he went back and abridged the part that I had finished."[१५७]

हें पुस्तक मुंबई येथें सन १८६५ मध्यें प्रसिद्ध झालें.[१५८]

**४६. नियतकालिकांचें परीक्षण:**

सर्वसंग्रह : सर्वसंग्रह या मासिकाचें सप्टेंबर व नोव्हेंबर १८६७ हे अंक

१५४ *D P I Book Depot Vol XX 1864-65 pp 181-182*

१५५ शं. ग. दाते. मराठी-ग्रंथ-सूचि. पृ ७२३.

१५६ मराठी दोलामुद्रितें. पृ ४५.

१५७ *D P I Book Depot Vol XX 1864-65 p 212*

१५८ शं. ग. दाते मराठी-ग्रंथसूचि. पृ. ८४१.

कँडीनें पाहून "There is nothing obscure or indelicate in these numbers," असा शेरा दिला आहे.[१९९]

**विविधज्ञानविस्तार :** विविधज्ञानविस्तार या मासिकाचे जानेवारी ते जुलै १८६८ पर्यंतचे [२००] अंक पाहून जुलै महिन्याच्या अंकांतील कांहीं चुका दाखविल्या आहेत. त्या अशा :—

"आणि ज्यांना मांसाचा प्रतिबंध नसेल त्यांना कुक्कुट किंवा अजनांसरस द्यावा," या वाक्यावर कँडी म्हणतो, "There is a great literary blemish in the above sentence. The writer should have said "कुक्कुट मांसरस किंवा अजामांसरस or more simply कोंबड्याचा किंवा बकऱ्याचा मांसरस."[२०१]

"तिच्या हृदयांत प्रीतीचे नवीन उद्गार उत्पन्न होऊं लागतात." यावर कँडी म्हणतो, "The word उद्गार does not mean a sentiment, but utterance expressive of sentiment. The हृदय is not the seat of उद्गार."[२०२]

**कँडीनें धार्मिक विषयावर लिहिलेलीं पुस्तकें :**

आतांपर्यंत कँडीनें केलेल्या विविध कार्यांचें येथपर्यंत संशोधन झालें. मराठी मॉडेल शाळेसाठीं अनेक विषयांवर निरनिराळीं पुस्तकें कँडीनें स्वतः तर लिहिलींच; पण दुसऱ्यांहि लेखकांनीं लिहिलेलीं तरजुमीं व व्याकरण आणि शुद्धलेखनदृष्ट्या सुधारलीं, हें आपण वर पाहिलेंच आहे. याशिवाय कँडीनें बरींच धार्मिक चोपडीं (ट्रॅक्ट्स) लिहिलीं. त्यांची माहिती पुढें देण्यांत येत आहे :

कँडीनें हीं जीं धार्मिक पुस्तकें लिहिलीं, याचें कारण पहिल्यापासूनच धर्माकडे असलेला त्याचा ओढा हें होय. सन १८२८ मध्यें रजा घेऊन इंग्लंडला परत गेल्यानंतर लष्करी नोकरी सोडून मिशनरी होऊन इकडे यावें, असें कँडीच्या मनांत होतें; पण कँडीची शरीरप्रकृति चांगली सुदृढ नाहीं, असा डॉक्टरनें अभिप्राय दिल्यावरून चर्चमिशनरी सोसायटीनें ती गोष्ट कबूल केली नाहीं. म्हणून दोन तीन वर्षांनीं आपल्या पहिल्या कामावर तो परत आला.[२०३] त्याच्या धार्मिक प्रवृत्तीबद्दल 'ज्ञानोदय'-कारांनीं पुढीलप्रमाणें लिहिलें आहे :—

"मेजर कँडी हे भक्तिमान ख्रिस्ती होते म्हणून त्यांनीं परोपकारी व धर्मसंबंधी

---

१९९ *The Bombay Educational Record. Vol. IV 1863 p. 145.*

२०० *Ibid. pp 141 208 and 311*

२०१ *Ibid p 122.*

२०२ *Ibid. p 311.*

२०३ ज्ञानोदय, ८ मार्च १८७३, पृ. ११३.

खिस्ती मंडळाच्या कामासहि फार साहाय्य केलें. पवित्र शास्त्राचें मराठी भाषांतर करण्याकरितां त्यांनीं फार चांगले शब्द निवडून दिले आणि भाषांतराच्या कामीं योग्य अभिप्राय देऊन फार मदत केली. त्यांनीं ट्राक्ट सोसैटीसही कित्येक पुस्तकें करून दिलीं. त्यांचा खप फार होतो व लोक तीं आवडीनें वाचतात. त्यांपैकीं 'भाव कोणावर ठेवावा' याच्या तर आजवर ६०,००० प्रती छापून लोकांमध्यें पसरल्या." [२०४]

कँडीनें धार्मिक विषयावर लिहिलेलीं पुस्तकें खालीलप्रमाणें आहेत:—

| | | | |
|---|---|---|---|
| १ देवाच्या दहा आज्ञा. | स्वतंत्र. | ट्रॅक्ट सोसायटी | १८२९ |
| *२ खरा मार्ग. | स्वतंत्र. | ट्रॅक्ट सोसायटी | १८२९ |

या पुस्तकास 'खरा मार्ग कोणता याचा विचार' हें नांव पुढच्या आवृत्तीच्या वेळीं दिलें होतें.

| | | | |
|---|---|---|---|
| *३ खऱ्या धर्माचीं चिन्हें. | स्वतंत्र. | अमेरिकन मिशन | १८२९ |
| *४ भाव कोणावर ठेवावा. | स्वतंत्र. | अमेरिकन मिशन | १८२९ |
| ५ पश्चात्तापाची गोष्ट. | स्वतंत्र. | ट्रॅक्ट सोसायटी | १८३५ |
| *६ येशू खिस्तानें जी प्रार्थना आपल्या शिष्यांस सांगितली तिजवर टीका. | स्वतंत्र. | ट्रॅक्ट सोसायटी | १८३६ |
| ७ येशू खिस्ताचा धर्म शिकविणाराची गोष्ट. | स्वतंत्र. | ट्रॅक्ट सोसायटी | १८३६ |

यांपैकीं * खूण केलेली चार पुस्तकें, अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें आहेत. त्यांतील विषय काय आहे व त्याचें स्वरूप कसें आहे, हें थोडक्यांत खालीं देत आहें:

**१ खरा मार्ग कोणता याचा विचार** (Inquiry concerning the true way), आवृत्ति ४ थी १८३८.

"देवाचा राग शांत करून आपल्या पापाची क्षमा करून घेण्याविषयीं लोकांमध्यें बहुत मार्ग आहेत. पण खरा मार्ग एकच आहे. वरकड मार्ग सर्व खोटे आहेत. खोटे कोणकोणते आहेत ते ऐकून घ्यावे." पृष्ठ ९.

एवढें लिहून गंगास्नानाचा, ब्राह्मणांच्या पायाचें पाणी पिण्याचा, तप करण्याचा इत्यादि सर्व मार्ग खोटे आहेत असें त्यानें म्हटलें आहे व 'खरा मार्ग कोणता आहे असें जर तुम्ही पुसतां तर ऐकून घ्या', असें सांगून खऱ्या मार्गाविषयीं तो म्हणतो,

"परमेश्वराचा पुत्र जो येशू खीस्त तो एकला जगाचा तारणारा. त्या एकल्यानेंच जगाला तारायासाठीं आपला जीव दिल्हा. म्हणून जगांतील सर्व माणसांनीं त्याला शरण

२०४ ज्ञानोदय. १५ जानेवारी १८४८. पृ २१.

येऊन त्यावर विश्वास ठेवला पाहिजे. माझीं पापें त्यांनीं क्षमा करून मजवर कृपा करावी अशी प्रार्थना अनन्य भावानें जो कोणी करील त्याची प्रार्थना परमेश्वर ऐकेल व त्या प्रार्थना करणाऱ्याचीं पापें क्षमा करील." पृ. २६.

हें पुस्तक मोडी लिपींत लिहिलेलें उपलब्ध आहे. याची दुसरी आवृत्ति अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें उपलब्ध आहे.

२ खऱ्या धर्माचीं चिन्हें (Marks of the True Religion).

"पापी मनुष्याचा उद्धार कसा व्हावा, पापाची क्षमा कशी व्हावी, नरक कसा चुकवावा आणि इहलोकीं व परलोकीं देवाची कृपा कशी मिळवावी, हा विचार सर्व विचाराहून मोठा आहे. संसाराच्या गोष्टींपेक्षां ही गोष्ट मोठी आहे म्हणून या गोष्टी-कडे लक्ष लावलें पाहिजे.

"जो धर्म देवाकडून आहे तो सकल मनुष्यजातीला उपयुक्त असावा. तो सर्व माणसांच्या कानात पडावा, तो सर्वांस चांगला व्हावा आणि जो धर्म सर्वांस चांगला नव्हे तो देवाकडचा नव्हे. खऱ्या आणि खोट्या धर्मांच्या अशा खुणा आहेत त्या खुणा ध्यानांत आणून खरा धर्म कोणता याचा विचार करावा!

"पहिल्यानें हिंदुधर्मशास्त्राविषयीं विचार करावा. ब्रह्मानें आपल्या लेकीशीं दारकर्म केलें. विष्णु आपले शत्रुस फसविण्यासाठीं कपट करीत असे. शिव लाज टाकून एका स्त्रीपुढें नागवा नाचूं लागला. खरा जो धर्म असेल त्यांतलें वर्णन असें नव्हे. हें क्षार देवाचें वर्णन. यासाठीं तो धर्म सोडा व खरा धर्म शोधा."

३ भाव कोणावर ठेवावा याचा विचार (In Whom Shall We Trust ?)

"भाव जर खरा असला आणि योग्य ठिकाणीं ठेवलेला असला तर मनुष्य तरेल, पण भाव जर खरा नसला किंवा अयोग्य ठिकाणीं ठेवलेला असला तर तो मनुष्य कसा तरेल. तो तरणार तर नाहींच. तो मध्येंच बुडेल.

"शिवाय खरा देव कसा असावा. अहो तुमची बुद्धि कोठें आहे. तुमची लाज कोणीकडे गेली. या गोष्टींचा पुरतेपणीं विचार करावा.

"हिंदु लोकांच्या बायका प्रति दिवशीं शिवाची पूजा करतात. अशी पूजा केल्यानें त्यांची लज्जा वाढली कीं कमी झाली हें पहावें.

"येशू ख्रिस्ताच्या धर्मात येऊन त्याच्या मार्गानें चालावें म्हणून सर्व उपदेश केला आहे. त्याचा धर्म कसा हें पुरतेपणीं जाणण्यासाठीं त्याचें धर्मपुस्तक वाचून पहा!"

हें पुस्तक मोडी लिपींत छापलेलें आढळतें. याच्या १८३६ व १८३७ च्या दोन आवृत्त्या अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें आहेत.

४ येशू ख्रिस्तानें जी प्रार्थना आपल्या शिष्यांस सांगितली तिजवर टीका. (Exposition of the Lord's Prayer).

"देवाची प्रार्थना केली पाहिजे. ह्या गोष्टीला नास्तिक मताच्या लोकांवाचून सर्व लोक मान्य आहेत. ढोंगानें प्रार्थना करणें हें पाप आहे व तें ह्या देशांत फार माजले आहे (पृ. ८). येशूनें आपल्या शिष्यांस जी प्रार्थना शिकविली त्यांतील अर्थ विशद केला आहे." (पृ. १२)

यापुढें या प्रार्थनेचा अर्थ देऊन पुस्तकाचा शेवट करतांना कँडीनें पुढील उपदेश केला आहे:

"माणसानों काळजी धरा. स्वस्थ बसूं नका. तुह्मी पापात स्वस्थ बसलां तर तुमचा सत्यानाश होईल. तुह्मी मरणानंतर नरकांत बुडाल. अहो मित्रानो हें तुह्मास प्राप्त न व्हावें ह्मणून एकला जो तारणारा एकला जो सद्गुरू ह्मणजे येशू खीस्त त्याला शरण येऊन ह्याच्या पायां पडा. ह्याजवर भाव ठेवा. ह्याचे शिष्य व्हा. मग येशू तुमचें कल्याण करील." पृ. ४४.

कँडीची प्रवृत्ति मूळची धार्मिक असल्यामुळें व त्याचा खिस्ती धर्माकडे ओढा असल्यामुळें त्यानें धार्मिक विषयावर हीं सात पुस्तकें लिहिलीं. मात्र शाळेंत जीं पुस्तकें लाविलीं जात त्यांत खिस्ती धर्मतत्त्वांचा उल्लेख असूं नये, याविषयीं कँडी फार दक्ष असे. त्याच्या या निःपक्षपातीपणाचें एक उदाहरण देण्यासारखें आहे. जुन्या पुस्तकांची आवृत्ति संपल्यानें ज्या कांहीं पुस्तकांची नवी आवृत्ति काढावयाची त्यांची एक यादी कँडीनें कार्टर यास पाठविली.[१०५] त्याबरोबर या पुस्तकांचें पुनर्मुद्रण करतांना त्यांत काय सुधारणा करावयास पाहिजे हें सांगताना 'यात्रेकऱ्याचा वृत्तांत' या पुस्तकांत नें बदल करावयास सुचविलें आहे. कँडी म्हणतो,

"I feel it my duty to state for the information of the Board that on examining it to see whether it needed any correction before being put to the press, I found that it contains some quotations from our scriptures, and passages including faith in our Saviour. As these may be considered an infringement of the Board's Rule of religious neutrality, I think it probable that the Board is ignorant that the book contains them; and I feel it therefore incumbent on me under the circumstances of the case, to make the Board aware of it."[१०६]

कँडीनें दिलेल्या या सूचनेवरून धार्मिक बाबतींतील बोर्डाचा नियम पाळण्यांत कँडी किती दक्ष होता, हें आपणांस दिसून येतें.

---

१०५ D P I. Board of Education Poona Sanskrit College 1848 p 192
१०६ Ibid p 194

कँडीचें हें विविध क्षेत्रांतील वाङ्मय व त्याची शिक्षणविषयक कामगिरी पा
म्हणजे कँडीच्या कर्तृत्वाबद्दल विशेष आदर वाटूं लागतो. कँडीच्या या कार्यांचा गौरव त
कालीन सरकारी अधिकाऱ्यांनीं मुक्तकंठानें केला आहे. 'शिक्षणाची स्थिति व उन्नति'
विषयावर सर अर्स्किन पेरी यानें जें टांचण लिहिलें आहे, त्यांत त्यानें मराठी स्कॉलर म्ह
कँडीचा गौरव केला आहे व त्याच्या लेखनशैलीबद्दल व भाषांतर कार्याबद्दल स्तुति
उद्गार काढले आहेत. भाषांतर करतांना इंग्रजी कल्पना मराठींत आणणें हें दुर्धर
अवघड काम असूनसुद्धां हें कार्य कँडीनें यशस्वी करून दाखविलें आहे. याबद्दल
टांचणांत अर्स्किन पेरीनें विस्तारानें लिहिलें आहे. तो म्हणतो,

"I believe Major Candy is one of the best Mahrat
scholars in the Presidency. He writes with great purity; ar
all his energies are devoted to the task of diffusing the usu
information of Europe through the tongue which he ha
studied so diligently."[२०७]

मराठी भाषेंत लेखननैपुण्याबद्दल सर अर्स्किन पेरीनें कँडीची ज्याप्रमाणें स्तु
केली आहे त्याप्रमाणें त्याच्या शिक्षणकार्यासंबंधानेंहि मत व्यक्त केलें आहे. आत
पर्यंत निरनिराळ्या विषयांवर शिक्षणासाठीं कांहीं पुस्तकें कँडीनें लिहिलीं असल्या
आपण पाहिलेंच आहे. याशिवाय शिक्षणक्षेत्रांत कोणत्या विषयावर पुस्तकें पाहिजे
त्यासंबंधींसुद्धां त्यानें बरेच श्रम घेतलेले दिसतात. या शालेय पुस्तकांसंबंधीं सरकार
कँडीस एक पत्र लिहिलेलें आढळतें तें असें,

"I have to request you will furnish to the Board a lis
of Class Books that your experience may point out as like
ly to be useful in this side of India, the preparation of a
useful and comprehensive set of Class Books being a subjec
in which the Board is much interested."[२०८]

या पत्रास अनुसरून गणित, व्याकरण, इतिहास, भूगोल, नॅचरल हिस्ट्रि, नॅचर
फिलॉसफी, पोलिटिकल एकॉनॉमी इत्यादि विषयावर शाळेंत पुस्तकें पाहिजेत, अ
कँडीनें रिपोर्ट लिहिला पुढें या विषयावर निरनिराळीं पुस्तकें अनेक विद्वानांकडू
मराठींत लिहून तयार केलीं गेलीं. याचें बरेंचसें श्रेय कँडीला आहे त्याचें हें का
डोळ्यांसमोर असल्यानें सर अर्स्किन पेरी आपल्या टांचणांत कँडीविषयीं म्हणतो,

"Vernacular education on this side of India does no
possess a warmer friend than Major Candy, and there is n
one abler to carry out every feasible suggestion for thei
improvement"[२०९]

२०७ *Report of the Board of Education* Vol. VIII 1849 p 78
२०८ *D P I Appendix to the Report of Board of Education* 1843 *Appendix H*
२०९ *Report of the Board of Education* Vol VIII 1849 p 77

कँडीवर 'प्रभाकर' पत्रांत खूप टीका येत असे. ही टीका कशा प्रकारची होती हें आपणांस कँडीनें 'ज्ञानोदयां'त त्यांना दिलेल्या उत्तरावरून दिसून येईल. कँडी या उत्तरांत लिहितो,

"प्रभाकरकर्ता म्हणतो कीं मेजर क्यांडी साहेबांस मराठी भाषा अगदीं समजत नाहीं व त्यांस पंडितांच्या मदतीवांचून दोन ओळींचें देखील भाषांतर व्हावयाचें नाहीं, परंतु असें हाणण्यास मला चिंता नाहीं कीं मी आज पंचवीस वर्षें मराठी भाषेचा अभ्यास करीत आहें. त्या अर्थी तिचें कांहीं ज्ञान मला असावेंच."[२१०]

'प्रभाकर' पत्रात कँडीवर जी टीका करण्यांत आली होती, त्यांतील वाक्यरचना कशी चुकीची आहे हें त्यानें पुढीलप्रमाणें दाखविलें आहे :—

"त्याच्यानें दोन ओळी भाषांतर करतां यावयाचें नाहीं. 'त्याच्यानें करतां यावयाचें नाहीं' हें वाक्य अगदीं अशुद्ध आहे. हें वाक्य शुद्ध लिहिण्याचे प्रकार दोन आहेत. 'त्याच्यानें करवणार नाहीं' किंवा 'त्यांस करवणार नाहीं', 'दोन ओळी भाषांतर' हेंहि बोलण्याचे चालीस विरुद्ध आहे. 'दोन ओळीचें भाषांतर' असी लोकांत बोलण्याची चाल आहे." [२१०]

कँडीवर ही टीका होत होती, त्याचें कारणहि कँडीच्या चरित्रात 'ज्ञानोदय'-कारांनीं दिलें आहे. तें असें :

"एतद्देशीय व दुसरे लोक जीं भाषांतरें व दुसरीं पुस्तकें सरकारकडे छापण्या-करितां किंवा आश्रयाकरितां पाठवीत असत, तीं सर्व क्याडीसाहेबाकडे पसंतीकरितां येत असत आणि साहेब मजकूर तीं चांगलीं तपासून त्याविषयीं निःपक्षपातानें अभिप्राय देत असत. हें काम करताना त्यास ज्या ग्रंथांतील अशुद्धे व चुका दाखवाव्या लागत व कित्येकांविषयीं प्रतिकूल अभिप्राय द्यावे लागत. कारण हें काम ते,

"शत्रोरपि गुणावाच्या दोषावाच्या गुरोरपि"

या वाक्यांत सांगितलेल्या नियमाप्रमाणें करीत असत. म्हणून कित्येक पुस्तकें वा भाषांतरें नापसंतही करण्यांत येत. यावरून बहुतास वाईट वाटून त्यांनीं वर्तमानपत्रां-तून व विशेषेंकरून प्रभाकरांतून क्यांडी साहेबावर भलतेसलते दोषारोप ठेवून कित्येक दिवसपर्यंत निंदा केली."[२११]

खुद्द "त्या भाषांतरांपैकीं बहुतेक भाषांतरें ज्यांनीं केलीं होतीं त्यांस इंग्लिश भाषेचें सरासरी ज्ञान आहे खरें, परंतु त्यांनीं आपल्या जन्मभाषेचा (मराठी भाषेचा) अगदीं अभ्यास केला नाहीं. ह्यामुळें परकीय भाषेंतून जें काय ज्ञान त्यांस प्राप्त झालें

२१० ज्ञानोदय, २ फेब्रुआरी १८५१. पृ. ४२.

२११ ज्ञानोदय, ८ मार्च १८७७. पृ. १२४–१२५.

आहे तें सुंदर रीतीनें ग्रंथ रचून हिंदुना लोकांत लिहिण्याबोलण्याच्या ज्या पद्धती आहेत त्याप्रमाणें तरी ग्रंथ लिहून स्वमार्गेत आणतां येत नाहीं. ह्या ग्रंथकारांपैकीं बहुतेकांस संस्कृत भाषेचें ज्ञान नाहीं,"[२१२] असें कँडीनें आपल्यावरील टीकेस उत्तर दिलें आहे. यावरून तत्कालीन पंडीतांबद्दल त्याचें मत काय होतें, तें दिसून येतें.

अशा तऱ्हेनें कँडीचें मराठी भाषेसंबंधींचें कार्य त्याच्या मरणापर्यंत चाललें होतें. "मरणापूर्वी दीड दोन वर्षें त्यानें आपल्या नोकरीचा राजिनामा देऊन पेन्शन घेतलें, परंतु इंग्लंडला न जातां तो येथेंच राहिला. दिल्ली दरबारच्या प्रसंगी त्याला 'कंप्यानियन ऑफ दि स्टार ऑफ इंडिया' हा बहुमानाचा किताब मिळाला."[२१३] कँडी ता. २६ फेब्रुवारी १८७७ रोजी मरण पावला. एकंदरींत, कँडीच्या जीवनाचा जवळ जवळ ५० वर्षांचा काळ मराठी भाषा व वाङ्मय यांनीं व्यापलेला दिसतो. या काळांत मराठी भाषेची मोठी सेवा करून कँडीनें आपलें नाव मराठी भाषेंत चिरस्मरणीय करून ठेवलें आहे.

---

२१२ ज्ञानोदय, १ फेब्रुवारी, १८५१. पृ. ४२.

२१३ ज्ञानोदय, ८ मार्च १८७७. पृ. १२६.

# अमेरिकन मिशनचें मराठी वाङ्मय

हिंदुस्थानांत जे मिशनरी आले, त्यांनीं धर्मप्रसार सुलभ व्हावा व हिंदु लोकांना ख्रिस्ती धर्माचीं तत्त्वें विशद करतां यावींत म्हणून देशी भाषांचा अभ्यास केला व ख्रिस्ती धर्मपर असे अनेक ग्रंथ लिहिले. प्रास्ताविक प्रकरणांत गोव्यास येऊन राहिलेल्या फादर स्टीफन्स, फादर क्रुवा इत्यादि जेसुइट मिशनरी, तंजावरचा मिशनरी स्वार्ड्झ व श्रीरामपूर येथील मिशनरी केरे यांनीं आपल्या परीनीं मराठी भाषेची सेवा कशी केली, हें सांगितलेंच आहे. खुद्द मुंबईत व इतर महाराष्ट्रांत मराठी भाषेचा अभ्यास करून मराठी भार्षेत धार्मिक ग्रंथ, शालोपयोगी ग्रंथ, काव्यग्रंथ व नियतकालिकें अशा तऱ्हेचे वाङ्मय निर्माण करून जवळ जवळ शंभर वर्षें मराठी भाषेची सेवा केली अशा एका मिशनरी संस्थेची व त्यांतील मिशनऱ्यांच्या मराठी वाङ्मयविषयक प्रयत्नांची सविस्तर माहिती या प्रकरणांत द्यावयाची आहे. ही संस्था म्हणजे अमेरिकन मराठी मिशन ही होय. महाराष्ट्रांत पेशव्यांचा अंमल असतांना मुंबईत व पुण्यांत ज्यांनीं प्रथम मराठी भाषा शिकून, त्या भार्षेत ग्रंथ निर्माण केले असे परकीय लोक म्हणजे अमेरिकन बोर्डाचे मिशनरी होत.

अमेरिकेंत अँडफोर्ड येथें कांहीं कॉलेजविद्यार्थ्यांनीं सॅम्युएल मिलच्या नेतृत्वाखालीं आशियांतील लोकांना "नैतिक अंधकारांतून बाहेर काढण्यासाठीं" सन १८०६ पासून प्रयत्न सुरू केले होते. या विचारांतून व प्रयत्नांतून त्यांची पहिली सभा स्थापन होऊन जेसुइट मिशनरींप्रमाणें त्यांनीं कार्य करण्याचें ठरविलें.[1] या सॅम्युएल मिलच्या नेतृत्वाखालीं झालेल्या पहिल्या सभेंतील विचारमंथनांतून सन १८१० मध्यें अमेरिकन बोर्ड स्थापन झालें. ता. १८ सप्टेंबर १८११ रोजीं या बोर्डाची वूर्सेस्टर येथें दुसरी सभा स्थापन झाली. त्यांनीं ब्रह्मदेश, सुरत व पेनांग हीं आशियांतील ठिकाणें कार्यासाठीं निवडलीं.

या सर्वांनीं अँडव्हार येथें तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला, तसेंच त्यांच्यापैकीं हॉल व न्यूवेल यांनीं डॉर्टमाउथ येथें वैद्यकीचा अभ्यास केला. पुढें कलकत्ता येथें निघण्यासाठीं १९ फेब्रुआरी १८१२ रोजीं कॅरव्हॅन या बोटीनें जडसन व न्यूवेल हे दोघे निघाले व २४ फेब्रुआरी रोजीं नॉट, हॉल व राइस हे तिघे हार्मनी या बोटीनें बाहेर पडले.[2] कॅरव्हॅन ही बोट कलकत्त्यास प्रथम १७ जून रोजीं लागली. या बोटीवरील जडसन व न्यूवेल यांनीं तेथें राहण्याची सरकारजवळ परवानगी

---

१. William E. Strong. *The Story of American Board.* p. 7.

२. *Ibid*, p. 16.; J. Murray Mitchell–*In Western India*, p 42. तसेंच ज्ञानोदय, १ ऑगस्ट १८५०, पृ. ११० 'हिंदुस्थानांतील अमेरिकन मिशन' हा लेख पहा.

मागितली, परंतु ती परवानगी नाकारल्यामुळें न्यूवेल व जूडसन मॉरिशस बेटाकडे गेले. हार्मनी ही बोट कलकत्त्यास उशीरां पोहोंचली. या बोटीवरील मिशनरींपैकीं राइस हा इतरांना सोडून अमेरिकेस परत गेला. हॉल व नॉट यांना आजारीपणामुळें कांहीं काळ कलकत्त्यास थांबावें लागलें. पण कलकत्ता येथें राहणें अशक्य झाल्यानें त्यांनीं मुंबईला जाऊन तेथें मिशन स्थापण्याचा प्रयत्न केला व १८१३ मध्यें मुंबई येथें त्यांनीं अमेरिकन मिशनची स्थापना केली. पुढें ७ मार्च १८१४ रोजीं मॉरिशसहून न्यूवेल त्यांना येऊन मिळाला.

हे तीन मिशनरी मुंबईस आल्यानंतर त्यांना तेथेंहि बऱ्याच अडचणी सोसाव्या लागल्या.[3] त्या वेळीं इंग्लंड व अमेरिका यांचें युद्ध चालू असल्यानें हे लोक अमेरिकेचे हेर असतील अशा समजुतीनें त्यांना इंग्लंडला जाण्याचा हुकूम झाला. हा हुकूम चुकवितां येत नाहीं, असें दिसून येतांच त्यांनीं सिलोनला पळून जाण्याचा निश्चय केला व ते कोचीनला जाणाऱ्या बोटींत गुपचूपपणें चढले व कोचीनला आले. तेथें त्यांनीं सिलोनला जाणाऱ्या बोटीची वाट पाहण्यांत कांहीं दिवस घालविले. त्यामुळें त्यांचा ठावठिकाणा कळला व त्यांना पकडून मुंबईत आणण्यांत आलें. मुंबईस आणल्यानंतर इंग्लंडला जाणारी दुसरी जी आगबोट होती त्या बोटींतून त्यांनीं इंग्लंडचा प्रवास करावा, असें त्यांना सांगण्यांत आलें; पण पुढें हा हुकूम तात्पुरता रद्द केल्यानें ते मुंबईसच राहिले. अशा स्थितींत त्यांनीं मुंबईस दोन वर्षें काढलीं. पुढें सन १८१५ मध्यें मुंबईचा त्या वेळचा गव्हर्नर सर इव्हन्स नेपियन यानें हद्दपारीचा हुकूम रद्द करून त्यांना मुंबईत रहाण्याची परवानगी दिली.[4] अशा रीतीनें अनेक अडचणींना तोंड देऊन या त्रिवर्गांनीं मुंबईत अमेरिकन मिशनची स्थापना करून तें वाढविलें.

मराठी ग्रंथनिर्मितीचें कार्य करण्यापूर्वी इतर अनेक मिशनरींप्रमाणें त्यांनीं मराठी भाषेचा अभ्यास केला. मुंबईस उतरल्यापासूनच त्यांनीं मराठी भाषेच्या अभ्यासाची सुरवात केली, असें दिसतें. कारण ता. ९ मार्च १८१३ रोजीं आपल्या आईबापांस लिहिलेल्या पत्रांत नॉटनें मराठी भाषेचा अभ्यास करण्यासाठीं आपण दररोज तीन-चार तास खर्च करतों असें म्हटलें आहे. तो लिहितो,

"Though our state is uncertain, we are commencing the Marathi language, – 'We walk by faith, not by sight.' A very

---

३. हॉल व नॉट यांना किती संकटें भोगावीं लागलीं त्याचें वर्णन 'ज्ञानोदया'त आढळतें. ज्ञानोदय १ एप्रिल १८५१, पृ. १०९, 'भरतखंडातील मिशनाविषयीं' हा लेख पहा.

४. *The Monthly Miscellany of Western India.* Vol. I. No. 2. May 1850. p 84.

talkative black gentleman is to sit by us, and *beat it into us, three or four hours every day.* " [५]

वरीलप्रमाणें हॉल व नॉट या दोघांनीं अमेरिकन बोर्डाच्या सेक्रेटरीलाहि १७ मार्च रोजीं एक पत्र लिहून मराठी भाषेच्या अभ्यासाबद्दल कळविलें आहे. त्यांत ते लिहितात,

" Our hopes of staying are so strong that we have already commenced learning the Marathi Language. " [६]

हॉल व नॉट यांनीं मराठी भाषेचा अभ्यास करून मराठी भाषेंत ख्रिस्तीधर्मतत्त्वाच्या प्रसाराची सुरुवात केली. याचीच परिणति होऊन पुढे या मिशनरींनीं मराठी भाषेंत पुस्तकेंहि लिहिलीं.[७] व नव्या कराराचें भाषांतर करण्यासहि सुरुवात केली. हॉलच्या मराठी भाषाभ्यासाबद्दल अमेरिकन मिशनच्या शतसांवत्सरिक रिपोर्टांत गॉर्डन हॉलचा नातू रे. जॉर्ज ए. हॉल याने गॉर्डन हॉलच्या कांहीं आठवणी लिहिल्या आहेत. त्यांत तो म्हणतो,

" His life was circumscribed by limitations not easy for us to appreciate. And yet in two years he so mastered the Marathi language that he was able to preach the Gospel to the people in their own tongue, and it is said, with remarkable power Some years ago one wrote, 'No missionary in Western India has ever been more respected among the Brahmins and higher classes for his discussions and pulpit discources.' He also translated a large part of the New Testament and prepared a harmony of the Gospels and many religious tracts " [८]

हॉल व नॉट हे मुंबईस राहिल्यानंतर व मराठी भाषा शिकल्यानंतर हिंदु लोकांसाठी कांहींतरी कार्य केलें पाहिजे या विचारानें सन १८१५ मध्यें त्यांनीं इंग्रजी शाळा काढली. त्यात प्रथम २५ मुलें होतीं. याशिवाय दोन व्हर्नाक्युलर शाळांत ४० मुलें होतीं. प्रथम त्यांना शिक्षक मिळण्यास अडचण पडली, पण पुढें दोन ब्राह्मण शिक्षक त्यांना मिळाले व ते व्हर्नाक्युलर शाळांत शिकवूं लागले. पुढील वर्षी शाळांची संख्या वाढली व एकंदर ३०० विद्यार्थी झाले. इ. स. १८१८ मध्यें ११ शाळा व ६०० विद्यार्थी झाले.

---

५. *Memorial Papers of the American Marathi Mission.* p. 74.

६. *Ibid*, p. 74.

७. **ज्ञानोदय,** ता. १६ मे १८५१ पृ. १५८. पहा—"त्या वेळीं ख्रिस्ती शास्त्राचें भाषांतर मराठी किंवा इकडील दुसऱ्या कोणत्या भाषेंत झालें नव्हतें; म्हणून ते त्यांतून लहान लहान वाक्यांचा तरजुमा करीत आणि तो लोकास वाचून दाखवीत असत."

८. *Centennial Report of the American Marathi Mission.* 1913. p. 82.

या पहिल्या मिशनऱ्यांना मराठी भाषा शिकण्यांत ज्या अडचणी आल्या, त्या म्हणजे व्याकरण, शब्दकोश यांच्या साहाय्याशिवाय त्यांना मराठी भाषा शिकावी लागली. रे ड्रुस म्हणतो,

"The Missionary, too, found few if any helps in the way of grammars and vocabularies in acquiring the native language. Seated with an unskilled Pundit he must receive instructions from him orally in regard to the meanings of words and the forms of speech, while the real principles of the language could be obtained only after long and patient comparisons and generalizations."९

या अडचणींतून मार्ग काढून गॉर्डन हॉल वगैरे मिशनरींनीं भाषाज्ञान कसें संपादन केलें, यासंबंधीं आणखी एक उतारा पहा :—

"Their first task was to learn the language, for which they had neither dictionary nor grammar; but in whose study the English wife whom Mr. Hall had married in 1813, and who was familiar with the Hindustani speech and character, was of great assistance Moreover, it was the habit of the missionaries to take their daily walk where they might meet the people, by the temples, bazaars or burning ghats, pausing like their Master of old wherever a group would gather around to listen. Thus they soon began to make acquaintance, and to learn the life and habit of the people."१०

प्रथम आलेल्या या मिशनरींना भाषा शिकण्यासाठीं हा जो त्रास पडला व ज्या अडचणींना तोंड द्यावें लागलें, तितका तो पुढें पांच-पन्नास वर्षांनीं मिशनरी आले त्यांना झाला नाहीं. कारण भाषेचें व्याकरण, शब्दकोश इत्यादि ग्रंथ तयार होऊन त्यांच्या पुढील बऱ्याच अडचणी नाहींशा झाल्या होत्या. १८३१ मध्ये मोल्स्वर्थचा शब्दकोश प्रसिद्ध झाला व युरोपियन लोकांना त्याच्या साहाय्यानें भाषा शिकणें कितीतरी सुलभ झालें. तसेंच या देशांतील हिंदु लोकांचा स्वभाव-विशेष, त्यांचा धर्मभोळेपणा या गोष्टीहि त्यांना या विषयावरील प्रसिद्ध झालेल्या पुस्तकामुळें परिचित झालेल्या होत्या. तिसरें म्हणजे पुष्कळसे हिंदु लोक ख्रिस्ती धर्माचे अनुयायी झाले होते, त्याच्याकडून त्यांना बरीच मदत होत असे.

हिंदुस्थानात हे मिशनरी आल्यानंतर येथील लोक 'अज्ञानांधकारांत लोळत आहेत' अशा समजुतीमुळें त्यांना "खऱ्या धर्माची" शिकवण देण्याची त्यांना

९. *Memorial Papers of the American Marathi Mission.* p 75.

१०. William E. Strong. *The Story of the American Board.* pp. 20-21.

आवश्यकता वाटली. यासाठीं त्यांनीं मराठी भाषेंत बायबल तयार केलें. बायबल हाच त्यांचा मराठी भाषेंतील मोठा ग्रंथ आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. याच-बरोबर त्यांनीं लहान लहान धर्मपुस्तकें लिहिलीं. यासाठीं सन १८१५ मध्यें अमेरिकन मिशननें रे. बार्डवेल याच्या देखरेखीखालीं मुंबई येथें एक लांकडी छापखाना स्थापन केला.'' पुढें त्यावर काम भागेना तेव्हां १८२५ मध्यें कलकत्याहून नवीन मराठी टाइप मागविण्यांत आले. तसेंच टाइप पाडण्याच्या कामीं टॉमस ग्रॅहम नांवाच्या एका आंग्लोइंडियनाची योजना करण्यांत आली. त्यानें टायपांच्या बाबतींत पुष्कळ सुधारणा करून छापण्याच्या कामांत मोठें यश मिळविलें आणि मराठी भाषेंत अनेक पुस्तकें छापून काढलीं.[१२]

छापखान्याची उभारणी झाल्यानंतर सन १८१७ पासून नव्या कराराचें भाषांतर करण्यास त्यांनीं सुरवात केली. सन १८२६ मध्यें हें भाषांतर छापून प्रसिद्ध झालें. विल्यम कॅरेनें बायबल छापण्याचा जो प्रयत्न केला, त्यानंतर अमेरिकन मिशनचा हा दुसरा उद्योग होय. अमेरिकन मिशनचें हें मराठी भाषेंतील बायबल रे. गॉर्डन हॉल, रे. सॅम्युएल न्यूवेल, रे. होरॅशिओ बार्डवेल, रे. जॉन निकोल्स व रे. ॲलन ग्रेव्हज् या पांच मिशनरींनीं केलें. यांपैकीं पहिले दोन मिशनरी १८१३ मध्यें हिंदुस्थानांत आले होते. बार्डवेल हा १८१६ मध्यें व ॲलन ग्रेव्हज् हा १८१८ मध्यें हिंदुस्थानांत आला. या पांच मिशनरींपैकीं न्यूवेल १८२१ मध्ये, निकोल्स १८२४ मध्यें व हॉल १८२६ मध्यें मरण पावले बार्डवेल १८२१ मध्ये अमेरिकेस गेला. एकटा ॲलन ग्रेव्हज् हा १८४३ पर्यंत कार्य करून महाबळेश्वर येथें मरण पावला. या पांचहि मिशनरींनीं मृत्यूचा धोका पत्करूनसुद्धां बायबलच्या भाषांतराचें हें कार्य पुरें केलें. बायबलचें भाषांतर चांगलें करतां यावें म्हणून त्यांनीं मराठी भाषेचा कसून अभ्यास केला व एतद्देशीय पंडिताची मदतहि घेतली. याविषयीं ॲलन ग्रेव्हज् म्हणतो,

" A considerable part of the first complete edition of the New Testament was made when five of our members were living, all of whom had a tolerably good acquaintance with Marathi, and with the original languages of the Scriptures ...Each one of course had the constant of one or more Pundits, who were from different parts of the country."[१३]

हे पंडित निरनिराळ्या भागांतील होते एवढेंच वर सागण्यांत आलें आहे; पण त्यांचीं नांवें मात्र देण्यात आलीं नाहींत. बायबलच्या भाषांतराचें श्रेय जेवढें

११. ज्ञानोदय, ता. १५ जून १८५२. पृ. १८८.

१२. William E. Strong *The Story of the American Board*. p. 21.

१३. *Memorial Papers of the American Marathi Mission*. p. 78.

अमेरिकन मिशनरींस वायबल पाहिजे, तसेंच थोडें तरी श्रेय पंडितांस द्यावें लागेल. कारण नव्या करारची पहिली प्रत करतांना पंडितांनी कोणत्या प्रकारचें साहाय्य केलें, हें सांगतांना मेय्हयू म्हणतो,

"In making the first copy of the New Testament, for the most part, the sense was given to the Pundit directly from the original, and then he wrote it down in his own words. A very small part only was written by us; and then we endeavoured afterwards to procure carefully all idiomatic corrections from Pundits, by a full explanation of words and sentences." १३.

वायबलचें भाषांतर जें इतक्या तत्परतेनें अमेरिकन मिशनरींनीं केलें, त्याचें कारण म्हणजे हिंदु लोकांना या पुस्तकाची अतिशय गरज आहे असें त्यांना वाटलें. वायबलप्रमाणेंच अनेक धार्मिक पुस्तिकादि छापण्यांत आल्या. पहिलें धर्मासंबंधींचें एक पुस्तक त्यांनीं हातानेंच लिहून काढलें होतें; कारण छापखाना येण्यापूर्वी दोन वर्षे धार्मिक पुस्तिका लिहिण्यास प्रारंभ झाला होता. छापखाना आल्यानंतर मात्र पुष्कळ धर्मपुस्तकें छापली जाऊं लागलीं. या पुस्तकांचे निरनिराळे विषय असून ख्रिश्चन चर्चच्या गरजा भागविण्याच्या उद्देशानें हीं पुस्तकें तयार करण्यांत आलीं होतीं. आता यापुढें अमेरिकन मिशनच्या या मिशनरींनीं लिहिलेल्या पुस्तकांची माहिती देण्यांत येत आहे:—

१. रे. गॉर्डन हॉल :

(१) *A Scripture Tract*, अमेरिकन मिशन. १८१७. पृ. ८.

अमेरिकन मिशनचें धर्मसंबंधीं हें पहिलेंच मुद्रित पुस्तक होय. या पुस्तकाची माहिती रे. ब्रुस यानें पुढीलप्रमाणें दिली आहे :—

"The first Christian tract that was printed in the Marathi Language was 'A Scripture Tract," probably one of those prepared by Gordon Hall. It consisted of eight pages, and was issued from the press on the 10th of March 1817. The edition consisted of 1500 copies. This was the *beginning* of the Marathi Christian literature " १४

हें पुस्तक उपलब्ध होत नाहीं.

(२) *The Way to Heaven* अ. मि. १८१८. पृ. १६.

याची दुसरी आवृत्ति १८१८ व तिसरी १८१९ मध्यें प्रसिद्ध झाली. पुढें हें पुस्तक हिंदुस्तानींत व गुजरातींत छापल्याचा उल्लेख आढळतो. हेंहि पुस्तक उपलब्ध होत नाहीं.

१४ *Ibid.*, p. 96.

(३.) **प्रश्नोत्तरावली** (*Catechism*) अ. मि. १८१९, पृ. ४०.

याची दुसरी आवृत्ति १८२४, तिसरी १८२६, चवथी १८३१ व पांचवी १८३५ मध्यें प्रसिद्ध झाली. अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें याची चवथी आवृत्ति उपलब्ध आहे. याची प्रश्नोत्तरात्मक रचना आहे. ती कशी आहे हें खालीं दिलें आहे:—

"प्रश्न—तुझा उत्पन्न करणार कोण ?

उत्तर—परमेश्वर.

प्रश्न—देवानें दुसऱ्या कोणत्या वस्तूस निर्माण केलें ?

उत्तर—त्यानें धोंडे व डोंगरओहोळ व झाडें व जंतू व सूर्य व चंद्र व तारा व सर्व प्रकारच्या वस्तू यांस निर्माण केलें.

प्रश्न—देवानें कशापासून सर्व वस्तु निर्माण केल्या ?

उत्तर—त्याने शून्यापासून सर्व वस्तु निर्माण केल्या ?" (पृ. १)

"प्रश्न—येशू कोण आहे ?

उत्तर—तो परमेश्वराचा येकुलता येक पुत्र। ज्यानें नेमलेल्या काळीं कुमारीचे ठायीं पुरुषसंयोगावांचून अवतार घेतला।" (पृ. ३)

या पुस्तकाची दुसरी एक आवृत्ति अहमदनगर येथें आहे. त्यावर लेखकाचें नांव व काल नमूद नाहीं; पण पुस्तकावर पाचवी आवृत्ति असें लिहिलें आहे. याचीं २४ पृष्ठें आहेत.

(४) **त्रिभुवनांची गोष्ट** (*The Three Worlds*) स्वतंत्र. अ. मि. १८२२, पृ. २०.

याची दुसरी आवृत्ति १८२५ मध्यें निघाली. ट्रॅक्ट सोसायटीनें आपल्या मालेंतील पहिलें पुस्तक म्हणून हें पुस्तक प्रसिद्ध केलें. सुरत मिशनचा रे. फिवी यानें गुजरातीमध्यें या पुस्तकाचें भाषांतर केलें. अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें या पुस्तकाची १८३१ मधील तिसरी आवृत्ति असून तिचीं २४ पृष्ठें आहेत. या पुस्तकाचें स्वरूप समजण्यासाठीं त्यातील कांहीं उतारे पुढें देण्यांत येत आहेत:—

"त्रिभुवन म्हणजे आकाश लोक व नरक व पृथ्वी असे तीन लोक सृष्टींत आहेत ॥ ह्या तीन लोकाचा उत्पन्न करणारा व धनी कोण ? तर परमेश्वराने आकाश लोक व पृथ्वी व नरक व सगळी सृष्टि यास उत्पन्न केलें आणि परमेश्वरावांचून ह्यांचा उत्पन्न करणारा कोणी नाहीं. ह्यांचा कोणी धनी नाहीं, कोणी प्रभू नाहीं, कोणी राजा नाहीं. सर्व जें आकाशात आणि सर्व जें पृथ्वींत आणि सर्व जें नरकांत त्या सर्वांस तो आपल्या इच्छेप्रमाणें चालवितो व सगळ्या सृष्टींत तो खरा देव सर्वदां सर्वत्र भरून राहातो. परंतु तो आमच्या डोळ्यांस दिसत नाहीं. कारण कीं तो केवळ

निराकार आत्मा आहे आणि त्याला पाहाणें आणि ओळखणें हें डोळ्यांचें काम नव्हे परंतु मनाचें काम आहे ॥ ”[१५]

मूर्तिपूजा करूं नये, यासाठीं या पुस्तकांत जोराचा प्रचार गॉर्डन हॉलनें कसा केला आहे, हें वर दिलेल्या उताऱ्यावरून दिसतें. थोडक्यांत हिंदुधर्माकडून खिस्ती-धर्माकडे लोकांचें मन वळावें, असा प्रयत्न या पुस्तकाच्या द्वारें केला आहे.

या पुस्तकाची २८ पृष्ठांची आणखी एक आवृत्ति अहमदनगर येथें आहे, पण यावर कालनिर्देश नाहीं.

**(५) देवाच्या दहा आज्ञा** ( *Ten Commandments with Comments* ) अ. मि. १८२५, पृ. १६.

याची दुसरी आवृत्ति १८२८ व तिसरी आवृत्ति १८२९ मध्यें प्रसिद्ध झाली. अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें ' परमेश्वराच्या शास्त्रांतील दाहा आज्ञा व इतर वाक्यें ' अशा शीर्षकाचें एक पुस्तक आहे. यावर आवृत्ति व सन नमूद नाहीं. याचीं ८ पृष्ठें आहेत. याचें स्वरूप पुढीलप्रमाणें आहे :—

१ माझ्यासमोर तुला दुसरे देव न होवोत.

२ तूं आपल्यासाठीं कोरींव मूर्ति । व कांहीं आकृती जी वरील आकाशांत । व जी खालील पृथ्वींत व जी पृथ्वीच्या खालील पाण्यांत । ती करूं नको । त्यांच्या पायां पडूं नको । आणि त्याची सेवा करूं नको । कां कीं मी तुझा परमेश्वर । तुझा देव । आवेशी देव [ आहे ] ।

३ परमेश्वर [ जो ] तुझा देव । त्याचें नाम तूं व्यर्थ घेऊं नको । कां कीं जो त्याचे नाम व्यर्थ घेतो । त्याला परमेश्वर उजळ करणार नाहीं. (पृ. १–२.)

**(६)** *On the Wordship of God*–अ. मि. १८२२. पृ. ३२.

याची दुसरी आवृत्ति रे. ॲलन यानें सन १८३२ मध्यें सुधारून प्रसिद्ध केली. ती सध्यां उपलब्ध नाहीं.

**(७) होणार क्रोध** ( *Wrath to Come*) स्वतंत्र. अ. मि. १८२५. पृ २४.

या पुस्तकाच्या एकंदर दहा आवृत्त्या निघाल्या. मोडी लिपींतहि हें पुस्तक छापलें गेलें. हिंदुस्थानी व सिंधी भाषांतहि या पुस्तकाचीं भाषांतरें झालीं आहेत. हेंहि पुस्तक उपलब्ध नाहीं.

**(८) शुभवर्तमान** ( *Tidings* ). अ. मि. १८२५ पृ. १६.

हें पुस्तक उपलब्ध नाहीं.

---

१५. रे गॉर्डन हॉल. त्रिभुवनाची गोष्ट. पृ. १–२.

या धार्मिक पुस्तकांशिवाय गॉर्डन हॉलनें तीन शिक्षणविषयक पुस्तकें लिहिलीं आहेत, तीं अशीं :

(१) लेकरांची पहिली पोथी ( *First Book of Children* ) स्वतंत्र. अ. मि. १८१८. पृ. १६.

हें पुस्तक १८१८ मध्यें प्रसिद्ध झालेलें आहे. अमेरिकन मिशन मालेमधील क्रमांक १ चें हें पुस्तक आहे. हें पृष्ठाच्या एका बाजूला बालबोधमध्यें व दुसऱ्या बाजूला मोडी लिपींत छापलें आहे. या पुस्तकाच्या आतांपर्यंत पन्नास आवृत्त्या तरी निघाल्या व या सर्व आवृत्त्या मिळून दहा लाख तरी प्रती खपल्या असतील, असा रे. ब्रूस यांचा अंदाज आहे. अगदीं प्रथम या पुस्तकांत सहा घटे असून १६ पृष्ठें होतीं. नंतर सुधारलेल्या आवृत्तींत या पुस्तकाची पृष्ठसंख्या वाढविण्यांत आली. या पुस्तकाच्या १८२८ व १८२९ सालीं बाणकोट मिशननें दोन आवृत्त्या काढल्या. ट्रॅक्ट सोसायटीनें मुद्दां १८३०, १८३१, १८३२, १८३३, १८३४ व १८३५ सालीं सहा आवृत्त्या काढल्या. पुढें १८३७, १८४१ व १८४४ मध्ये बालबोध व मोडी लिपींत हें पुस्तक प्रकाशित करण्यांत आलें.

असें सांगितलें जातें कीं, हें पुस्तक स्कॉटिश मिशनचा डॉ. स्टीव्हन्सन यानें प्रथम रचलें व रे. ह्यूम यानें तें सुधारून अधिक आकर्षक केलें; परंतु अनेक साधक-बाधक प्रमाणें पाहून रे. ब्रूस यानें असें नमूद केलें आहे कीं, हे पुस्तक डॉ स्टीव्हन्सन हिंदुस्थानांत येण्याच्या अगोदर सहासात वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालें होतें व त्याचा प्रकाशनकाल १८१८ हाच असावा. याविषयीं कारणें देताना तो म्हणतो कीं, आपल्यापुढें लेकरांची पहिली पोथी ह्या पुस्तकाची जी बालबोध व मोडींत प्रत आहे त्यावर नं. २ अमेरिकन मिशन सिरीज् असें लिहिलें आहे. नं. ८ अमेरिकन मिशन सिरीजचें "A Summary of Scripture Doctrine" हें पुस्तक १८२० सालीं प्रसिद्ध झालें आहे. तेव्हा नं. २ चें 'लेकराची पहिली पोथी' हे पुस्तक त्याच्या-पूर्वी प्रसिद्ध झालें असलें पाहिजे. दुसरें कारण अमेरिकन मिशन प्रेसनें प्रकाशित केलेल्या पुस्तकाची जी यादी त्याना या संस्थेच्या सुपरिंटेंडंटकडून १८५४ त मिळाली. त्यांत ह्या पुस्तकाचा प्रसिद्धिकाल १८१८ असल्याचें त्यानीं नमूद केले आहे.

या पुस्तकाचा मूळ कर्ता कोण, यासंबंधीं रे. ब्रूस यानें आपल्या लेखांत विवेचन केलें आहे. रे. ब्रूस याला रे. विल्यमवूड याजकडून अमेरिकन मिशनच्या १८४१ पूर्वीच्या पुस्तकांची यादी मिळाली होती. त्यांत लेखक व भाषांतरकार यांचीं नावें दिलीं होतीं. या यादींत या पुस्तकाचे लेखक म्हणून मि. हॉल व रे. स्टीव्हन्सन या दोघांचा उल्लेख होता. त्यावरून मूळ पुस्तक रे. हॉल यानें तयार केलें असावें व नंतर डॉ. स्टीव्हन्सन ( हा इ. स. १८२४ मध्यें येथें आला. ) यानें सुधारून

वाढविलें असावें, असा निष्कर्ष ब्रूस यानें काढला आहे.[१६] ब्रूस याचा हा निष्कर्ष मान्य होण्यासारखा आहे. यावरून हें पुस्तक गॉर्डन हॉलनें १८१८ मध्यें तयार केलें असावें, याविषयीं शंका रहात नाहीं.

या पुस्तकाच्या १८२८ व १८३१ च्या दोन आवृत्त्या अहमदनगर येथें आहेत. त्यांतील भाषांचे नमुने पुढें देण्यांत आले आहेतः—

**लेकरांची पहिली पोथी,** बाणकोट. १८२८. पृ. १८.

" येशू बोलिला बाळकांस असूं द्या आणि मजजवळ येण्याला त्यांस मना करूं नका कां कीं आकाशांचें राज्य अशांचें आहे ॥ " (पृ. १.)

" धडा १ ॥ देव सर्वकाळ तुझे जवळ आहे ॥ जें कांहिं काम तुं करितोस तें देव पाहातो ॥ तुझें सारें बोलणें तो ऐकतो ॥ तुझे मनांतील विचारहि तो जाणतो ॥ यासाठीं तुं कांहिं वाईट काम करूं नको ॥ तुं कोणि वाईट शब्द बोलुं नको । तुं कोणि वाईट विचार करूं नको ॥ देवाचि याद तुं सोडुं नको ॥ देवाला काळोख आणि उजेड याचा भेद नाहीं ॥ जसें दिवसांत तसें रात्रींत त्याला दिसतें ॥ "(पृ.२)

**लेकरांची पहिली पोथी.** मुंबई १८३१. पृ. २०.

" येशू बोलिला लेंकरास मजजवळ येऊं द्या आणि त्यांस वर्जू नका कां कीं, देवाचें राज्य अशांचें आहे." (पृ. १)

" देव सर्व काळ तुझ्याजवळ आहे ॥ जें कांहीं काम तूं करितोस तें देव पाहातो ॥ तुझें सर्व बोलणें तो ऐकतो ॥ तुझ्या मनांतील विचारहि तो जाणतो ॥ यासाठीं तूं कोणतेंहि वाईट काम करूं नको ॥ तूं कोणताहि वाईट शब्द बोलूं नको ॥ तूं कोणताहि वाईट विचार करूं नको ॥ देवाची आठवण तूं कधीं सोडूं नको ॥ देवाला काळोख आणि उजेड याचा भेद नाहीं ॥ जसें दिवसास तसें रात्रीस त्याला दिसतें ॥ (पृ. २–३.)

**( २ ) इंग्लिश भाषणाचें ज्ञान मिळवायासाठीं साह्यकारि ।** (*A Help in Aquiring a Knowledge of the English Language*) स्वतंत्र. अ. मि. १८१९. पृ. ३८०.

याची दुसरी आवृत्ति १८३१, तिसरी १८४६, चवथी १८५१ व पांचवी १८५८ मध्यें प्रसिद्ध झाल्याचें आढळून येतें.[१७] याची हिंदुस्थानांत निरनिराळ्या भाषांत भाषांतरें झाली आहेत. कानडी व हिंदुस्तानी या भाषांतहि या पुस्तकाच्या आवृत्त्या निघाल्या आहेत.

---

१६. *Memorial Papers of the American Marathi Mission* p 92.

१७ *Ibid.* p 117.

याच पुस्तकासारखें इ. स. १८१८ मध्यें प्रेषित छापखान्यांत छापलेलें 'इंग्लिश भाषणाचें ज्ञान मिळवायासाठीं शीघ्र आणि सोपा उपाय' (An Easy and Expeditious Means of Acquiring a Knowledge of the English Language) या नावानें पुस्तक पहावयास मिळतें, याची एकंदर १६८ पृष्ठें असून यावर लेखकाचें नांव नाहीं. यावरून गॉर्डन हॉलनें १८१९ मध्यें जें वर दिलेल्या नांवाचें पुस्तक लिहिलें, त्याच्याहि अगोदर त्याच्याच मिशनमधील एकाद्या मिशनरीनें किंवा त्यानेंच हें पुस्तक लिहिलें असावें. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयात 'इंग्रजी भाषणाचें ज्ञान मिळवायासाठीं साह्यकारि' (A Help in Aquiring a Knowledge of the English Language) हें सन १८३१ च्या आवृत्तीचें पुस्तक मिळतें.[१८] त्यावर लेखकाचें नांव नाहीं. हें पुस्तक १८१८ मध्यें प्रसिद्ध झालेल्या पुस्तकासारखेंच दिसतें. यावरून तें १८१८ मधील पुस्तकाची दुसरी आवृत्ति असावी असें वाटतें. या पुस्तकाची १८५१ मधील सुधारलेली चवथी आवृत्ति महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें आहे. या पुस्तकांत व्याकरणाचा भाग बराच आहे.

(३) **खगोलविद्या (आकृतीसह)** (*Elements of Astronomy and Geography with Plates.*) स्वतंत्र.अ. मि. १८२४. पृ. ८०.

गॉर्डन हॉलचें शिक्षणविषयक असें हें तिसरें पुस्तक सन १८१९ मध्ये प्रथम प्रसिद्ध झालें. या पुस्तकाची रे. ॲलन यानें सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ति सन १८२९ मध्ये निघाली व तिसरी १८३५ मध्यें प्रसिद्ध करण्यात आली.[१९]

अहमदनगर येथें अमेरिकन मिशनमध्यें जी प्रत आहे, त्यावर काल नमूद नाहीं. याची पृष्ठसंख्या ८० आहे. म्हणजे रे. डी. ओ. ॲलन यानें सुधारून वाढविलेलें १८२९ मधील हें पुस्तक असावें. या पुस्तकांत एकंदर ३७ धडे असून प्रत्येक धड्याखालीं अभ्यासासाठी प्रश्न दिले आहेत "खगोळ भूगोल इत्यादिक॥" असें त्याचें नाव आहे. या पुस्तकाची १८३५ मधील एक आवृत्ति महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें असून त्यात ३७ धडे आहेत व एकंदर पृष्ठसंख्या ७५ आहे. हें शिक्षणविषयक पुस्तक असलें, तरी या मिशनरींनीं ख्रिस्ती धर्माचा संबंध कोठें ना कोठें तरी आणून ख्रिस्ती धर्म श्रेष्ठ आहे, असें प्रतिपादन केलें आहे. या पुस्तकाचें हें स्वरूप समजावून घेण्यासाठीं 'हिंदुस्तानचे वर्णन' या धड्यातील माहिती खालीं देण्यात येत आहे :—

"ख्रीस्ती शके १००० च्या वर्षीं । महंमदी लोक इंया देशांत येऊन जिंकु लागले । आणि तेरामाच्या वर्षीं दाक्षिण देश देश जिंकून घेऊं लागले ॥ त्यांनीं आपला धर्म वाढवायास । आणि हिंदूंचा धर्म मोडायास । बहूत

१८. मराठी दोनशतक्रिते. पृ. ४

१९. *Memorial Papers of the American Marathi Mission*. p. 117.

बळात्कार केला ॥ या देशांत आतां जे महंमदी लोक आहेत । त्यांचे पूर्वज बहुत करून हिंदु लोक होते । आणि बळात्कारानें महंमदी धर्मांत ओढले गेले ॥ अशी ख्रीस्ती धर्माची रीत नाहीं ॥ या धर्माचा उपदेश अवघ्यां लोकांस करावा । परंतु कोणावर बळात्कार न करावा ॥ जो कोणी स्वइच्छेनें ह्या धर्मांत येईल । त्याला निरंतर सुख प्राप्त होईल ॥ आणि जो कोणी यांत न येईल । त्याला देवच शिक्षा करील ॥ "[२०]

शिक्षणविषयक पुस्तकांतसुद्धां धर्मसंबंधीं मतें मांडून त्यांनीं खिस्ती धर्माचा प्रसार करण्याचा प्रयत्न केला, तरी धर्मप्रसाराच्या मोहानें का होईना, शिक्षणविषयक ग्रंथ लिहून या परकीय लोकांनीं शिक्षणाविषयीं जी आस्था दाखविली व त्या आस्थेमुळेंच या देशांतील भाषेचा अभ्यास करून मराठी भाषेची सेवा केली, त्याचें महत्त्व कमी होत नाहीं.

गॉर्डन हॉलनें धर्मप्रसार करण्याचा प्रयत्न पुण्यांत केल्याचा एक उल्लेख आढळतो. छापखाना सुरू केल्यानंतर त्याचे हे प्रयत्न जोरांत सुरू झाले. या मिशन छापखान्यांत बरीच मराठी पुस्तकें छापून तीं वांटण्यासाठीं सन १८२३ मध्यें दोघां ज्यूंना त्यानें पुण्यास पाठविलें. या दोघांना जें शिफारसपत्र त्यानें दिलें होतें, तें पुढीलप्रमाणें आहे.—

"This is to certify that the bearers hereof viz. Samuel and Benjamin Jews have been in our employ as school masters for several years. They are now furnished by us with a small quantity of Mahratta and few Hindoostanee books, which they are authorised to distribute gratuitously to such persons as may desirous of receiving them "[२१]

आपल्या दोन नोकरांना मराठी व हिंदुस्तानी भाषांतील पुस्तकें व शिफारसपत्रें देऊन गॉर्डन हॉलनें पुण्यास पाठविलें. त्या वेळीं पुण्याचा कलेक्टर रॉबर्टसन यानें मुंबई सरकारला पत्रद्वारें असें कळविलें कीं, हीं धार्मिक पुस्तकें वाटण्याला सरकारचें साहाय्य आहे, अशी लोकांची समजूत झाली आहे व ती सरकारला हानिकारक होईल. म्हणून त्यानें त्या दोघांना जाहीर रीतीनें पकडलें व त्यांना त्यांच्या पुस्तकांसहित घाटाखालीं हद्दपार करविलें." याच पत्रांत त्यांच्याकडे किती पुस्तकें होतीं, हेंहि त्यानें कळविलें आहे.

---

२०. सगोळे ग्रंथ इत्यादिक. पृ. १५.

२१. *G. D. Vol* 2/2. 1821-23 p 429.

२२. पुण्याला हीं पुस्तकें वाटतांना जी गडबड झाली, त्याची माहिती 'ओरिएंटल क्रिश्चन स्पेक्टेटर' मध्येंहि आढळते. *O. C. S , July* 1835. p. 268.

"The bearers of the notification issued by Mr. Hall were going about the bazars of Poona distributing there loads which amount to about six thousand volumes of various kinds." २३

पुण्याच्या कलेक्टरच्या वरील रिपोर्टावरून पुण्याचा कमिशनर चॅपलिन यानें मुंबई सरकारचा चीफ सेक्रेटरी न्यूनहॅम यालाहि यासंबंधीं कळविलें कीं, हीं धार्मिक पुस्तकें वांटल्यानें सरकारबद्दल लोकांच्या मनांत अप्रीति उत्पन्न होईल व सरकारच्या लोकप्रियतेला धक्का बसेल. हीं पुस्तकें वांटल्यानें पुण्याच्या ब्राह्मणवर्गामध्यें फार खळवळ उडाली आहे. यामुळें मिशनरींच्या या चळवळीला पायबंद घालणें आवश्यक होऊन बसलें आहे, असेंहि त्यानें सुचविलें आहे. याप्रमाणें मुंबई सरकारनें रे. हॉल याला तसें कळविलें. या पुस्तकप्रसाराला मुंबई सरकारनें असा अडथळा आणल्या-नंतर अमेरिकन मिशनचे रे. हॉल, निकोल्स व ग्रेव्हज् या तीन मिशनरींनीं आपली बाजू मांडून, असें करण्यांत कांहीं आक्षेपार्ह नाहीं व पेशव्यांचे वेळेपासून आपण धार्मिक पुस्तकें वांटीत आहोंत आणि हिंदुस्थानांतहि तीं वांटलीं जातात, असें आपल्या कृतीचें समर्थन केलें, तें असें:—

"As early as 1810, the distribution of Testaments and Tracts, in the Mahratta Language was commenced on the Eastern side of the Mahratta country, and shortly after it was also commenced on the Western side of the same, even when the Late Peishwa was in power, and was not interdicted by him. The same proceeding has been carried on from that time to the present without interdiction. In the space of two years from March 1812, no less than 6005 Testaments and tracts were distributed in the Mahratta language. During the small period 60,718 Testaments and Tracts were distributed in the different parts of India and Burmah by a single mission in Bengal." २४

यावरून मिशनरींच्या धर्मप्रसारामुळें किती पुस्तकें वांटलीं जात होतीं, हें दिसून येतें. हीं पुस्तकें बाजारांत जशीं वांटलीं जात, त्याचप्रमाणें त्यांचा मिशनरी शाळेंतूनहि प्रसार केला जात असे.

## २. सॅम्युएल नॉट :

गॉर्डन हॉलचा हा सहकारी त्याच्याबरोबर हिंदुस्थानात आल्याचा उल्लेख मागें आलाच आहे. हॉलबरोबर मुंबईस तो काम करीत होता. यानें मराठी भाषेचा अभ्यास केला; परंतु प्रकृति बिघडल्यामुळें हा १८१५ मध्यें अमेरिकेस परत गेला.

२३. *G. D. Vol.* 2/2. 1821–23. p. 427.

२४. *Ibid.* pp. 459-460.

ते " यिशु आपले शिष्यांस दर्शन देऊन स्वर्गास गेला ॥ पर्व १६ ॥ " येथपर्यं बखर आहे. भाषेच्या नमुन्यासाठीं पुढील उतारा पहा :—

" यिशु खीस्ताचा जन्म पूर्वीच स्वर्गदूताकडून सांगितला होता ॥ प्र गालिली यांतील नाजरत गांवांतील मार्या नामें येक कुमारी ती दाविदाचे घराती योसेफ नामें एक माणुस याला मागणी करुन दिल्ही होती. तिजकडे गाब्रियेल ना दूत ईश्वराकडून पाठविला होता ॥ आणि तो दूत तिला बोलिला, सलाम फार कृ मिळविलेली अशी तुं, आदेस । प्रभू तुजेजवळ आहे स्त्रियांमध्यें तुं धन्य आहेस मग ती त्याला पाहून त्याचे गोष्टीवरुन घाबरी जाली तेव्हां तो दूत तिला बोलि हे मार्या भिऊं नको कां त्वां ईश्वराजवळ कृपा मिळविली आहे..." (पृ. १.)

हेंच पुस्तक पुढें वाढवून खूप मोठें करण्यांत आलें. सन १८४० मध्यें अमे रिकन ट्रॅक्ट सोसायटीनें मिशन प्रेसमध्यें हें पुस्तक ३०४ पृष्ठांत छापलें. त्याचे नांवांतहि (The History of Our Lord and Saviour Jesus Christ Complied from the Gospels) " आमचा तारणारा प्रभु येशू खीस्त याविषय सुवर्त्तमान; पवित्र लेखांतून काढलें, " असा बदल करण्यांत आला.

पुढील वर्षी म्हणजे १८४१ मध्यें हेंच पुस्तक मोडी लिपींत छापून काढण्यां आलें. याचें नांवहि वरीलप्रमाणेंच आहे. यावर 'चवथी आवृत्ति' असें लिहिलें असू ' सूचनें 'त म्हटलें आहे की, " ह्या पुस्तकांत येशू खिस्ताचें वर्तमान विस्तारा लिहिलें आहे." याची एकंदर पृष्ठसंख्या ४६५ आहे.

एकंदर बायबेलच्या मूळच्या २४ पानी बखरीचा पुढें वीस वर्षांनीं ४६ पृष्ठांचा विस्तार पावलेला असा "सुवर्त्तमान' बनला. यांत मूळचें सर्व स्वरू पालटलें आहे.

(९) *Parables of Our Lord.* अ. मि. १८२०. पृ १८,

अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें या पुस्तकाची १८२१ ची आवृत्ति असून इंग्रजींत त्याचें नाव " Parables of Our Blessed Saviour " असें बदलण्यांत आलें आहे.

या पुस्तकाचें मराठींत नांव पुढीलप्रमाणें देण्यांत आलें आहे: " आमचा धन्य उद्धरणार जो यिशु खीस्त यानें जे दृष्टान्त सांगितले त्यांतून कांहीं काढू या बखरींत लिहिले आहेत ॥ "

या पुस्तकात एकंदर ९ दृष्टान्त असून १८ पृष्ठें आहेत. या दृष्टान्तांपैकी ५ वा दृष्टान्त नमुना म्हणून खालीं देण्यांत आला आहे.

" जर ईश्वर पाप्यास वाचावयास देतो, तर कारण असें आहे, कीं त्यांस पश्चाताप करण्याचा अवकाश असावा. हें अंजिराचें वांझे झाडाचे दृष्टान्तावरु जाणावें. लुक-१३-६-६. "

"कोणी येकाचे बेलबागांतील अंजीराचे येक झाड लाविलें होतें आणि याचें फळ शोधावयास येऊन कांहीं सांपडलें नाहीं. तेव्हां तो माळ्यास बोलिला, पाहा, तीन वर्षांपर्यंत या अंजीराचे झाडापासून फळ शोधीत आलों; परंतु मला सांपडलें नाहीं, त्याला कापून टाक, तें भूमीस व्यर्थ कां करितें? तेव्हां तो उत्तर देऊन त्याला बोलिला, हे प्रभू मी त्याचें भोवतें खाणितों; आणि खत घालितों, तोंपर्यंत हें वर्ष राहुं दे कदाचित् तें फळ देईल नाहींतर मग त्याला कापून टाकसील." (पृ. १२)

या एका दृष्टान्तावरून बाकीच्या दृष्टान्ताची कल्पना होईल व त्याचें स्वरूपहि समजून येईल.

३—*Miracles of Our Lord.* अ. मि. १८२०. पृ. ३६.

या पुस्तकाची १८२६ ची आवृत्ति अहमदनगर येथील अमेरिकन मिशन-मध्यें असून "Miracles of Our Blessed Saviour", असें त्याचें नांव बदलण्यांत आलें आहे.

या पुस्तकाचें मराठींत नांव 'आमचा धन्य उद्धरणार, जो येशू खीस्त, यानें जे चमत्कार केले, त्यांतून कांहीं निवडून या वहीमध्यें सांगितले आहेत', असें देण्यांत आलें आहे

यात येशू खिस्ताचे एकंदर १३ चमत्कार देण्यांत आले आहेत. यांत 'आंधळे माणसास खीस्त दृष्टी देतो' (मार्कस १०;४८–५२); 'भाकरी व मासोळ्या याचा चमत्कार' (योहान ६; ५–१४); 'दाहा कोढ्यांस खीस्त शुद्ध करितो' (लूका १७; ११–१९); 'लाजारस नामें एक मेला मनुष्य याला खीस्त उठवितो' (योहान ११; १–४४) असे १३ चमत्कार वर्णन केले आहेत. या चमत्कारांवरून येशू-विषयीं लोकांची भक्ति वाढून त्यानीं खिस्ताकडे वळावें हाच हेतु यांत उघड दिसतो

भाषेच्या नमुन्याकरितां "दहा कोढ्यांस खीस्त शुद्ध करितो," हा चमत्कार पुढें देण्यांत येत आहे:—

"...आणि येशू यरुशलेमास जात होता, तेव्हां असें जालें, कीं शोमरोन व गालील यांचे मधून गेला आणि तो येके गांवांत शिरत असतां, दाहा कोढी माणुस त्याला भेटले; हे दूर उभे राहिले, आणि उंच स्वर काढून बोलिले, येशू गुरु, आह्मावर दया कर आणि तो पाहून त्यास बोलिला, तुह्मी जाऊन आपणांस उपाध्यांसीं दाखवा. आणि ते जात असतां असें जालें, ते शुद्ध केले गेले. आणि त्यांमधील येक निरोगी जाला असे याने पाहून माघारी मुरडून, मोठे स्वरानें ईश्वरास गौरविलें आणि त्याचे पायांजवळ तोंडावर पडून उपकार त्याला मानिला." (पृ. २८–२९).

या तीन पुस्तकांशिवाय वार्डवेलनें लिहिलेलीं—१ *Epistles of James and Jude*, २ *Discourses of Our Lord*, ३ *The Sermon of the Mount*, ४ *The History of Joseph*, ५ *Useful Instruction*, हीं पांच पुस्तकें उपलब्ध नाहींत. मात्र हीं पुस्तकें वार्डवेलनें लिहिल्याचें रे. बूसनें नमूद केलें आहे.

**५. रे. जॉन निकोल्स :**

गॉर्डन हॉलचा हा समकालीन मिशनरी होय. हा ता. २२ फेब्रुवारी १८१८ रोजीं हिंदुस्थानांत आला. १८२४ मध्यें दक्षिण कोंकणांत उपदेश करण्यासाठीं व शाळा पहाण्यासाठीं गेला असतां ९ डिसेंबर रोजीं तापानें तो तेथें मरण पावला.[२८]

सहा वर्षांतच मृत्युमुखीं पडल्यामुळें जॉन निकोल्सच्या हातून फार पुस्तकें रचिलीं गेलीं नाहींत. त्यानें दोनच पुस्तकें लिहिलीं. **१ प्रश्नोत्तरावळी** (*A Catechism*). अ. मि. १८१९. पृ. ४०.

इ. स. १८१९ मध्यें गॉर्डन हॉलच्या सहकार्यानें यानें हें पुस्तक लिहिलें. या पुस्तकाची माहिती मागें देण्यांत आली आहे.

**२ अन्य देवांची परीक्षा** (*Trial of False Gods*). स्वतंत्र. अ. मि. १८२०.

हें पुस्तक जॉन निकोल्सनें सन १८२० मध्यें लिहिलें; परंतु तें कोठें मिळत नाहीं.

या दोन पुस्तकांशिवाय १८२६ मध्यें बायबलची जी आवृत्ति प्रसिद्ध झाली, त्यांत भाषांतराचें काम त्यानें केलें.[२९] या बायबलची एक प्रत उपलब्ध असून त्याची भाषा कशी आहे हें समजण्यासाठीं त्यांतील एक उतारा येथें देण्यांत येत आहे:—

"नोहाचे वयाचे साहाशावें वर्षं त्या वर्षाचे दुसरे महिन्यांत सत्रावी मीती त्याच दिवसीं मोठे डोहाचे झरे फुटले गेले आणि आकाशाचीं द्वारें मोकळीं झालीं॥ आणि चाळीस दिवस आणि चाळीस रात्री पृथ्वीवर पाऊस जाला॥ त्याच दिवसाचे मधांत नोहा आणि शेम व हाम व याफेथ नोहाचे पुत्र आणि नोहाची बायको आणि त्याचे पुत्रासहीत त्याच्या तीन बायका गल्बतांत गेल्या॥ तीं आणि आपले जातीप्रमाणें प्रत्येक वनपशु आणि आपले जातीप्रमाणें प्रत्येक ग्रामपशु आणि आपले जातीप्रमाणें प्रत्येक वळवळणार जो पृथ्वीवर वळवळतो आणि आपले जातीप्रमाणें प्रत्येक पांखरूं सर्व पंखाचा प्रत्येक पक्षी॥ आणि सर्व मास ज्यांत जीवाचा आत्मा आहे यांमधून दोघें दोघें नोहाकडे गलबतांत गेलीं॥ आणि जीं आंत गेलीं तीं सर्व मासांतून पुरुष व स्त्री जसी ईश्वरानें त्याला आज्ञा दिल्ही तसीं गेलीं. नंतर यहोवानें त्याला आंत कोंडिलें॥ आणि पृथ्वीवर चाळीस दिवस जलप्रलय होता तेव्हां

२८. अमेरिकन मराठी मिशनचा शंभर वर्षांचा इतिहास. पृ. १९.
२९. *Memorial Papers of the American Marathi Mission*, p. 78.

पाण्यानी वाहून गलबतास तरविलें आणि तें पृथ्वीवरून उचललें गेलें ॥ आणि पाणी बळावलीं आणि पृथ्वीवर अत्यंत वाढलीं आणि पाण्याच्या पाठीवर गलबत चाललें ॥ आणि पृथ्वीवर पाणी फार फार बळावलें आणि संपूर्ण स्वर्गाखालील सर्व उंच डोंगर ते झांकिले गेले ॥ पंधरा हात पाणी वरतें बळावलें असें डोंगर झांकिले ॥" (पहिलें पुस्तक पर्व ॥ ७ ॥ ११-२० ).[२०]

## ६. रे. एडमंड फ्रॉस्ट :

रे. गॉर्डन हॉलचा हा एक समकालीन मिशनरी होता. हा २८ जून १८२४ रोजीं हिंदुस्तानांत आला. बायबल सोसायटीनें जेव्हां सर्व बायबल पुन्हां सुधारण्याचें ठरविलें, तेव्हां त्या कामावर याची नेमणूक करण्यांत आली; परंतु हें काम फ्रॉस्टच्या हातून फार काळ झालें नाहीं. कारण १८ ऑक्टोबर १८२९ रोजीं फ्रॉस्ट मरण पावला.

मुंबई येथें १८१३ मध्यें गॉर्डन हॉलनें अमेरिकन मिशनची स्थापना केल्यानंतर सुरुवातीच्या काळांत त्यानें व इतर सहकाऱ्यांनीं अनेक अडचणींना तोंड देऊन मराठी भाषेचा अभ्यास केला व त्या भाषेत अनेक धार्मिक व शैक्षणिक पुस्तकें लिहिण्यास सुरुवात केली. या मिशनरींना पुढें छापखान्याचें साहाय्य मिळून बॉईवेलसारखा छापखान्याचा कारागीरही मिळाला. त्यामुळें त्यांचीं सर्व पुस्तकें छापलीं जाऊन त्यांचा जोराचा प्रसार होऊं लागला. अमेरिकन मिशननें छापखाना सुरू करून केवळ एका मराठी भाषेंतच नव्हे तर निरनिराळ्या भाषांत विविध प्रकारचीं पुस्तकें छापून केवढें कार्य केलें हें अमेरिकन बोर्ड ऑफ फॉरिन मिशनच्या १९ व्या रिपोर्टांत खालीलप्रमाणें दिलें आहे :—

"*The American Board of Commissioners for Foreign Missions* was incorporated in the year 1812 ..The Board have seven printing presses connected with different missions, which are kept in constant operation and have printed, or are in readiness for printing, in nine different languages. The whole number of copies of works printed at these presses, principally elementary school-books, translations from the scriptures and religious tracts, must now exceed five hundred thousand, and the number of pages twenty millions. "[२१]

हीं पुस्तकें सर्व वर्गाच्या लोकांत वांटलीं जात. मराठी भाषा ज्यांना वाचावयास येत होती, त्यांना हीं पुस्तकें देऊन वाचनाची गोडी या लोकांना लावण्यांत आली.

२०. मराठी वाङ्मय, पृ. १५.
२१. *O. C. S. Jan.* 1830, p. 21.

तसेंच ज्या शाळा त्यांनीं काढल्या होत्या, त्यांतहि या पुस्तकांचा ते उपयोग करूं लागले. यासंबंधीं बाँबे ऑग्झिलरी बायबल सोसायटीच्या अकराव्या रिपोर्टांत रे. स्टोन म्हणतो;

" A considerable number of the portions of the Murathee New Testament have been used in our Native Free Schools—but the greater part have been personally distributed by the members of the mission, to individuals, after having as certained their ability and desire to read them." [३२]

पहिल्या मिशनरींनीं सुरू केलेली मराठी ग्रंथलेखनाची व ग्रंथमुद्रणाची ही परंपरा खंडित झाली नाहीं. ती जोरांत चालू राहिली. पुढें जे मिशनरी आले त्यांना पूर्वीच्या मिशनरींसारख्या अडचणी आल्या नाहींत. मराठी भाषा उत्तम प्रकारें शिकून त्यांनीं व्याकरण, गणित, भूगोल, तर्कशास्त्र इत्यादि शिक्षणविषयक अनेक लहानमोठे ग्रंथ लिहिले. अहमदनगर येथें एका अमेरिकन मिशनची स्थापना होऊन तेथील मिशनऱ्यांनींहि मराठींत अनेक ग्रंथ निर्माण केले.

---

३२. *O. C. S.* Feb. 1830, p. 38.

# अहमदनगर येथील अमेरिकन मिशनचें वाङ्मय

गॉर्डन हॉलनें मुंबई येथें अमेरिकन मिशन स्थापन केल्यानंतर त्या मिशनची एक शाखा अहमदनगर येथें स्थापन झाली. ता. २० डिसेंबर १८३१ रोजी रे. ॲलन ग्रेव्हज्, हॉलीज रीड व हार्वे हे तीन मिशनरी अहमदनगर येथें आले. त्या वेळीं तेथें आर्मी सर्जन म्हणून असलेले डॉ. ॲडम यांनी त्यांची सोय फेरीबाग नांवाच्या मुसलमानी राजवाड्यांत करून दिली. हा राजवाडा सर जॉन माल्कम हे मुंबईचे गव्हर्नर असतांना त्यांनी फच्च्या रेशमाच्या कारखान्यासाठीं डॉ. ॲडम यांना दिला होता. याच ठिकाणीं अमेरिकन मिशन प्रथम स्थापन झालें.[1]

१. ॲलन ग्रेव्हज् :

ॲलन ग्रेव्हज् हा अहमदनगर येथें सन १८३१ पासून आपल्या पत्नीसह राहिला. पुढें कांहीं काळानें ते दोघे प्रकृतिस्वास्थ्यासाठीं महाबळेश्वरास जाऊन राहिले. ग्रेव्हज् याला चिनी भाषाहि येत होती. त्यामुळें महाबळेश्वरास असतांना तो चिनी भाषेचा वर्गहि घेत होता. या ठिकाणीं तो ३० डिसेंबर १८४३ मध्यें मरण पावला.[2] पुढें त्याची बायको मिसेस ग्रेव्हज् हिनें महाबळेश्वर येथें मुलींची शाळा घरीच वर्षें चालविली व ती ता. २३ मार्च १८५६ रोजीं तेथें मरण पावली.

अहमदनगर येथें ग्रेव्हज् याच्याबरोबर रीड व हार्वे हे दोन मिशनरी होते. या मिशनरींनीं मराठी भाषेचा चांगला अभ्यास करून त्या भाषेंत ते धर्मोपदेश करूं लागले. याविषयीं त्या तिघांनीं मिळून लिहिलेल्या एका पत्रांत ते म्हणतात,

'Since we came here, we have had statedly three services in Marathi on the Sabbath. One is early in the morning, with from 150 to 200 blind, lame, laprous, aged and otherwise infirm and disabled persons; who assemble to receive grain furnished by the benevolence of the English residents.'[3]

याच पत्रांत ते पुढें म्हणतात,

"We have a meeting for prayer and reading and explaining the scriptures in Marathi every morning at our own house and here we have the pleasure of seeing a few persons present who are not in our employment."[4]

---

१. *Memorial Papers of the American Marathi Mission*, p. 3.
२. *O. C. S Jan. 1844*, p. 27.
३. *Memorial Papers of the American Marathi Mission*, p 46.
४. *Ibid*, p. 46.

ॲलन ग्रेव्हज्‌नें मराठी भाषेचा अभ्यास केल्यानंतर बायबलचें भाषांतराचें कार्य अंगावर घेतलें. सन १८२६ मध्यें बायबलचें जें मराठी भाषांतर झालें, तें करणाऱ्यांमध्यें जी पांच मिशनरी मंडळी होती त्यांमध्यें हा होता. पुढें १८३० मध्यें बायबलच्या नव्या कराराची जी सुधारून वाढविलेली आवृत्ति बायबल सोसायटीतर्फे निघाली ती ॲलन ग्रेव्हज् यानें तयार केली होती. ही आवृत्ति तयार करतांना गॅरेट व फ्रॉस्ट या दोन मिशनरींना ग्रेव्हज् याचे मदतनीस म्हणून नेमण्यांत आलें होतें; पण फ्रॉस्ट लवकरच मृत्यु पावल्यामुळें व गॅरेटनें ती जबाबदारी टाळल्यामुळें ॲलन ग्रेव्हज्‌लाच हें सर्व काम करावें लागलें. नव्या कराराप्रमाणें जुन्या कराराचा 'एक्झोडस' हा भागहि त्यानें भाषांतर करून १८३२ मध्यें ७५० प्रतींची आवृत्तीहि छापली गेली. जुन्या कराराचे 'लेव्हिटिस' व 'नंबर्स' हे दोन भाग त्यानें १८३६ मध्यें लिहिले; परंतु बायबल सोसायटीनें त्यांत फार बदल सुचविल्यामुळें त्यानें ५०० प्रतींची आवृत्ति स्वतः छापून प्रसिद्ध केली. सन १८३८ मध्यें नंबर्स, डिटरॉनॉमि, जोशुआ, जजेस व रूथ या भागांचें त्यानें भाषान्तर केलें व अमेरिकन मिशननें तें प्रसिद्ध केलें. 'दि साम्स' हा भाग ग्रेव्हज् व डिक्सन या दोघांनीं मिळून भाषान्तरित केला व १८३८ मध्यें त्याची सुधारून आवृत्ति काढण्यांत आली. सन १८४२ मध्यें क्रॉनिकल्सच्या पहिल्या पुस्तकाचें ग्रेव्हज्‌नें भाषान्तर केलें. अशा रीतीनें ग्रेव्हज् यानें बायबलच्या नव्या कराराचें भाषान्तर केलें[५] व जुन्या कराराचीं बरींच प्रकरणें लिहिलीं.[६]

बायबलच्या भाषांतराशिवाय ॲलन ग्रेव्हज् यानें पुढील पुस्तकें लिहिलीं—

( १ ) *Maratthi Sermon on Joshua*. अ. मि. १८२५. पृ. २४.

या पुस्तकाचा लेखक म्हणून रे. एस्. ग्रेव्हज् असें नांव ॲबटनें आपल्या कॅटलॉगांत दिलें आहे; पण मेमोरियल पेपर्समध्यें हें पुस्तक ॲलन ग्रेव्हज्‌च्या नांवावर घालण्यांत आलें आहे.[७] हें पुस्तक कोठेंच मिळत नाहीं.

( २ ) **इसापनीति हितोपदेश**. स्वतंत्र. अ. मि. १८३३. पृ. ८८.

हेंहि पुस्तक कोठेंच उपलब्ध होत नाहीं.

( ३ ) **गीतांचें नवीन पुस्तक** ( *Hymns for Public Worship* ). अ. मि. १८३३. पृ. ४८.

गीतांचें हें पुस्तक अहमदनगर येथील मिशनमध्यें आहे. हें पुस्तक लिहून ग्रेव्हज् यानें मिशनच्या पद्यवाङ्मयाची सुरवात केली. यापैकीं १५ व्या पदातील तीन श्लोक पहाः—

५. *O. C. S.* September 1838, p. 398.
६. *O. C. S.* March 1845, p. 89.
७. *Memorial Papers of the American Marathi Mission*, p. 113.

गीत भजनाचे श्लोक, छंद ॥ १५ ॥

॥ १ ॥ रात्र जाऊनी दिवस उगवला ॥
येशू तूं निशीं रक्षिलें मला ॥
दृष्टि पाहतो आज ही क्षिती ॥
दयाळूपणें दास रक्षिती ॥

॥ २ ॥ क्रमितसों नवा दिवस चांगला ॥
स्मरून ईश्वरा व्याप त्यागला ॥
पाप नावडे वासना मनीं ॥
नावडे मती दुष्ट कामनी ॥

॥ ३ ॥ सत्कथा स्तुति वाचितों सदा ॥
नम्र होऊनी राहूं सर्वदा ॥
ख्रिस्तदास हा हेत फारसा ॥
न्यूनता नसे पुण्यसारसा ॥

या कवितांचें वृत्त कामदा असून यांतील भाषा साधी, सोपी व सहजसुंदर वाटते. या गीतभजनाची दुसरी आवृत्ति सन १८३५ मध्यें सुधारून निघाली.

## २. जेम्स गॅरेट :

हा ता. ९ मे १८२१ रोजीं हिंदुस्तानांत आला व १६ जुलै १८३१ रोजीं मृत्यु पावला. १८३० मध्यें बायबलची जी सुधारून वाढविलेली आवृत्ति निघाली, तिच्याकरितां नेमलेल्या समितींत गॅरेट याला घेण्यांत आलें होतें; पण त्यानें या समितींत भाग घेतला नाहीं. गॅरेट हा छापखान्याच्या कामांत तज्ञ व उत्तम कारागीर असल्यामुळें त्यानें सॅम्युएल न्यूवेलनंतर मे १८२२ पासून १८३१ पर्यंत अमेरिकन मिशनच्या छापखान्याचें काम केलें. या कालांत त्यानें अनेक पुस्तकें छापिलीं; पण लिहिण्याचें काम मात्र फारसें केलें नाहीं. त्यानें एकच पुस्तक लिहिलें.

१. बाराखड्या (*First Lessons*). अ. मि. काल (?), पृ. ३२[८].

अॅबटच्या कॉटलॉगांत यानें लिहिलेल्या बाराखड्या या पुस्तकाचा उल्लेख आढळतो. मात्र हें पुस्तक उपलब्ध होत नाहीं.

---

८. Rev. Abbott, *Catalogue of the Marathi Christian Literature during eighty years*, p. 19. Barakhurdya या नांवाचें १४ पृष्ठांचें पुस्तक १८३४ सालीं छापल्याचे व २६ पृष्ठांचें पुस्तक १८३५ सालीं छापल्याचे उल्लेख आढळतात. पहा— *Report of the American Marathi Mission for the years 1831 and 1835.*

### ३. रे डेव्हिड ओ. ॲलन :

हा ता. २७ नोव्हेंबर १८२७ रोजीं हिंदुस्तानांत आला व १२ फेब्रुआरी १८५३ रोजीं परत गेला. येथें आल्यानंतर त्यानें मराठी भाषेचा अभ्यास करून बायबलच्या भाषांतराचें काम केलें. नव्या कराराची जी सुधारलेली आवृत्ति ॲलन ग्रेव्हज् याच्या नेतृत्वाखालीं निघत होती, त्या समितींत ग्रेव्हज् आजारी पडल्यानंतर ॲलन याला घेण्यांत आलें. १८४० पासून १८५२ पर्यंत हा बायबल सोसायटीचा सेक्रेटरी होता. जुन्या करारांचें भाषांतर पूर्वी ग्रेव्हज् यानें केलें होतें. तें सुधारण्यासाठीं ॲलन व ह्यूम यांची एक समिति नेमण्यांत आली होती. त्याप्रमाणें डेव्हिड ॲलन यानें सर्व जुना करार सुधारून प्रकाशित केला.[१] यापूर्वी नवा करार व जुना करार हे वेगवेगळे छापून प्रसिद्ध होत असत. ॲलन यानें १ मार्च १८४७ रोजीं संपूर्ण बायबलचें मराठी भाषांतर एकत्र छापून प्रसिद्ध केलें. अशा तऱ्हेनें ज्या पुस्तकाचा कांहीं भाग प्रथम १८१७ मध्यें अवघ्या ८ पानांत छापला होता त्याची वाढ होत होत १८४७ मध्यें संपूर्ण बायबल छापण्यांत येऊन तें मराठी वाचकांना उपलब्ध झालें.[१०]

या भाषांतराप्रमाणेंच त्यानें 'सॅम्युएल'-भाग १ व २ याचें मराठी भाषांतर केलें व तें स्वतःच्या जबाबदारीवर छापून प्रसिद्ध केलें. रे. ॲलन यानें १८४२ पासून १८५० पर्यंत आठ वर्षे मिशन प्रेसचा सुपरिंटेंडेंट म्हणूनहि काम केलें. त्याचप्रमाणें बॉंबे ट्रॅक्ट सोसायटीचा हा सेक्रेटरी होता. ट्रॅक्ट सोसायटी १० डिसेंबर १८२७ मध्यें स्थापन झाली. तिचे व अमेरिकन मिशनचे फार घनिष्ठ संबंध होते. कित्येक मिशनऱ्यांनीं जीं धार्मिक पुस्तकें रचिलीं तीं या ट्रॅक्ट सोसायटीनें छापलीं. या विविध कार्याशिवाय त्यानें पुढील पुस्तकें लिहिलीं:—[११]

**१. शास्त्रांतील उपदेशसार** ( *Summary of Scripture Doctrines* ). अ. मि. १८३०, पृ. ८७.

या पुस्तकाची सन १८३३ मधील तिसरी आवृत्ति अहमदनगर येथें आहे. त्यांत १६ अध्याय असून पृष्ठसंख्या ५६ आहे. पहिल्या अध्यायांत देवाचे गुण व दहा आज्ञा दिल्या आहेत. नंतरचे अध्याय माणसाचें पाप, तारणाराचा जन्म, येशु ख्रिस्ताचीं कामें व गरीबपण, पवित्र आत्म्याचीं कारणें, खरे ख्रिस्ती जे यांचीं लक्षणें, खरे ख्रिस्ती यांचें सुख अशा विषयांना वाहिलेले आहेत.

**( २ ) खगोलविद्या** ( *Elements of Astronomy & Geography* ). अ. मि. १८२९, पृ. ८०.[१२]

---

९. ज्ञानोदय, १५ फेब्रुआरी १८५३, पृ. ५०.

१०. *O. C. S.* May 1847, pp. 171–172.

११. *O. C. S.* February 1853, p. 84.

१२. *Memorial Papers of the American Marathi Mission*, p. 117.

ह्या पुस्तकाची माहिती रे. गॉर्डन हॉल याच्या ग्रंथाची माहिती लिहितांना देण्यांत आली आहे. रे. गॉर्डन हॉलच्या वरील पुस्तकाची रे. ॲलन यानें सुधारून वाढविलेली ही आवृत्ति आहे.

( ३ ) *Summary of the Holy Scriptures*. अ. मि. १८३२, पृ. ८४.

हें पुस्तक कोठेंच उपलब्ध होत नाहीं.

( ४ ) *On the Worship of God*. अ. मि. १८३२.[13]

या पुस्तकाची सुधारून दुसरी आवृत्ति त्यानें काढली. हेंहि पुस्तक कोठें मिळत नाहीं.

( ५ ) **शास्त्राचा सारांश** ( *Compendium of the Bible.* ). स्वतंत्र. अ. मि. १८३४, पृ. ३८.

' उपदेशसार ' या पुस्तकाची ही संक्षिप्त आवृत्ति आहे. यांत दहा आज्ञांचा बराच भाग आहे. त्याशिवाय येशू खिस्ताचें चरित्र व चमत्कार जोडले असून येशूच्या मृत्यूपर्यंतचें चरित्र यांत सांगितलें आहे.

अहमदनगर येथें अमेरिकन मिशनमध्ये या पुस्तकाची १८३५ मधील शिळा-छापाची एक आवृत्ति असून तिचीं पृष्ठें ६० आहेत. तसेंच १८४५ ची दुसरीहि एक आवृत्ति तेथें असून तिचीं पृष्ठें ४३ आहेत. मोडी लिपींत हें पुस्तक १८३७ मध्यें छापलेलें या मिशनमध्यें असून त्याचीं पृष्ठें ८८ आहेत.

या पुस्तकांतील भाषेच्या नमुन्यासाठीं पुढील उतारा पहा:-(आवृत्ति : १८३४)

" ज्या देवानें सर्व मनुष्यांस उत्पन्न केलें, ज्यानें सर्वांस बुद्धि दिल्ही व जो सर्वांचें पोषण व संरक्षण करणारा, त्याची ओळख व सेवा केली पाहिजे, याविषयीं सर्व लोक मान्य आहेत. त्याची ओळख कशी होईल, त्याचे गुण काय आहेत व कसे समजावे, आणि त्याची सेवा कशी करावी, हें ज्ञान प्राप्त होण्याचे उपाय दोन प्रकारचे आहेत, ह्मणजे त्याच्या कामांवरून व त्याच्या शास्त्रावरून. " ( पृ. १ )

( ६ ) **तारणारा जो येशू ख्रिस्त याविषयीं** ( *History of Our Saviour* ). अ. मि. १८३४. पृ. २१६.

हें पुस्तक उपलब्ध नाहीं.

( ७ ) **प्रार्थना** ( *On Prayer* ). अ. मि. १८३४. पृ. ९.

या पुस्तकाचा थोडक्यांत सारांश असा आहे:—

" प्रार्थनेमध्यें अर्थ पुष्कळ आहेत. तर सर्व लोकांनीं देवाची प्रार्थना अवश्य करावी. आपल्या पापांचें स्मरण अवश्य करून ती देवाजवळ कबूल करावी आणि

१३. *Ibid*. p. 112.

येशू ख्रिस्ताच्या नामानें व त्याच्या पुण्यामुळें क्षमा मागावी; मग पुढें देवाच्या सर्व आज्ञाप्रमाणें चालून तरून जावें."

**४. रे. सायरस स्टोन :**

हा ता. २९ डिसेंबर १८२७ रोजीं हिंदुस्थानात आला व २० जून १८३८ रोजीं परत गेला.

रे. स्टोन यानें गॅरेट याच्यानंतर सन १८३१ ते १८३३ पर्यंत अमेरिकन मिशनचा सुपरिंटेंडेंट म्हणून काम केलें. हें काम करीत असतांनाच त्यानें एकंदर सात पुस्तकें लिहिलीं. तीं अशीं:—

(१) *Concerning Salvations.* स्वतंत्र. अ. मि. १८३३. पृ. ८.
(२) *True Remedy for Sinners.* स्वतंत्र. अ. मि. १८३३. पृ. ८.
(३) *The Birth of Christ.* स्वतंत्र. अ. मि. १८३३. पृ. १६.
(४) *The True Atonement.* स्वतंत्र. अ. मि. १८३३. पृ. ८.
(५) *Preparation for Death.* स्वतंत्र. अ. मि. १८३४. पृ. ९.[14]
(६) *Good Instructions.* स्वतंत्र, अ. मि. १८३४. पृ. १२.

रे. स्टोन यानें लिहिलेलीं वरील सहाहि पुस्तकें उपलब्ध नाहींत.

**(७) आत्म्याविषयीं लेकरांची पहिली पोथी.** (*Child's Book on the Soul. Part I.*) भाषांतर. अ. मि. १८३६. पृ. ९२.

हें पुस्तक अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें आहे. भाषेच्या नमुन्यासाठीं त्यांतील 'बोधक पत्र' पुढें देण्यांत येत आहे:—

"लाहान मुलगे व मुलग्या यांनीं चांगलीं व्हावयास व बरें करावयास शिकावें असें जो इच्छितो त्याचें हें पत्र आहे. कांकीं चांगलें होणें किंवा बरें करणें हें सुखी होण्याचा मार्ग आहे.

"हे माझ्या प्रिय मुलांनो,

"मला साहा मुलें आहेत. तीं सर्व फार लाहान आहेत. त्यामध्यें जो वडील तो नवावर्षांच्या आंत आहे. तीं मला वारंवार ह्मणतात कीं, आह्मांस चांगल्या गोष्टी सांग. जेव्हां तीं आईबापांच्या आज्ञाप्रमाणें वर्तून चांगलीं असतात तेव्हां त्यांस असल्या गोष्टी सांगावयास मी संतोष पावतों. त्यासाठींच म्यां हें लाहान पुस्तक लिहिलें आहे." (पृ. ३)

यांत बारा संभाषणें असून शेवटीं संबोधक गोष्ट दिली आहे. याची सुधारलेली दुसरी आवृत्ति १८४४ मध्यें निघाली.

14. *Ibid* pp. 113-4.

५. रे. सँडॉल बी. मंगर :

हा ता १० सप्टेंबर १८३४ रोजीं हिंदुस्तानांत आला व २३ जुलै १८६८ रोजीं मरण पावला. मंगर यास मराठी भाषा चांगली अवगत होती. म्हणून शुभवर्तमानाचा प्रसार व्हावयासाठीं त्यानें खूप प्रयत्न केले. हिंदुशास्त्राचीहि त्याला चांगली माहिती होती व त्याचा उपयोग तो आपल्या उपदेशांत करीत असे.[15] मंगर यानें मराठींत पुढील पुस्तकें लिहिलीं आहेत :—

१ प्रार्थनेसंबंधीं प्रश्नोत्तरें ( *Catechism on the Lord's Prayer* ). अ. मि. १८३६. पृ. ३५.

हें पुस्तक उपलब्ध नाहीं.

२ आत्म्याविषयीं लेंकरांची दुसरी पोथी ( *Child's Book on the Soul, Part II* ). भाषांतर. अ. मि. १८३७. पृ. ११९.

हें पुस्तक अहमदनगर येथें अमेरिकन मिशनमध्यें आहे. या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत त्याचें स्वरुप विशद केलें आहे तें असें :—

" आत्म्याविषयीं म्या पहिली पोथी लिहिली, तिजमध्यें सांगितलें होतें कीं कदाचित् मी दुसरी एक लहान पोथी लिहून तुम्हास आपल्या आत्म्याविषयीं कांहीं आणखी सांगेन. जी पोथी म्या केली तीच ही आहे.

" या पुस्तकांत गंगाबाई व तिचा पुत्र गोविंदा यांचीं कांहीं दुसरीं संभाषणें होतील. त्यानें आपल्या आत्म्याविषयीं उत्तरोत्तर ज्ञान प्राप्त व्हावयाची इच्छा करून फार काळजी धरिली. तसीच काळजी तुम्ही धरा म्हणजे तुम्हाला उपदेश करणें हें मला फार आवडेल. "[16]

या प्रस्तावनेवरून एक गोष्ट दिसून येते ती म्हणजे रे. स्टोन याच्या ' आत्म्याविषयीं लेंकरांची पहिली पोथी ' या पुस्तकाचें काम मंगरनें पुढें चालविलें असावें, त्याचा उल्लेख त्यानें या दुसऱ्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत केलेला दिसतो. त्याचप्रमाणें या पुस्तकांतील विषयाचा बोधहि या प्रस्तावनेवरून होतो. यांत १२ संभाषणें दिलेलीं असून शेवटीं परीक्षेसाठीं प्रश्नहि देण्यांत आले आहेत.

( ३ ) ज्ञानाचे मार्ग ( *Wisdom and Her Ways.* ). अ. मि. १८४१, पृ. ३०.

( ४ ) नवें उत्पन्न (*The New Creature*). स्वतंत्र. अ. मि. १८४२. पृ. ३१.

१५. अमेरिकन मराठी मिशनचा शंभर वर्षांचा इतिहास, पृ. ३६-७.

१६. आत्म्याविषयीं लेंकरांची दुसरी पोथी. प्रस्तावना, पृ. ३ व ४.

(५) (*Old Testament Selections*) ... ... १८५१. दृ. २२५.[१७]

(६) खरेपणाचें युद्ध (*Conflict of Truth.*). अ. मि. १८५८. पृ. २४.

(७) देव, मनुष्य, शास्त्र ह्यांविषयीं विचार (*The Scriptures and What they teach of God and Man.*). स्वतंत्र. ट्र. सो. १८५८. पृ. ६३.

(८) (*Salvation of Jesus Christ.*) ... १८६६. पृ. ७४.[१७]

वरील पुस्तकें कोठेंच उपलब्ध होत नाहींत.

## ६. रे. ॲमास ॲबट :

हा ता. १५ ऑक्टोबर १८३४ रोजीं हिंदुस्तानांत आला व २७ जानेवारी १८४७ रोजीं परत गेला. तो पुन्हां १५ सप्टेंबर १८५७ रोजीं येथें आला व ७ एप्रिल १८६९ रोजीं परत गेला.

याच्याविषयीं ' ज्ञानोदया 'त पुढील उल्लेख आढळतो :

" हा साहेब या ग्वाल्यांतल्या विद्यालयाचा कांहीं दिवस चौकशीस व मुख्य शिक्षक होता. तसेंच यानें गांवोगांवीं उपदेश केला आणि धर्मप्रकरणीं व शालोपयोगी कांहींएक पुस्तकांची तयारी केली. कांहीं दिवसांपूर्वी ज्या तर्कशास्त्राविषयीं आम्हीं लिहिलें होतें तें यानेंच केलें."[१८]

उपरिनिर्दिष्ट विद्यालय म्हणजे १८३५ मध्यें अहमदनगर येथें उच्च शिक्षण देण्यासाठीं स्थापन झालेली सेमिनरी होय. ही स्थापन झाल्यापासून तिचा सुपरिंटेंडेंट म्हणून रे. ॲबट याची नेमणूक झाली. या सेमिनरीचा उद्देश लोकांमध्यें खरेखुरे ख्रिस्ती स्वभावांचे विद्येप बाणविणें हा होता. या संस्थेत काम केल्यामुळें व शिक्षण-शास्त्राचा दीर्घकाळ अनुभव मिळाल्यामुळें रे. ॲबट यानें शिक्षणशास्त्राला वाहिलेलीं अशीं पुस्तकें मराठींत लिहिलीं:—

**१ गणित भाग १, २, ३** (*Arithmetic*) स्वतंत्र. अ. मि. १८३७. पृ. १८६.

हें गणित १८३७ मध्यें प्रसिद्ध झाल्यापासून ४० वर्षे शाळेंत चाललें. हन १८४६ मध्यें डॉ फेअरबँक यानें एक लहान अंकगणित तयार केलें. त्या वेळीं हें अंकगणित मागें पडलें. या पुस्तकाच्या २ व ३ या भागांची स्वतंत्र आवृत्ति हन १८५६ मध्यें काढण्यांत आली. भाग १ याची चवथी आवृत्ति १८६५ मध्यें निघाली व ती रे. ह्यू. बॅलेंटाइन यानें सुधारून छापली.[१९] हें पुस्तक (तीनहि भाग एकत्र

१७. *Memorial Papers of the American Marathi Mission*, p. 116.

१८. ज्ञानोदय, १५ फेब्रुआरि १८४०, पृ. ५१.

१९. *Memorial Papers of the American Marathi Mission*, p. 118.

केलेलें ) पहिला भाग १८४१, पृ. १०४, दुसरा भाग १८४२, पृ. ६० व तिसरा भाग, पृ. २२, महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें आहे.

२ गृहवासी मुलांचें पुस्तक ( *The child at Home* ). भाषांतर, अ. मि. १८३७. पृ. २०.

३ उरूस व यात्रेसंबंधीं जरीमरी याविषयीं संभाषण ( *Pilgrimages* ). अ. मि. १८४४. पृ. ४८.

४ तरुणांस एकांतीं बोध ( *Private Advice to Young man* ). स्वतंत्र. १८४४. पृ. २०

५ काफर मुलगी ( *African Girls and Other Stories* ) भाषांतर. अ. मि. १८४५. पृ. ३२.

हें पुस्तक ट्रॅक्ट सोसायटीनें १८५० मध्यें पुन्हां छापलें.

६ *The Cholera*. १८४६ मध्यें लिहिलेला निबंध.[२०]

ट्रॅक्ट सोसायटीनें १८४९ मध्ये प्रसिद्ध केला. ही पांचहि पुस्तकें कोठेंच उपलब्ध होत नाहींत.

७ पदार्थविद्या (*Natural Philosphy*). भाषांतर. अ.मि.१८४६. पृ. ९५.

या पुस्तकात ९ प्रकरणें असून त्यांत निरनिराळ्या विषयांचें विवेचन केलें आहे व शेवटच्या २२ पृष्ठांत आकृत्या दिल्या आहेत. शिक्षणविषयक पुस्तकांमध्यें हें अगदी नवीन पुस्तक दिसतें.

या पुस्तकाच्या प्रारंभीं पदार्थविद्येची व्याख्या 'पदार्थमात्राचे जे धर्म किंवा नियम त्यांविषयीं जी विद्या तिला पदार्थविद्या म्हणतात', अशी देऊन पदार्थविद्येचे शिल्पविद्या, जलविद्या, वातविद्या, दर्शनविद्या, नादविद्या, विद्युल्लताविद्या आणि चुंबकविद्या असे सात भाग सांगितले आहेत.

पहिल्या अध्यायांत वस्तूची गति आणि त्याविषयीं नेम ( of Motion and the Laws of Motion ) याविषयीं विवेचन करून त्यांत गुरुत्व ( Gravity ), जडत्व ( Inertia ), वेग ( Velocity ), जोर ( Momentum ), व प्रेरणा ( Forces ) याविषयीं सिद्धान्त सांगितले आहेत. दुसरा अध्याय "ज्या वस्तू पृथ्वीजवळ आहेत त्यांचे चढणें व पडणें" ( The ascent and decent of bodies ) असा आहे. तिसऱ्या अध्यायांत "अनेक प्रेरणांनी वस्तूची गती" ( The Composition and Resolution of Motion ), चवथ्या अध्यायांत "गुरुत्व

२० या पुस्तकासंबंधानें O. C. S. मध्यें पुढील माहिती मिळते. "A Marathi Tract on Cholera written in the form of a dialogue, has issued from the American Mission Press", *O. C. S. July* 1846, p. 261.

केंद्राविषयीं" (Centre of Gravity), पांचव्या अध्यायांत "वस्तूंचा संघात" (Collision of bodies), सहाव्या अध्यायांत "पाहार" (The Lever), सातव्या अध्यायांत "चाक व आंस आणि कपी" (Wheel and Axle and Pulley), आठव्या अध्यायांत "कल्पन क्षेत्र, मळसूत्र आणि पाचर" (The Inclined plane, the Screw, and the Wedge) व नवव्या अध्यायांत "कल्पन क्षेत्रावरून वस्तू पडण्याचा नेम" (The Motion of Bodies upon inclined planes) या विषयांची माहिती देण्यांत आली आहे. प्रत्येक अध्यायांतील विषयांचीं नांवेंच फक्त येथें दिलीं आहेत. त्यावरून या पुस्तकांत कोणते विषय आहेत तें कळून येईल व या पुस्तकाच्या रचनेचें सर्वसामान्य ज्ञानहि वाचकांना होईल.

८ तर्कशास्त्र ( *A Treatise on Logic* ). स्वतंत्र. अ. नि. १८४७. पृ. ४०.

या पुस्तकाच्या पहिल्या पानावर "सुज्ञांची जीभ ज्ञानाचें चांगलें उपयोग करितें, परंतु मूर्खांचें तोंड मूर्खपण ओकितें", हें वाक्य बोधवाक्य म्हणून दिलें आहे.

या पुस्तकाचीं एकंदर प्रकरणें ११ असून, या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत लेखक म्हणतो, "या लाहान पुस्तकाच्या कर्त्याचा अभिप्राय असा आहे कीं, तर्कविद्या जी फार अवघड म्हणून लोक समजतात, ती एवढी सुलभ करावी कीं ती साधारण बुद्धीनें समजावी आणि ही विद्या अस्या रीतीनें शिकवावी कीं, शिष्याला तिचा उपयोग करून घेतां येईल.'

"हें पुस्तक विशेषेंकरून ह्या देशांतील खिस्ती लोकांसाठीं केलें आहे, आणि जीं उदाहरणें घेतलीं आहेत तीं बहुतकरून धर्माविषयीं आहेत परंतु त्यावरून दुसऱ्या लोकांना ही विद्या शिकण्यास कांहीं अडथळा नाहीं."

या पुस्तकांत सिद्धान्ताचीं जीं उदाहरणें दिलीं आहेत, त्यावरून या पुस्तकाचें अंतरंग कसें आहे याची वाचकांना जास्त कल्पना येईल. हीं उदाहरणें बहुतेक खिस्ती धर्मतत्त्वें विशद करून सांगणारीं आहेत. एक सिद्धान्त असा आहे :—

"१. ईश्वराशिवाय कोणी जगाला उत्पन्न केलें नाहीं.
२. येशू खीस्तानें जगाला उत्पन्न केलें.
३. यास्तव येशू खीस्त ईश्वर आहे." (पृ. ४)

'तर्कसूत्र' रचण्यासाठीं 'वाद' या प्रकरणांत कांहीं वाद दिले आहेत. ते असे :—

"२. कृष्ण पापी होता, यास्तव तो ईश्वर नाहीं.
४. पारमार्थिक माणसें लबाडी कधीं करणार नाहींत, यास्तव खिस्ती शास्त्रकर्ते लबाडी करणारे नव्हते.

७. दुष्कर्मी आणि लबाड यांच्या बोलण्यावर विश्वास ठेवायाचा नाहीं.
यास्तव ब्रम्हयाच्या बोलण्यावर विश्वास ठेवायचा नाहीं.

१०. जर खिस्ती खरें आहे, तर येशू खीस्त जगद्गुरु आहे." (पृ. ५
मिथ्यावादांत (म्हणजे Falacy मध्यें) खालील उदाहरण दिलें आहे :—

"देव पवित्र आहे,
कृष्ण पवित्र नाहीं.
यास्तव कृष्ण देव नाहीं." (पृ. १७)

शेवटीं प्रकरण ११ यांत धर्मसंबंधीं तर्कसूत्रें दिलीं आहेत. तीं अशीं :—

"७ ईश्वराशिवाय जगाला कोणी उत्पन्न केलें नाहीं. येशू खीस्तानें जग उत्पन्न केलें, यास्तव येशू खीस्त ईश्वर आहे". (पृ. ३६)

"१८. ज्याच्या पदरीं पाप आहे तो ईश्वर नाहीं. कृष्णाच्या पदरीं पाप आहे. यास्तव कृष्ण ईश्वर नाहीं." (पृ. ३७)

तर्कशास्त्राच्या या अंतरंगावरून या पुस्तकांतील उदाहरणेंसुद्धां धर्मप्रसारापासून अलिप्त नाहींत, हें दिसून येतें. तरी या विषयावर युरोपियनानें लिहिलेलें हें नवें पुस्तक असल्यामुळें या पुस्तकाचें विशेष महत्त्व मानलें गेलें. तसेंच आतांपर्यंतच्या बहुतेक अमेरिकन मिशनऱ्यांनीं खिस्ती धर्मसंबंधीं धार्मिक पुस्तकें लिहिलीं, तर ॲबट यानें ती ठराविक चाकोरी सोडून शिक्षणविषयावरील व तें सुद्धां तर्कशास्त्रावरचें पुस्तक लिहिलें. या पुस्तकाविषयीं 'ज्ञानोदयां'त जो अभिप्राय व्यक्त झाला आहे तो खालीं दिला आहे :

"हें पुस्तक नुसतें वाचलें तरी फार उपयोगी पडेल खरें; परंतु मेहनतीनें त्याचें अध्ययन करावें, असेंहि आहे. हें पुस्तक मोठमोठ्या शाळांमध्यें असावेंच. कारण कीं, या देशांतील लोकांची बुद्धि वादविण्यास विशेष उपयोगी जो अभ्यास तो या पुस्तकांत सांपडेल."[११]

या पुस्तकाविषयीं पुढील मत O. C. S. मध्यें देण्यात आलें आहे :

"...What, after the tomes of *Naya-Shastra*, in the Sanskrit language, will the natives think of this? Nothing but the study of the little work and the experience of its use, will convince them that so much good can be compressed into so small a space and presented at so cheap a price. This work is original in its matter and arrangement and we think it peculiarly adapted to the circumstances and wants of the more intelligent natives."[१२]

---

११. ज्ञानोदय, १५ आक्टोबर १८४४, पृ. १४.

१२. O. C. S. February 1847, p. 62.

(९) गाण्याचें पुस्तक (*A Music Book*) अ. मि. १८४८, पृ. ६८.

(१०) *Index to New Testament*. स्वतंत्र. अ. मि. १८६८, पृ. १०.

(११) स्त्रियांचे विकार (*Medical Work on Diseases of Women*). स्वतंत्र. १८७२, पृ. ७९.

हीं तीन पुस्तकें कोठेंच उपलब्ध होत नाहींत.

रे. ॲबट याच्याप्रमाणें त्याची पत्नीसुद्धां अहमदनगर येथें मिशनकार्य करीत होती. तिनेंहि धार्मिक व इतर विषयांवर पुस्तकें लिहिलीं आहेत. तिनें लिहिलेलीं दोन पुस्तकें ॲबट यांच्या कॅटलॉगमध्यें नमूद केलीं आहेत. त्यांचीं नांवें:—

(१) ज्या बायांस लेकरें आहेत त्यांस सुबोध (*Address to Mothers*). स्वतंत्र. अ. मि. १८४१. पृ. २९.

(२) गरीब स्वेजलंड (*Poor Switzerland*). भाषांतर. अ. मि. १८४४. पृ. १८.

हीं दोनहि पुस्तकें उपलब्ध झालीं नाहींत.

### ७. रे. हेन्री बॅलंटाईन :

हा ता. ११ ऑक्टोबर १८३५ रोजीं हिंदुस्तानांत आला व ४ सप्टेंबर १८६५ रोजीं परत गेला. आपल्या तीस वर्षांच्या वास्तव्यांत यानें मिशनरी कार्य तर्सेच मराठी वाङ्मयाचें कार्य एवढें केले कीं, त्याचें नांव ख्रिस्ती वाङ्मयांत कायमचें राहील यांत शंका नाहीं. विशेषतः ख्रिस्ती पदसंग्रहाचा मराठी भाषेत विकास करून व इंग्रजी भाषेतील कित्येक पदें मराठी भाषेत आणून त्यानें गाण्याचें पुस्तक तयार केलें. मराठी भाषेप्रमाणें संस्कृत भाषाहि त्याला अवगत होती. याविषयीं एक उतारा खालीं दिला आहे, त्यावरून बॅलंटाईन याची योग्यता कळून येईल.

"बॅलंटाईन विद्वान् असून ते एम्. ए. झाले होते. त्यास लॅटिन व ग्रीक भाषा चांगल्या येत होत्या. संस्कृत भाषेचा त्यांनीं इतका चांगला अभ्यास केला होता कीं, ते कांहीं दिवस एक संस्कृत वर्ग शिकवीत असत. असें असतांहि उपदेश करतेवेळेस मराठी भाषा अगदीं साधी व प्रचारांतली वापरीत असत, म्हणून त्यांचे उपदेश रानटी कुणब्यांस व अडाणी महारासहि समजत असत. त्यांनीं मराठींत संस्कृत किंवा विजातीय शब्द कधीं घुसडूं दिले नाहींत."

"दुसरा एक अत्यंत महत्त्वाचा उपकार त्यांनीं ख्रिस्ती महाराष्ट्रावर केला आहे. ते स्वतः कवि होते, तरी इंग्रजी भाषेतील सुंदर कवितांचें त्यांनीं मराठी रूपांतर करून भक्तिप्रसंगीं गाण्यांचें एक पुस्तक तयार केलें."[११]

---

११. अमेरिकन मराठी मिशनचा शंभर वर्षांचा इतिहास, पृ. २७-२९.

बॅलंटाईन मराठी भाषा फार लवकर शिकला व थोड्याच अवधींत मूळच्या काव्यात्म प्रवृत्तीमुळें तो मोठ्या रसभरीत वाणीनें ख्रिस्ती धर्मोपदेश करूं लागला. याविषयीं डॉ. ग्रॅहम यानें पुढील उद्गार काढले आहेत :—

"Mr. Ballantine preached a very impressive sermon, in excellent Marathi, on the Love of God."[२४]

बॅलंटाईनयाच्या अंगीं असलेला हा काव्यरचनेचा गुण विकास पावून त्यानें भजनाच्या गीतांचीं तशींच इतरहि पुस्तकें लिहिलीं :

**१ शास्त्रांतील मुख्य सिद्धांताविषयीं प्रश्न** (*Topical Questions on the Scriptures.*) १८४१, पृ. १०१.

या पुस्तकाची १८४६ मधील आवृत्ति अहमदनगरच्या अमेरिकन मिशनमध्यें आहे. याचीं ९४ पृष्ठें असून ४० धडे आहेत. प्रत्येक धड्यांत पंचवीसावर प्रश्न आहेत. हे सर्व प्रश्न बायबलावर आहेत. प्रश्नाला कोणतें उत्तर पाहिजे, हें त्या प्रश्नापुढें बायबलमधील भाग उद्धृत करून सांगितलें आहे.

शास्त्रांतील मुख्य सिद्धान्ताचा नीट अभ्यास व्हावा म्हणून हे प्रश्न दिले आहेत. त्याचीं उत्तरें बायबलमधून काढावीं लागून त्याबरोबर बायबलचाहि अभ्यास व्हावा असा यांत हेतु असावा.

**२ देवाचें भजन करण्याचीं गीतें** (*Hymns for Divine Worship*). १८४५, पृ. १४८.

बॅलंटाईनच्या पूर्वीहि कांहीं पदें प्रचारांत होतीं; पण तीं कामापुरतींच होतीं. त्यांचें सर्व स्वरूप पालटून ख्रिस्ती पद्यवाङ्मयाला बॅलंटाईन यानें एक नवीन दिशा दाखवून दिली. बॅलंटाईनच्या पूर्वीं गीताची स्थिति कशी होती त्याचें स्पष्ट दिग्दर्शन पुढील उताऱ्यांत सांपडेल :

"भक्तीच्या वेळेस जशी शास्त्राची तशी गीतांची गरज आहे, ही जाणीव आमच्या पहिल्या मिशनरींस झाली. १८१९ मध्यें अमेरिकन मिशननें एक १६ पृष्ठांचें गायनाचें पुस्तक छापलें. हाच आमच्या गीतसंग्रहाचा आरंभ होय. या-संबंधानें कित्येक मिशनरींनीं एका पत्रांत लिहिल्यावरून समजतें कीं, यांत कांहीं देशी चालींचीहि गीतें घातली होतीं व तीं शाळेंतील शिक्षक व मुलें यांस फार आवडत असत. याचीच वाढविलेली दुसरी आवृत्ति सन १८२५ मध्यें प्रसिद्ध झाली. १८३३ व १८३५ सालींहि त्याच्या सुधारलेल्या व वाढविलेल्या आवृत्ति निघाल्या. याच वेळेस दुसरें एक पुस्तक प्रसिद्ध झालें होतें. त्यांत दाविदांच्या गीतांचा संग्रह केला होता. मिशनरी लोकांस समजून आलें होतें कीं, देशी चालीच्या

२४. *Memorial Papers of the American Marathi Mission*, p. 4.

गीतांत उणीव असून ती दूर करण्याची वेळ दूरच आहे. तरी त्यांनीं तत्कालि काळांत आपल्या कामापुरती तयारी केली हें विशेष आहे.[२५]

बॅलंटाईन यांचें पुस्तक तयार होण्यापूर्वी अमेरिकन मिशनें वापरीत असलेलें पुस्तक म्हणजे रे. ॲलन ग्रेव्हज् यांचें 'गीतांचें नवीन पुस्तक' हें होय. याची माहिती मागें देण्यांत आली आहे. या पुस्तकाप्रमाणेंच 'Psalms and Hymns' हेंहि पुस्तक त्यांच्या उपयोगांत असे; परंतु या पुस्तकांचा अपुरेपणा उत्तरोत्तर जाणवूं लागला व त्याचा उपयोग वाटेनासा झाला. बॅलंटाईन नगर येथें आल्याबरोबर त्याला असें दिसून आलें कीं, मराठीमध्यें चांगल्या गीतसंग्रहाचें पुस्तक नाहीं; जीं पुस्तकें आहेत तीं प्रार्थना करण्याच्या मुळींच उपयोगी नाहींत. याचें कारण यापूर्वी जीं पुस्तकें अमेरिकन मिशनऱ्यांनीं लिहिलीं होतीं त्यांतील स्वररचना देशी पद्धतीची होती. प्रार्थना करतांना खिस्ती लोकांच्या डोळ्यांपुढें त्यांचे पूर्वींचे रीतीरिवाज व धार्मिक चाली उभ्या राहत व त्यांची त्यांना आठवण होईल या भीतीनेंच हीं गीतें प्रार्थनेच्या दृष्टीनें निरुपयोगी ठरलीं. ही गोष्ट ध्यानांत आल्याबरोबर बॅलंटाईन यानें इंग्रजी भाषेंतील उत्तम गीतें निवडून तीं मराठी भाषेंत भाषांतरित केलीं. मात्र त्यांची स्वररचना पूर्वीप्रमाणें ठेविली. बॅलंटाईन यानें केलेल्या या गीतांबद्दल रे. ब्रूस म्हणतो,

"These translations generally preserve the happy medium of fidelity to the spirit of the original, with sufficient freedom of expression to suit the idiom of the new language." [२६]

बॅलंटाईनचें हें गीतांचें पुस्तक १८४५ सालीं प्रसिद्ध झालें. त्यांत शंभरपेक्षां अधिक गीतें होतीं. या पुस्तकाची १८५४ मध्यें नवीन आवृत्ति निघाली. या आवृत्तीच्या वेळीं बॅलंटाईन यानें दुसऱ्या अनेक इंग्रजी पदांचें मराठींत भाषांतर केलें एवढेंच नव्हे, तर कित्येकदां इंग्रजी पदांच्या ऐवजीं बायबलांतील उतारा घेऊन त्याचेंच मराठींत पद्यमय रूपांतर केलें. याप्रमाणेंच 'Ten Commandments' व 'The Lords Prayer' या पुस्तकाचीं मुद्दां त्यानें काव्यांत रूपांतरें केलीं. या आवृत्तीचीं ४४० पृष्ठें असून त्यात ३३६ गीतांचा संग्रह आहे.[२७] याच पुस्तकाचा दुसरा भाग म्हणून सन १८५५ मध्यें ३१० पृष्ठांचें चालींसहित गीतांचें पुस्तक प्रसिद्ध करण्यांत आलें व याला 'Sacred Songs' असें नाव मिळालें. हें पुस्तक अहमदनगर येथें अमेरिकन मिशनमध्यें आहे. गीतांची रचना करण्याबरोबरच स्वरलेखन करून संगीताचा पहिला प्रयत्न बॅलंटाईन यानें केला हें विशेष आहे.

२५. अमेरिकन मराठी मिशनचा शंभर वर्षांचा इतिहास, पृ. १०२.

२६. *Memorial Papers of the American Marathi Mission* pp. 123-124.

२७. ज्ञानोदय, १ ऑक्टोबर १८५४, पृ. २९६.

'देवाचें भजन करण्याचीं गीतें' या बॅलंटाईनच्या पुस्तकाच्या दोन आवृत्तीनंतर या पुस्तकाची तिसरी आवृत्ति सन १८५७ मध्यें प्रसिद्ध करण्यांत आली. मात्र या आवृत्तींतून 'दाविदाचीं गीतें' गाळलीं होतीं. या पुस्तकाची चवथी आवृत्ति सन १८६५ मध्यें अमेरिकन मिशननें बॉंबे ट्रॅक्ट सोसायटीच्या सहकार्यानें प्रसिद्ध केली. यांचें कारण सर्व चर्चमध्यें बॅलंटाईन यानें रचलेलीं पदेंच म्हटलीं जाऊं लागलीं होतीं व या पुस्तकांचा उपयोग महाराष्ट्रांतील सर्व मिशनें व मंडळ्या यांमध्यें होऊं लागला होता.[२८] या चवथ्या आवृत्तीचें छापण्याचें काम चालू असतांना व त्यांचीं प्रुफें तपासत असतांनाच बॅलंटाईन समुद्रावरील सफरींत ९ नोव्हेंबर १८६५ रोजीं मरण पावला. त्याच्या या पुस्तकाबद्दल मिशन सोसायटीनें १८६५ च्या रिपोर्टांत गौरवपर उद्गार काढले आहेत ते असे :—

"The admirable collection of Hymns by Mr. Ballantine has long been in use, but has only now been published by this society. 336 of the choicest Hymns in the English language, are here rendered into flowing Marathi, with a success that leaves nothing to be desired." [२९]

बॅलंटाइन याचें हें पुस्तक अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें उपलब्ध असून त्यांतील दोन गीतें येथें नमुन्यासाठीं देण्यांत येत आहेत. तसेंच ज्या मूळ इंग्रजी गीतावरून त्यानें हें भाषांतर केलें तें गीतहि सोबत दिलें आहे. त्यावरून बॅलंटाईन यांच्या भाषांतराची वाचकांस कल्पना येईल.

| ६९ ख्रिस्ताचें रक्त. | The Blood of Christ |
|---|---|
| १ येशूच्या रक्तें भरलें<br>पुण्याचें कुंड जाण<br>जे पापी त्यांत घातलें.<br>ते होती शुद्ध प्राण. | 1 There is a fountain filled with blood,<br>Drawn from Immanuel's veins,<br>And sinners plunged beneath that flood<br>Lose all their guilty stains. |
| २ त्यांवागी मरणारा चोर<br>त्यामुळें हर्षला,<br>तेणेंची माझा दोष घोर<br>पुसेल सगळा. | 2 The dying thief rejoiced to see,<br>That fountain in his day;<br>And there have I, as vile as he,<br>Washed all my sins away. |

२८. *O. C. S.* January 1850, p. 43.

२९. *Memorial Papers of the American Marathi Mission*, p. 121. फरिन्दमाचेंच रे. मा. मिचेल म्हणतो, 'Henry Ballantine did much for Marathi Hymnology,' *In Western India*, p. 62.

| | |
|---|---|
| ३ हें प्रभू तुझें, रक्तमोल. | 3 Dear, dying Lamb! thy precious blood. |
| कधीं न सरणार, | Shall never lose its power, |
| देवाचें सर्व प्रिय कूळ | Till all the ransomed church of God. |
| तूं तेणें खंडणार. | Be saved, to sin no more. |
| ४ हा रक्त ओघ वाहतां | 4. E've since, by faith, I saw the streame, |
| म्या मावें पाहिला. | Thy flowing wounds supply, |
| तेथूनी स्तुति करितां | Redeeming love has been my theme |
| उद्धार गायिला | And shall be till I die. |
| ५ सर्व आयुष्य पावेतों | 5. Then, in a nobler, sweeter song, |
| करीन स्तवनें, | I'll sing thy power to save, |
| व जेव्हां प्राण सोडितों | When this poor, lipsing stammering tongue. |
| अनंत गायनें.[30] | Lies silent in the grave.—Amen.[31] |

**२२८ ईश्वर स्तवन**

| | |
|---|---|
| | ( Dexology ) |
| ६ मुवंद्य देव परात्पर, | 6 Praise God, from whom all blessings flow, |
| स्तवाहो त्याला खालीं वर | Praise Him, all creatures here below |
| तो बाप, पुत्र, आत्मा, जाण, | Praise Him above, ye heavenly host |
| त्र्येकाला द्या अनंत मान .[32] | Praise Father, Son and Holy Ghost.[33] |

**लेकरांचीं गायनें ( *Hymns for children* )—१८६२.**

'देवाचें भजन करण्याचीं गीतें' या पुस्तकाच्या चवथ्या आवृत्तींत लेकरांचीं गायनें हा भाग परिशिष्ट म्हणून जोडण्यांत आला होता. म्हणजे मूळचीं ३३६ गीतें व मुलांकरितां लिहिलेलीं आणखी गीतें मिळून ४०० गीतांचा हा संग्रह १८६२ मध्यें प्रसिद्ध करण्यांत आला. या पुस्तकासंबंधीं ज्ञानोदयांत पुढील माहिती आली आहे :—

" त्यांत लेकरांसाठीं रचिलेलीं ६४ गीतें असून तीं ज्या चालींवर गायाचीं त्या चालीहि त्यां लगत युरोपियन लोकांच्या रीतीप्रमाणें स्वरचिन्हांनीं लिहिल्या

३०. देवाचें भजन करण्याचीं गीतें ( १८५५ ), नं. ६९.
३१. *Hymns of the Faith. No. 94.*
३२. देवाचें भजन करण्याचीं गीतें ( १८५५ ). नं. २२८.
३३. *Northfield Hymnal.* No. 198.

आहेत. हीं गीतें इंग्लिश भाषेंतील गीतांचीं भाषांतरें आहेत व इंग्लिश गीतें ज्या वृत्तांवर आहेत त्याच वृत्तांवर रचिलीं आहेत व त्याच गळ्यांवर गातां येतात. कांहीं गीतें तुकारामाच्या मोठ्या अभंगांच्या छंदांवर केलेलीं असून त्यांवर युरोपियन चाली किंवा गळे बसविले आहेत. कांहीं गीतें लहान म्हणजे अष्टाक्षरी अभंगांच्या छंदावरहि केलीं आहेत, व त्यांवरहि युरोपियन चाली बसविल्या आहेत.[१४]

बॅलंटाईन यांचें हें पुस्तक अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें उपलब्ध आहे.

याच पुस्तकांतील गीतांमध्यें बिसेल, फेअरबँक इत्यादि मिशनरींचीं नवीन गीतें घालून १८७४ मध्यें १२२ गीतांचा 'बुलबुल' नांवाचा संग्रह प्रसिद्ध करण्यांत आला.

**३. जगन्नाथाविषयीं** (*Account of Jagannath*). स्व. अ. मि. १८४६. हें पुस्तक मला उपलब्ध झालें नाहीं.

**४. ज्ञानोदय पंचांग.** १८४७. अमेरिकन मराठी मिशनरी १८४७, पृ. १६८.

या पुस्तकावर ज्ञानोदयांत जो अभिप्राय आला आहे, त्यावरून या पंचांगाची माहिती जास्त समजून येईल. हा अभिप्राय असा आहे :—

"आम्हीं मागच्या अंकांत लिहिलें होतें कीं, सन १८४७ चें पंचांग मराठी भाषेंत छापखान्यांत छापीत आहेत. या पंचांगांत जे अंश आहेत त्यांचें दिक्प्रदर्शन येणेंप्रमाणें—

"सूर्यमंडळाचें वर्णन, ग्रहणाचा विचार, निरनिराळ्या लोकांचे शक, सन, महिने, वर्षांतील चंद्रसूर्यग्रहणें, सूर्योदय, सूर्यास्त, चंद्रोदय, दिनमान, सकाळसंध्याकाळची भरती, चंद्राचीं स्वरूपें, तिथि, वार, तिथिमान, नक्षत्र, नक्षत्रमान, कैली वजनी व मोजणी यांचीं कोष्टकें; निरनिराळ्या धार्मिक व परोपकारी मंडळ्यांचें वर्णन, कित्येक धर्मांचें वर्णन, सरकारी मुलखी लोकांची माहिती, मुलखी सरकारी नेटिव लोकांची जात, पदवी, नांमें, किती वर्षें चाकरी केली. हल्लीं कोण कोठें आहे इत्यादि; पुण्यांतील संस्कृत पाठशाला, ग्रांट वैद्य पाठशाला, अल्फिन्स्टन इन्स्तिट्यूशन, इत्यादि विद्यालय यांचें वर्णन, आणि या शिवाय दुसऱ्या कित्येक उपयोगी गोष्टी लिहिल्या आहेत."[१५]

हें पंचांग तयार करण्याचा हेतु व उद्देश काय आहे हेंहि मिशनरींनीं या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत सांगितलें आहे. भविष्यावर लोकांनीं विश्वास ठेवूं नये व

---

१४. ज्ञानोदय, १५ ऑक्टोबर १८९२, पृ. ३०५–३०६.

१५. ज्ञानोदय, १ जानेवारी १८४७, पृ. ६१३. व जानेवारी १८४७, पृ. ६६ व ६७. *O. C. S.* मध्येंहि सारा अभिप्राय आहे. पहा *O. C. S.* January 1847, p. 37.

वर्षफल पाहून व्यर्थ सुखदुःख मानूं नये म्हणून हें पंचांग मराठी मार्फत करितों, असें त्यांनीं म्हटलें आहे.

५. निरनिराळे धर्म ( *Various Systems of Religion*). स्वतंत्र- अ. मि. १८५१, पृ. १९. हें पुस्तक अहमदनगर येथें अमेरिकन मिशनमध्यें आहे.

६. कोकराचा चारा ( *Lambs Fed* ) स्वतंत्र. अ. मि. १८५१, पृ. ५२.

७. *On the Relations of the Marathi to the Sanskrit*— १८५१. पृ. २०. भाषाशास्त्रविषयक प्रबंध.

८. *Introduction to Mental Arithmetic*—१८५४, पृ. ८३.

९. लखीरामबाबाविषयीं ( *Account of Lakhiram* ) स्वतंत्र. अ. मि. १८५५, पृ. १८. हीं चार पुस्तकें कोठेंच मिळत नाहींत.

१०. मतपरीक्षा ( *Examination of Religions* ), भाग १ व २– १८५६-५८, पृ. ७६ व १२६.

मूळ संस्कृतवरून[३६] हें पुस्तक मराठींत आणविलें. हिंदु धर्मकल्पना खुळ्या असून खिस्ती धर्मकल्पना सत्य आहेत असें दाखविण्याचा प्रयत्न या पुस्तकांत करण्यांत आला आहे.[३७]

या पुस्तकासंबंधानें ज्ञानोदयांत ' किरकोळ बातम्या ' या सदरांत पुढील माहिती आहे :—

" डाक्तर बालंटैन आणि प्रोफेसर हाल हे गृहस्थ संस्कृत धर्मसंबंधीं पुस्तकांचें सार काढून त्यावर एक ग्रंथ तयार करीत आहेत सदर्हु ग्रंथ जर निष्पक्षपातानें व दुराग्रह वर्जून त्या दोघां विद्वानांनीं केला तर मात्र हिंदु आदिकरून लोकांत ग्राह्य होईल."[३८]

हें पुस्तक मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहे.

११. येसोबा पवार याचा वृत्तांत ( *Account of Yesooba Pawar* ). स्वतंत्र. अ. मि. १८५८, पृ. २७.

हें पुस्तक अहमदनगर येथें अमेरिकन मिशनमध्यें आहे.

या पुस्तकाशिवाय वॅलंटाईन यानें रे. ॲलन याच्याबरोबर जुन्या कराराची सुधारून वाढविलेली आवृत्ति काढतांना सुधारणासमितींत काम केलें व एक्सोडस,

---

३६. याची संस्कृत प्रत ( प्रथम खंड ) अहमदनगर येथें अमेरिकन मिशनमध्यें आहे.

३७. पंचांग, सन १८४७, पृ. ६.

३८. ज्ञानोदय, १ फेब्रुआरी १८५४, पृ. ४८.

लेव्हिटिसम्, डेटरानॉमि, जोशुआ, जजेस, सॅम्युएल भाग २ व इसाया हीं प्रकरणें सुधारण्यांत भाग घेतला. त्याचप्रमाणें १८६५ मध्यें अमेरिकन मिशननें मराठींत '*Reference Testament*' हें पुस्तक तयार करण्याचें काम बॅलंटाइन याजकडे सोंपविलें; पण त्याची प्रकृति ढांसळल्यामुळें हें पुस्तक त्याच्या हातून तयार झालें नाहीं. तें पुढें फेअरबँक यानें १८६७ मध्यें लिहून पुरें केलें.

या बायबलच्या भाषांतराच्या कामाप्रमाणेंच ज्ञानोदयाचा संस्थापक व संपादक म्हणून त्यानें केलेलें कार्यहि महत्त्वाचें आहे ज्ञानोदय हें त्रैमासिक जून १८४२ पासून सुरू झालें. यांत महत्त्वाचे लेख इंग्रजी व मराठी भाषांतून येत असत. याचीं प्रथम १६ च पृष्ठें होतीं. पहिले दोन अंक निघाल्यावर तें १८४४ अखेरपर्यंत दर महिन्याला निघूं लागलें. पुढें तें पाक्षिक झालें. आरंभीं ज्ञानोदय शिळेवर अहमदनगर येथें मुद्रित होत असे. पुढें हें मासिक मुंबई येथें छापण्यांत येऊं लागलें. बॅलंटाइन या मासिकाचा दोनदां संपादक झाला. प्रथम १८४२ ते १८४४ अखेर व दुसऱ्यांदा १८५८ पासून १८६५ पर्यंत. अमेरिकन मिशनरींचें मराठींत व इंग्रजींत निघणारें सर्वांत जुनें असें हें एकच मासिक होतें. या मासिकाचें अवतारकार्य काय होतें याबंबंधीं संपादक लिहितात,

" या प्रसंगांत ज्ञानोदयाला एक मोठें काम पडलें आहे. तें असें कीं, लोकांस खरें ज्ञान दाखवावें, खरें काय आणि खोटें काय याचा शोध कसा करावा, हें लोकांस शिकवावें आणि विशेषेंकरून ख्रिस्ती धर्माचीं प्रमाणें पुढें आणावीं आणि लोकांचें लक्ष त्याजकडे लागूं करून त्या धर्मप्रमाणें चालल्यानें किती कल्याण होईल हें दाखवावें, असें या कागदाचें कार्य होईल.[३९]

रे. बॅलंटाईन याच्याप्रमाणें त्याची पत्नी मिसेस बॅलंटाईन हिनेंहि दोन पुस्तकें मराठींत लिहिलीं आहेत. तीं अशीं:—

१. मनोकृत्य गणित (*Intellectual Arithmetic*) अ. मि. १८४०, पृ. १६९.

कोल्बर्नच्या पुस्तकाचें हें भाषांतर आहे. पुणें येथें महाराष्ट्र ग्रंथालयामध्यें या पुस्तकाची १५६ पृष्ठांची एक प्रत उपलब्ध आहे.

२. लहान खगोलविद्या (*A Small Geography*), अ. मि. १८४७, पृ. ४४[४०]

हें पुस्तक कोठेंच उपलब्ध होत नाहीं.

---

३९ ज्ञानोदय, १ जानेवारी १८४५, पृ.५.

४० *Memorial Papers of the American Marathi Mission*, p. 118.

८. रे. ओझरो फ्रेंच :

हा ता. १० ऑगस्ट १८३९ रोजीं हिंदुस्तानांत आला व १९ जुलै १८४९ रोजीं परत गेला. येथें १० वर्षे राहून व मराठी भाषा शिकून यानें मराठींत कांहीं पुस्तकें लिहिलीं आहेत. हा धर्मोपदेश करण्यासाठीं खेडोपाडीं जात असे. त्यावेळीं लोकांची दारूमुळें होत असलेली दुर्दशा पाहून दारूच्या दुष्परिणामावरहि यानें एक पुस्तक तयार केलें. त्यानें लिहिलेलीं पुस्तकें:—

१. राधानाथाची गोष्ट (*Life of Radhanath*) स्वतंत्र. अ. मि. १८४४, पृ. ३७.

२. पावसाविषयीं विचार (*Inquiry concerning the Want of Rain*) स्वतंत्र. अ. मि. १८४८ पृ. ८.

३. मद्यपानाचीं फळें (*Rewards on Drunkenness*) भाषांतर. अ. मि. १८४७, पृ. १२.

४. पश्चात्तापाविषयीं ग्रंथ (*Child's Book on Repentance*) भाषांतर, अ. मि. १८४८, पृ. ९२.

यांपैकीं एकहि पुस्तक अहमदनगर येथें अमेरिकन मिशनमध्यें नाहीं.

९. रे. इबेंझर बर्जेस :

हा ता. १० ऑगस्ट १८३९ रोजीं हिंदुस्थानांत आला व २८ डिसेंबर १८५४ रोजीं परत विलायतेस गेला. आपल्या १५ वर्षांच्या येथील वास्तव्यांत बर्जेसनें विविध विषयांवर मराठी मार्फत ग्रंथ लिहिले. बर्जेसनें मराठी भाषा व वाङ्मय यांची जी सेवा केली त्यासंबंधीं 'ज्ञानोदया'मध्यें माहिती आहे ती अशी—

"सन १८३९ मध्यें बर्जीस साहेब हे अमेरिका देशाहून आले आणि त्यांनीं कांहीं वर्षेपर्यंत अहमदनगरांत इंग्लिश व मराठी, विद्यालयाचें काम चालविलें आणि कित्येक सुंदर पुस्तकेंहि रचलीं; तीं अशीं कीं, मराठी खगोलविद्या, मराठी व्याकरण, शाळेसाठीं इंग्लिश-मराठी कोश, इंग्लिश व्याकरण आणि भाषण-सांप्रदायिक वाक्यें, असें इंग्लिश व मराठी, आणि मराठी शिकणाऱ्याकरितां इंग्लिश मार्फत मराठी व्याकरण हीं सर्व पुस्तकें फार उपयोगी आहेत."[२१]

अहमदनगरास आल्यानंतर बर्जेस हा सेमिनरीमध्यें काम करूं लागला. मेव्हर यानें लिहिलेला जुना करार सुधारण्यासाठीं जी कमिटी नेमण्यांत आली होती त्यांत बर्जेस यानें काम केलें. एक्झोडस, लेव्हिटक्स, नंबर्स, डेट्रानॉमि, जजेस, सॅम्युएल भाग १ व २, एझरा, नामिया, ईस्थर, जॉब, साम्स, प्रोवर्ब्स,

२१. ज्ञानोदय ता. १ जानेवारी १८५४ व *O. C. S.* January 1854, p. 38.

एक्लेसिएट्स्, सॉलोमन सॉंग व जेरेमिया इतक्या प्रकरणांच्या रचनेंत त्यानें काम केलें. ह्या जुन्या कराराला 'प्राचीन करार' असें नांव देऊन बॉम्बे बायबल सोसायटीनें हा ९४२ पृष्ठांचा ग्रंथ १८५४ मध्यें प्रसिद्ध केला.[४२] बर्जेसनें ज्ञानोदय पंचांग १८४७ तयार करण्यांत वॅलेंटाइन याच्या बरोबर भाग घेतला होता.

बर्जेस याचा जो मोठा नांवलौकिक आहे तो मराठी मिशनचा व्याकरणकार म्हणूनच आहे, कारण आतांपर्यंत बहुतेक अमेरिकन मिशनरींनीं धार्मिक विषयांवरच लहानमोठीं पुस्तकें लिहिलीं होतीं; परंतु व्याकरणासारख्या रुक्ष विषयावर यानेंच मराठींत व इंग्रजींत पुस्तकें लिहिलीं. बर्जेसनीं लिहिलेलीं पुस्तकें:—

१. *Easy Lessons in Reading with an English and Marathi Vocabulary*. अ. मि. १८४१; पृ. १३१ + २ + १६३ कोश. हें पुस्तक महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें उपलब्ध आहे.

२. खगोल-विद्या ( *Astronomy with Plates* ) स्वतंत्र. अ. मि. १८४६, पृ. ३८. याची दुसरी आवृत्ति १८५७ मध्यें निघाली. हें पुस्तक उपलब्ध नाहीं.

३. मराठी भाषेचें व्याकरण ( *Marathee Grammar* ) स्वतंत्र. अ. मि १८४८, पृ. ११०. हें पुस्तक महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें असून या पुस्तकाच्या प्रस्तावनेवरून या पुस्तकाचा उद्देश काय आहे, हें वाचकांच्या ध्यानीं येईल. या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत लेखक म्हणतो,

"या ग्रंथांतील अभिप्राय असा आहे कीं, मराठी भाषेचीं मूळतत्त्वें संक्षेपानें स्पष्ट करून दाखवावीं.

"शब्द व तत्त्वें यांचा वर्ग करण्याविषयीं हा ग्रंथ पूर्वी केलेल्या मराठी व्याकरणांपेक्षां पूर्ण आहे असें वाटतें.

"कांहीं मुख्य गोष्टींविषयीं हें व्याकरण पूर्वील व्याकरणापेक्षां थोडें वेगळें आहे. यांत संस्कृत भाषेच्या नियमाप्रमाणें नामांच्या विभक्ति केल्या नाहींत. परंतु जेणेंकरून नामास कार्यरूप होण्याचा नियम स्पष्ट समजण्यांत यावा, अशी रीत काढली आहे."

प्रश्नोत्तररूपानें हें पुस्तक बर्जेसनें लिहिलें आहे.

४. इंग्लिश व्याकरण आणि भाषण सांप्रदायिक वाक्यें-इंग्लिश आणि मराठी. ( *Principles of English Grammar and Idiomatic Sentences, English and Marathi* ) स्वतंत्र. अ. मि. १८५१, पृ. २८४.

४२. हा नवीन करार या प्राचीन करारार्थी जोडलेला आहे. ज्ञानोदय, ता. १ जून १८५४ पृ. १९१.

या पुस्तकाची पहिली आवृत्ति महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें असून १८५२ मध्ये निघालेली दुसरी आवृत्ति अहमदनगर येथें अमेरिकन मिशनमध्यें आहे. दोनहि आवृत्तींत पृष्ठसंख्या सारखीच आहे. हें पुस्तक कां लिहावें लागलें याचा खुलासा लेखकानें प्रस्तावनेंत आरंभीं केला आहे तो असा:—

"Treatises on English Grammar, written for the use of English youth, are not well adapted to supply the wants of foreigners, and especially are they wanting in adaptation to the youth of this country: And in regard to the phrase books which now exist, no disparagement is intended in saying that they do not fully meet the wants of the Marathi student."[४३]

या प्रस्तावनेच्या शेवटीं बर्जेस म्हणतो,

"This work has been composed it is true, to assist the native youth of this country to acquire English, yet it is adapted to be scarcely less useful in aiding the European to acquire the Marathi."[४४]

५. Easy Primer and Vocabulary; in Marathi. स्वतंत्र. अ. मि.१८५२, पृ. ११६.

हें पुस्तक कोठेंच उपलब्ध होत नाहीं.

६. Grammar of the Marathi Language (In English), स्वतंत्र. अ. मि १८५४, पृ. १८६.[४५]

पुणें पाठशाळेंतील परशुरामपंत गोडबोले आदि विद्वान् शास्त्र्यांच्या मदतीनें कॅरे, बॅलंटाइन, केनेडी, डॉ. स्टीव्हन्सन व दादोबा पांडुरंग यांच्या एतद्विषयक ग्रंथांच्या प्रकाशनानंतर त्यांचे प्रयत्न जमेस धरून हा ग्रंथ इंग्रजीमध्यें लिहिला आहे. बर्जेस यानें हे व्याकरणसुद्धां युरोपियन लोकांच्या अभ्यासासाठीं उपयोगी पडावें म्हणून लिहिलें. या पुस्तकाची 'ज्ञानोदयां' त जाहिरात देतांना या पुस्तकाचा उद्देश स्पष्ट केला आहे तो असा:—

"A Grammar of the Marathi Language, 182 pages 8vo, for the use of Europeans and others learning that language, will be issued from the American Mission Press."[४६]

---

४३. E. Burgess—*Principles of English Grammar, Preface p. I.*

४४. *Ibid. Preface*, p. VIII.

४५. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील दोलामुद्रितें, पृ. २५.

४६. ज्ञानोदय, ता १ जानेवारी १८५४, पृ. १६.

या पुस्तकावर 'ज्ञानोदया' मध्यें अभिप्राय आला आहे.[४७]

बर्जेस यानें या पुस्तकाशिवाय इंग्रजींत सूर्यसिद्धांतावर एक पुस्तक लिहिलें आहे, त्याचा उल्लेख येथें करावासा वाटतो. त्या पुस्तकाचें नांव 'Translation of Surya Siddhant' असें असून पृष्ठसंख्या ३८४ आहे.[४८]

## १०. रे. रॉबर्ट डब्ल्यू ह्यूम.

हा ता. १० ऑगस्ट १८३९ रोजीं हिंदुस्थानांत आला व २० सप्टेंबर १८५४ रोजीं परत गेला.

रॉबर्ट ह्यूमनें बायबलच्या भाषांतरकमिटींत भाग घेऊन जेनिसिस, एक्झोडस, नंबर्स, डेट्रानॉमि, जोशुआ, सॅम्युअल, किंग्ज भाग १ व २, व क्रॉनिकल एवढीं प्रकरणें सुधारलीं. १८४५ ते १८५४ पर्यंत ट्रॅक्ट सोसायटीचा सेक्रेटरी म्हणूनहि त्यानें काम केलें. ह्यूमचें दुसरें महत्त्वाचें कार्य म्हणजे ट्रॅक्टस्चें अंतरंग सुधारणें हें होय. यासंबंधीं पुढील उल्लेख आढळतो :

"या साहेबांचा कल पहिल्यापासून विद्याविषयक कामाकडे फार होता. ग्रंथ लिहिणें, वर्तमानपत्र चालविणें व तरुणांस शिक्षण देणें यांत त्यांस परम संतोष वाटत होता. पुस्तक किंवा ट्रॅक्ट यांचें बाह्यांग सुंदर असण्याची त्यांस नेहमीं आवश्यकता वाटत असे. त्याप्रमाणें हीं पुस्तकें शिळाछापावर न छापतां टाइपांनीं छापावीं हा प्रयत्न साहेबांनीं केला. या कामीं मदर ह्यूम यांची त्यास मोठी मदत होती. मडम साहेबांनीं सुंदर चित्रांचे नमुने स्वता हातानें तयार करावे व मि. टॉमस ग्रॅहम यांनीं त्याचे कट्स तयार करावे व साहेबांनीं ते कागदावर छापून घेण्याची व्यवस्था पहावी. अशारीतीनें जसें आंत तसें बाहेरहि पुस्तक सुंदर होऊन लोकांचें मन त्याकडे धांवत असे. यापूर्वी हीं पुस्तकें सोसायटी फुकट वांटीत असे, पण ह्यूम यांस तसें करणें आवडलें नाहीं. त्यांनीं माफक किंमत प्रत्येक पुस्तकावर ठेवली. असें जरी झालें तरी पुस्तकाच्या सुंदरपणावरून लोक आवडीनें ती घेऊं लागले."[४९]

रे ह्यूम यानें मराठींत पुढील पुस्तकें लिहिलीं :

१. **विचारकथन** (*On Faith*), भाषांतर. अ. मि. १८५०, पृ. १२०.

या पुस्तकाचें कर्तृत्व 'मेमोरियल पेपर्स' मध्यें रे. वाइल्डर यांजकडे देण्यांत आलें आहे.[५०] त्यावरून ह्यूमचें हें पुस्तक त्यानें पुरें केलें असावें, असें दिसतें.

४७. ज्ञानोदय ता १६ जानेवारी १८५४ पृ. १०.

४८. या पुस्तकाबद्दल मिचेल म्हणतो. "This book will remain a monument of patient and exact research." पहा. Murray Mitchell—*In Western India*, p. 52.

४९. अमेरिकन मराठी मिशनचा शंभर वर्षांचा इतिहास, पृ. ६३.

५०. *Memorial Papers of the American Marathi Mission*. p. 110.

२. मूर्तीचा उच्छेद—स्वतंत्र. ट्रॅ. सो. १८५०, पृ. ३२.

३. नारायणबावा ( *Narayan Bawa* ) स्वतंत्र. ट्रॅ. सो. १८५१, पृ. ३१. हीं दोन पुस्तकें कोठेंच उपलब्ध होत नाहींत.

४. पशुज्ञानप्रकाश ( *Book of Beasts* )—अ. मि. १८५१, पृ. २४. हें पुस्तक अहमदनगर येथें अमेरिकन मराठी मिशनमध्यें मिळतें. त्यांतील भाषेचा नमुना पहा :—

" हत्ती सर्व जनावरांहून मोठा, बळकट व बुद्धिमान आहे. तो सात फुटी-पासून पंधरा फूटपर्यंत उंच आहे. त्याचे डोळे लाहान, व कान सुपासारिखे आहेत. त्यांस दोन लांब दांत असतात. ते दांत लोकांच्या फार कामास येतात. हत्तीला नाकाच्या ठिकाणीं लांब सोंड असती, ती फारच चमत्कारिक व तो तिच्या योगानें बहुत काम करितो. आफ्रिका खंड, भरत खंड, सियाम देश आणि ब्रह्मीदेश या ठिकाणीं हत्ती फार आहेत. त्याला पाळिलें असतां तो गरीब होऊन धन्याच्या स्वाधीन राहतो. थोर लोक त्यांवर बसून फिरत असत, व पूर्वी लढाईमध्येंहि त्यांचा उपयोग पडत असे. परंतु आतां त्यांचा कांहीं विशेष उपयोग नाहीं; केवळ गजांतलक्ष्मी म्हणवायासाठीं बाळगतात आणि त्यासाठीं व्यर्थ खर्च करितात. ( पृष्ठांक नाहीं ).

५. लेकरांकरितां चित्रांचें पुस्तक (*Picture Book for Children*) *Com*. ट्रॅ. सो. १८५१, पृ. ३२.

६. गुरु करण्याविषयीं ( *On the Choice of a Guru* )—स्वतंत्र. ट्रॅ. सो. १८५१, पृ. ९.

ही दोनहि पुस्तकें कोठेंच मिळत नाहींत.

या पुस्तकांशिवाय गॉर्डन हॉलनें लिहिलेल्या 'लेंकरांची पहिली पोथी' हा पुस्तकाची नवीन आवृत्ति रे. ह्यूमनें इ. स. १८४४ मध्यें प्रसिद्ध केली. तसेंच १८४७ चें पंचांग तयार करण्यांतहि त्यानें भाग घेतला होता.

११ रे. रॉयल जी. वाइल्डर.

हा ता. २० सप्टेंबर १८४६ रोजीं हिंदुस्थानांत आला व ११ मे १८५७ रोजीं परत गेला. आपल्या दहा वर्षांच्या वास्तव्यांत रे. वाइल्डरनें मराठी भाषा शिकून बरींच पुस्तकें लिहिलीं. वाइल्डर हा मुंबईस आल्यानंतर तो अहमदनगरास गेला. तेथें कांहीं वर्षे राहून पुढें कोल्हापुरासहि त्यानें काम केलें. अहमदनगर येथील सेमिनरीमध्यें सुपरिंटेंडंट म्हणून कांहीं वर्षे त्यानें काम केलें. तसेंच बायबलाच्या जुन्या कराराच्या भाषांतरकमिटींत तो होता. त्यानें क्रॉनिकल्स भाग १, जॉब हीं प्रकरणें सुधारलीं. यानें लिहिलेलीं पुस्तकें :—

१. **सालसबेरी मैदानांतील धनगर याची गोष्ट** ( *The Shepherd's of Salisbury Plain*). भाषांतर. अ. मि. १८४९. पृ. ५८.

२. **गवळयाच्या कन्येची गोष्ट.** ( *The Dairyman's Daughter*), भाषांतर. ट्रॅ. सो. १८५०, पृ. ६४.

३. **पश्वादि भूतदया.** ( *Kindness to Animals* ) भाषांतर. ट्रॅ. सो. १८५३, पृ. ९२.

या पुस्तकाचें भाषांतर रामजी मोर यानें केलें असून त्यांत वाइल्डरनें सुधारणा केली असें ' मेमोरियल पेपर्स 'मध्यें नमूद आहे.[51]

४. **हिंदुशास्त्रांतील पदार्थविज्ञान** ( *Physical Errors of Hinduism* ) स्वतंत्र. ट्रॅ. सो. १८५५, पृ. ७५.

या पुस्तकासंबंधीं ' ज्ञानोदयांत ' माहिती देण्यांत आली आहे ती अशीः—

" हिंदु शास्त्रामध्यें पदार्थविज्ञानाविषयीं चुका सांपडतात हें काय आश्चर्य ? जसें इतर सर्व गोष्टींविषयीं तसेंच विद्याविषयींहि मानवी बुद्धीचें पहिलें काम सर्वदां अपूर्ण असतें. तें संपूर्ण करण्यास आणि खरें मत स्थापण्यास बहुत वेळ लागतो. सर्व गोष्टी पारखून जें खरें तेंच शोधून काढावें यास बहुत श्रम व खर्चहि लागतो. पण हिंदु शास्त्र्यांनीं असे श्रम व खर्च कधीं केला आहे कीं काय ? आणि आपलें मत अन्य लोकांनीं पारखावें हें तरी त्यांस बरें वाटतें कीं काय ? नाहीं, आम्ही अगदीं परिपूर्ण आहों असा अभिमान धरून आपलें मत दुसऱ्यांनीं पारखावें, असें ते कबूल करीत नाहींत."[52]

ही चारहि पुस्तकें उपलब्ध होत नाहींत.

५. **ईश्वरी विद्या,** भाषांतर. अ. मि. १८५६, पृ. २२२.

हें पुस्तक अहमदनगर येथें अमेरिकन मिशनमध्यें असून ' ईश्वरविद्या ' या नांवाचें दुसरेंहि एक पुस्तक तेथें आहे. या दोन पुस्तकांपैकीं 'ईश्वरविद्या' या पुस्तकाचें कर्तृत्व ॲबटनें वाइल्डरला दिलें आहे.[53] परंतु हें पुस्तक रे. मोडक यांनीं लिहिल्याचें दिसून येतें. दोन्ही पुस्तकांतील प्रकरणें एकच आहेत. पण ' ईश्वरीविद्या ' हें पहिलें पुस्तक असून ' ईश्वरविद्या ' हें नंतरचें सुधारून वाढविलेलें पुस्तक दिसतें. याविषयीं ' ईश्वरविद्या ' या पुस्तकाच्या ' Note ' मध्यें वाइल्डर म्हणतो,

---

५१. *Ibid.*, p. 119.

५२. ज्ञानोदय, ४ डिसेंबर १८५५, पृ. ३७२.

५३. Rev. Abbott; *Catalogue of the Marathi Christian Literature during eighty years*, p. 57.

'My first labor therefore, was to prepare a new translation from the original English. This I circulated in the Ahmednuggur Mission for criticism. After it came back to me I devoted my first leisure to a thorough revision of the work, getting such assistance from pundits and Native Christians, as I could .... But as I conversed, instructed and preached on the subjects and doctrines involved I became more and more dissatisfied with this second copy. In reading and revising it, both alone and with Pundits, I made changes till I found them obscuring the text. This led to another entire revision, so that the present is the third complete copy that I have prepared.'[५४]

बाइल्डरला मदत करणारा पंडित व एतद्देशीय ख्रिश्चन कोण आहे, याचाहि उलगडा 'ज्ञानोदया'वरून होतो. त्यांत 'धर्मसंबंधीं नवीन मराठी पुस्तकें' या या सदराखालीं 'ईश्वरविद्या' या पुस्तकासंबंधीं पुढील मजकूर आढळतो :—

"अहमदनगर मिशनांतील रेवरेंड रामकृष्ण विनायक मोडक यांनीं हें एका इंग्रजी ग्रंथावरून भाषांतर केलें आहे तरी एतद्देशीय लोकांच्या समजुतीस येण्याजोगें करण्याकरितां जेथें जेथें अगत्य दिसलें तेथें तेथें त्यांनीं मूळ ग्रंथांतील विचारांत फेरफार केलें आहेत व पदरचेहि पुष्कळ विचार घातले आहेत."[५५]

या पुस्तकाचें कर्तृत्वहि 'मेमोरियल पेपर्स' मध्यें रे. मोडक यांनाच देण्यांत आलें आहे.[५६]

ईश्वरी विद्या या बाइल्डरनें लिहिलेल्या पुस्तकाचें स्वरूप त्यांतील प्रस्तावनेवरून आपणांस दिसून येतें. पहा : "या ग्रंथामध्यें ईश्वरी विद्येच्या सिद्धांताचे आधार आणि प्रमाणें सृष्टिजन्यज्ञानावरून आणि शास्त्रोक्त ज्ञानावरूनहि जीं मिळतात, तीं दोन्ही एकदम दाखवून प्रत्येक सिद्धांताचा उलगडा केला आहे."[५७]

६. पवित्र शास्त्रांतील मुख्य विषय (Scripture Manual) भाषांतर. ट्र. सो. १८५७, पृ. १९०.

हें पुस्तक अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें आहे या पुस्तकाचा उद्देश काय याविषयीं लेखकानें जें प्रस्तावनेंत सांगितलें आहे त्यांतील महत्त्वाचा भाग पुढील प्रमाणें :—

५४. ईश्वरीविद्या, *Note*, p. III & IV.
५५. ज्ञानोदय, १ डिसेंबर १८५८, पृ. ३५९–३६०.
५६. *Memorial Papers of the American Marathi Mission* p. 116.
५७. ईश्वरी विद्या. प्रस्तावना पृ. ८.

" पवित्र शास्त्रांत नीतीसंबंधीं मतें व आचरण याविषयीं उपयोगी व खरा उपदेश आणि सुबोध लिहून ठेवला आहे. ख्रिस्ती राष्ट्रें यांची आबादी व श्रेष्ठपण कोठून विचारिलें तर हीं पवित्र शास्त्रावरून झालीं आहेत असें समजलें पाहिजे.

यास्तव हें शास्त्र बरोबर समजून घ्यावें, याचा अभ्यास व मनन करून याचा अभिप्राय ध्यानांत आणून त्याप्रमाणें चालावें असा सर्वांचा धर्म होय. या लहान ग्रंथांत पवित्र शास्त्रांतले ७५० मुख्य विषय मांडून ठेविले आहेत."[५८]

या प्रस्तावनेवरून या पुस्तकाच्या भाषेचेंहि स्वरूप समजून येईल.

या पुस्तकाशिवाय बायबलच्या विषयावर तीन पुस्तकें वाइल्डरनें लिहिल्याचें ॲब्रट आपल्या कॅटलॉगमध्यें नमूद करतो तीं अशीं :—

१ मात्थीनें व मार्कसानें केलेलीं शुभवर्त्तमानें यावरील टीका. ( *Commentary on the Gospels of Matthew and Mark* ) स्वतंत्र. ट्रॅ. सो. १८७०, पृ. ३९४+१.

२ मार्कसानें केलेलें शुभवर्त्तमान यावरील टीका ( *Commentary on the Gospel of Mark*). स्वतंत्र. ट्र. सो. १८७०, पृ. ९०.

३ लुकानें केलेलें शुभवर्त्तमान यावरील टीका ( *Commentary on the Gospel According to Luke* ), स्वतंत्र. ट्र. सो. १८७५, पृ. ११२.

रे. वाइल्डर याची पत्नी मिसेस वाइल्डर हिनें मराठींत एक पुस्तक भाषांतरित केलें आहे. तें असें :—

१ लहान जेन ( *Little Jane, the young cottager.* ) भाषांतर. ट्रॅ. सो. १८५५, पृ. ७९.

हें पुस्तक कोठें उपलब्ध होत नाहीं, पण ' ज्ञानोदयांत ' या पुस्तकाची माहिती पुढीलप्रमाणें देण्यांत आली आहे :—

" या पुस्तकांत ख्रिस्ती धर्मातल्या मताविषयीं कांहीं लिहिलें आहे. जे येशू ख्रिस्तावर भरवसा ठेवितात त्यांचें मरण आनंदानें व शांतीनें होतें, हें सप्रमाण दाखविलें आहे...ख्रिस्ती धर्मावरून जीवात्म्याला जो आधार आहे तो या गोष्टीवरून उघड दिसेल," [५९]

१२. रे. सॅम्युएल बी. फेअरबँक

हा ता. २० सप्टेंबर १८४६ रोजीं हिंदुस्थानांत आला व ३१ मे १८९८ रोजीं महाबळेश्वराहून कोडइकनॉलला जात असतां वाटेंत मरण पावला.

---

५८. पवित्र शास्त्रांतील मुख्य विषय–प्रस्तावना.

५९. ज्ञानोदय, ता. ४ डिसेंबर १८५५, पृ. ३६१.

रे. फेअरबँक यानें कांहीं वर्षे मुंबई व अहमदनगर येथें काम केलें. अहमदनगर येथें अमेरिकन मिशन प्रेसचा सुपरिंटेंडंट म्हणून तो १८५५ पर्यंत राहिला. या जागीं असतां नव्या कराराची आवृत्ति त्यानें आपल्या देखरेखीखालीं छापिली. पुढें बायबलकमिटीनें नव्या कराराची पॉकेट आवृत्ति काढण्याचें ठरविल्यानंतर तेंहि काम फेअरबँकनें १८७३ मध्यें पुरें केलें. फेअरबँकनें शैक्षणिक व धार्मिक विषयांवर मराठींत पुढील पुस्तकें लिहिलीं :—

१. लहान गणित ( *A small Arithmetic*), स्वतंत्र. अ. मि. १८४८, पृ. ७२.

२. शास्त्रांतील गोष्टी ( *Scripture Stories*), स्वतंत्र.अ.मि. १८५१, पृ. ७२.

३. पक्षीगुणादर्शक ( *Book of Birds* ), अ. मि. १८५१, पृ. ३०.

४. ( *Marathi Grammar for beginners* ) स्वतंत्र खिश्चन व्हर्नाक्युलर सोसायटी. १८६५, पृ. ३२.

हीं चारहि पुस्तकें कोठेंच उपलब्ध होत नाहींत.

५. भूगोलविद्या ( *Questions on Geography* ) स्वतंत्र. अ. मि. १८६७, पृ. १६४.

हें पुस्तक १८७५ मध्यें दोन भागांत प्रसिद्ध करण्यांत आलें व पुढें १८८२ मध्यें रे. इ. एस्. ह्यूम यानें तें सुधारून प्रसिद्ध केलें. अहमदनगर येथें अमेरिकन मिशनमध्यें या पुस्तकाचे दुसरा व तिसरा हे दोनच भाग आहेत. त्यांचीं ९६ पृष्ठें आहेत. तेव्हा उरलेलीं पृष्ठें पहिल्या भागांत असावींत.

या पुस्तकातील विषय प्रश्नोत्तरानें समजावून दिले आहेत. त्यांतील कांहीं प्रश्नोत्तरें पुढें देण्यात आलीं आहेत :—

" मक्का कशानें प्रसिद्ध आहे ?

तेथें महंमद जन्मला, आणि तें मुसलमान लोकांचें पवित्र स्थान आहे.

तेथें बहुत मुसलमान लांबून यात्रेस जातात.

आदेन हल्लीं कोणाच्या अमलांत आहे ?

इंग्लिशांच्या अमलांत आहे. लोक आगबोटींत विलायती डाकेचीं पत्रें व कापूस वगैरे सामान मरून, आदेनच्या बंदरावरून जात येत असतात.

आरबी लोकांचा पूर्वज कोण होता ?

१०. Rev. Abbott, *Catalogue of the Marathi Christian Literature during eighty years, p. 21.*

आब्राहामाचा पुत्र जो इस्माएल तो.

शास्त्रांत त्याजविषयीं काय भविष्य लिहिलें आहे?

त्याचा हात सर्वांविरुद्ध, आणि सर्वांचा हात त्या विरुद्ध असें होईल." (पृ. १-२)

६. **तुल्यार्थदर्शक नवा करार** (*The New Testament with References*). अ. मि. १८६८, पृष्ठें ६०३-१०.

हें पुस्तक महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें उपलब्ध आहे.

७. **गणित** (*Arithmetic Interest, Discount*) स्वतंत्र. अ. मि. १८७५, पृ. १२.

८. **गणित भाग १** (*Arithmetic, Part I*) स्वतंत्र. अ.मि.१८७६,पृ.३६.

९. **गणित भाग २** (*Arithmetic Part II*) स्वतंत्र.अ. मि.१८७९,पृ.२४.

१०. **गणित भाग ३** (*Arithmetic Part III*) स्वतंत्र. अ. मि. १८८४, पृष्ठ २८.

हीं चार पुस्तकें कोठेंच मिळत नाहींत.

फेअरबँकनें सुधारलेलीं पुस्तकें :—

या पुस्तकांशिवाय रे. बर्जेस यानें लिहिलेलें 'खगोलविद्या' हें पुस्तक यानें सुधारून सन १८४९ मध्यें त्याची दुसरी आवृत्ति काढली. तसेंच सर्वोत्तम सखाराम यानें भाषांतर केलेलें 'सृष्टींतील चमत्कार' (Nature's wonders) हें पुस्तक फेअरबँकनें पूर्णपणें सुधारून बॉंबे ट्रॅक्ट सोसायटीमार्फत १८५३ मध्यें प्रसिद्ध केलें.[११] याशिवाय १८५१, १८५२, १८७७ व १८८२ या चार वर्षांचीं 'ज्ञानोदय पंचांगें' फेअरबँकनें तयार केलीं.

**फेअरबँकचीं गीतें :**

फेअरबँक मराठींतून गीतांची रचना करी. बॅलंटाईन याच्या मानानें फेअरबँक याची कामगिरी मोठी नसली तरी त्यानेंहि गीतांत चांगली भर घातली आहे. बॅलंटाईन याच्या गीतसंग्रहाची सन १८७४ मध्यें जी पांचवी आवृत्ति प्रसिद्ध झाली त्यांत फेअरबँक व विशेल यांनीं इंग्रजींतील कांहीं चांगल्या गीतांचीं भाषांतरें करून त्यांचा त्यांत समावेश केला. याप्रमाणें यांतील कांहीं गीतांचा भाग 'बुल्बुल' या नांवानें प्रसिद्ध करण्यांत आला. त्यांत फेअरबँक व विशेल यांचीं गीतें आहेत. फेअरबँक याचें मराठींत भाषांतरित केलेलें एक गीत येथें नमुन्यासाठीं मूळासह पुढें देण्यांत येत आहे :—

११. *Memorial Papers of the American Marathi Mission, p. 119.*

२३१. ख्रिस्त सैनिकांस आव्हान.

१ पाहा ! क्रूस झेंडा पुढें चालला,
ख्रिस्ती सैनिकांनो ! चला हो चला,
सरदार ख्रिस्त । पुढें असतां
वैऱ्यांमध्यें गेला ! त्याचा बावटा
ध्रु. पाहा ! क्रूस झेंडा ! पुढें चालला.
ख्रिस्ती सैनिकांनो ! चला हो चला.

२ जयध्वजामुळें । धाक वाटतो
सैतानाचा मेळा । पळूं लागतो.
घोष एकतांना । दुष्ट कांपती,
करा हो आरोळी । जय मीळती । ध्रु.

३ थोर फौजरूपी । ख्रिस्ती मंडळी
शत्रू जिंकायाला । चालूं लागली,
एक प्रभू आहे । भाऊ हो आम्ही
ऐक्यता असावी । मेळ नेहमीं । ध्रु.

४ गळताती राज्यें । पिकल्यावरी,
वाढे ख्रीस्तसत्ता । सर्वदां तरी
बळ नरकाचें । नची चालतें
वचन ख्रिस्ताचें । ठाम राहतें. ध्रु.

५ तर सैनिकांनो । पुढें व्हा, चला
आमच्या संगतीं । लागा गायाला
संतां दूतांनो हो । त्या सर्वोत्तमा
सुवंदित म्हणा । वंदा महिमा. ध्रु.[६२]

"Onward Christian Soldiers."

1 Onward Christian Soldiers!
Marching as to war
With the Cross of Jesus.
Going on before.
Christ, the Royal Master,
Leads against the foe;
Forward into battle,
See his banners go.
Onward Christian Soldiers,
Marching as to war,
With the Cross of Jesus
Going on before.

2 Like a mighty Army
Moves the Church of God,
Brothers, we are treading
Where the saints have trod.
We are not divided,
All one body we
One in hope and doctrine
One in charity.
Onward etc.

3 Crown and throne may
perish,
Kingdoms rise and wane;
But the Church of Jesus
Constant will remain.
Gates of hell can never
'Gainst that Church prevail
We have Christ's own
promise
And that cannot fail.[६३]
Onward etc. Amen.

६२. गाननिधि आणि त्याची पुरवणी (१८९०). पृ. ८८–८९.
६३. *Hymns of the Faith No. 191* and *Northfield Hymnal No.147.*

रे. फेअरबँक याच्याप्रमाणें त्याची पत्नी मिसेस फेअरबँक हिनें पुढील पुस्तक मराठींत लिहिलें आहे :

**पवित्र शास्त्रांत वर्णिलेलीं मुलें** (*The Children of the Bible*). भाषांतर ट्रॅ. सो. १८६९. पृ. ९१. हें पुस्तक उपलब्ध नाहीं.

### १३. रे. ॲलन हेझन :

हा ता. २७ फेब्रुआरी १८४७ रोजीं हिंदुस्तानांत आला व २४ फेब्रुआरी १८७२ रोजीं परत गेला. रे. हेझन अहमदनगरास आल्यानंतर बायबलचें भाषांतर सुधारण्यासाठीं जी कमिटी होती, तिच्यामध्यें त्यानें काम केलें. १८५४ मध्यें प्रसिद्ध झालेल्या जुन्या कराराच्या आवृत्तींत डिहूटरॉनॉमि, जोसुआ, जजेस, रूथ, सॅम्युएल भाग १ व २; किंग्ज भाग १; क्रॉनिकल्स भाग १; साम्स हीं प्रकरणें सुधारलीं. तसेंच नवा करार छापला जाऊं लागला तेव्हां प्रेसचा सुपरिंटेंडेंट म्हणूनहि त्यानें काम केलें. १८५७ सालची बायबलची नवी आवृत्ति त्यानें आपल्या देखरेखीखालीं तयार केली. पुढें १८७० मध्यें बायबल सोसायटीच्या विनंतीवरून या बायबलचा कांहीं भाग त्यानें सुधारून दिला. त्याच्या या कार्याविषयीं पुढीलप्रमाणें उल्लेख आढळतो :—

"डॉ. हेझन यांची मराठी भाषा फार उत्तम होती. शास्त्राच्या मराठी भाषांतरांत त्यांची सेवा फार मोठी होती "[६४]

हेझन याची दुसरी कामगिरी म्हणजे त्यानें बरींच वर्षें "ज्ञानोदय" चालविला.[६५] सन १८६५ ते १८६७ पर्यंत 'ज्ञानोदया'चा संपादक म्हणूनहि त्यानें काम केलें.[६६] याशिवाय त्यानें पुढीलप्रमाणें मराठींत पुस्तकें लिहिलीं :—

१. बहुभाष (*Parley the Porter*) भाषांतर अ. मि. १८५०, पृ. ४२.

हें पुस्तक उपलब्ध नाहीं. मेमोरियल पेपर्समध्यें या पुस्तकाची पृष्ठसंख्या ४८ दिली आहे.

२. मातृबोध (*The Mother at Home*) भाषांतर. ट्रॅ. सो. १८५२, पृ. २२१.

सिव्हिल सर्व्हिसमधील एका अधिकाऱ्यानें भाषांतरित केलेलें हें पुस्तक

---

६४. अमेरिकन मराठी मिशनचा शंभर वर्षांचा इतिहास, पृ. ९३.

६५. ज्ञानोदय, १ जानेवारी १८५८, पृ. ३.

६६. *Memorial Papers of the American Marathi Mission*, p. 103.

हेझन यानें सुधारून संपादित केलें. मेमोरियल पेपर्समध्यें याचें साल १८५१ व पृष्ठें २२० दिलीं आहेत.[६७] हें पुस्तक उपलब्ध नाहीं.

३. चार शुभवर्त्तमानाचा गोश्वारा (*Synopsis of the Four Gospels* in Harmony in Marathi, with Map.)[६८] अ. मि. १८६८, पृ. २०.

हें पुस्तक अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें आहे.

१४ रे. विल्यम वूड :

हा १९ जानेवारी १८४८ रोजीं हिंदुस्तानांत आला व ता. १५ मार्च १८७२ रोजीं परत गेला. हिंदुस्तानांत आल्यानंतर हा अहमदनगर येथें गेला व त्यानें मराठी भाषा शिकून पुढीलप्रमाणें पुस्तकें लिहिलीं :—

१. सचोटीविषयीं (*Honesty*) भाषांतर. अ. मि. १८५०, पृ. २९.

२. ख्रिस्ती शास्त्रांतल्या कथा (*Barth's Bible Stories*) भाषांतर. ट्र. सो. १८५१, पृ. १८१.

३. (*The Cross Bearer.*) भाषांतर. ट्रॅ. सो. १८७१, पृ. ५७.[६९]

हीं पुस्तकें कोठेंच मिळत नाहींत.

१५. रे. जॉर्ज बोवेन :

हा १९ जानेवारी १८४८ रोजीं हिंदुस्तानांत आला व ३० ऑक्टोबर १८५५ रोजीं त्यानें मिशनचा संबंध सोडला व पुढें १८७४ पर्यंत ट्रॅक्ट सोसायटीच सेक्रेटरी म्हणून त्यानें काम केलें. बोवेन यानें मराठींत पुढील पुस्तकें लिहिलीं :—

१. धर्माविषयीं संवाद (*A Dialogue on Religion*) भाषांतर. ट्रॅ. सो. १८५०, पृ. ५८.

हें पुस्तक अहमदनगर येथें अमेरिकन मिशनमध्यें आहे. या पुस्तकाचें कर्तृत्व ॲबट यानें आपल्या कॅटलॉगांत बाईबेल याजकडे दिलें असून त्याचा प्रकाशनकाल १८२० असा नमूद केला आहे;[७०] परंतु या पुस्तकावर १८५० हा काल आढळतो. मेमोरियल पेपरसमध्यें या पुस्तकाचें कर्तृत्व बोवेनकडे दिलें आहे.[७१] यावरून मूळचें पुस्तक यानें सुधारून वाढविलें असावें.

---

६७. *Ibid.* p. 119.
६८. *Ibid.* p. 116.
६९. *Ibid.* p. 120.
७०. Rev. Abbott. *Catalogue of the Marathi Christian Literature during Eighty years*, p. 15.
७१. *Memorial Papers of the American Marathi Mission*, p. 119.

हें पुस्तक नरसिंहभट्ट म्हणून एक अमलदार, त्याचा मुलगा रामा व त्यांचा शेजारी अबदुल्ला या तिघांनीं केलेल्या संभाषणाचें आहे व खिस्ती धर्माचें मोठेपण त्यांत सांगितलें आहे.

२. हिंदुधर्माविषयीं प्रश्न — भाषांतर. ट्रॅ. सो. १८५२, पृ. १३.

हें पुस्तक उपलब्ध नाहीं.

१६. रे. लेम्युएल बिसेल :

हा २७ ऑगस्ट १८५१ रोजीं हिंदुस्तानांत आला व १८९१ मध्यें महाबळेश्वर येथें मरण पावला. बिसेल अहमदनगर येथें आल्यानंतर मराठी भाषा उत्तम प्रकारें शिकला. त्याचे मराठी शब्दांचे उच्चारहि स्पष्ट असावेत. कारण त्याच्या उपदेशासंबंधीं एक उल्लेख आढळतो तो असा :—

"डॉ. बिसेल हे उत्तम उपदेशक होते. त्यांचा उपदेश अगदीं भारदस्तीचा व मनाला लावणारा असे. दाखले व दृष्टांत अगदीं बेताचे घेत असत व लोक हासतील असा एकहि शब्द काढीत नसत. त्यांची भाषा अगदीं बालबोध व भारदस्तीची असे. त्यांच्या उपदेशांत इतका जोर असे कीं, त्यांचे शब्द अंतःकरणाला लागून मन तल्लीन होत असे व कितीहि वेळ बोलले तरी कंटाळा येत नसे."[७२]

रे. बिसेल यानें मराठींत पुढीलप्रमाणें पुस्तकें लिहिलीं आहेत.

१. **जगाचा तारणारा जो येशू ख्रीस्त त्याजकडून मनुष्याचा तरणोपाय याविषयीं** ( *The Saviour of Our World* ) भाषांतर ट्रॅ. सो. १८५८, पृ. १६७.

२. **प्रार्थनेचें सामर्थ्य** ( *The Power of Prayer* ) भाषांतर. अ. मि. १८५९, पृ. २३६.

हीं दोन पुस्तकें कोठेंच मिळत नाहींत.

याशिवाय रे. बिसेल व आर. व्ही. मोडक या दोघांनीं मिळून एक पुस्तक लिहिलें आहे. तें असें :

३. **वाचनपाठावलि** ( *Wachan Pathavali* ) *Com.* ट्रॅ. सो. १८८४, पृ. १५३.

हें पुस्तक अहमदनगर येथें अमेरिकन मिशनमध्यें आहे. प्रस्तावनेंत याचें स्वरूप पुढीलप्रमाणें सांगितलें आहे :—

"ह्या वेच्यांचा विषयानुसार क्रम लाविला नाहीं, तथापि वाचकाच्या ध्यानात तो सहज येईल, आणि हिंदुस्तानांत व विशेषेंकरून महाराष्ट्र देशांत सुमारें

७२. अमेरिकन मराठी मिशनचा शंभर वर्षांचा इतिहास, पृ. ४५.

५० वर्षांपासून धर्मनीति, रीतिभाती, लोकसुधारणा, इ. गोष्टींत कसकसा फेरफार व वृद्धि होत चालला आहे; त्या काळचे खिस्ती मिशनेरी लोक व इतर खिस्ती लोक आणि सुधारलेले हिंदु यांचे विचार कसे होते हें समजेल. ह्या वेच्यांत कित्येक विद्वान् व सुधारलेले हिंदु आणि एतद्देशीय खिस्ती यांचा संक्षिप्त वृत्तांत आहे, एक हा ग्रंथ वाचणारांस बहुत बोध व ज्ञान होईल अशी आशा आहे.''(प्रस्तावना)

२. बिसेल याच्याप्रमाणें त्याची पत्नी मिसेस मेरी एलिझाबेथ बिसेल हिनेंहि मराठी वाङ्मयांत पुस्तकें लिहिलीं आहेत. विशेष म्हणजे तिनें स्वतः कांहीं गीतें रचून गीतांचीं पुस्तकें तयार केलीं आहेत. तसेंच हिचीं कांहीं गीतें व पदें Sacred Song या पुस्तकाच्या १८७४ मधील आवृत्तींत घालण्यांत आलीं आहेत. याशिवाय स्त्रियांना उपदेश करणारीं अशीं कांहीं पुस्तकें हिनें लिहिलीं आहेत. तीं पुढीलप्रमाणें :—

१. देवप्रीतीची प्राचीन गोष्ट व दुसरीं गायनें ( *The Old, Old Story, and other Hymns.* ) भाषांतर, ट्रॅ. सो १८७२, पृ. ५०.

हें पुस्तक महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें आहे. त्यांतील एक गीत नमुन्यासाठीं पुढें देण्यांत येत आहे :—

" १ येशू जगीं आला आकाश सोडुनी,
महिमा टाकुनी नीच झाला
२ पापी जनावरी मोठी प्रीति करी,
सांगा गोष्ट खरी त्या येशूची
३ बालबोध सांगा मज पामराला,
या कष्टी मनाला शांत करा. " (पृ. ३).

२. बुलबुल–लेकरांकरितां मंजुळ गायनें *Comp.* अ. मि. १८७४, पृ. ११०.

याची सुधारून वाढविलेली आवृत्ति सन १८८१ मध्यें निघाली. यांत बॅलंटाईन, बिसेल, फेअरबँक यानीं तयार केलेलीं गीतें आहेत.

हें पुस्तक अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें मिळतें. मिसेस बिसेल हिचीं कांहीं गीतें 'उपासनासंगीत' या पुस्तकांतहि आढळतात. त्यांतील भाषांतर केलेलें एक मराठी गीत मूळच्या इंग्रजी गीतासह नमुन्यासाठीं म्हणून खालीं दिलें आहे :—

| | |
|---|---|
| **द्वारीं उभा असलेला ख्रीस्त.** | **Behold A Stranger at the Door.** |
| १. दाराशीं पहा कोण तो<br>उभा असूनि ठोकितो | 1. Behold a stranger at the door!<br>He gently knocks, he knocked<br>before; |

कृपाळु मित्र असतां
तुम्ही दुर्लक्ष करितां
ध्रु. ख्रिस्त प्रभुला हृदयीं घ्या
तें शुद्ध ठेवाया,
कां करितां दूर दाराबाहेर
त्या प्रियास हृदयीं घ्या.
२. कृपा अतांहि दावया
तो पहातो हृदीं याया
कुणीहि प्रीति असली
वैऱ्यावरी न दाविली
३. खरा सुमित्र आहे काय?
करील सर्वदा सहाय?
प्रभु त्या खांबिं खीळिला
तें पाप्या मित्र ठरला
४. तो दिव्य मित्र यावया,
त्याचा प्रसाद पावाया
टाकूनि पाप सगळें
कराच द्वार मोकळें
५. न त्यास आंत घेतिलें
देऊनि खेद लाविलें,
न जाणो तो तुम्हा सोडील
कृपेच्या वेळहि टळेल. "[७४]

He waited long, is waiting still
You treat no other friend so ill.

2. Oh, lovely attitude! He stands,
With melting heart and open hands;
Oh matchless kindness! and he shows
This matchless kindness to his foes.

3. Rise, touched with gratitude divine,
Turn out his enemy and thine;
Turn out soul enslaving sin,
And let the heavenly stranger in.

4. Soverign of Souls! Thou Prince of Peace.
O may thy gentle reign increase!
Throw wide the door, Each willing mind,
And be His empire all mankind.
Amen."[७३]

३. एका आईचें शेवटचें भाषण (*The Mother's Last Words.*) स्वतंत्र. ट्रॅ. सो. १८७५, पृ. ३१.

हें पुस्तक मिळत नाहीं.

४. ख्रिस्ती स्त्रियांच्या कर्तव्याविषयीं निबंध (*The Privileges and Duties of Christian Women.*) स्वतंत्र. खाजगी. १८८४, पृ. २१.

हें पुस्तक अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें आहे. त्यांतील भाषेचा नमुना पहा :—

---

७३. *Hymns of the Faith. No. 262.*

७४. उपासनासंगीत. पृ. १०६

" लोकांच्या कल्याणार्थ बायका कधीं कांहीं वर्णायालोगें काम करितील असें पूर्वींपासून बहुधा या देशांतील लोकांचें मत नाहीं. बायको अज्ञान, असमंजस, अल्पबुद्धीची असून तिनें केवळ बाप, माऊ, नवरा यांची सेवा करण्यांत आपलें आयुष्य घालवावें, हेंच तिच्या जन्माचें सार्थक असें तिजविषयीं समजतात. तेव्हां मी तितक्याच योग्यतेची आहे असें जाणून तीही निराश होऊन बसते. माझें सुशिक्षण व्हावें, माझी बुद्धि वाढावी, मी सुधरावें, दुसऱ्यांच्या उपयोगीं पडावें, असे विचार तिला फार करून सुचत नाहींत. " ( पृ. १–२ ).

शेवटीं ' आईचे उपकार ' ही कविता दिली आहे.

१ तुझे उपकार किती । आई गे, आई गे,
काय सांगूं तुझी प्रीति । आई गे, आई गे,
बाळपणीं पोसिलें,
तूं उरासीं धरिलें,
मोठे श्रम घेतले, आई गे, आई गे.

२ पाळण्यांत निजविलें, आई गे, आई गे,
मला नाही रडूं दिलें, आई गे, आई गे,
गाणें गात बसमी,
चेंडू खेळ दाविसी,
गोड बोले मजसीं, आई गे, आई गे,

याची एकंदर चार कडवीं आहेत.

५. **शास्त्रांत वर्णिलेल्या स्त्रिया**— भाषांतर. ट्रॅ सो. १८८८, पृ. २८९.

६. **नव्या करारांत वर्णिलेल्या स्त्रिया**— भाषांतर. ट्रॅ. सो. १८९०, पृ. २५०.

हीं दोन पुस्तकें उपलब्ध नाहींत.

**१७. रे. चार्लस हार्डिंग :**

हा ता. १२ जानेवारी १८५७ रोजीं हिंदुस्तानांत आला. हिंदुस्थानांत आल्यावर यानें स. १८५८ ते १८५९ पर्यंत, बायबल सोसायटीचा सेक्रेटरी म्हणून काम केलें. याला पदें रचण्याचा नाद होता. मिसेस सिसेल हि<sup></sup> संपादित केलेला 'बुलबुल' हा पदांचा संग्रह यानें आपल्या देखरेखीखालीं छापून काढला. त्याच-प्रमाणें यानें स्वतःहि पदांचें एक पुस्तक लिहिलें आहे. याच्या ग्रंथाची माहिती पुढीलप्रमाणें :—

१. गाननिधि ( *The Song Treasury with Appropriate Tunes.* ) Comp. साजगी. १८८६, पृ. ११९.

२. गाननिधि आणि त्याची पुरवणा ( *Songs and Hymns for Sunday Schools and Day Schools.* ) Com. ट्रॅ. सो. १८९०, पृ. ११८.

या पुस्तकाची दुसरी आवृत्ति सन १८९३ मध्यें गाननिधि (पुरवणीसहित) या नांवानें काढण्यांत आली. तिचीं १२२ + ६ पृष्ठें आहेत. हीं दोन्ही पुस्तकें अमेरिकन मिशनमध्यें आहेत. या पुस्तकांत पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना उद्धृत केली आहे. त्यांत हार्डिंग म्हणतो,

" This Collection is enriched by several new translations by Mrs. Bissell and Dr. Fairbank gives us " Onward Christian Soldiers " not before published. We are also permitted to use a few translations by the Rev. J. Taylor, and Miss Sorabji allows us to include with the School Songs five of her pretty kindergarten songs. It is hoped that the book will be very useful in Sunday Schools and other Schools. " ७५

या प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें फेअरबँकचें ' पाहा क्रूस झेंडा पुढें चालला ' हें पद या पुस्तकांत प्रथमच घातलेलें दिसतें.[७६] याची माहिती मागें दिलीच आहे. या पुस्तकाचें स्वरूप समजण्याकरितां दुसरें एक गीत येथें देतों.

३००. बाळांनों त्यजा निद्रा ( Awake Ye Little Dreamers )

बाळांनो त्यजा निद्रा,
जागे व्हा लवकरी,
भानू ये उदयाद्री
तारा जात स्वर्गी ॥ १ ॥
उठा उठा तो कुकु बोलतो,
उठा उठा तो कुकु बोलतो,
कुकू कुकू तो कुकू बोलतो,
कुकू कुकू तो कुकू बोलतो ॥ २ ॥[७७]

रे. हेन्री जेम्स ब्रूस :

हा ता. ३ मार्च १८६२ रोजीं हिंदुस्तानांत आला व ४ मे १९०९ रोजीं पांचगणी येथें मरण पावला. रे. ब्रूस येथें आल्यानंतर, त्यानें सातारा येथें काम केलें. त्याच्या कार्यासंबंधीं पुढीलप्रमाणें उल्लेख आढळतो:—

७५. रे. चार्लस हार्डिंग, गाननिधि Preface to the First Edition.
७६. तत्रैव, पृ. ८८-८९.
७७. तत्रैव, पृ ११९.

"लेखनद्वारां त्यांची सेवा फार मोलाची झाली आहे. मिशनचे वार्षिक रिपोर्ट कांहीं वर्षे ते तयार करीत असत. त्यांनीं लहान मोठीं अनेक पुस्तकें लिहिलीं आहेत. त्यांच्या कोलंबिया प्रेसकडून उत्तम सेवा झाली आहे."[७८]

रे. ब्रूस. यांच्या कामगिरीचें स्वरूप दुहेरी आहे. त्यांच्या कामगिरीचा एक भाग म्हणजे छापखाना चालविणें व दुसरा भाग पुस्तकें लिहिणें हा होय. सातारा येथें काम करीत असतांना सन १८७५ मध्यें कोलंबिया प्रेस नांवाचा छापखाना त्यानें साताऱ्यास घातला. या छापखान्याचा व्याप पुढें एवढा वाढला कीं, सन १८७१ मध्यें अमेरिकेहून दुसरी यंत्रसामुग्री आणून त्याला हा छापखाना वाढवावा लागला. या कामाशिवाय रे. ब्रूस यानें पुढील पुस्तकें मराठींत लिहिलीं आहेत:—

१. घड्याळ करणारा आणि त्याचें कुटुंब (*The Watchmaker and his family*) भाषांतर. ट्रॅ. सो. १८६७, पृ. ७०.

२. येशूकडे ये (*Come to Jesus*). भाषांतर. अ. मि. १८६८, पृ. ७५.

हीं दोन पुस्तकें कोठेंच मिळत नाहींत.

३. तुलनादर्शक शरीरशास्त्र (*Anatomy Human and Comparative.*) स्वतंत्र व खाजगी. १८७८, पृ. ३४०.

या पुस्तकाचें संपूर्ण नांव "तुलनादर्शक शरीरशास्त्र म्हणजे मानवशरीरशास्त्र आणि इतर प्राण्यांचीं त्याची तुलना" असें आहे. हें मूळ पुस्तक उपलब्ध नसून त्याची १९०१ मध्यें डॉ. डब्ल्यू. ओ. बॅलंटाईन यानीं तपासून प्रसिद्ध केलेली एक पुढील आवृत्ति अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें आहे.

४. विश्वासु कुत्रा आणि त्याची टोपली (*The Faithful Dog and his Basket*) स्वतंत्र. अ. मि. १८७९, पृ. १६.

हें पुस्तक कोठें मिळत नाहीं.

५. लहान मुलांकरितां गणित. (*An Illustrated Primary Arithmetic*) स्वतंत्र. १८८१, पृ. ५२.

ह्या ग्रंथाची दुसरी आवृत्ति अमेरिकन मिशनमध्यें आहे. या पुस्तकांत सर्व ठिकाणीं पशु, पक्षी, रथ, घोडे, कोंबड्या, कुत्रे, घड्याळें, चमचे, पिपें, पिंजरे, चेंडू, पुस्तकें, इत्यादि अशीं चित्रें आहेत व त्या चित्रांच्या आधारानें गणितें सोडवून दाखविलीं आहेत. हा याचा विशेष आहे.

६. ज्योतिषशास्त्राचीं मूलतत्वें—स्वतंत्र. खाजगी १८८२, पृ. २१.

हा ग्रंथ अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें आहे.

---

७८. अमेरिकन मराठी मिशनचा शंभर वर्षांचा इतिहास, पृ. ८०

७. शास्त्रांतले पशु (*The Beasts of the Bible*) स्वतंत्र व खाजगी. १८८६. पृ. २४.

हें पुस्तक अहमदनगरच्या अमेरिकन मिशनमध्यें आहे.

८. शास्त्रासंबंधीं कोश —— *Comp.* इं. सो. १८८५, पृ. ४५३.

हा कोश रे. ब्रूस व कासमभाई महंमद या दोघांनीं मिळून केला. हा कोश कोठें उपलब्ध होत नाहीं.

या पुस्तकाप्रमाणें रे. ब्रूसनें मिशनरी वाङ्मयावर एक लेख लिहिला आहे. इ. स. १८८१ मध्यें अहमनगर येथें अमेरिकन मिशन स्थापन होऊन ५० वर्षे पूर्ण झाली. त्या प्रसंगीं एक मोठा सुवर्णमहोत्सव साजरा झाला. त्या निमित्तानें अमेरिकन मराठी मिशनच्या वाङ्मयकार्याची माहिती देणारा लेख त्यानें लिहिला. या लेखांत १८१३ मध्यें जेव्हां अमेरिकन मिशन स्थापन झालें तेव्हां सुरुवातीची मराठी वाङ्मयाची स्थिति काय होती याचें विवेचन करून अमेरिकन मिशननें मराठी वाङ्मयाची वाढ कशी केली हें मुख्यतः त्यानें सांगितलें आहे. या लेखाचें नांव The Literary Work of the American Marathi Mission" असें असून तो 'मेमोरियल पेपर्स'मध्यें प्रसिद्ध झाला आहे.[७९]

रे. हेन्री ब्रूस याची पत्नी मिसेस ब्रूस हिनेंहि मराठींत वरींच पुस्तकें लिहिलीं आहेत. मराठी भाषेचा अभ्यास आपण कसा केला यासंबंधीं ती लिहिते,

"In closing, concerning Mahratta, we have read through the primer twice, are going over Mr. Burgess' Marathi Grammar the second time and have read ten chapters in Matthew."[८०]

हिनें लिहिलेलीं पुस्तकें :—

१. ईश्वरी भक्तांस सर्व गोष्टी कल्याणकारक होतात याविषयीं (*It is all for the best.*) भाषांतर, इं. सो. १८६९, पृ. २८.

२. रागेनबाख गांवांतील लोहार (*The Smith of Ragenbach and Other Stories.*) भाषांतर. इं. सो १८७१, पृ. ४८.

३. जानसनबाबा(*Uncle Johnson.*)भाषांतर. अ. मि. १८७१, पृ. १६.

४. आळशी मुलगा (*Lazy Tom. An Illustrated Poetical Tract.*) भाषांतर. खाजगी. १८७९, पृ. ४.

---

७९. *Memorial Papers of the American Marathi Mission.* pp. 73 to 141.

८०. *Journal of Mrs Hepzibeth P. Bruce,* p. 54.

५. तरुण साफेरा अथवा ज्येन नामें मुलगी (*The Young Sapphira.*) भाषांतर. अ. मि. १८८०, पृ. १४.

हीं पुस्तकें कोठें मिळत नाहींत.

या पुस्तकांशिवाय मिसेस ह्यूम हिनें कांहीं पदेंहि केलीं आहेत. तीं 'बुलबुल' या पुस्तकांत व Sacred Song या पुस्तकाच्या १८७४ च्या आवृत्तींत पाहावयास मिळतात.

## १९. रे. चार्लस डब्ल्यू. पार्क.

हा ता. १६ सप्टेंबर १८७० रोजीं हिंदुस्तानांत आला व १८८१ मध्यें अमेरिकेस परत गेला. हिंदुस्तानांत आल्यानंतर त्यानें मराठींत पुस्तकें लिहिल्याचें दिसत नाहीं; परंतु यानें १८७४, १८७५, १८७६, १८७८, १८७९, १८८० व १८८१ या सात वर्षांच्या 'ज्ञानोदय' पंचांगाचें त्यानें संपादन केलें. पहिल्या पांच वर्षांच्या पंचांगांची प्रत्येकीं ३२ पृष्ठें होतीं व शेवटच्या दोन वर्षांच्या पंचांगांचीं पृष्ठें ४८ दिसतात.

रे. पार्क याची पत्नी मिसेस पार्क हिनेंहि मराठी वाङ्मयाचें कार्य केलें आहे. हिनें ज्ञानोदयाची पुरवणी म्हणून लहान मुलांसाठीं एक विभाग सुरू केला. हा विभाग 'बालबोध मेवा' म्हणून प्रसिद्ध आहे. हा विभाग जानेवारी १८७३ पासून हिनें देण्यास आरंभ केला. त्यावेळीं याचीं चार पानें असून त्याचा आकार 'ज्ञानोदया' प्रमाणें असे व महिन्यांतून एकदांच हा मेवा प्रसिद्ध होत असे. सन १८७४ च्या सुरवातीपासून याचीं आठ पानें करण्यांत आलीं. हा विभाग पुढें सुंदर चित्रांनीं विभूषित होऊं लागला. या विभागांत लहान मुलांसाठीं गोष्टी, कोडीं, गणितविषयक प्रश्न व अनेक मनोरंजक विषय येत. मिसेस पार्क हिनें या विभागाचें संपादन १८८० पर्यंत केलें. हिच्यानंतर मिसेस इ. एस्. ह्यूम संपादन करूं लागली. मराठी वाङ्मयांत बालवाचकांकरितां म्हणून सुरू केलेला मिशनरींचा हा पहिलाच प्रयत्न दिसतो.

बालबोधमेवा याशिवाय मिसेस पार्क हिनें मराठींत पुढील पुस्तकें लिहिलीं:—

१. दोन मेंढरांची गोष्ट (*A Story of Two Lambs*) स्वतंत्र. ट्रॅ. सो. १८७२. पृ. ४३.

हें पुस्तक अहमदनगर येथें अमेरिकन मिशनमध्यें सांपडतें. या पुस्तकांत एका धनगरानें मेंढवाड्यांतून पळून गेलेल्या दोन मेंढरांचें वाघापासून संरक्षण कसें केलें याची गोष्ट सांगून ख्रिस्ती धर्मासंबंधीं पुढीलप्रमाणें बोध सांगितला आहे:—

"जसें ह्या मेंढक्यानें त्या कोकरांस वाघाच्या हातून सोडविलें, तसें प्रभू येशू ख्रिस्तानें आम्हांस सैतानापासून सोडवून आम्हांवर मोठी प्रीति केली. तो

उत्तम मेंढपाळ आहे. म्हणून जसी त्या सौम्यानें आपल्या मेंढपाळावर प्रीति केली, तसी जर आपण येशू ख्रिस्तावर प्रीति करूं, तर आयुष्यभर सुखी व आनंदित होऊं." (पृ. ३९).

२. राजाचा पुत्र ( *The King's Son* ) स्वतंत्र. द्वि. सो. १८७४, पृ. २७.

३. उत्तम मित्र ( *The Best Friend* ) भाषांतर. द्वि. सो. १८७५, पृ. ७५.

हीं दोन पुस्तकें उपलब्ध नाहींत.

अमेरिकन मिशनच्या सुरुवातीपासून म्हणजे सन १८१३ पासून अमेरिकन मिशनरींनीं जीं पुस्तकें लिहिलीं त्याचा आढावा व त्या मिशनरींची सन १८७५ पर्यंतची माहिती या दोन प्रकरणांत देण्यांत आली आहे. प्रारंभींचें त्याचें कार्य महत्त्वाचें असल्यानें तेंच देण्याचा मुख्य हेतु होता. पुढें मिशनरी लोकांनीं धर्मप्रसार करून देशी लोकांना बाटवून ख्रिस्ती केल्यानंतर हे हिंदी ख्रिश्चन लोक मराठींत धार्मिक व इतर पुस्तकें लिहूं लागले व अमेरिकन मिशनरी लोकांनीं हळूहळू मराठींत लिहिण्याचें बंद केलें. याविषयीं रे. जे. मरे मिचेल आपल्या पुस्तकांत म्हणतो,

"The first tract writers were—as was natural—missionaries though several laymen also rendered valuable assistance. Latterly native authorship has come to the front, and will become more and more prominent as time goes on." ८१

यामुळें पहिल्या मिशनरींनीं जें वाङ्मयविषयक कार्य केलें तें त्यांच्या स्वतंत्र प्रयत्नाचें द्योतक मानावें लागेल व तेवढेंच या ठिकाणीं देण्यांत आलें आहे.

---

८१. J. Murray Mitchell—*In Western India*-p. 213.

# स्कॉटिश मिशनची मराठी वाङ्मयसेवा

हिंदुस्तानांत सन १८१३ मध्यें अमेरिकन मिशन स्थापन झाल्यानंतर १८२२ मध्यें स्कॉटिश मिशनरी सोसायटीनें हिंदुस्तानकडे आपलें लक्ष वळविलें. त्यानंतर या मिशनचा पहिला मिशनरी डोनाल्ड मिचेल हा सन १८२३ च्या जानेवारींत मुंबई येथें आला; परंतु तो दहा महिन्यांतच मरण पावला. त्याच्या मृत्यूपूर्वी क्रॉफर्ड, कूपर व जेम्स मिचेल हे तीन मिशनरी येथें आले. लवकरच स्टीव्हन्सन हा चवथा मिशनरी त्यांना येऊन मिळाला.[1] त्यांनीं मिशनचें काम चालू केलें. यांपैकीं क्रॉफर्ड व कूपर हे प्रकृति नादुरुस्त झाल्यामुळें कांहीं वर्षांनीं स्वदेशीं परत गेले. तत्पूर्वीच १८२७ मध्यें रॉबर्ट नेस्बिट व १८२८ मध्यें जॉन विल्सन हे दोघे या मिशनला येऊन मिळाले. स्कॉटिश मिशन स्थापन झाल्यानंतर या मिशनरींनीं मराठी भाषा शिकून खिस्ती धर्मविषयक व इतर विषयांवर बरींच पुस्तकें लिहिलीं यांच्या मराठी अभ्यासाबद्दल रे. मरे मिचेल पुढीलप्रमाणें लिहितो,

"Having mastered the Marathi Language the missionaries preached in the house, by the wayside, in the market place, and when permitted – in the temple. They went on tours, sometimes going a hundred miles from their own station."[2]

मराठी भाषेचें ज्ञान संपादल्यावर या मिशनरींनीं कांहीं धार्मिक पुस्तकांचीं भाषांतरें केलीं व स्वतंत्र पुस्तकेंहि लिहिलीं.[3] त्यांची माहिती यापुढें देण्यांत येत आहे:–

१. रे. जे. कूपर.

हा हिंदुस्तानांत १८२३ च्या सुमारास आला व १८२९ च्या सुमारास परत गेला असावा. यानें मराठी भाषेचा अभ्यास करून धार्मिक विषयावर एक पुस्तक लिहिलें आहे तें हें :—

(१) मोठा विचार-मरणानंतर काय प्राप्त होईल. (*The Great Inquiry.*) स्वतंत्र. इं. सो. १८२९, पृ. २२.[4]

या पुस्तकाची मुंबई येथें छापलेली १८३२ सालची एक आवृत्ति अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें मिळते. याचीं १९ पृष्ठें आहेत. या पुस्तकांतील भाषेचें स्वरूप पुढील उताऱ्यांत दिसून येईल :—

---

१. J Murray Mitchell : *In Western India*, pp. 43–44.

२. *Ibid.* p. 45.

३. *Ibid.* p. 50.

४. Rev. Abbott. *Catalogue of the Marathi Christian Literature during Eighty Years*, p. 23.

"मरणानंतर तुलाही देवाकडेस जावें लागेल आणि तो तुझा न्याय ठरवील." (पृ. २-३)

"...मागील जन्म नव्हता व पुढील जन्म होणार नाहीं याचें मुख्य प्रमाण असें आहे कीं तसेंच देवाचें पुस्तकांत लिहिलें आहे." (पृ. ११)

"आताच विचार कर. तारणाराला शरण जा आणि शेवटीं आनंदानें मरून तूं देवाकडे जासील आणि तुला आकाशवास प्राप्त होईल."[४] (पृ. १९)

हें पुस्तक मोडी लिपींतहि असून त्याचीं १८ पृष्ठें आहेत.

## २. रे. जेम्स मिचेल :

हा हिंदुस्तानांत २१ जुलै १८२३ मध्ये आला व २३ डिसेंबर १८५३ मध्यें परत गेला. आपल्या तीस वर्षांच्या येथील वास्तव्यांत धर्मोपदेश, मराठी शाळा, बाणकोट येथील लिथोग्राफिक (शिळा) छापखाना यांत त्यानें काम केलें.[५] याच्याविषयीं 'ज्ञानोदया'त पुढीलप्रमाणें उल्लेख आहे.

"तीस वर्षांमागें हे साहेब मिशनेरीचें काम करावें म्हणून या देशीं आले आणि आजपर्यंत कोकणांत व पुण्यांत राहून फार मेहनत केली. आलीकडे यांची प्रकृती बिघडली हाणून हे गेले महिन्याच्या २३ वे तारखेस सहकुटुंब स्कॉटलंडास गेले."[६]

जेम्स मिचेल हा कांहीं काळ हर्णै येथील मिशनमध्यें होता. मराठी भाषेचा अभ्यास केल्यानंतर विल्सनबरोबर दौरा काढल्याचा त्याचा रिपोर्ट आढळतो[७]. या दौऱ्यांत मिशनरी मराठी लोकांस उपदेश करून धार्मिक पुस्तकें वांटीत असत. या दोघांनीं तेरा ते चौदा हजार पुस्तकें वाटल्याचें मिचेलनें आपल्या रिपोर्टांत लिहिलें आहे.[८]

मराठींत धर्मोपदेश करीत असल्याची माहिती देत असतांना एके ठिकाणीं मिचेल म्हणतो,

"*In Marathi* I have still daily, when at home, an assembly of people at my own house, to whom I read and expound a portion of the Divine word, and conclude with prayer."[९]

---

५. *O. C. S.* January 1834, p. 37.

६. ज्ञानोदय – १ जानेवारी १८५४, पृ. २. व १५ जानेवारी १८५४, पृ. १७.

७. *O. C. S.* February 1833, pp. 74-75.

८. *O. C. S.* April 1835, p. 148.

९. *O. C. S.* September. 1843, p. 490. यामध्यें मराठींत धर्मोपदेश केल्याचे दोन ठिकाणीं उल्लेख आहेत; पहा. O. C. S. March 1850. p. 120 व O. C. S. January 1853 p. 37.

रे. जेम्स मिचेल यानें बायबलच्या भाषांतराच्या कामांत भाग घेऊन "Epistles to the Corinthians" या भागाचें मराठी भाषांतर केलें.[१०] याशिवाय त्यानें आणखी दोन पुस्तकें लिहिलीं :—

१. उद्धाराचा उपाय ( *The Way of Salvatian* ) स्वतंत्र. स्कॉ. मि. १८३३, पृ २२.[११]

हें पुस्तक अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें आहे. अमेरिकन मिशन प्रेसमध्येंहि छापलेलें दुसरें एक पुस्तक तेथें आहे; पण त्यावर प्रसिद्धिकाल नाहीं. या पुस्तकाची भाषापद्धति लक्षांत येण्यासाठीं एक उतारा पुढें देण्यांत येत आहे:—

"अहो मित्रहो तुह्मी आणि सर्व माणसें पापी आहां. याजविषयीं जर कदाचित् तुह्मी नाकबूल व्हाल तर याचें प्रमाण जें देवानें आपलें पुस्तकांत प्रगट केलें आहे तें मी दाखविर्तो. त्यांत असें लिहिलें आहे कीं, माणसाचें पाप पृथ्वीमध्यें मोठें आणि त्याच्या अंतःकरणांतील कल्पना सर्वदा वाईट आहेत असें ईश्वरानें पाहिलें." (पृ. १)

"ईश्वराच्या पुत्रानें आह्मास सुख द्यायास व आमचें तारण करायास बापाजवळ जी प्रतिज्ञा केली ती पूर्ण करायास आपले ईश्वरी गौरव व थोरपण झांकून नुमारें १८३३ वर्षांच्या पूर्वी मनुष्यरूपें अवतार घेऊन लोकांमध्ये नुमारें ३४ वर्षे राहिला." (पृ. ६)

२. ख्रिस्ती धर्माच्या मुख्य सिद्धांतांतील लहान प्रश्नोत्तरावली. भाषांतर. अ. मि. १८४१, पृ. ३५.[१२]

हें पुस्तक Catechism on the Lords Prayer व The Ten Commandments यावर आधारलेलें भाषांतर आहे. तें कोठेंच मिळत नाहीं.

३. डॉ. स्टीव्हन्सन :

हा हिंदुस्थानांत १८२४ मध्यें आला व १८५४ मध्यें स्वदेशांत परत गेला. याच्या कार्याविषयीं 'ज्ञानोदयां'त पुढीलप्रमाणें माहिती देण्यात आली आहे[१३]—

"हे साहेब सन १८२४ मध्यें म्हणजे तीस वर्षांमागें मिशनरीचें काम करावयास मुंबईस आले आणि कोकणामध्यें व पुण्यांत १० वर्षे काम केलें. नंतर देऊन ते चासन्न झाले...हे साहेब गेल्या महिन्याच्या २८ व्या तारखेस स्वदेशांत गेले."

१०. *O. C. S.* April 1836 p. 170 व O. C. S. March 1839 p. 111.

११. Rev Abbott. *Catalogue of the Marathi Christian Literature during eighty years*, p.61.

१२. *O. C. S.*, May 1853, p. 2-2

१३. ज्ञानोदय, १ मे १८५४, पृ. १२६-१३०.

स्टीव्हन्सन हा इतर मिशनरींबरोबर दौऱ्यावर जात असे. रे. नेस्बिट याच्याबरोबर स्टीव्हन्सन यानें नाशिक, अक्कलकोट, सातारा येथें जो दौरा काढला त्याची माहिती त्यानें आपल्या रिपोर्टांत दिली आहे. या दौऱ्यांत धार्मिक पुस्तकें वांटणें, धर्मोपदेश करणें व शाळांस भेट देणें हे ठरावीक कार्यक्रम असत. खुद्द साताऱ्या छत्रपतीला सुद्धां 'नव्या करारा'ची एक आवृत्ति त्यांनीं भेट दिली व त्याच्या राज्यांत धार्मिक पुस्तकें वाटण्याची व प्रचार करण्याची परवानगी मिळविली.[१४] मराठी आणि इंग्रजी त्याचप्रमाणें मराठी व हिंदुस्तानी या भाषांत उपदेश केल्याचेहि उल्लेख त्यांच्या रिपोर्टांत आहेत.[१५] स्टीव्हन्सन यानें मराठींत धार्मिक व शैक्षणिक या विषयांवर पुस्तकें लिहिलीं आहेत. विशेषतः व्याकरणावर त्यानें बरींच पुस्तकें लिहिलीं आहेत. याच्या वाङ्मयकार्याविषयीं मरे मिचेल लिहितो,

"He had held much intercourse with the Brahmans in Poona, and with immence difficulty had obtained copies of their sacred books. He published a selection (twenty-five in number) of the Hymns of Rig Veda—with translations into Marathi and English. No other scholar in India or Europe had attempted such a work.—He also composed an excellent Magadhi grammar; studied the Jain religion and translated from the Marathi dialect the Kalpa Sutra, a very important book, he wrote several Marathi tracts and a large number of valuable papers in Oriental subjects."[१६]

स्टीव्हन्सननें जीं पुस्तकें व लेख लिहिले आहेत ते पुढीलप्रमाणें :—

**१ ख्रिस्ति धर्माच्या सत्यतेचीं प्रमाणें.** स्वतंत्र. ट्रॅ. सो. १८२८, पृ. ४०.

हें पुस्तक उपलब्ध नाहीं.

**२ संभाषणें : कित्येक ब्राह्मण मराठी इत्यादि आणि ख्रिस्तदास यांमध्यें हिंदुधर्म आणि ख्रिस्तीधर्म याविषयीं.** स्वतंत्र. ट्रॅ. सो. १८२९, पृ. ५०.

या पुस्तकाची १८३० ची आवृत्ति अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें असून त्याचीं ५६ पृष्ठें आहेत. स्टीव्हन्सन यानें मिचेल याच्या सहकार्यानें तें लिहिलें आहे.

या पुस्तकाच्या 'सुचनें'त पुढीलप्रमाणें माहिती दिली आहे :—

"जीं संभाषणें आषाढ आणि श्रावण महिन्यांत सन इसवी १८२९ कित्येक ब्राह्मण शास्त्री इत्यादि आणि ख्रिस्ताचे दोन सेवक यामध्यें झाली, त्यांतील सार

१४. *O. C. S.*, March 1832, p. 98.
१५. *O. C. S.*, April 1835, p. 149.
१६. J. Murray Mitchell, *In Western India*, pp. 50–51.

पुढें लिहिलें आहे. जर कोणी वेकानें सत्य मार्गाचा शोध लागावा ह्मणोन काळजी घरली तर त्याणे पुढली संभाषणें वाचावीं. त्यांत दोन्ही मतें बरोबर लिहिलीं आहेत यास्तव जो कोणी नम्र आणि चांगली बुद्धी परमेश्वरापासून मागून हीं वाचील त्याला निश्चयेंकरून शोध लागेल परंतु जो अभिमान धरून मनांत बोलतो कीं मी सारें जाणतों त्याला शोध लागणार नाहीं. (पृ. १.)

३ इंग्लिश भाषेच्या व्याकरणाची मूळपीठिका (*The Principles of English Grammar.*)—स्वतंत्र. १८३१.

या पुस्तकाची सन १८३१ मध्यें छापलेली पहिली आवृत्ति मुंबई विद्यापीठांत असून १८३३ ची दुसरी आवृत्ति मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहे.[१७] या पुस्तकासंबंधीं पुढील उल्लेख आढळतो :

"This work is conducted on excellent principles, and is very full and accurate. It appears well fitted to promote the object in view in writing it."[१८]

या व्याकरणांत कोणत्या गोष्टी आहेत त्यांची माहिती लेखकानें 'परिभाषे'त दिली आहे. त्यांतील महत्त्वाचा भाग असा आहे.

"इंग्लिश भाषा शिकणारास भाषा आल्यानें काय उपयोग आहे हें एथें लिहावयाचें कारण नाहीं. इंग्लिश भाषेंत या लोकीं आणि परलोकीं उपयोगी पडावयाजोग्या सर्व प्रकारच्या विद्या लिहिल्या गेल्या आहेत आणि भाषाज्ञान पुरतें झाल्यावांचून सरकारचा रीति समजत नाहींत हें सर्व लोकांस ठाऊक आहे.

"इंग्लिश भाषा शिकणारांस शब्दोच्चार भाषा रीतीप्रमाणें यथास्थित होण्यास कठिण पडतें. यास्तव याकर ह्मणून कोणीएक होता त्याणें जे नेम सांगितले त्यांतून कांही मुख्य मराठी भाषेंत उतरून घेतले." (पृ. १)

"भाषा व विद्या दोनी बरोबर यावीं ह्मणून उपयोगी विद्या कळवायाकरितां उदाहरणें योजिलीं आहेत. दोहींत शिकणारानें चांगला अभ्यास करावा अशी ग्रंथकर्त्यांची प्रार्थना आहे." (पृ. २)

४ *The Principles of Murathee Grammar*, स्वतंत्र. अ. मि. १८३३. (पृ. १४३)

या पुस्तकाची १८४३ सालची १६३ पृष्ठें असलेली व १८५४ सालची १७७ पृष्ठें असलेली अशा दोन आवृत्त्या महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें आहेत. या पुस्तकांना पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना आहे. त्यावरून पाहतां हें व्याकरण तयार करावयास त्यामुळें स्टीव्हन्सन उद्युक्त झाला, तें कारण पुढीलप्रमाणें देण्यांत आलें आहे :

---

१७. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील दोलामुद्रितें, पृ. ५

१८. *O. C. S.*, July 1831, p. 249.

"While studying the language, I found many points relative to which I wished informtion, not at all touched on by Grammarians and others treated too concisely to convey clear ideas to the mind. To remedy these defects, I early commenced making a collection of notes of various kinds or points of Grammar, and have continued doing so for eight years. I now wish to put the students of Murathee in possession of the fruits of my experience"[१९]

हें व्याकरण तयार करतांना परशुरामपंत गोडबोले व दाजीशास्त्री शुक्ल यांचें कोणत्या प्रकारचें साहाय्य झालें त्याचाहि उल्लेख स्टीव्हन्सननें केला आहे.[२०]

या पुस्तकाची आवश्यकता त्या काळांत केवढी होती, हें सांगतांना त्याचा एक परीक्षण-लेखक म्हणतो,

"At the present time, when so many officers, civil and military, in this part of India, are obliged to make themselves acquainted with the Marathi language, and when translations of the most approved works, scientific and moral), are in the course of preparation for the improvement of the natives, a good Grammar of it must be viewed as a *desideratum*."[२१]

"भाषांतराच्या कामीं या व्याकरणाचा फार उपयोग होईल व मोल्सवर्थच्या शब्दकोशाच्या खालोखाल याचें महत्त्व आहे," असें हाच परीक्षणलेखक या लेखांत पुढें म्हणतो". स्टीव्हन्सनच्या या व्याकरणाचा गौरव ता. १६ मे १८३४ च्या 'दर्पण' पत्रांत एका पत्रलेखकानें पुढीलप्रमाणें केला आहे:—

"महाराज, मेस्तर स्तिवनसन् साहेब यांणें महाराष्ट्र भाषेचें व्याकरण केलें आहे. त्यावर तुम्ही कांहीं लिहिलें नाहीं हें पाहून मला आश्चर्य वाटलें. तें व्याकरण आपली भाषा शिकविणारे इंग्रेज लोक यास जसें उपयोगी आहे तसें आपलें लोकांस नाहीं तरी तशीं जीं व्याकरणें प्रसिद्ध झालीं त्यांत तें फार उत्तम आहे. असें छापून सर्वांत प्रसिद्ध करावें असें तें योग्य आहे. जो पाद्री यांणें हा ग्रंथ केला आहे त्याणें दोहो वर्षांमागें याप्रमाणेंच एक इंग्रेजी भाषेचें व्याकरण केलें, आणि मुंबईची विद्यामंडळी यांणीं १५०० रुपये खर्च करून त्यास आश्रय दिला, ते रुपये मेस्तर स्तिवनसन् यांस इनाम दिले. त्याणें सांप्रत जो ग्रंथ केला तो फारच उत्तम झाला, कां कीं, एकदोन गृहस्तांनीं मराठी भाषेचें व्याकरण केलें त्यावरून त्या साहेबास कांहींच सहाय्य झालें नसेल.

१९. Stevenson, *The Principles of Murathee Grammar*, Preface to the First Edition, p. 3.

२०. *Ibid.*, Preface to the First Edition, p. 4.

२१. *O. C. S.*, July 1834, p. 235.

२२. *Ibid.*, pp. 238-239.

"मला इतकेंच लिहावयाचें आहे कीं, उदरहू सांगितलेल्या दोहों ग्रंथांत[२३] जे बहुत विषय संदिग्ध ठेविले होते किंवा ज्यांत चुक्या केल्या होत्या व शिक्षा मंडळीचे कारखान्यांत ज्या पंडितांनीं मराठी भाषेचा कोश केला त्यांची व महाराष्ट्र व इंग्रजी कोश ज्या प्रसिद्ध साहेबानें केला त्या साहेबाची ज्या विषयावर भिन्न भिन्न मतें होतीं ते विषय स्तिवनसन् पाद्री याणें फार चमत्कारिक रीतीनें उघड करून दाखविले आहेत."[२४]

या पुस्तकाचें उत्पन्न मिशनरी कार्यासाठीं देण्यांत आल्याची माहिती *O. C. S.* मध्यें सांगण्यांत आली आहे:—

"Mr. Stevenson has, in the course of the year, published a *Grammar of the Marathi Language* for the use of Europeans. The profits arising from the sale of this work should any be realized, will be devoted to missionary purposes." [२५]

५ शुभवर्तमानासंबंधीं प्रश्नोत्तरावळी (*Gospel Catechism.*)[२६]
स्वतंत्र. डूं. सो. १८४५, पृ. ३५.

हें पुस्तक अहमदनगर येथें अमेरिकन मिशनमध्यें आहे. या पुस्तकांत डाव्या पृष्ठावर मराठींत व त्याच्या समोरच्या उजव्या पृष्ठावर इंग्रजींत त्याचें भाषांतर दिलें आहे. यांत प्रश्नोत्तररूपानें येशूचें चरित्र आढळतें. यांत एकंदर बारा धडे आहेत. त्यांतील कांहीं प्रश्न व उत्तरें पुढें देण्यांत येत आहेत:—

'प्र०—मन शुद्ध करायाला आणि पापाचें प्रायश्चित्त करायाला कोणी मनुष्याला सामर्थ्य आहे कीं काय?

उ०—नाहीं; पापाचें प्रायश्चित्त करणें आणि मन शुद्ध करणें यांत मनुष्याचे उपाय चालत नाहींत.

प्र०—येशू खीस्ताच्या मरणेंकरून काय झालें?

उ०—येशू खीस्ताच्या मरणेंकरून आमच्या पापाचें प्रायश्चित्त झालें आणि आम्हांसाठीं पुण्य सिद्ध झालें.

प्र०—पवित्र आत्म्यावरून काय होत असतें?

उ०—पवित्र आत्मा मनुष्यांचें मन पालटतो, त्याचे वाईट गुण काढितो आणि त्यांच्याबद्दल चांगले गुण लाविता." (पृ. ८)

२३. बापूजी केंचा कोश व महमद इब्राहिम मकबा यांचें व्याकरण या पुस्तकाचा उल्लेख करून त्यात चुका आहेत असें पत्रलेखकानें म्हटलें आहे.

२४. दर्पण, ता १६ मे १८३४.

२५. *O. C. S.*, January 1834, p. 58.

२६. या पुस्तकाचा उल्लेख *O. C. S.* मध्यें केला आहे. *O. C. S.*, May 1853, p. 212.

**६ पुराण आणि इब्री शास्त्र यांच्या पुरातन कथांचें बराबर पहाणें.** स्वतंत्र. अ. मि. १८४५, पृ. ४३.

हें पुस्तक कोठेंच सांपडत नाहीं.

**७ काल्पनीक विज्ञानाविषयींचें संक्षेपेंकरून कथनं** ( *Historical Sketch of the Different Systems of Speculative Philosophy.* ) स्वतंत्र. ट्रॅ. सो. १८५२, पृ. ४६.

हें पुस्तक महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें असून त्याची दुसरीहि एक ५७ पृष्ठांची प्रत त्या ठिकाणीं आहे.

या पुस्तकाची माहिती स्टीव्हन्सन पुढीलप्रमाणें देतो :—

" पदार्थांचें मूळ कारण काय आहे, जगाची उत्पत्ति कशी झाली, इंद्रियगोचर वस्तु कशा आणि कोठून झाल्या आणि पुढें काय होईल, हे सर्व विचार काल्पनीक विज्ञानांत मोडतात. " ( पृ. ५ )

खिस्ती शास्त्रांतील नियम सांगून अखेरीस स्टीव्हन्सन या पुस्तकांत म्हणतो,

" जरी इंद्रियवश मनुष्यांनीं ह्या ज्ञानाचा धिकार फारच केला, तरी हें ईश्वरप्रेरित ज्ञान आहे. आणि ज्या लाखो माणसांनीं ह्याचा अंगिकार केला, त्यांच्या मनांत सुखशांति भरून राहिली. " ( पृ. ४६ )

स्टीव्हन्सननें निरनिराळ्या नियतकालिकांमध्यें लिहिलेले लेख पुढीलप्रमाणें आहेत :—

**१ एक इंग्लिश वकील व एक मराठी माणूस या दोघांमध्यें इंग्लिश न्यायाविषयीं संभाषण :** [२७]

स्टीव्हन्सन यानें हें संभाषण सन १८३१ मध्यें लिहिलें. तें पुण्याच्या कलेक्टरला फार आवडल्यामुळें त्यानें त्याचा पुरस्कार मुंबईचा गव्हर्नर याच्याकडे एका पत्रद्वारें केला. या पत्रात पुण्याचा कलेक्टर म्हणतो, " आपल्या कायद्यांतील नियम व तत्वें याची लोकांस चुकीची माहिती असते व त्याविषयीं त्या लोकात अज्ञान असतें. यासाठीं गोष्टीरूपानें व मनोरंजक रीतीनें लोकास हा विषय समजावा म्हणून स्टीव्हन्सन् याना विनंती केल्यावरून त्यांनीं मराठींत हें संभाषण करून दिलें आहे. हें संभाषण लोकांमध्यें वाटावें यासाठीं ५० प्रती चांगल्या कागदावर व २००० प्रती साध्या कागदावर छापून घ्याव्यात. " [२८]

पुण्याच्या कलेक्टरच्या या पत्रास उत्तरादाखल गव्हर्नर ह्रेअर लिहितो, " अशा प्रकारचीं पुस्तकें छापून मॅजिस्ट्रेटनीं वांटणें हें सरकारी कामाच्या कक्षेत येईल कीं काय,

२७. *G. D. Vol.* 18/237. 1831, pp. 47 to 50.
२८. *Ibid.*, p. 35-37.

याची सरकारास शंका आहे. तेव्हां स्टीव्हन्सन यांनीं सरकारी मदतीसाठीं जर अर्ज केला तर ही गोष्ट प्रसिद्ध करण्यासाठीं त्यांना सरकारी मदत देण्यांत येईल, हाच यांत उत्तम मार्ग होय."[११]

कसेंहि असो, स्टीव्हन्सन याची ही गोष्ट छापून प्रसिद्ध झालेली दिसत नाहीं. ती तशीच सरकारी दप्तरांत पडून राहिली. कायद्यासारख्या क्लिष्ट विषयाची माहिती संभाषणात्मक व मनोरंजक पद्धतीनें देण्यासाठीं स्टीव्हन्सननें अशा प्रकारचें लेखन करावें हें विशेष आहे. या संभाषणांतील भाषा नीट समजण्यासाठीं प्रारंभींचा कांहीं भाग पुढें देण्यांत येत आहे :—

"[मराठी बोलतो] आज तुमची भेट झाली यास्तव मी फार समाधान पावलों. आज्ञा होईल तर तुमचें न्यायाविषयीं मी कांहींएक प्रश्न करीन. तुमचा न्याय बहुत प्रौढ आहे पण थोडक्या गोष्टीविषयीं संशय आहे. आपण कृपा करून त्या संशयाची निवृत्ति करावी.

[इंग्लिश वकील म्हणतो] तुमचा संशय दूर करण्याविषयीं जें माझ्यानें होईल तें करावयाला मी तयार आहें. सर्व रयतेचें कल्याण असावें अशा इंग्लिश सरकारचा फार हेतु आहे पण अझूण तुमचें कल्याण चांगलेंसें होत नाहीं. रयतेचें हित न व्हावें अशी कंपणीचे कारमान्याचीहि इच्छा नाहीं. पण अशा अडचणी एकेक प्रात होतात कीं जांचें निवारण लवकर होतच नाहीं. त्यामुळें असें होतें. इंग्लिश न्यायांत कोणत्या गोष्टी तुम्हांला वांकड्या दिसतात त्या मला सांगा.

[मराठी] आम्हाला एक गोष्ट फारच चमत्कारिक दिसते कीं तुमचा न्याय असा चांगला असता चोराला पारपत्य चांगलेंसें होत नाहीं.

[इंग्लिश वकील] काय म्हणतां आमचे लोक चोराला मारीत नाहींत! मारतात.

[मराठी] अपराधी ठरविल्यानंतर त्यास मारितात खरें, पण त्याकडे अपराध लागू करावयास साक्षी लागतात तेथें आमचा अगदीं उपाय चालत नाहीं. काय जेव्हां चोर चोरी करायाला येतो तेव्हां दोन-तीन साक्षी घेऊन येतो असें इंग्लिश न्यायाधीशाला वाटतें काय म्हणून साक्षी मागतो."[१०]

२ *An Essay on the Vernacular Literature of the Marathas*, १८४१.[११]

या लेखांत मराठी वाङ्मयाची तुलना जरी युरोपियन वाङ्मयाशी होणार नाहीं, तरी आपण समजतों त्याप्रमाणें तें पाठीमागें नाही असेंहि स्टीव्हन्सननें या लेखांत म्हटलें आहे. मराठ्यांचें मुख्य वाङ्मय प्राकृत बोलींत आहे असें तो म्हणतो. पहा:—

९. *Ibid.*, p. 52.

१०. *Ibid.*, p. 47.

११. *The Journal of the B. B. R. A. S.*, July 1841, pp. 1–10.

"The Marathas have, besides, a literature of their own written in a dialect called the Pracrit. This Pracrit, as will fully appear from the specimens afterwards to be given, is nothing but the present spoken language in an antique dress." [३१]

सर्व मराठी वाङ्मय प्राकृतमध्यें लिहिलें आहे, असें सांगून स्टीव्हन्सननें प्राकृत कवींची नांवें व त्यांची माहिती दिली आहे. सर्वांत जुना प्राकृत लेखक नामदेव होय, असें त्यानें सांगितलें आहे. त्यानंतर जनाबाई, मुक्ताबाई, ज्ञानोबा, श्रीधर, आत्मनायक नांवाचा महार, तुकाराम ( The most Pracrit writer of eminence ), रामदास, वामन व मोरोपंत यांची माहिती दिली आहे.

हा लेख लिहिण्याचा हेतु स्टीव्हन्सननें पुढीलप्रमाणें सांगितला आहेः—

"I should wish to see the attention of learned natives directed to a selection of some of the best of the pieces above-mentioned, for the purpose of having two or three volumes accurately printed, with an index of difficult words for the sake of beginners. The study of these authors would improve the style of Maratha composition, which is in danger at present, from an almost exclusive attention to foreign literature." [३२]

डॉ. स्टीव्हन्सनच्या लेखानें फार महत्त्व असून यांत मुख्य अशा मराठी लेखकांचें समालोचन केलें आहे. ज्याना त्यांची माहिती मिळवायची असेल त्यांना या लेखाचा फार उपयोग होईल, अशा तऱ्हेचा अभिप्राय *O. C. S.* मध्यें नमूद करण्यांत आला आहे. [३३]

३ *An Essay on the Language of the Aboriginal Hindus, 1842.* [३४]

या लेखांत मुख्यतः हिंदी, बंगाली, गुजराती, मराठी, तेलगू, कानडी, तामिळ व सिंहली या भाषांच्या व्याकरणविषयक घडणी (Structure) मध्यें साम्य आहे, हें स्टीव्हन्सननें सांगितलें आहे.

४ *An Essay on the Points of the Similarity and Dissimilarity between the English and Marathi Language., 1847* [३५]

---

३१. *Ibid.*, p. 1.

३२. *Ibid*, p. 10.

३३. *O. C. S.*, August 1841, p. 381.

३४. *The Journal of the B. B. R. A. S.*, January 1812, pp. 103-126.

३५. Thomas Candy—*Dictionary : English and Marathi*, 1847, pp. 9-19.

स्टीव्हन्सननें कँडीच्या इंग्लिश-मराठी शब्दकोशाच्या १८४७ च्या आवृत्तींत हा लेख लिहून इंग्लिश व मराठी भाषांत साम्य व भेद दाखविला आहे.

५ *Observations on the Grammatical Structure of the Vernacular Languages in India, 1849–52.*[३७]

हिमालयाच्या पायथ्यापासून तों सिलोनच्या दक्षिण टोकापर्यंत आणि कॉकेशसपासून तों आसामपर्यंत अनेक भाषा आहेत; परंतु त्या एकमेकांस जवळ आहेत असा सिद्धान्त स्टीव्हन्सननें या चार लेखांतून मांडला आहे.

६ *A Comparative Vocabulary of Non-Sanscrit Vocables of the Vernacular Languages of India, 1852.*[३८]

भाषाशास्त्रावरील हा लेख स्टीव्हन्सननें रॉयल एशियाटिक सोसायटीच्या जर्नलमध्यें लिहिलेला आढळतो.

७ *A Comparative Vocabulary of Non-Sanscrit Primitives in the Vernacular Languages of India, 1853.*[३९]

हा लेख स्टीव्हन्सननें दोन भागांत लिहिला आहे. यांत हिंदुस्तानी व मराठी शब्दांचें मूळ कानडी व तामिळ या भाषांत आहे, असें स्टीव्हन्सननें सांगितलें आहे. तो म्हणतो,

"There are many roots, no doubt, in the Southern family that cannot be traced into the Northern languages; but I trust I have succeeded in explaining the origin of many Hindustani, and more Marathi words from the Canarese and Tamil." [४०]

८ *Observations on the Marathi Language.*[४१]

या लेखांत स्टीव्हन्सननें मराठी भाषेविषयीं महत्त्वाचे विचार मांडले आहेत. मराठी भाषेविषयीं तो म्हणतो,

"The Marathi is a very expressive language, and with the sources to draw on we have already mentioned, is capable of being applied to all the purposes of science and literature...There are variations in the language which amount to almost different

३७. *The Journal of the B. B. R. A. S.*, January 1849, pp. 71–76, January 1850, pp. 1-7, January 1851, pp. 196–202 व January 1852, pp. 15–20.

३८. *The Journal of the B. B. R. A. S.*, January 1852., pp. 117-131.

३९. *Ibid.*, January 1853, pp. 319–339.

४०. *Ibid.*, January 1853, p. 319.

४१. *Observations on the Marathi Language*, Art. IX, pp. 84 to 91

dialects, but they are hardly of sufficient importance to merit any particular notice here." [४२]

स्टीव्हन्सन येथून जाण्यापूर्वी त्याच्या सत्काराची सभा स्कॉटिश चर्चमध्ये त्याच्या मित्रांनी भरविली होती. त्या प्रसंगीं स्टीव्हन्सन यांच्या वाङ्मयकार्याबद्दल गौरव करण्यांत आला. या निमित्ताने रे. कुक यानें भाषण केलें. त्याच्या या भाषणांतून स्टीव्हन्सन याची योग्यता व त्याच्या कार्याचें महत्त्व आपणांस दिसून येईल. यांतील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणें आहे—

"As an accomplished Oriental Scholar and Antiquary, Dr. S. is wellknown and justly esteemed. His contributions to literature and antiquarian research have been numerous and valuable. He has given the public a Marathi Grammar, which is highly esteemed; various and important translations of religious works,..." [४३]

## ४ रे. रॉबर्ट नेस्बिट

हा इ. स. १८२७ मध्यें हिंदुस्तानांत आला व १८५५ मध्यें कॉलऱ्यानें मृत्यु पावला.[४४] नेस्बिट येथें आल्यानंतर त्यानें मराठी भाषेचा अभ्यास केलाच; परंतु हिंदुस्तानी व संस्कृत या भाषांचेंसुद्धां चांगलें अध्ययन केलें. त्याच्या या अभ्यासाविषयीं रे. मरे मिचेल पुढीलप्रमाणें लिहितो,

"Nesbit studied Sanskrit and Hindustani; but his forte was Marathi. In the pronunciation of the language he was marvellously accurate. He was equally scrupulous as to accuracy of idiom. No wonder then that, when he preached, he held the ears and eyes of his hearers captive. It was impossible, even for the most bigoted Brahman, not to admire the carefully prepared ideas, couched in the most perfect and appropriate language." [४५]

मराठी भाषा शिकल्यानंतर हा लोकांना धर्मोपदेश करण्याकरितां दौऱ्यावर जाऊं लागला. याविषयीं आपल्या रिपोर्टांत त्यानें कांहीं उल्लेख केले आहेत.[४६]

४२. *Ibid.*, p. 90.

४३. ज्ञानोदय, १ मे १८५४, पृ. १२९.

४४. नेस्बिटच्या जाण्याच्या पुढील ज्ञानोदयानें दिलें आहे. ज्ञानोदय ता. १५ मे सन १८५५. पृ. १५२. त्याच्या मृत्यूची माहिती मिचेलनें दिली आहे. पहा. J. Murray Mitchell-*In Western India*, p. 312.

४५. J. Murray Mitchell-*In Western India*, p. 51.

४६. *O. C. S.*, February 1839., pp 69, 71; April 1840, pp. 159-167, February 1840, pp. 66-84; March 1840, pp. 107-120; May 1840, pp. 205-214.

पुणें येथें असतांना तो मराठींत धर्मोपदेश करीत असे, याविषयीं मिशनच्या रिपोर्टांत तो म्हणतो—

"I have still two services in English, and one in Marathi, on that day, and continue to give usual lecture on Thursday evening." [४७]

याच रिपोर्टांत अक्कलकोटच्या दौऱ्याची माहिती देतांना, तेथील राजाची मुलाखत घेऊन आपण त्याच्याशीं मराठींत संभाषण केलें असें तो नमूद करतो. पाहा :—

"When at Akalkot I had an interview with the young Raja, and conversed with him a considerable time in Marathi. He seems to know the dignity of truth, and to be aware by whom it is observed and whom it is not." [४८]

राजेरजवाडे, सरदार वगैरे लोकांकडे या मिशनरींचें जाणेंयेणें असे. अक्कलकोटच्या राजाप्रमाणें म्हसवड येथेंहि एका राजाला भेटून त्याच्याशीं नेस्बिटनें धार्मिक विषयावर संभाषण केलें व मराठी भाषेंतील 'नव्या कराराची' एक प्रत भेट म्हणून त्याला दिली.[४९]

नेस्बिट हा मिशनरी कार्याप्रमाणें, फ्री चर्च विद्यालयांत मराठी शिकवीत असे. हा विषय शिकविण्यासाठीं त्याची फार ख्याति होती असें दिसतें. आपल्या शालेय जीवनाची माहिती देतांना बाबा पदमनजींनीं फ्री चर्च विद्यालयांविषयी जी माहिती दिली आहे, त्यांत ते नेस्बिट यांच्याविषयीं म्हणतातः

"हे साहेब आह्मास मराठी शिकविण्याविषयीं फार श्रम घेत. आम्हीं इंग्रजीवरून जीं भाषांतरें करावीं, किंवा नवीन निबंध रचावे, ते घरीं नेऊन शुद्ध करून त्यावर स्वाभिप्राय लिहून आणून आम्हांस परत देत."[५०]

नेस्बिट यानें बायबलच्या भाषांतर कमिटींत भाग घेऊन जुन्या कराराच्या कांहीं भागाचें भाषांतरहि केलें आहे. ग्रेव्हज अमेरिकेला गेल्यानंतर त्याच्या जागीं नेस्बिटला घेण्यात आलें.[५१] त्यानें 'सेंट मार्कचें गॉस्पेल' या भागाचें मराठींत भाषांतर केलें.[५२] पुढें ह्या पुस्तकाच्या ८००० प्रती छापण्यांत आल्या.[५३]

---

४७ *O. C. S.*, February 1833, p. 76.
४८. *O. C. S.*, Feburary 1833, p. 78.
४९. *O. C. S.*, June 1834, p. 180.
५०. बाबा पदमनजी, अरुणोदय, पृ. २५४.
५१ *O. C. S.*, November 1832, p. 504.
५२. *O. C S.*, April 1834, p. 137 व April 1835, p. 150.
५३. *O. C. S.*, May 1835, p. 194.

या पुस्तकाप्रमाणें 'हिब्रू'चें मराठी भाषांतरहि त्यानें केलें.[५४] या भाषांतराविषयीं तो म्हणतो,

"In the department of the *tracts*, I have to notice the translation of the Address of the Church of Scotland to the Children of Israel. This has been made with a special reference to the Beni-Israel of this Presidency...It is, I believe, only the second work in Marathi prepared especially for them." ५५

बायबलच्या या भाषांतराशिवाय नेस्बिटनें इतर कांहीं मराठी पुस्तकें लिहिलीं आहेत. तीं पुढीलप्रमाणें :—

१. खरें प्रायश्चित्त (*The True Atonement*) स्वतंत्र. ट्रॅ. सो. १८३०, पृ. ४७.

हें पुस्तक कोठेंच उपलब्ध नाहीं, पण याची माहिती 'ज्ञानोदयां'त आली आहे. तिच्यावरून या पुस्तकाच्या भाषेचा नमुना :—

"अहो लोकांनो, जें प्रायश्चित्त देवाच्या पुत्रानें केलें तें खरें. जें पुण्य केलें तें निर्मण (निर्मळ ?), अक्षय, अनंत असें आहे. त्याच्या पुण्याचें अगत्य तुम्हांस लागतें आणि त्याचें पुण्य तुम्ही मागून घेतलें पाहिजे."[५६]

२. भगवद्गीतेचें सार (*Analysis of the Bhagawut Gita*) स्वतंत्र. ट्रॅ. सो. १८३२, पृ. ११०[५७]

हें पुस्तक अहमदनगर येथें अमेरिकन मिशनमध्यें व महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें आहे. याची सुरुवात नेस्बिटनें पुढीलप्रमाणें केली आहे :—

"भगवद्गीता हिंदु लोक फार वाचतात ॥ गीता महाभारतामध्यें भीष्म पर्वीं सांगितली आहे ॥ ते भारत पांचवा वेद आहे असें म्हणतात ॥ सर्व भारतापेक्षां गीता चांगली असें बहुत लोकांस वाटतें. कारण गीता फार करून भगवानाचें वाक्य आहे ॥

"कौरव आणि पांडव यांमध्यें लढाई होत असतां कृष्णाचें आणि अर्जुनाचें रणांत संभाषण झालें तें गीतेंत सांगितलें आहे ॥ आपल्या नातलगांस मारण्याचा प्रसंग आला होता म्हणून अर्जुनाला दया येऊन तो युद्धास प्रवर्तेना ॥ तेव्हां त्याची समजूत व्हावयासाठीं कृष्णानें बहुत गोष्टी त्याला सांगितल्या. त्या गोष्टींचें सार पुढें सांगतों." (पृ. ३)

---

५४. *O. C. S.*, March 1839, p. 111.

५५. *O. C. S.*, September 1843, p. 492.

५६. ज्ञानोदय, १६ आक्टोबर १८४८, पृ. ३०५.

५७. *O. C. S.* January 1847, p. 32.

अशी पुस्तकाची सुरवात करून भगवद्गीता खरी नाहीं असा शेवटीं निष्कर्ष काढला आहे.

३. हिंदुशास्त्रांत सांगितलेलें ब्राह्मणांचें महत्त्व ( *The Brahmin's Claims* ) स्वतंत्र. ट्रॅ. सो. १८३२, पृ. ८६.

हें पुस्तक अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें आहे. या पुस्तकाची १८४८ सालची १२६ पृष्ठांची चवथी आवृत्ति महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें आहे.

या पुस्तकांत ब्राह्मणांची उत्पत्ति कशी झाली हें सांगून ब्राह्मणाचें स्वरूप व गुण सांगितले आहेत. शेवटीं लेखक म्हणतो—

" कोणी मनुष्यानें आपली उत्पत्ति अथवा स्वरूप अथवा गुण अथवा पद अथवा अधिकार अथवा कृत्यें याविषयीं वल्गना कराची हें वेडा मनुष्य आपला तृणरूप मुगुट मिरवितो आणि ज्या लाहान कोठडींत तो घातलेला असतो तिजविषयीं हा सर्व माझा मुलूख आहे असें मान डोलवून बोलतो त्या वेडेपणापेक्षां वाईट आहे. " (पृ. १०९-११० )

४. पृथिव्यादि भूतांचें भजन. ( *Worship of the Elements* ) स्वतंत्र. ट्रॅ. सो. १८३५, पृ. ३६.

अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें हें पुस्तक आहे या पुस्तकांतील पुढें दिलेल्या उताऱ्यावरून यांतील मायेचें स्वरूप समजून येईल:

" देवानें संपूर्ण जग कर्त्तेसमयीं पृथिव्यादि भुतें उत्पन्न केलीं. तीं भुतें देवानें केल्याच्या पूर्वीं अगदींच नव्हतीं, तीं जेव्हां त्यानें केलीं तेव्हांच झालीं. तीं अगोघर देवाच्या स्वरूपांत लीन होऊन राहिलीं होतीं अथवा दुसऱ्या कोणत्याहि ठिकाणीं होतीं असें कांहीं नाहीं, तीं देवाच्या अंगचीं नाहींत. तो तीं आपल्या अंगांतून काढीत नाहीं. अथवा आपल्या अंगाचा विस्तार करून प्रगट करीत नाहीं. तो निराळा तीं निराळीं. तो करणारा तीं केलेले पदार्थ त्याच्या आज्ञेनें तीं झालीं. त्याच्या आज्ञेनें तीं आहेत. त्याची आज्ञा झाल्यास तीं नाहींशीं होतील. म्हणजे कशीं तीं त्यामध्यें लीन होतील असें नाहीं तर त्यांचें अस्तित्वच जाईल. " ( पृ. १ )

" अज्ञान आणि विपरीत बुद्धि या दोहोंच्या योगानें भूम्यादि भुतांचें भजन होऊं लागलें आणि आजपर्यंत चाललें आहे. तें भजन केवळ व्यर्थ विपरीत आहे आणि त्यांत मूर्खत्व फारच आहे हें उघड करून दाखवावयास महुत आयास नको. " ( पृ. ५-६ ).

एकंदरींत पृथिव्यादि म्हणजे पंच महाभूतांचें भजन करणें हें वेडेपणाचें लक्षण असून येशू ख्रिस्ताला शरण जाऊन त्याचें पुण्य मागून घ्यावें अशा तऱ्हेचा या पुस्तकाचा शेवट केला आहे.

५. ( *Catechism Assembly's Shorter* ) भाषांतर, १८३६, पृ. ३६.

६. होळीविषयीं उपदेश. स्वतंत्र. ट्रॅ. सो. १८४७, पृ. ५३.
वरील दोनहि पुस्तकें कोठेंच उपलब्ध झालीं नाहींत.

### ५. डॉ. जॉन विल्सन

हा १८२८ मध्यें हिंदुस्थानांत आला व १८७५ मध्यें मुंबईजवळ मरण पावला. आपल्या सत्तेचाळीस वर्षांच्या वास्तव्यांत विल्सननें विविधप्रकारचें कार्य केलें. शिक्षणाचें व हस्तलिखित ग्रंथ गोळा करण्याचें त्याचें कार्य विशेष आहे. सर्व धर्मांचा त्यानें सूक्ष्म अभ्यास केला होता. हिंदु व पारशी धर्मावर त्यानें पुस्तकें लिहिलीं आहेत. १८३० मध्ये 'ओरिएंटल ख्रिश्चन स्पेक्टेटर' या मासिकाची सुरवात त्यानें केली.[५८] १८३५ मध्यें बॉम्बे लिटररी सोसायटीचा अध्यक्ष म्हणून विल्सन याला निवडण्यांत आलें. पुढें १८६८ मध्यें मुंबई विद्यापीठाचा उपकुलगुरु म्हणूनहि त्याची नेमणूक करण्यांत आली.

मुंबईस आल्यानंतर प्रथम कांहीं काळ विल्सन कोंकणांत राहिला व तेथें त्यानें मराठीचा अभ्यास सुरू केला. या अभ्यासाविषयीं तो स्वतः म्हणतो,

"When I was in the Konkan I generally devoted about nine hours to the study of Marathee... I afterwards principally depended on my pundit, who had only a knowledge of Marathee, and on the literary helps which I could obtain." [५९]

मराठी भाषेचा अशा तऱ्हेनें अभ्यास करून विल्सननें जें प्राविण्य मिळविलें, त्याबद्दल त्यानें परमेश्वराचे आभारहि खालील शब्दांत मानले आहेत:—

"I thank God for enabling me to make much greater progress than I expected." [६०]

अशा रीतीनें मराठीवर प्रभुत्व मिळवून विल्सन ठिकठिकाणीं मराठींत धर्मोपदेश करूं लागला. विल्सनच्या या धर्मोपदेशाबद्दल *O. C. S.* मध्यें पुढील-प्रमाणें उल्लेख आढळतो.

"Mr. Wilson, after assiduous application to the study of the Marathee language, from his arrival in February, during most of which time he resided in the Concan, returned in the end of the last month to Bombay, to re-establish the mission there, having

---

५८. या मासिकाचें उद्दिष्ट व हेतू "To convey intelligence of the progress of the Gospel and to promote the encouragement of religious enquiry." असा विल्सननें दिला आहे. पहा- *O. C. S. Vol.* 13/210 1830, p. 210.

५९. Smith, *The Life of John Wilson*, p. 59.

६०. *Ibid.*, p. 73.

previously so far mastered the language as to enable him to preach in Murathee and carry on the other branches of missionary labour." ६१

विल्सन मराठींत धर्मोपदेश करी, याविषयींचे दोन तीन उल्लेख आढळून येतात.[६२] मराठी भाषेप्रमाणें ज्या लोकांना हिंदुस्तानी भाषा समजत असे अशा मुसलमान लोकांसाठीं विल्सन हिंदुस्थानी भाषेंत धर्मोपदेश करीत असे. इस्रायल लोकांमध्येंहि त्याचें दळणवळण असे. त्या लोकांना 'जुन्या करारा'चा अभ्यास करण्यास हुरूप यावा म्हणून त्यानें हिब्रू भाषेचें मराठींत व्याकरण लिहिलें.[६३] मराठी व हिंदुस्तानी या भाषाप्रमाणें गुजराती, संस्कृत व फारशी या भाषांचाहि त्यानें चांगला अभ्यास केला होता.[६४] विल्सनच्या या निरनिराळ्या भाषाज्ञानामुळें बॉबे मिशनरी युनियनची ९ वी वार्षिक सभा भरली असतां त्या सभेंत, मिशनरी लोकांनीं एतद्देशीय लोकांची एक भाषा शिकल्यानंतर त्यांची दुसरी एकादी भाषा शिकावी अशा विचारहि त्यानें मांडला होता.[६५] निरनिराळ्या प्रांतांत कोणती भाषा प्रचलित आहे याचाहि अभ्यास आपल्या दौऱ्यांत विल्सन करीत असे. धारवाड कलेक्टरेटमध्यें मराठी भाषा असून तेथील लोक मराठी भाषा चांगली बोलतात असें त्यानें नमूद करून ठेवलें आहे. तो लिहितो,

"We ascended the remaining part of the Ghat, and entered the Dharwar Collectorate. We found that the Marathi was their native language; and that they spoke it with purity. They considered the Marathi of the Goanese territories as merely *hotch-potch*." ६६

या दौऱ्यांत व मुंबईतहि विल्सनची मराठी भाषेंत व्याख्यानें होत. त्याचा श्रोत्यांवर किती परिणाम होत असे, हें बाबा पदमनजी यांनीं आपल्या चरित्रांत पुढीलप्रमाणें सांगितलें आहे :—

"त्याचें मला प्रथमदर्शन व्याख्यानाच्या प्रसंगींच झालें, परंतु तें वर सांगितलेल्या व्याख्यानमालिकेंतलें नव्हतें. ते पालस्तैन देशाचा प्रवास करून आल्यावर त्याचा वृत्तांत Lands of the Bible नामक स्वकृत ग्रंथांतून आपल्या अंग्रेजी कि चर्च मंडळीस मराठींत सांगत असत. त्याची बातमी मला लागल्यावरून मी तेथें जाऊं

६१. *O. C. S*, February 1830, p. 40.

६२. *O. C. S.*, February 1830, p. 45. तसेंच *O. C. S.*, January 1834, p. 27, येथें धर्मोपदेश करण्याचें वेळापत्रक विल्सननें दिलें आहे.

६३. *O. C. S.*, March 1832, p. 96.

६४. J. Murray Mitchell-*In Western India*, p. 51.

६५. *O. C. S.*, December 1833, p. 505.

६६. *O. C. S.*, April 1834, p. 125.

लागलीं. इंग्लिश गृहस्थास मराठी बोलतांना ऐकण्याचा हा माझा प्रथमच प्रसंग. त्यांचें भाषण मी आश्चर्यानें ऐकत असें."[६७]

या व्याख्यानाच्या द्वारां विल्सन हा धर्मासंबंधीं बरेंच कार्य करीत असे, असें स्पष्ट दिसतें. या धार्मिक भावनेने त्यानें जें कार्य केलें त्यांतूनच त्याच्या हातून मराठींत ग्रंथलेखन झालें.

विल्सननें डॉ. स्टीव्हन्सन व रे. फरार यांच्याबरोबर 'लूकाचें गॉस्पेल', 'जॉनचें गॉस्पेल', 'मॅथ्यूचें गॉस्पेल' व 'एपिस्टल टु दि रोमन्स' या बायबलच्या भागांचें भाषांतर केलें, असा उल्लेख *O. C. S.* मध्यें आढळतो.[६८] या बायबलच्या भाषांतराशिवाय विल्सननें मराठींत पुढीलप्रमाणें पुस्तकें लिहिलीं आहेत :

१. देव कसा आणि खरे भक्त कसे ? ( *The Nature of God and the Character of true Worshippers* )—१८३१ पृ. २८.

२. *A Grammar of the Hebrew Language, with points in Murathee*. १८३१.[६९]

हीं दोन्हीहि पुस्तकें उपलब्ध नाहींत.

३ हिंदुधर्माचें पहिलें प्रसिद्धीकरण ( *An Exposure of the Hindu Religion.* ) स्वतंत्र. अ. मि. १८३२, पृ. १५९.

हें पुस्तक महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें आहे. तें मोरभट दांडेकर यांच्या पुस्तकाला लिहिलेलें उत्तर होय. विल्सननें दांडेकरांच्या पुस्तकाचें भाषांतर व आपलें हें उत्तर एकत्र छापून प्रसिद्ध केलें व याची किंमत तीन रुपये ठेवली. फक्त प्रसिद्धीकरण वेगळें छापून तें दीड रुपयांस विकण्याची सोय करण्यांत आली होती. हें पुस्तक लिहिण्याचें कारण काय घडलें व या पुस्तकाचा उद्देश काय होता, याचा खुलासा पुढीलप्रमाणें आढळतो :—

"On the appearance of the Bhatta's Tract, we promised to notice it; but we found that our space would not allow us to do justice to the different subjects which it embraced. Our readers, however, who may be interested in the discussion, to which it refers, have now an opportunity of judging of both sides of the question." [७०]

या पुस्तकांतील पुढें दिलेल्या उताऱ्यावरून विल्सनच्या भाषेचें स्वरूप ध्यानीं येईल.

---

६७. बाबा पद्मनजी, अरुणोदय, पृ. १६९.

६८. *O. C. S.*, April 1836, p. 170.

६९. हिब्रू व्याकरणाचा उद्देश काय आहे, याची माहिती *O. C. S.* मध्यें दिली आहे. पहा, *O. C. S.*, July, 1831, p. 249.

७०. *O. C. S.*, April 1832, p. 132.

" हिंदु धर्मोपद्रयाचें कारण मोरभट्टाचे ग्रंथीं असें ध्वनित होतें कीं, 'उत्तरोत्तर हिंदु लोकांत विद्या कमी होत चालली आहे ' याजवरून मी असें म्हणतों कीं, बहुत लोकांचा निश्चय झाला कीं, जर खऱ्या विद्येचा प्रसार होईल तर निश्चय हिंदुधर्म लयास जाईल. खऱ्या विद्येच्या व पुराणाच्या सिद्धान्तास परस्परें फार विपरीत तत्व आहे. तें असें कीं, पृथ्वी गोळाकार असतां पुराणांत पुष्कर पत्रासारिखी व कांहीं पटांगणासारखी वर्णिली आहे...वेदांतहि मागल्यासारख्या पुष्कळ चुका आहेत. उदाहरण चंद्रापासून पाऊस येतो ! " (पृ. ५)

४. पहिली प्रश्नोत्तरावली (*An Elementary Catechism*)[७१] १८३३, पृ. २२.

हें पुस्तक कोठेंच उपलब्ध होत नाहीं.

५. पाऊसासाठीं प्रार्थना (*Prayer for Rain*) स्वतंत्र-ड्यु.सो. १८३३, पृ. ४.

हें पुस्तक अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें आहे. या पुस्तकांतील पुढील उतारा पहा—

" हे भगवाना आम्ही नम्रता धरून तुजजवळ येतों. तुझें भजन मनानें व सत्यतेनें करायास आमची इच्छा आहे. आपल्या अपार पराक्रमानें त्वा आम्हांस उत्पन्न केलें आणि अपार अनुग्रह करून त्वां आमचें रक्षण केलें आहे. (पृ. १)

"...हे आमच्या देवा आम्हांवर दया व कृपा कर. पाहा आम्ही तुझे लोक आपल्या दुःखास्तव तुझी प्रार्थना करितों, कीं महागाई आणि दुष्काळ जीं आम्हीं आमच्या अन्यायामुळें यथार्थ रीतीनें भोगतों, तीं तूं आपल्या चांगुलपणानें फिरवून स्वस्ताई आणि सुकाळ कर. आकाशांतून पाऊस पाठीव कीं तेणेंकरून पृथ्वीवर मनुष्यांकरिता आणि पशूकरितां अन्नोदक पुरतें व्हावें. पाऊस तुझ्या स्वाधीन आहे. त्याची आम्हावर तुझ्या औदार्यानें वृष्टी कर कीं तेणेंकरून आम्ही तुजपुढें हर्षयुक्त होऊं आणि तुझी स्तुति करीत राहूं. " (पृ. ३)

विल्सनच्या पुस्तकातील या उताऱ्यावरून विल्सनची मराठी भाषा कशी होती हें दिसून येईल.

६. वाक्यावली. इंग्रेजी आणि मराठी. (*Idiomatical Exercises Illustrative of the Phraseology and Structure of the English and Marathi Languages*)—१८३३, पृ. २५८.

या पुस्तकाची दुसरी आवृत्ति १८३९; तिसरी आवृत्ति १८५१, पृ. ३०४; पाचवी आवृत्ति १८६८, पृ. ३३४ अशा आवृत्त्या निघाल्या. या पुस्तकाची १८३३ ची आवृत्ति महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथे असून त्यावर डार्फेनें 'संभाषणात्मक इंग्रजी-मराठी वाक्यें ' असें शीर्षक दिलें आहे.

७१. *O. C. S.*, January 1834; p. 30, *O. C. S.*, January 1853, p. 31.

या देशांतील लोकांना इंग्लिश भाषेचा अभ्यास करण्यासाठीं या पुस्तकाचा उपयोग होईल, असा या पुस्तकाचा उद्देश विल्सननें सांगितला आहे.[७१] या पुस्तकाच्या स्वरूपासंबंधानें स्पष्ट कल्पना विल्सननें प्रस्तावनेंत दिली आहे ती अशीः—

"It comprises a variety of sentences illustrative of the phraseology and structure of the English and Marathi languages, arranged alphabetically under the heads of Nouns, Adjectives, Verbs and Irregular Verbs.

"The sentences are designedly short. Some of them are in the form of maxims, but most of them are in a simple colloquial form, which is perhaps the best for facilitating the acquisition of words and phrases."[७२]

या पुस्तकाच्या पांचव्या आवृत्तींत मराठी शब्दकोशाच्या परीक्षणाचा भाग (३५ पृष्ठें) आरंभीं दिला आहे. या पुस्तकाच्या या वाढविलेल्या भागाविषयीं विल्सननें त्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत पुढील उल्लेख केला आहेः—

"To this fifth Edition (as to the previous one) I have prefixed a contribution which I lately made to the Bombay Quarterly Review—A Review of the Marathi Dictionary, including Remarks on the Marathi language and Hints on its study."[७४]

७. **दुसरें हिंदुधर्म प्रसिद्धीकरण** (*Second Exposure of the Hindu Religion*). स्वतंत्र. मुंबई. १८३५, पृ. १७६.

या पुस्तकाची प्रत महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें आहे. हें पुस्तक नारायणराव यांस उत्तर म्हणून लिहिलें आहे. याविषयीं पुस्तकाच्या सुरवातीस विल्सननें जें निवेदन केलें आहे, तें त्याच्याच शब्दांत खालीं देण्यांत येत आहे :—

"मोरभट दांडेकरास जें म्यां पूर्वीं उत्तर दिल्हें त्या हिंदुधर्मप्रसिद्धिकरणांत म्यां आपली इच्छा अशी स्पष्ट दर्शविली होती कीं त्याजवर कोणी कांहिं उत्तर दिल्हें असतां त्यास प्रत्युत्तर द्यायास मी सिद्ध आहें. असें म्यां लिहिलें होतें त्याचें कारण असें आहे कीं जितके जितके मोठे विचार धर्मप्रकरणीं माझे आढळण्यांत आले तितक्याविषयीं जें सत्य तेंच मी बोललों असा माझा निश्चय होता. आणखी मला असें कळून आलें कीं हिंदुधर्मस्थापनेविषयीं कोणी जेवढा प्रयत्न करील

७१. *O. C. S.*, January 1834, p. 30. "It is hoped that it may be useful, and particularly to native youth who study English."

७२. डॉ. विल्सन, वाक्यावली-Preface पहा.

७४. वाक्यावली-आवृत्ति ५ वी, Preface, p. VI.

तितका त्या धर्माच्या खोटेपणाच्या अधिक आणि स्वच्छ निर्देशास कारण होईल आणि असे प्रयत्न करणारे आणि जे कोणी पुढें हीं उत्तरें प्रत्युत्तरें वाचतील ते सर्व त्यांतील दोषादोष पाहून ईश्वरी कृपेनें कदाचित् ख्रिस्तीधर्म स्वीकारतील. असा माझा विचार असतां मग माझ्या हिंदुधर्मप्रसिद्धिकरणास उत्तर स्वदेशधर्माभिमानी म्हणजे नारायणराव यानें दिलें म्हणून मला त्याचा खेद मानायास कांहीं कारण दिसत नाहीं. तें उत्तर कसेंहि असो आणि त्याच्या लिहिणाराचें सामर्थ्य कसेंहि असो परंतु मला असें वाटतें कीं त्यांतून माझ्या मनांत जो अभिप्राय आहे तो अनायासानें निघतो आणली त्यांची योग्यता सांगितली असतां अवघड प्रसंगीं हिंदुधर्म ज्या स्थानीं आश्रय पावतो त्या स्थानाचा नाश होईल ".[75]

८. खरा जो ख्रिस्ती धर्म त्यांत कांहीं हिंदु लोकांनीं प्रवेश केला त्याविषयीं वर्तमान ( *Hindu converts to Christianity* ). स्वतंत्र. ट्रॅ. सो. १८३८, पृ. १२.[76]

९. भगवान् कसा ओळखावा ( *On Knowing God* ).

हीं दोनहि पुस्तकें कोठेंच उपलब्ध नाहींत.

१०. *Bombay School Collection*, संपादन व भाषांतर, पृ. ८८.[77]

या पुस्तकाचें संपादन व कांहीं भागाचें भाषांतरहि विल्सननें केलें आहे. हेंहि पुस्तक कोठेंच मिळत नाहीं.

या पुस्तकांशिवाय इंग्रजींतून मराठी भाषाविषयक असे लेख विल्सननें लिहिले आहेत. त्यांची माहिती पुढीलप्रमाणेः—

१. *Marathi Proverbs*—Translated & Illustrated. 1837[78].

या विषयावर विल्सननें दोन लेख लिहिले आहेत. या लेखांत मराठी म्हणी देऊन त्यांचें स्पष्टीकरणहि इंग्रजींत त्यानें केलें आहे. यांपैकीं उदाहरणांदाखल कांहीं म्हणी खालीं देण्यांत येत आहेत. म्हणजे या म्हणी कोणत्या स्वरूपाच्या आहेत तें दिसून येईल.

१. अधिक रागा मग भीक मागा—Indulge your anger, and smart with hunger. Used to express the idea that a passionate man will never succeed in the world.

---

७५. डॉ. विल्सन, दुसरें हिंदुधर्मप्रसिद्धिकरण, पृ. १-२.

७६. *O. C. S.*, April 1837, p.151 व *O. C. S.* May 1838, p. 212.

७७. *O. C. S.*, January 1834, p. 30.

७८. *O. C. S.*, September 1837, pp. 406–408, *O. C. S.* October 1837, pp. 453–455.

२. आला वारा गेला वारा तो कोणाचा सोयरा? The wind came, the wind went; it is no one's cousin. "The wind and the tide for no man abide."

३. अंधळा मागत होता एक डोळा ईश्वरानें दिल्हे दोन. A blind man asked one eye, and God gave him two. Used when expectations are exceeded.

यापुढें मराठींतील कांहीं म्हणी नुसत्या देतों:—

४. आवडीला मोल नाय.

५. आभाळ गडगडे पाणी पडे.

७. आई जेऊं देईना आणि बाप भीक मागूं देईना.

८. आजाला नातू शिकविणार.

९. आऊत सोडून राऊत झाला.

२. *Notes on the constituent elements, the diffusion, and the application of the Marathi Language. 1857.*[७९]

मोल्सवर्थच्या मराठी-इंग्रजी शब्दकोशाच्या दुसऱ्या आवृत्तीकरितां विल्सननें हा लेख लिहिला आहे. या लेखांत ज्ञानेश्वरापासून मोरोपंतापर्यंत मराठी वाङ्मयाचा आढावा घेऊन त्या वाङ्मयाचे विशेष विल्सननें सांगितले आहेत.

३. *Tribes and Languages of the Bombay Presidency 1874.*[८०]

या लेखांत विल्सननें मुंबई इलाख्यांतील भाषांविषयीं माहिती दिली आहे.

विल्सन याला मराठी भाषेविषयीं फार आस्था वाटत वाटत होती व जे एतद्देशीय लोक मराठी भाषेचा तिरस्कार करितात त्याचें त्याला वाईट वाटे. एवढेंच नव्हे तर विद्यापीठानें वरच्या परीक्षेतून मराठी भाषा वगळल्यामुळें मराठी भाषेच्या अभ्यासाविषयीं अनास्था उत्पन्न झाली आहे, असें त्याचें मत होतें. याविषयीं उल्लेख आढळतो तो असा,

"In connexion with the disregard of their native tongue shown by educated young men Dr. Wilson regretted that the University had excluded Marathi from its higher examinations, which he considers a great discouragement to the study of that language." [८१]

---

७९. Capt. J.T. Molesworth, *A Dictionary Marathi and English*, (2nd Edition) 1857, pp. XXII to XXX.

८०. *Indian Antiquary*, Vol. III. August 1874, pp. 221-231.

८१. *The Bombay Educational Record*, Vol. IX. 1873, p. 101.

विल्सनच्या मराठी भाषेच्या व वाङ्मयाच्या कार्याचें महत्त्व, त्याला या भाषेविषयीं जी आस्था वाटत होती त्यावरून दिसून येण्यासारखें आहे.

## ६. मिसेस विल्सन

ही १८२८ मध्यें हिंदुस्तानांत आली व १८३५ मध्यें मरण पावली. मिसेस विल्सन हिनें मराठी भाषेचा अभ्यास केल्यानंतर मराठींत चार पुस्तकें लिहिलीं तीं पुढीलप्रमाणें :—

१. मेदी आणि पार्शी लोकांचें वृत्तांतकथन (आ. २ री) मुंबई, शिळाछाप, १८३८, पृ. ६०.

२. ग्रेकी लोकांचे वृत्तांतकथन—(आ. २ री) मुंबई, शिळाछाप, १८३८, पृ. ६४.

३. आशुरी व बाबेली लोकांचें वृत्तांतकथन—(आ. २ री) मुंबई, शिळाछाप, १८३८, पृ. ६१.

वरील तीनहि पुस्तकें महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें आहेत. यांपैकीं तिसऱ्या पुस्तकांतील पुढील उताऱ्यावरून मिसेस विल्सन हिची भाषा कशी आहे, हें वाचकांस समजून येईल.

"ह्या इतिहासावरून लोकांनीं ईश्वराची प्रीति आणि भय धरायास शिकावें. निर्दय राजे आणि गर्विष्ठ लोक जे दुसऱ्याचें बरें न पहातां आपलाच स्वार्थ पाहतात त्यांनीं ज्ञान मिळवून लीनता धरावी. त्यांनीं स्मरण ठेवावें कीं, ईश्वर आहे आणि तो गर्विष्ठांस आणि निर्दय राजांस शासन केल्यावाचून जाऊं देणार नाहीं."

"ज्या गोष्टी बाबेल नगराविषयीं भविष्यवाद्यांनीं सांगितल्या होत्या त्या सर्व पूर्ण झाल्या आहेत. याजवरून असें दिसतें कीं,खीस्ती शास्त्रें देवानें लावून दिलेलीं आहेत." (पृ. ६०–६१)

४. प्राचीन मिस्री लोकांचें वृत्तांतकथन—(आ. २ री) मुंबई, शिळाछाप, १८३९, पृ. ८०.

हेंहि पुस्तक महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें पहावयास मिळतें. या पुस्तकांतील एक उतारा येथें देण्यांत येत आहे :—

"देवानें मिस्र देशाविषयीं दुसरें एक भविष्य लिहिलेलें आहे कीं, तेव्हां अवघे देश खीस्ती होतील तेव्हां हा देश आनंद पावेल आणि फिरून नीच होणार नाहीं. प्रभु मिस्र देशाचें पारपत्य करील परंतु पुढें कल्याणहि करील. आणि ते मिस्री लोक ईश्वरास शरण येतील त्यांची प्रार्थना ऐकून तो त्यांचें हित करील. त्या दिवशीं इस्राएल व मिस्र व आशुर हे तीन देश समान होतील. ईश्वरानें सांगितलेल्या-

प्रमाणें जसें आजपर्यंत दाखल्यास उतरलें तसेंच पुढेंहि उतरेल. देवाच्या समोर कांहीं कर्म लपत नाहीं आणि त्याच्या बोलण्यांत एकहि चूक नाहीं. आतां पुष्कळ देशांची हलाकी होत चाललेली आहे. यास्तव, देवाच्या बोलण्याचा फार विचार केला पाहिजे. पुढें कांहीं वेळ उलटापालट होऊन सर्वत्र खीस्ती धर्म स्थापिला आणि तेव्हां सर्व लोक देवाची भावें भक्ति करितील व आनंद पावतील आणि जसें पाणी उथळ जमिनीवर पसरतें तसाच खीस्ती धर्म सगळ्या पृथ्वीवर पसरेल." (पृ. ७९-८०).

मिसेस विल्सन हिच्या या पुस्तकांची पहिली आवृत्ति कोठेंच पाहावयास मिळत नाहीं, पण १८३४-३५ च्या सुमारास ती निघाली असावी असें दिसतें. तसेंच कांहीं धार्मिक पुस्तकेंहि तिनें लिहिलेलीं दिसतात. यासंबंधीं उल्लेख आढळतो तो असा:—

"The last work, with the fulfilment of Prophecies regarding Egypt, the Account of the Medes and Persians, and the Devotional Exercises, and several other tracts and small books on similar kind which will be printed as soon as possible, were prepared in Marathi by my dearest wife, during the year and a half preceding her death." ८४

मिसेस विल्सन ही अशा तऱ्हेनें मराठी वाङ्मयाची सेवा करून १८३५ मध्यें मरण पावली. तिच्या मृत्यूविषयीं एका एतद्देशीय वृत्तपत्रांत जो एक मृत्युलेख लिहिला गेला त्याचें इंग्रजींत भाषांतर O. C. S. मध्यें प्रसिद्ध झालें आहे. त्यावरून मिसेस विल्सन हिची योग्यता कळून येईल. यांत मिसेस विल्सन हिच्या भाषाज्ञानाविषयीं पुढीलप्रमाणें उल्लेख करण्यांत आला आहे:—

"On Sunday the 19th instant, Margaret, the wife of the Rev. Mr. Wilson, quitted this world for the abode of the blessed. This deceased lady was highly distinguished for her acquaintance with European literature, and proficient in the Marathi, Hindustani, and other native languages." ८५

## ७. रे. जे. मरे मिचेल

हा १८३८ च्या नोव्हेंबरांत हिंदुस्तानांत आला व सन १८६८ मध्यें कलकत्ता मिशनला मिळाला. मरे मिचेल मुंबईस आल्यानंतर, कृष्णशास्त्री यांच्या हाताखालीं त्यानें मराठी भाषेचा अभ्यास केला. याविषयींची माहिती त्यानें स्वतः आपल्या पुस्तकांत दिली आहे ती अशी:—

८४. *O. C. S.*, January 1836, p. 78.
८५. *O. C. S.*, January 1836, p. 77.

"On reaching Bombay one of my first duties was to attack the Marathi language. My friends had chosen a stately man, Krishna Shastri, for my Pundit. He knew exceedingly little English beyond the words Yes and No. The study of Marathi charmed me. How clear in form was every letter. (the same as in Sanskrit) and how perfectly uniform in sound!" ८४

मराठी भाषेचा अभ्यास केल्यानंतर मरे मिचेल हा केव्हां केव्हां मराठींतून वर केव्हां केव्हां इंग्रजींतून धर्मोपदेश करूं लागला.८५ विल्सन व नेस्बिट यांच्याबरोबर मराठींत धर्मोपदेश केल्याचा उल्लेख मरे मिचेल करतो.८६ निरनिराळ्या यात्रेंत जाऊन तो मराठी व गुजराती या भाषांतील पुस्तकें वांटी.८७ मराठी भाषेप्रमाणें डॉ. स्टीव्हन्सनच्या मार्गदर्शनाखालीं मरे मिचेलनें संस्कृत भाषेचा अभ्यास केला होता.८८ त्यानें प्राचीन मराठी वाङ्मयाचा अभ्यास करून ज्ञानेश्वर व तुकाराम यावर भाषणें दिलीं. यासंबंधीं पुढील उल्लेख आढळतो:—

"In connexion with a series of Marathi lectures conducted by our American friends in their own Chapel, Mr. Mitchell has delivered two discourses—the substance of which has been published in *Dnyanodaya*—on the popular gods or saints Dnyanoba and Tukaram, and taken part on other occasions in the consequent discussions." ८९

मराठी भाषेचें मरे मिचेल याचें पहिलें कार्य म्हणजे बायबलचें मराठी भाषांतर सुधारणें हें होय. यापूर्वी जरी बायबलचें मराठी भाषांतर अमेरिकन मिशनरींनी केलें होतें, तरी त्यांत सुधारणा करण्यासारखीं पुष्कळच स्थळें होतीं बायबलचें हें भाषांतर करण्याचें काम किती कठिण होतें, याविषयीं मरे मिचेल लिहितो,

"I found this work exceedingly laborious. First, to get the exact sense—neither more nor less—and secondly, to convey that exact sense exactly—neither more not less—into the vernacular language was a most difficult, and often an impossible task. Some of the most characteristic expressions resisted all attempts to render them literally. If you ventured to do so, the natives exclaimed with sneer, 'Nonsense!' or more sneeringly still, 'Missionary Marathi.' On the other hand, if you deviated by

८४. J. Murray Mitchell—*In Western India*, p. 52
८५. *O. C. S.*, January 1853, p. 31.
८६. J. Murray Mitchell, *In Western India*, p. 76.
८७. *O. C. S.*, October 1843, p. 539,
८८. J. Murray Mitchell, *In Western India*, p. 76.
८९. *O. C. S.*, January 1853, p. 29.

a hair's-breadth from the literal sense, some missionaries were ready to cry out, 'you are paraphrasing, not translating.'' [१०]

बायबलचें भाषांतर करण्याचें जसें मराठी वाङ्मयाचें कार्य मिचेलनें केलें, तसेंच दुसरें एक कार्य केलें त्याचा येथें उल्लेख केला पाहिजे. पूना कॉलेजचा प्रिन्सिपॉल मेजर कँडी हा सन १८५४ मध्यें इंग्लंडला रजेवर जाणार होता. त्या जागेवर काम करण्याबद्दल मरे मिचेल याला डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन यांजकडून विनती करण्यांत आली; परंतु मिशनच्या कामांत व्यत्यय येईल म्हणून त्यानें प्रिन्सिपॉलचें काम करण्याचें नाकारलें. मात्र व्हिजिटर म्हणून काम करण्याची त्यानें तयारी दाखविली व त्यास व्हिजिटर नेमण्यांत आलें.[११] व्हिजिटर असतांना त्यानें पूना कॉलेजमध्यें मराठी डिपार्टमेंट व संस्कृत कॉलेज चालविलें. तो लिहितो,

"My especial duty, however, was to superintend the Marathi department and the Sanskrit College."[१२]

मरे मिचेल यानें मराठींत लहान लहान अशीं दहा पुस्तकें लिहिलीं आहेत. तसेंच सुमारें १५ कविताहि त्यानें रचल्या होत्या व त्या ख्रिश्चन व्हर्नाक्युलर सोसायटीच्या पुस्तकांत प्रसिद्ध झाल्याचें त्यानें नमूद केलें आहे.[१३] मरे मिचेलनें लिहिलेलीं पुस्तकें पुढीलप्रमाणें आहेत :—

१. **नारळी पौर्णिमा**—स्वतंत्र. ट्रॅ. सो. १८५१, पृ. ८.

२. **सुबोधक अभंग**—स्वतंत्र. ट्रॅ. सो. १८५२, पृ. १६.

हीं दोन पुस्तकें कोठेंच उपलब्ध होत नाहींत. मात्र सुबोधक अभंग यांवर ज्ञानोदयांत परीक्षण आलें आहे.

३. **अळंदीची यात्रा** ( *The Pilgrimage to Alandi* ) स्वतंत्र, ट्रॅ. सो. १८५५, पृ. ३०.

हें पुस्तक महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें उपलब्ध आहे. या पुस्तकांत कुणबी, साहेब व ब्राह्मण यांचा संवाद देऊन ज्ञानेश्वराविषयीं गैरसमजूत दूर करण्याचा त्या साहेबानें प्रयत्न केला आहे. या पुस्तकांतील भाषेचें स्वरूप पुढीलप्रमाणें आहे:—

कु०—साहेब, ज्ञानोबाविषयीं आपलें मत काय आहे ?

सा०—तो साधारण मनुष्य होता. तो बरेंच संस्कृत जाणत असे. त्यानें भगवद्गीतेवर ज्ञानेश्वरी नामें एक ग्रंथ टीकारूपें रचिला, इतकेंच. जसा तुकाराम,

१०. J. Murray Mitchell, *In Western India*, pp. 77-78.

११. *Ibid.*, pp. 320-321.

१२. *Ibid.*, p. 322. यासंबंधीं *D. P. I.* च्या दप्तरांतहि माहिती मिळते. पहा. *D. P. I.*, *Poona College*, *Vol. XVIII.* 1856, pp 489-507.

१३. J. Murray Mitchell—*In Western India*, p. 373.

रामदास, वामन पंडित, मोरोपंत इत्यादि कवि होऊन गेले त्यांतीलच तोहि एक होता. तो इतर लोकांपेक्षा कांहीं हुशार आणि विद्वान होता म्हणून वेडे लोक त्यास ईश्वरी पुरुष मानूं लागले." (अळंदीची यात्रा पृ. २०)

या पुस्तकाचें शेवटीं येशू ख्रिस्ताचा अंगीकार करा हें सांगतांना पुढील-प्रमाणें अभंग दिला आहेः—

जय देवसुता प्रिय सर्वांहूनी ।
आलासी वरूनी तारावया ॥ १ ॥
पापाच्या सागरीं सर्वहि बुडालों ॥
भ्रष्ट नष्ट झालों पातकानें ॥ २ ॥
म्हणोनि पेटली नरकाची आग ॥
ईश्वराचा राग भयंकर ॥ ३ ॥
तूंची दयावंत मोठा देवसुत ॥
केली काकळूत आमुची त्वां ॥ ४ ॥
जामीन होऊनी ऋणहि फेडूनी ॥
नरकापासूनी तारिलेसि ॥ ५ ॥
दास म्हणे जय देवसुता जय ॥
दुरावलें भय नरकाचें ॥ ६ ॥ (अळंदीची यात्रा, पृ. २९-३०)

४ पंढरपूरची यात्रा (*Pandharpur and Vithoba*) स्वतंत्र, ट्रॅ. सो. १८५५, पृ. ६९.

५ तुकाराम याची गोष्ट. स्वतंत्र, ट्रॅ. सो. १८५६, पृ. ५१.
६ संस्कृत सुबोध श्लोक स्वतंत्र, ट्रॅ. सो. १८५७, पृ. ३७.
७ शकुन मुहूर्त इत्यादि याविषयीं. स्वतंत्र, ट्रॅ. सो. १८६२, पृ. ३६.
८ पुष्पमाला. स्वतंत्र, ट्रॅ. सो १८६३, पृ. ४८.
९ कुणब्याशीं संभाषण. स्वतंत्र, ट्रॅ. सो. १८६३, पृ. २०.

हीं पुस्तकें कोठेंच पहावयास मिळत नाहींत.

१० खंडोबाची गोष्ट (*Khandoba and his Worship*) स्वतंत्र, ट्रॅ. सो. १८७४, पृ. ३६. (आवृत्ति ६ वी)

हें पुस्तक महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें उपलब्ध आहे मिचेलच्या कांहीं पुस्तकांवर 'ज्ञानोदयां'त परीक्षण आलेलें आढळतें.[९४]

९४ ज्ञानोदय, ता. १५ मार्च १८५१, पृ. १११ –सुबोधक अभंग यांवर परीक्षण. ज्ञानोदय, ता. ४ डिसेंबर १८७५ पृ. ३१०–३११;–खंडोबाची गोष्ट व अळंदीची यात्रा यांवर परीक्षणें.

मरे मिचेलला कविता करण्याचा नाद होता. त्यानें मराठींत कांहीं कविता केल्या आहेत. ' आतां मावळलें दिन ', ' ऐका सर्व खरे भक्त ', ' देवा तूं दयाळू फार ', ' मी अनाथ मी बिचारा ' अशा त्याच्या कांहीं मराठी कविता ' Sacred Songs ' या पुस्तकांत समाविष्ट झाल्या आहेत.[९५] पण हें पुस्तक मिळत नसल्यानें या कवितेचा कांहीं नमुना देतां येत नाहीं.

या कवितेप्रमाणें ' येशू खिस्त माहात्म्य ' या विषयावर कांहीं अभंगपर अध्याय लिहून मरे मिचेलनें ' ज्ञानोदयांतून ' प्रसिद्ध केले याविषयीं तो आपल्या आपल्या पुस्तकांत म्हणतो,

" I was so deeply interested in Tukaram that I studied his abhangs—at least many of them with very close attention. It is not difficult to reproduce the music of the verse, and I wrote a number of pieces, in close imitation of his style, though of course inculcating sentiments very different from most of Tuka's These first appeared in the Dynanodaya, an excellent serial conducted by the American Mission, and were afterwards published separately by the Tract Society."[९६]

' येशू खिस्त माहात्म्य ' याचे एकंदर सहा अध्याय ज्ञानोदयांत सापडतात. पहिला अध्याय ' श्री महामोक्षप्रतीक्षा-परमेश्वरजय पावतो ' असा असून त्यांत १६३ अभंग आहेत.[९७] दुसरा ' खीस्त जन्म ' या नावाचा आहे. त्यांत १६५ अभंग आहेत[९८] तिसरा अध्याय ' अद्भुत क्रियावर्णन ' असा असून या अध्यायांत ३९३ अभंग आहेत.[९९] चवथ्या अध्यायाचें नांव ' उपदेशपद्धति ' असें असून त्यांत ६५५ अभंग आहेत.[१००] पांचवा अध्याय ' खिस्तप्राणार्पण ' हा असून त्याचे ३४३ अभंग

---

९५. *Memorial Papers of the American Marathi Mission*, pp. 134–140.

९६. J. Murray Mitchell—*In Western India*, p. 169.

९७. ज्ञानोदय, ता. १५ ऑक्टोबर १८५०, पृ ३६१–३६३.

९८. ज्ञानोदय, ता. १५ जानेवारी १८५१, पृ १९–२५.

९९ ज्ञानोदय, ता. १५ मे १८५१, पृ १५०–१५३; ज्ञानोदय, १५ जुलै १८५१, पृ. २१४–२१७, ज्ञानोदय, ता. १५ ऑगस्ट १८५१, पृ २४७–२४९. ज्ञानोदय, १ ऑक्टोबर १८५१, पृ. २९९–३०२.

१००. ज्ञानोदय, ता. १५ नोव्हेंबर १८५१ पृ ३५०–३५७, ज्ञानोदय, १५ डिसेंबर १८५१, पृ ३८४–३८९, ज्ञानोदय, १५ मार्च १८५२, पृ. ९१–९४ ज्ञानोदय, १९ जानेवारी १८५४, पृ. १८–२२. ज्ञानोदय, १ डिसेंबर १८५४, पृ. ३५८–३६१; १ फेब्रुवारी १८५५, पृ. ४०–४४; ज्ञानोदय, १ एप्रिल १८५५, पृ १०४–१०६.

आहेत.[१०१] सहावा अध्याय 'खीस्त स्वर्गारोहण' असा असून त्याचे १४७ अभंग आहेत.[१०२]

मरे मिचेलच्या अभंगाचें स्वरूप कसें आहे हें ध्यानीं येण्यासाठीं ४ थ्या अध्यायांतील कांहीं अभंग पुढें देण्यांत येत आहेतः—

" येशू ह्मणे मागा म्हणजे मिळेल ॥ शोधा तें गावेल तुम्हाप्रति ॥२८२॥
ठोकिनसा मग उघडे किजेल ॥ काज तें साधेल तुमचेंचि ॥२८३॥
कांकीं मागणारा इच्छिलें पावतो ॥ धुंडिल्या जोडतो पदार्थेंहि ॥२८४॥
ठोकि त्यासी दार उघडिलें जातें ॥ मग देवाहातें काय नोहे ॥२८५॥
ऐसा कोण बाप याळकें जेवण ॥ इच्छितां पाषाण देईल जो ॥२८६॥
किंवा मागितली असोनि मासोळी ॥ देईल वेटोळी विखाराची ॥१८७॥
येशू ह्मणें तुह्मी प्रेमेंहि दुवाड ॥ परि तुह्मा चाड बाळकांची ॥१८८॥

याशिवाय मरे मिचेलनें इंग्रजींत मराठी संतांवर कांहीं लेख लिहिले आहेत. तसेंच जेसुइट वाङ्मयाचा परिचय करून देणारा लेखहि त्यानें लिहिला आहे. त्यांची माहिती पुढीलप्रमाणें :—

१. *The story of Tukaram.* ( From the Marathi-Prakrit with an Introduction ) *:-1849.*[१०४]

२. *Pandharpur.—1882.*[१०५]

हा लेख तुकारामावर लिहिला आहे.

३. *Tukaram 1882.*[१०६]

या लेखांत तुकारामाच्या ५५ निवडक अभंगाचें मिचेलनें इंग्रजींत भाषांतर केलें आहे.

४. *Marathi Poetry—*[१०७]

---

१०१. ज्ञानोदय, २ एप्रिल १८५५, पृ. १०६–१०७; ज्ञानोदय, २ मे १८५५, पृ. १३५–१३७, ज्ञानोदय, १५ जून १८५५, पृ. १८९–१९१; ज्ञानोदय, १ ऑगस्ट १८५५, पृ. २२६–२२९.

१०२. ज्ञानोदय, १७ डिसेंबर १८५५. पृ. ३७३–३७४

१०३. ज्ञानोदय, १८ जानेवारी १८५४, पृ. २८.

१०४. *The Journal of the B. B. R. A. S.*, January 1849, pp. 1-29.

१०५. *Indian Antiquary, Vol XI*, June 1882, pp. 149-156.

१०६ *Indian Antiquary, Vol. XI*, March 1882, pp. 57-66.

१०७. J. Murray Mitchell. *In Western India*, Chapter XVI, pp. 165-169.

'*In Western India*' या पुस्तकांतील १६ वें प्रकरण. या प्रकरणांत ज्ञानेश्वर व तुकारामाची माहिती मिचेल्नें दिली आहे.

५. *Marathi works composed by Portuguese*. 1849. [१०८]

या लेखांत उत्तर कोकणांत पोर्तुगीजांनीं मराठी वाङ्मयाचें जें कार्य केलें त्याची माहिती देण्यांत आली आहे

स्कॉटिश मिशनच्या स्थापनेपासून तों मरे मिचेल यांच्यापर्यंत त्या मिशनमधील मिशनरींनीं मराठींत जें वाङ्मयकार्य केलें त्याचें विवेचन येथपर्यंत केलें आहे. त्यांच्या कार्याबद्दल रावबहादूर पारसनीस यांनींसुद्धां गौरवाचे उद्गार काढले आहेत ते म्हणतात,

"Several distinguished missionary workers, such as the Rev. Dr. Wilson, the Rev. Dr. Murray Mitchell and the Rev. Dr. Stevenson studied Marathi literature, and read valuable papers before this Society. They were struck by richness of that literature and exhorted their contemporaries to cultivate it." [१०९]

स्कॉटिश मिशनचें हें मराठींतील वाङ्मयकार्य पुढें चालू राहिलें नाहीं. कारण यापुढें एतद्देशीय ख्रिश्चन मिशनरी शिकून तयार झाले व ते मराठींत लिहूं लागले याविषयीं मरे मिचेल लिहितो,

"As time went on, however, I felt that the necessity of a missionary writing Marathi Tracts was diminishing in as much as our pupils were coming forward and writing Marathi with a fluency and power that threw our best efforts into the shade." [११०]

स्कॉटिश मिशनच्या पूर्वी स्थापन झालेल्या अमेरिकन मिशनचें मराठी वाङ्मयकार्य थंडावलें, त्याचेंहि कारण हेंच आहे, हें आपण मागें पाहिलेंच आहे. सुरवातीच्या मिशनरींचा उत्साह व तडफ ही पुढच्या मिशनरींत राहिली नाहींत. धर्मप्रसाराची तीव्रताहि कमी होत गेली. यामुळेंहि पहिल्या मिशनरींनी जें वाङ्मयकार्य केलें, तसें पुढच्या मिशनरींच्या हातून झालें नाहीं. यामुळें मिशनच्या मराठी वाङ्मयसेवेचा विचार करतांना एकोणिसाव्या शतकाच्या सुरवातीपासून पुढें पाऊणशें वर्षांच्या कालांतील वाङ्मयसेवेचें सविस्तर विवेचन या प्रकरणांत केलें आहे. त्यायोगें अमेरिकन मराठी मिशन, स्कॉटिश मिशन व इतर मिशनें यांच्या मराठी भाषेचें व वाङ्मयाचें समग्र स्वरूप वाचकाच्या ध्यानीं येईल.

---

१०८. *Journal of the B. B. R. A. S.*, January 1849, pp.132-157.
१०९. *Journal of the B. B. A. S.*, *Vol XXII*. 1908, p 173.
११०. J. Murray Mitchell, *In Western India*, p. 373.

# इतर मिशनरींची मराठी वाङ्मयसेवा व कांहीं अनामिक ग्रंथकारांचे ग्रंथ

अमेरिकन व स्कॉटिश या मिशनबरोबर त्या काळांत दुसरीं अनेक मिशनें वाङ्मयीन कार्य करीत होतीं. त्यांत नाशिक येथें चर्च मिशनरी सोसायटीचें मिशन सन १८३२ मध्यें स्थापन झालें.[१] त्यांतील मिशनरींनीं मराठी वाङ्मयाचें जें कार्य केलें तें या प्रकरणांत प्रामुख्यानें कथन करावयाचें असून इतर मिशनरींच्याहि वाङ्मय सेवेची माहिती द्यावयाची आहे. तसेंच या मिशनबाहेरच्या कांहीं युरोपियन लोकांनीं धार्मिक विषयांवर मराठींत पुस्तकें लिहिलीं आहेत त्यांचीहि ओळख करून द्यावयाची आहे. त्याचप्रमाणें ज्या कांहीं मिशनरींनीं मराठींत पुस्तकें लिहिलीं, पण हीं पुस्तकें कोणी लिहिलीं त्यांचीं नावें मात्र समजत नाहींत, अशीं जीं कांहीं अनामिक ग्रंथकारांचीं जुनीं पुस्तकें सांपडलीं आहेत, त्यांचाहि परामर्श या प्रकरणाच्या शेवटीं घ्यावयाचा आहे.

## नाशिक येथील चर्च मिशनरी सोसायटीचे मिशनरी

### १. रे. जॉन डिक्सन

हा हिंदुस्थानांत १८२९ मध्यें आला व १८४६ मध्यें औरंगाबाद येथें मरण पावला. चर्च मिशनरी सोसायटीचा हा पहिला मिशनरी. १८३२ मध्यें नाशकास येऊन त्यानें तेथें मिशन सुरू केलें. यांस संस्कृत व मराठी भाषा येत होत्या. यासंबंधीं 'ज्ञानोदयांत' पुढील उतारा आढळतोः—

"...त्यानें हा देश सुधारावा आणि लोकांचें कल्याण करावें झणून फार प्रयत्न केला. यास ह्या देशाच्या ज्या संस्कृत व मराठी इत्यादि भाषा त्या चांगल्या येत होत्या आणि त्यानें जुन्या करारांचें भाषांतर मराठी भाषेंत केलें. असा करण्यावरून तो मेला असतांहि जिवंतासारिखा आहे."[२]

रे. डिक्सन याची मोठी कामगिरी म्हणजे जुन्या करारांचें त्यानें मराठींत केलेलें भाषांतर होय.[३] जुन्या करारांतील क्रॉनिकल्स, एझरा, नेमिया आणि इस्थर; जॉब, प्रॉव्हर्ब, एक्लेसिॲस्ट, सालोमन सॉंग, इशिया, जेरेमिया हीं प्रकरणें डिक्सन यानें भाषांतर केलीं आहेत तर बाम ह्या प्रकरणाचें डिक्सन व ग्रेव्हज यानें भाषांतर केलें आहे. त्याच्या या कार्यांचा उल्लेख पुढीलप्रमाणें आढळतोः—

१ *O. C. S.*, May 1835, p. 189.

२. ज्ञानोदय, २ फेब्रुवारी १८५४, पृ. ३३.

३. *O. C. S.*, May 1847. p. 172, ४ *O. C. S*, May 1844, p. 203.

"He has left behind him many Marathi translations, especially those of the Pentateuch, and the poetical and prophetical books of the Old Testment."[४]

डिक्सन यानें पुढील एक पुस्तक लिहिल्याचेंहि नमूद आहेः

**साधारण प्रार्थना** (*Liturgy of the Established Church with the Psalms*) भाषांतर, १८३५, पृ. २७१.[५]

हें पुस्तक कोठेंच उपलब्ध होत नाहीं.

## २. रे. विल्यम मिचेल

हा हिंदुस्थानांत केव्हां आला हें समजत नाहीं; पण सन १८३४ मध्यें आजारामुळें हा स्वदेशीं परत गेला. हा चर्च मिशनरी सोसायटीचा नाशिक येथील मिशनरी होय. यानें 'Gospel of Matthew'चें मराठींत भाषांतर केलें. याच्या शिळाछापावर १२०० प्रती काढल्याचें नमूद आहे.[६] तसेंच 'Acts of the Apostles' चेंहि यानें मराठींत भाषांतर केलें.[७] याशिवाय यानें दोन पुस्तकें लिहिलीं आहेत तीं अशीं:—

(१) **प्रार्थना** (*On Prayer*), स्वतंत्र. अ. मि. १८२५, पृ. ६३.[८]

हें पुस्तक कोठेंच पाहावयास मिळत नाहीं.

२. **मुलांसाठीं प्रश्नोत्तरावळी** (*Catechism for Children*) भाषांतर. ट्रॅ. सो. १८२८, पृ. ३६.[५]

हें पुस्तक अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें आहे. यांत ७१८ प्रश्नोत्तरें दिलेलीं आहेत व शेवटीं प्रार्थना दिली आहे. भाषेचें स्वरूप समजून यावें म्हणून खालीं एक प्रश्न व त्याचें उत्तर देण्यात येत आहे:—

"प्रश्न १—अरे माझे आवडत्या मुला तूं काय आहेस हें तूं समजतोस काय?
उत्तर—मी देवानें केलेला असा कांहीं पदार्थ आहें। माझें शरीर व जीवात्मा त्यानें उत्पन्न केला आहे." (पृ. १.)

## ३. रे. चार्लस पिनहॉर्न फरार

हा १८३२ मध्यें येथें आला व १८४७ मध्यें परत गेला. नाशिक येथील चर्च मिशनरी सोसायटीचा हा मिशनरी होय.[५] यानें मराठींत पुढीलप्रमाणें पुस्तकें लिहिलीं:—

४. *O. C. S.*, February 1816, p. 76.
५. *O. C. S.*, May 1835, p. 190.
६. *O. C. S.*, August 1830, p. 237.
७. *O. C. S.*, May 1835, p. 190.
८. *Memorial Papers of the American Marathi Mission*, p. 113.

(१) ईश्वराचें पवित्रत्व व न्यायत्व यांचें प्रदर्शन. *(On the Holiness and Jusice of God.)*—चर्च मिशनरी सोसायटी १८३४, पृ. २२.

(२) शास्त्रांतील गोष्टी *( Old Testament Scripture Narratives)* १८३५.

(३) *Expository and Practical Discources,* १८३५.

हीं तीनहि पुस्तकें कोठें मिळत नाहींत.

(४) *A General letter of invitation to the Marathi Service.*"

चर्चमध्यें जेव्हां धर्मोपदेश होत असे, त्याचें निमंत्रण लोकांस देण्यासाठीं हें पत्रक नाशिक शहरांत वांटलें जात असे. हें पत्रक मिळत नाहीं.

(५) मराठी किस्से — —

हें पुस्तक उपलब्ध नाहीं.

(६) पहिली पोथी —

हें पुस्तक सुधारून त्याची नवी रचना फरार यानें केली व त्याला 'बालोपदेश' हें नांव दिलें. शाळेसाठीं या पुस्तकाचा उपयोग करण्यांत येत असे. हेंहि पुस्तक कोठेंच मिळत नाहीं.

(७) दाविदाचीं गीतें. ( *The Psalms of David in Marathee Metre* ) १८३८, पृ. ९८.

याचा दुसरा विभाग मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहे.[१२] या विभागाचीं १८ पृष्ठें आहेत. यांत आर्या, श्लोक, अभंग, गीतें इत्यादि ५६ ते १०५ क्रमांक पावेतों आहेत. ॲबटने आपल्या कॅटलॉगांत याचा प्रसिद्धिकाल १८५० हा दिला असून एकंदर पृष्ठें २९१ नमूद केलीं आहेत. त्यावरून या पुस्तकाचे दोन्ही भाग एकत्र असले पाहिजेत व ही त्या पुढची आवृत्ति असली पाहिजे असें दिसतें. दुसऱ्या भागांतील एक आर्या येथें देण्यांत येत आहे. :—

" उपकार स्तुति देवा, करणें करणेंचि आहुती नावा ॥
त्याच्या त्याचीं चरितें, कळवुनि लोकांस त्यास मानावा ॥ १ ॥"[१३]

---

९. *O. C. S* , May 1853, p. 212,

१०. J. Murray Mitchell, *In Western India*, p. 52.—" C. P. Farrar of the Church Missionary Society at Nasik (the father of the Dean Farrar ), was undoubtedly a superior man. "

११. क्रमांक १ ते ४ या पुस्तकांची माहिती *O. C. S.* मध्यें मिळते. पहा—*O. C. S.*, May 1835, p. 193.

१२. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील दोलामुद्रितें, पृ. ८.

१३. फरार, दाविदाचीं गीतें, पृ. १४.

या शेवटच्या तीन पुस्तकांची माहिती O.C.S.मध्यें आहे ती पुढीलप्रमाणें:

" He has prepared a set of Marathi Kittas, and remodelled and enlarged the Pahili Pothi under the title of Balopadesh for the use of schools......The great attachment of the Hindus to metrical compositions has induced him to undertake the editing of the Psalms of David in Marathi metre-the first fifty are ready and will be instantly forwarded for publication."[१४]

यावरून रे. फरार यानें शिक्षणविषयक पुस्तकें लिहून मराठीची सेवा केली असें दिसून येतें. तसेंच 'दाविदाचीं गीतें' हें पुस्तक लिहून त्यानें ख्रिस्ती पद्य-वाङ्मयांतहि भर घातली.

## ४ मिसेस फरार

रे. चार्लस फरार याच्याप्रमाणें त्याची पत्नी मिसेस फरार हिनेंहि शिक्षण-विषयक पुस्तकें मराठींत लिहिलीं आहेत. तीं पुढीलप्रमाणें :

(१) चमत्कारिक गोष्टी (*The Ayah and Lady*) स्वतंत्र. १८३४, पृ. ६६. हें पुस्तक मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहे.

(२) हेनरी आणि त्याचा संभाळणारा गडी संभू ह्यांची गोष्ट (*Henry and his Bearer*). Modified & Translated. नाशिक. १८३५, पृ. ३८.

या पुस्तकाबद्दल O. C. S. मध्यें पुढीलप्रमाणें अभिप्राय देण्यांत आला आहे :

" This story will be very useful as a school book, and will encourage a taste for reading among the Young. The translation has been executed by a lady, and is a successful and happy attempt."[१५]

मिसेस फरार हिनें हीं दोन पुस्तकें शेरवूडच्या पुस्तकांवरून मराठींत अनु-वादित केलेलीं आहेत. या पुस्तकांसंबंधीं माहिती देतांना रे. फरार म्हणतो,

"The Ayah and lady, and Henry and his Bearer, by Mrs. Sherwood, having been modified and adapted to the wants and habits of the Marathi people, have been translated by Mrs. Farrar, and published by the society."[१६]

या पुस्तकांचें गुजराती भाषेतहि भाषांतर झालेलें दिसतें.[१७]

---

१४. *O. C. S.*, June 1836, p. 305.
१५. *O. C. S.*, February 1832, p. 59.
१६. *O. C. S.*, May 1835, p. 103-104.
१७. *O. C. S.*, February 1835, p. 72.

हें पुस्तक महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें पाहावयास मिळतें. या पुस्तकांतील भाषेचा नमुना पुढें देण्यांत येत आहे :

" बंगाल देशांत दिनापूर म्हणून एक शहर आहे. त्यांत एक मुलगा जन्मला होता. त्याचें नांव हेनरी. त्याचा बाप इंग्रेजी सरकारचे फौजेंतला एक सरदार होता. तो एके किल्लेदाराचे गढीवर हल्ला करितांना मेला. पुढें पांच चार महिन्यांनीं हेनरीची आईहि मेली. तेव्हां हेनरी आठ दाहा महिन्याचा असतां पोरका होऊन राहिला. त्याची आई मरते वेळेस त्याला हातावर घेऊन आकाशाकडे पाहून म्हणाली. हे परमेश्वरा हा माझा अनाथ बाळक मी तुझे स्वाधीन करून प्राण सोडितें. तूं याचा प्रतिपाळ करशील असें मला ठाऊक आहे. कां कि जे अनाथ ते तुजकडून दया पावतात " ( पृ. १ ).

( ३ ) कुटुंबप्रवर्त्तननीति ( *Hints for the Improvement of Early Education and Discipline* ). भाषांतर. चर्च मिशनरी सोसायटी १८३५, पृ. ५६.

हें पुस्तक मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहे.[१८] या पुस्तकाचा उद्देश मिसेस फरार हिनें प्रस्तावनेंत दिला आहे तो असा :

" परोपकार करायाचा उद्योग यथाशक्तीनें लहानसा जरी केला तरी त्यास तुच्छ मानीत नाहीं असा जो भगवान् तो ह्या लहान ग्रंथास आशीर्वचन देऊन लोकांच्या उपयोगी पडे असें करूं आणि आपल्या मुलांस कुमार्गापासून संरक्षण करण्याविषयीं कधीं ज्यानी उपाय केले नाही त्यांसहि ईश्वर कृपा करून हा ग्रंथ वाचायाची बुद्धि देऊन त्यांनीं आपल्या मुलांच्या उत्तम शिक्षेस लागावें असें करूं."

या उताऱ्यावरून मिसेस फरार हिच्या मराठी भाषेचें स्वरूपहि समजून येईल.

( ४ ) यात्रेकऱ्याचा वृत्तांत, चर्च मिशनरी सोसायटी, नाशिक, १८३८, पृ. १४६.[१९]

हें पुस्तक महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें व मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय येथें आहे. पुस्तकातील भाषेच्या नमुन्यासाठीं पुढील उतारा पहा :—

" राजापूर प्रांतात एक उपळें गांव आहे, त्यात रायोजी जाधव म्हणून कुणबी राहत होता. तो फार सालस आणि मेहनती असे, आणखीहि कित्येक गुणांनीं तो चांगला होता, तें पुढें समजण्यांत येईल. कुणबी लोक बहूतकरून पूर्वापार वहिवाटीनें आपल्या एकाद्या बैलावाणी डोळे झांकून चालत असतात; नवा प्रकार ऐकण्यांत आला तरी त्याचा शोध त्यांनी करूं नये, नवी युक्ति एकादी पदरांत

१८. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील दोलामुद्रितें, पृ. ६.

१९. तत्रैव, पृ. ९.

पडली तरी ती घेऊं नये, अशी त्यांची रीत आहे. पण राघोजी केवळ तसा नव्हता, प्रापंचिक गोष्टींविषयीं कांहीं तैलबुद्धीचा होता. तरी त्याला विवेकी पुरुष असें म्हणवत नाहीं, का आपला उत्पन्न करणारा कोण, आपल्या जन्माचें सार्थक काय, असा परमार्थ विचार त्यानें कधीं केला नाहीं" (पृ. २-३).

(५) *An Easy Marathi Reading Book.*

(६) *Animal Biography.*[१०]

हीं दोन पुस्तकें कोठेंच उपलब्ध होत नाहींत.

## ५. मिसेस टाउनसेंड

या कालखंडांतील या मिशनरीबाई होत. हिची माहिती कोठें मिळत नाहीं. हिनें पुढीलप्रमाणें मराठींत पुस्तकें लिहिलीं :

(१) जुन्या कराराच्या पुस्तकांतल्या गोष्टी (*Narratives from Book of Exodus*) भाषांतर. अ. मि. १८३९, पृ. ६०.

(२) फुलें वेचणाऱ्या मुलींची गोष्ट—भाषांतर. अ. मि. १९४५, पृ. ३६.

(३) शिद्दी चाकर माणसाची गोष्ट—भाषांतर. ट्रॅ. सो. १८४४, पृ. ३४.

(४) नव्या करारांतल्या पुस्तकांतल्या गोष्टी—भाषांतर. ट्रॅ. सो. १८४८, पृ. ११७.

हीं पुस्तकें कोठें मिळत नाहींत. हिनें लिहिलेल्या वरील पुस्तकांचा नामनिर्देश ॲबट यांच्या कॅटलॉगवरून करण्यांत आला आहे.

## ६. मिसेस स्कूफ

हिचीहि माहिती मिळत नाहीं. हिनें एक पुस्तक लिहिलें आहे.

चांगले मुलगे किंवा तुम्ही आपली परीक्षा करा. भाषांतर. ट्रॅ. सो. १८३८, पृ. १४.

हें पुस्तक कोठेंच मिळत नाहीं.

## ७. रे. डब्ल्यू. एस्. प्राइस

याची माहिती मिळत नाहीं. यानें पुढीलप्रमाणें पुस्तकें लिहिलीं आहेत :

(१) भरतखंडांतील यात्रेकरी—भाषांतर. ट्रॅ. सो. १८४८, पृ. २९१.

---

१०. शेवटच्या दोन पुस्तकांची (क्रमांक ५ व ६) माहिती O. C. S. मध्ये आढळते "पहा-O. C. S. April 1837, p. 162. शेवटच्या पुस्तकाची माहिती अशी दिली आहे : Mrs. Farrar has also prepared a little work in Marathi on Animal Biography." O. C. S., May 1835, p. 104.

(२) ख्रिस्ती मंडळीची बखर ( *History of the Christian Church* ). भाषांतर. ट्रॅ. सो. १८५०, पृ. २६०.

या पुस्तकासंबंधानें मेमोरियल पेपर्समध्ये पुढीलप्रमाणें उल्लेख आढळतो :

" Trans. by a Gentleman in Gov. Service, W. S. Price Esq.; and revised by the Missionaries at Nagpur. "[२१]

(३) ल्यूथरचा इतिहास — —भाषांतर. ट्रॅ. सो. १८५१, पृ. १८३.

(४) ख्रिस्ती वीर ... ... भाषांतर ... १८७१, पृ. ११९.

(५) सिंहस्थ माहात्म्य ... ... प्रसिद्धिकाल नाहीं. पृ. २६.

हीं पुस्तकेंहि कोठेंच पहावयास मिळत नाहींत.

८. अँड्र्यू फ्रॉस्ट

हा हिंदुस्तानांत येऊन १८५३ पासून काम करूं लागला. १८६१ मध्यें आजारामुळें त्यानें स्वदेशीं प्रयाण केलें. यानें मराठींत एक पुस्तक लिहिलें आहे.

एक नास्तिक मनुष्य ख्रिस्ती कसा झाला याविषयीं हकीकत.
—ट्रॅ. सो. १८५८. पृ. ५६.

हें पुस्तक कोठेंच उपलब्ध नाहीं.

९. रे. ए. व्हाईट

याची माहिती मिळत नाहीं. यानें मराठींत तीन पुस्तकें लिहिलीं आहेत.

(१) नवसाला पावणें याविषयीं विचार ... ट्रॅ. सो. १८६२, पृ. २२.

(२) दृष्टांत दर्पण ... ... ... ट्रॅ. सो. १८६३, पृ. ३२.

(३) येशू ख्रिस्ताची मध्यस्ती ... ... ट्रॅ. सो. १८६५, पृ. ३२.

हीं पुस्तकें कोठेंच मिळत नाहींत.

१०. रे. सी. एफ्. श्वॉर्झ

चर्च मिशनरी सोसायटीचा हा मिशनरी होय. हिंदुस्तानांत आल्यानंतर १८७३ मध्यें तो नाशिक येथें आला व १८७८ मध्यें शरणपुरांत मरण पावला. यानें तीन पुस्तकें लिहिलीं आहेत तीं अशीं :

(१) हृदयदर्पण–भाषांतर. ट्रॅ. सो. १८६२, पृ. ८९.

(२) पवित्र शास्त्रांतील इतिहास–भाषांतर. ट्रॅ. सो. १८६२, पृ. २८१.

(३) ख्रिस्ती धर्मप्रकरणीं प्रश्नोत्तरावली–भाषांतर. ट्रॅ. सो. १८६१, पृ. ३०.

हींहि पुस्तकें उपलब्ध नाहींत.

---

२१. *Memorial Papers of the American Marathi Mission*, p. 115

या मिशनरींशिवाय मिशनबाहेरच्या कांहीं युरोपियन लोकांनीं धार्मिक विषयांवर मराठींत पुस्तकें लिहिलीं आहेत. मोल्सवर्थ, थॉमस कॅंडी हेहि युरोपियन गृहस्थ आहेत. त्यांच्या वाङ्मयाची माहिती त्या त्या वेळीं सांगितलीच आहे. यांच्या-शिवाय इतर जे युरोपियन लोक धार्मिक व दुसऱ्या इतर विषयांवर लिहिणारे आहेत, त्यांमध्यें जॉर्ज कॅंडी, मिसेस कॅंडी, बेल, केग इत्यादि युरोपियन येतात. त्यांची व त्यांच्या वाङ्मयसेवेची माहिती पुढें देण्यांत येत आहे :

## १. जॉर्ज कॅंडी

हा इ. स. १८२१ मध्यें हिंदुस्तानांत आला व १८५४ मध्यें परत गेला. हा थॉमस कॅंडी याचा भाऊ होय. हिंदुस्तानांत आल्यानंतर त्यानें लष्करांत नोकरी धरली व मोल्सवर्थला शब्दकोशाच्या कामांत साहाय्य केलें. याची माहिती मागें दिलीच आहे. याच्याविषयीं 'ज्ञानोदयां'त पुढीलप्रमाणें माहिती आली आहे :—

"हे साहेब ३३ वर्षामागें पलटणी कामावर होते, परंतु त्यास खिस्ती उप-देशकाचें काम पसंत वाटलें ह्मणून त्यांनीं तें घेतलें आणि सोळा वर्षेपर्यंत तें त्यांनीं सुंदर रीतीनें चालविलें. आणि या साहेबांच्या हातून पुष्कळांची सुधारणूक झाली. तर हे कांहीं कारणांमुळें हलीं स्वदेशास परत गेले."[१२]

यानें मराठींत एकच पुस्तक लिहिलें आहे, तें पुढीलप्रमाणें :—

**ख्रिस्ती धर्म कसा उत्पन्न झाला आणि कसा पृथ्वीवर वाढला।** (*View of the Rise and Progress of Christianity*.) स्वतंत्र ड्रॅ. सो. १८३२, पृ. ३०.

हें पुस्तक अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें आहे तसेंच या पुस्तका-ची १८३३ मधील २२ पृष्ठांची व १८३८ मधील २० पृष्ठांची अशा दोन आवृत्त्या येथें आहेत. या पुस्तकांतील भाषेचें स्वरूप समजण्यासाठीं एक उतारा पुढें देण्यांत येत आहे :

"प्रभु येशू ख्रीस्त याच्या नांवावरून ख्रीस्ती धर्माचें नांव झालें. येशू ख्रीस्त हें नांव अर्थासहित आहे. येशूचा अर्थ म्हणजे तारणारा किंवा उद्धार करणारा. ख्रीस्ताचा अर्थ ह्मणजे अभिषिक्त. हे दोन शब्द ग्रीक भाषेंतले आहेत. प्रभु येशू ख्रीस्त जे आपल्या गांवावर भाव ठेवतात, त्यास तो पाप व नरक यांपासून तारतो म्हणून त्याला येशू नांव आहे. राजे जे असतात त्यांच्या गादीवर बसावयाच्या पूर्वी अभिषेक होतो. प्रभु येशू ख्रीस्त हा त्रैलोक्याचा राजा आहे॥"[१३]

---

१२. ज्ञानोदय– १ एप्रिल १८५४, पृ. ९७.

१३. जॉर्ज कॅंडी, ख्रिस्ती धर्म कसा उत्पन्न झाला आणि पृथ्वीवर वाढला। पृ. १-९.

"खिस्ती धर्म खरा आहे किंवा खोटा आहे ही फारच मोठी गोष्ट आहे. खरा आहे म्हणून जर कोणाची समजूत असली तर खिस्ती धर्म स्वीकारायला त्यानें उशीर लावूं नये."[२४]

## २. मिसेस कँडी

जॉर्ज कँडी व थॉमस कँडी यांच्याप्रमाणें कँडी कुटुंबांतील मिसेस कँडी हिनेंहि मराठींत पुस्तकें लिहिलीं आहेत तीं अशीं:—

(१) **मुलांसाठीं बोधाच्या गोष्टी** (*Instructive Stories for Children*) भाषांतर ट्रॅ. सो. १८३३, पृ. ६०.

हें पुस्तक अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें आहे. यांत एकंदर सात गोष्टी आहेत. त्या म्हणजे आंबा घेण्याची गोष्ट, दादाड पोरांची गोष्ट, मुंग्या माशांची गोष्ट, रागाच्या उपायाची गोष्ट, जीभ आटोपण्याविषयीं गोष्ट, विधवांची गोष्ट अशा त्या सात गोष्टी आहेत.

यांतील भाषेचा नमुना म्हणून पहिल्या गोष्टींतील एक उतारा पुढें देतों:—

**रामा**:—"मला फार पश्चात्ताप झाला. मी फार श्रमी आहें. म्यां खरेंच वाईट काम केलें. माझी क्षमा करावी म्हणून मी प्रार्थितों. येशू ख्रीस्तासाठीं देवानें माझी क्षमा करावी म्हणून म्यां प्रार्थना केली आहे. माझी प्रार्थना त्यानें ऐकिली आहे असें मला वाटतें. कांहीं पहिल्यापेक्षां आतां माझें मन शांत झालें आहे."[२५]

बहुतेक धड्यांतून खिस्ताच्या नांवानें प्रार्थना करावी असा निष्कर्ष काढून मिसेस कँडी हिनें खिस्ती धर्माचें महत्त्व वाचकांच्या मनावर बिंबवण्याचा प्रयत्न केला आहे.

(२) **बालमोंतांतलें शाळेचें वर्णन** (*The Village School*). भाषांतर. शिळाछाप–१८३७, पृ. ४०.

या पुस्तकाची १८३७ सालची (शाईनें कालनिर्देश घातलेली) शिळाछापाची एक आवृत्ति महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें, येथें आहे. या पुस्तकांतील भाषा पुढीलप्रमाणें आहे:—

"दोघी मुलींचें शाळेंत जात असताना वाटेंत जें बोलणें झालें त्याची गोष्ट."

"राणी आणि चिमणी ह्या दोन मुली होत्या. एके दिवशीं चिमणी शाळेंत जात असतां वाटेंत राणीला भेटली तेव्हां राणी ह्मणते,

(राणी)—अगे चिमणे, तूं या वाटेनें नित्य जातेस हें मी पाहतें. तूं कोठें जात असतेस बरें?

२४. तत्रैव, पृ. २७-२८.

२५. मिसेस कँडी, मुलांसाठीं बोधाच्या गोष्टी, पृ. ७.

(चिमणी)— मी बालमोतांतल्या शाळेंत जातें.

(राणी)— वाट लांब आहे. तूं दमत असशील. माझी आई मला तिकडे पाटवीत नाहीं हें मला फार बरें वाटतें.

(चिमणी)— वाट जरी लांब आहे तरी तिकडे जाणें मला वाईट वाटत नाहीं. कां कीं मी तिकडे गेली असतां माझी बुद्धि वाढते आणि मला सुखही अधिक होतें हें तुला ठाऊक नाहीं कीं." [१६]

**(३) सदाचरणाच्या गोष्टी** *(Moral Stories)*. भाषांतर. मुंबई. १८४८, पृ. ८६.

हें पुस्तक महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें, येथें आहे. या पुस्तकांतील भाषेचा नमुना पुढीलप्रमाणें आहे :—

" गयाळ पोर—

" बाबू ह्मणून एक बारा वर्षांचा पोर होता, त्याचा बाप एके लहानशा गांवांत फडकरी होऊन राहिला होता. बापाचें वर्तमान सांगावें हें मला फार वाईट वाटतें, कां कीं तो चांगला मनुष्य नव्हता. तो झिंग्या आणि वाईट शब्द बोलणारा असा वाईट माणूस होता. जवळ जे दुसरे वाईट कैफी लोक राहत होते ते सर्व त्याच्या घरीं येऊन बसत असत. त्याच्या घरांत देवाचें पुस्तक एकहि नव्हतें, देवाची प्रार्थना तो करीत नसे, आणि भजन करावयास तो कधीं देवळांत जात नसे." [१७]

### ३. मि. विल्यम बेल

याची माहिती मिळत नाहीं. यानें एक पुस्तक लिहिलें आहे.

**यात्रिक क्रमण-भाग २.** — —भाषांतर. ट्रॅ. सो. १८५४, पृ. २७२.
हें पुस्तक कोठें मिळत नाहीं.

### ४ मि. डी. जे. क्रेग

याची माहिती कोठें मिळत नाहीं. यानें एक पुस्तक लिहिलें आहे.
**खरेपणा आहे काय ?** —ट्रॅ. सो. १८५६, पृ. २८.
हें पुस्तक उपलब्ध नाहीं.

### ५. कर्नल जी. ए. जॅकोब

याची माहिती मिळत नाहीं. यानें एक पुस्तक लिहिलें आहे.
**मनःशांतीचा पाया** — भाषांतर. ट्रॅ. सो. १८६३, पृ. १८.
हेंही पुस्तक कोठें उपलब्ध होत नाहीं.

---

१६. मिसेस कँडी, बालमोतांतलें शाळेचें वर्णन, पृ. १.
१७. मिसेस कँडी, सदाचरणाच्या गोष्टी, पृ. ५४.

या पुस्तकाशिवाय कर्नल जॅकोब यानें, अहमदनगर येथील अमेरिकन मिशन-कडून सन १८७३ मध्यें बक्षिसासाठीं निबंध मागविण्यांत आले होते, त्या निबंधांचा परीक्षक म्हणून काम केलें. कर्नल जॅकोब याच्याशिवाय फेअरबँक व कृष्णशास्त्री चिपळूणकर हे दोघे निबंधपरीक्षक होते.

आतांपर्यंत निरनिराळ्या मिशनांमधील मिशनरींनीं व मिशनबाहेरच्या कांहीं युरोपियन लोकांनीं जीं पुस्तकें लिहिलीं, त्यांचें विवेचन वर करण्यांत आलें आहे. यापुढें ज्या युरोपियन मिशनरींनीं मराठींत पुस्तकें लिहिलीं आहेत, परंतु ज्यांचे लेखक कोण हें आपणांस समजत नाहीं, अशा कांहीं अनामिक ग्रंथकारांच्या ग्रंथांची माहिती पुढें द्यावयाची आहे. ह्या पुस्तकांच्या अंतरंगावरून व एकंदर सर्वसामान्य स्वरूपावरून हीं पुस्तकें मिशनरींनीं लिहिलीं असावींत असें दिसून येतें. अशीं कांहीं जुनीं पुस्तकें उपलब्ध झालीं आहेत. तीं पुढीलप्रमाणें :—

(१) इंग्लिश भाषणाचें ज्ञान मिळवायासाठीं शीघ्र आणि सोपा उपाय (*An Easy Expeditious Means of acquiring a Knowledge of the English Language*). मिशन प्रेस, १८१८.

या पुस्तकाच्या शीर्षकाखालीं " ह्या देशांत जे इंग्लिश भाषण आणि विद्या शिकावयास इच्छितात त्यांचे हितासाठीं नेमला ॥ " असें लिहून त्याखालीं मराठी, इंग्रजी व संस्कृत बोधवाक्यें दिलीं आहेत. मराठी बोधवाक्य पुढीलप्रमाणें आहे—

" जिह्वाचें भय हें ज्ञानाचें मूळ आहे.
आणि पापापासून फिरणें ही बुद्धी आहे ॥ "

इंग्रजी बोधवाक्य असें आहे :—

"Of all things, knowledge is esteemed the greatest treasure, from incapacity to be stolen, from incapacity to be given away, and from incapacity to be destroyed."

यानंतर या पुस्तकाची ' सूचिका ' (Advertisement) दिली आहे व त्यांत या पुस्तकाची योजना सांगण्यात आली आहे ती अशी—

" ह्या देशांतील जे इंग्लिश भाषण शिकावयास इच्छितात त्यांस शिकविणारा-वांचून समजावयास ही लहान पोथी केली आहे व जे इंग्लिश लोक मराठी भाषण शिकावयास इच्छितात त्यांस ही उपाय आहेत ॥

ह्या पोथीची योजना ऐसी आहे कीं

१ शब्दावळीसारिखा एके एके शब्दाचा अर्थ वेगळा सांगितला आहे ॥

२ तेच शब्द गोष्टींत मिळऊन दाखविले आहेत ॥

३ जीं प्रयोजनें उद्योगांत उपयोगी पडतात व बुद्धीस वाढवितात व अंतः-करणास शुद्ध करितात तीं निवडलीं आहेत ॥

ह्या योजनेप्रमाणें ही सर्व पोथी बहुधा घडली आहे ॥"

या योजनेप्रमाणें च अभिप्रायाप्रमाणें या पुस्तकाचें स्वरूप आहे, असें पुस्तकाच्या अंतरंगावरून कळून येईल.

पुस्तकाच्या सुरुवातीस अक्षरें (Alphabet), व शब्द देऊन नंतर कांहीं वाक्यें दिलीं आहेत. नमुन्यासाठीं कांहीं वाक्यें देतों.

"Sugar and molasses are sweet. साकर आणि गुळ मिठाया आहेत ॥
These steps are stone. ह्या पायऱ्या धोंड्याच्या आहेत ॥
This floor is earth. हि भोय मातीचि आहे ॥"
That road is straight. ति वाट निट आहे।
That window is glass. ति खीडकि कांचेची आहे ॥"

If you behave well, then perhaps you also will obtain such a book–जर तुं बरें वर्ततोस, तर कदाचित तुंही तसि पोथि पावसिल ॥"[30]

अशा तऱ्हेचीं प्रत्येक धड्यांत वाक्यें दिलेलीं असून त्या वाक्यांत आलेले शब्द व त्यांचे मराठी अर्थ दिलेले आहेत.

यापुढें 'यथ्याकरण कित्येक तत्वें आणि प्रकाश ॥' (Certain Grammatical Principles and Illustrations)

या भागाचें विवेचन लेखनानें केलें आहे व या धड्याखालीं "इंग्लिश व्याकरण इंग्लिश भाषण शुद्ध बोलायास आणि वाचायास आणि लिहायास शिकवितें."[31] असें म्हटलें आहे.

हा व्याकरणाचा भाग ११३ पृष्ठापर्यंत आहे. यांत नाम, सर्वनाम, क्रियापद, गुणविशेषण, क्रियापदाचे काळ, प्रयोग, उपसर्ग (Preposition), काकु (Interjection), खुण करणें (Punctuation) असे विषय देण्यांत आले आहेत.

व्याकरण तयार करण्याचा मुंबईतील मिशनरींचा हा पहिलाच प्रयत्न असावा, असे त्याच्या स्वरूपावरून दिसतें. याचें कारण इंग्लिश व्याकरणांतील इंग्रजी शब्दांना मराठी शब्द न सुचल्यामुळें कित्येक ठिकाणीं त्यांना तेच इंग्लिश शब्द ठेवावे लागले. याचें उदाहरण गुणविशेषण (Adjective) या धड्यांत आपणांस पहावयास मिळतें, तें असें :—

---

२८. इंग्लिश भाषणाचें ज्ञान मिळवायासाठीं शीघ्र आणि सोपा उपाय. पृ. ४.
२९. तत्रैव, पृ. ५.
३०. तत्रैव, पृ. ७.
३१. तत्रैव, पृ. १९.

" गुणविशेषणांस मुकाबल्याचे तीन प्रकार आहेत जे पाजटीव, कंम्पारीटीव आणि सुपर्लीटीव म्हटलेले आहेत ॥

" मुकाबल्याचे हे वेगळे प्रकार नामांच्या गुणांचे वेगळे प्रकार दाखवायास स्विकारीले आहेत ॥ "[३२]

व्याकरणांत पुष्कळ उदाहरणें धार्मिक स्वरूपाचीच आहेत. तीं अशीं :—

" ईश्वर जो आपला प्रभु त्याजवर तुं आपले सगळे अंतःकरणानें प्रीती कर.

" तुं मूर्तीच्या पायां पडूं नको आणि तीस पूजुं नको. "[३३]

काकु याची व्याख्या " काकु शब्द जे ते मनांतील आग्रह चेतन दाखवितात ॥ " अशी देऊन " Oh! हा, Alas! उ. O! आहाहें " हे शब्द काकुचे मुख्य आहेत असें म्हटलें आहे.[३४]

' खुण करणें ' या धड्यांत इंग्रजी शब्द मराठींत तसेच दिले आहेत. उदा. Comma कामे; : Colon कोलन. Period पीर्यड् इत्यादि.[३५]

या पुस्तकांत व्याकरणाप्रमाणें गणित, भूगोल, इतिहास, समाजशास्त्र, धर्म इत्यादि अनेक विषयांचें विवेचन करण्यांत आलें आहे. गणितासंबंधानें माहिती देतांना Arithmetic याला लिलावती हाच शब्द त्यांनीं वापरला आहे. यावरून गणितशास्त्रसुद्धां मिशनरी लोक नवीन तयार करीत होते व त्यांना शब्दाची अडचण भासत होती हें दिसून येतें. गणितांतल्या कांहीं व्याख्या पुढीलप्रमाणें दिल्या आहेत—

" *अंकानीं जो हिशेब केला तो लिलावति म्हटलेला आहे ॥*

" मिळवणि वजावाकि गुणाकार आणि भागाकार यांकडून सगळे लैलावत्य हिशेब केले आहेत ॥ "[३६]

यापुढें ४३ व्या धड्यात ' खगोळ भूगोळ वगैरे' या विषयावर माहिती दिली आहे ती अशीः—

" सूर्य चंद्र ग्रह तारा यांचें वर्णन खगोळ म्हटलेलें आहे ।
पृथ्वीचें वर्णन जें त्यांस भुगोळ म्हटलेलें आहे ॥

" पृथ्वीचा आकार तोफेच्या गोळ्यासारिखा गोळाकार आहे ॥ पृथ्वी आकाशामध्यें ईश्वराच्या अदृश्य शक्तीनें लोंबविली आहे ॥"[३७]

---

३२. तत्रैव, पृ. ३५.
३३. तत्रैव, पृ. ७६–७८.
३४. तत्रैव, पृ. ८९.
३५. तत्रैव, पृ. ९१.
३६. तत्रैव, पृ. ११५.
३७. तत्रैव, पृ. ११२.

यापुढें निरनिराळ्या देशांतील लोकांची माहिती ४६ व्या धड्यांत दिली आहे. यांतील हिंदुस्थानाविषयीं माहिती पुढीलप्रमाणें आहे :—

" दाहा वर्षामागें कछ आणि गुजराथ याच देशांत ३००० कन्या प्रतिवर्षी जिवें मारल्या गेल्या आणि आतां कछामध्यें प्रतिवर्षी १००० कन्या जिवें मारल्या जातात असा हिशेब केला आहे ॥

" गंगेच्या कांठीं बहुत रोगी आणि म्हातारे लोक पुरानें वाहिले जाण्यासाठीं अथवा जनावरानी खाल्ले जाण्यासाठीं उघडे टाकले आहेत ॥

" इंदिया देशांत प्रतिवर्षी १०००० विधवा सरणावर आपल्या नवऱ्यांसहित जाळल्या जातात असा हिशेब केला आहे ॥

" ह्या इतक्या सर्व रीती नरहींसेचें प्रकार आहेत आणि ईश्वराला फार संतापवितात."[३८]

एवढें सांगितल्यानंतर पुस्तककर्ता ईश्वर या विषयावर आला आहे. त्यानें येशु खिस्ताची माहिती देऊन त्याची महतीहि गायिली आहे. सर्व लोकांनीं खिस्ती धर्माकडे वळावें असें सांगून शुभवर्तमानाची जाहिरातहि केली आहे :—

यापुढचें प्रकरण 'वेळ मोजण्याची कळा–शकज्ञाणति' (Chronology) असें आहे. यांतील कांहीं माहिती पुढें देण्यांत येत आहे. त्यावरून या प्रकरणाची वाचकांस कल्पना येईल

" हींदु लोकांच्या मछ आणि कछ अवतारांचें वर्णन त्या जळप्रळयाची विपरीत गोष्ट आहे असें कित्येक निपुण माणसें फार शोधुन समजलीं आहेत ॥ लोकानी जळप्रळयाचे कांहीं आगोधर मूर्तीपूजा बहुधा धंडिली होती परंतु निश्चय नाहीं ॥ जळप्रळयानंतर लौकरच मूर्तीपूजा चालत होती हें निश्चय ॥"[३९]

" बुद्ध केव्हां उत्पन्न जाला या विषई हींदु कवीचें मोजणें एवढें असंगत आहे कीं अधिक पुरातन प्रसंग – यथास्थित ठरवायासाठीं हींदु कवीपासून साह्य मिळणार नाहीं."[४०]

अशा तऱ्हेचें या पुस्तकाचें स्वरूप आहे. यात व्याकरण व इतर विविध विषय देण्यांत आले आहेत. मात्र याचा उद्देश दुहेरी आहे असें दिसतें. ज्यांस इंग्लिश भाषण शिकावयाचें आहे, त्यांसहि याचा उपयोग व्हावाच; आणि त्यांच्यामध्यें खिस्ती धर्माचा प्रसारहि व्हावा, असें यावरून स्पष्ट दिसून येतें यांत पुढील मराठी वाङ्मयाचीं सूक्ष्म बीजें दिसून येतात, असा हा ग्रंथ असल्यामुळें याला महत्त्व द्यावेंसें वाटतें. हें मुंबई प्रांतांत प्रसिद्ध झालेलें पहिलेंच मराठी पुस्तक होय. याची १८३१

३८. तत्रैव, पृ. १४२–१४३.
३९. तत्रैव, पृ. १५७.
४०. तत्रैव, पृ. १५९.

करितोस ॥ तूं कृपा करून अन्न वस्त्र प्रति दिवसीं आह्मास देत आहेस ॥ सगळी सृष्टी तुझ्या स्वाधीन आहे ॥ अवघे पराक्रम व ज्ञान व पुण्य व वरेपण तुझीं आहेत ॥"[४७]

यापुढें प्रार्थनेच्या अशाच कांहीं रीती दिल्या आहेत. त्यांत "कुटुंबासहित संध्याकाळची प्रार्थना", "येकांतीची प्रार्थना", "जेवणाविषयीं प्रार्थना" अशा कांहीं प्रार्थना आहेत.

या प्रार्थनेच्या रीतींनंतर भजनाचे दहा अभंग दिले आहेत व म्हणूनच या पुस्तकाला 'भजनाचे मासले' असें नांव देण्यांत आलें असावें. भजनासाठीं तयार केलेले अभंग हें मिशनरींचें अगदीं पहिलेंच पद्यवाङ्मय असावें. त्यानंतर बऱ्याच मिशनरींनीं पदें व गीतें तयार करून पद्यवाङ्मयांत भर घातली. त्याची माहिती वेळोवेळीं मागें आलेली आहे. हे भजनाचे अभंग काव्यदृष्ट्या फार योग्यतेचे आहेत असें नाहीं; पण पद्यरचनेचा मिशनरींचा हा पहिलाच प्रयत्न असल्यामुळें त्याला महत्त्व आहे. त्या दृष्टीनें त्यांनीं हे अभंग कसे केले आहेत, हें पाहण्यासाठीं 'भजनाचे मासले' यांतून कांहीं अभंग खालीं दिले आहेत :—

**अभंग १ ॥ सुख साधायाचा उपाय ॥** चाल कानडा ॥

" १ तुह्मास मुलां हो सुख व्हावें
तर तुह्मी ईश्वरासच भ्यावें
२ त्याच्याच स्वाधीन सर्व गोष्टी
ठिकाण तयाचें सारी सृष्टी
३ तयाचें इष्टत्व साधा ऐसें
तराया उपाय पुण्य तैसें
४ येशूनें आह्मास्तव केलें मरून
तें घेतां तरावें तयास स्मरून
५ ईश्वर तुह्मांस मित्र साधा
सुखाचा समुद्र असें लाधा
६ व्हा राजी त्याचीच करा भक्ती
पश्चात अनंत घ्यावी शक्ती."[४८]

**अभंग २ ॥ निजण्याच्या समयींची प्रार्थना ॥** चाल कानडा ॥

" १ दिवस गेला झोंपीं जातों
ईश्वर स्मरून कीर्ति गातों
२ माझी जतन् रात्रीं करा
अर्जी पुरेव हे ईश्वरा

४७. भजनाचे मासले, पृ. ४–९.
४८. तत्र, पृ. ३७.

३ परी रात्रीं मी जर् मरेन
अन्य दिवस जर न पाहेनें
४ तर येशूचें पुण्य द्यावें
मला स्वर्गवस्तींत् घ्यावें." [४९]

या अभंगांवरून या पुस्तकाचें स्वरूप वाचकांच्या घ्यानीं येईल.

(७) मद्यादि पदार्थापासून शरीर बुद्धीस विकार होतात ते ( *The Effects of Ardent Spirits upon the Human Body and Mind* ). मुंबई – आंग्लोळी, १८३६, पृ. ३४.

या पुस्तकाच्या विषयासंबंधानें लेखकानें पुढीलप्रमाणें माहिती दिली आहे :

" या पोथींत दारू प्यालें असतां शरीरास व बुद्धीस काय काय विकार होतात ते सांगितले आहेत व भांग, गांज्या, रंडी, अफू यांजपासून काय काय दुःखें होतात तींहि थोडींशीं जाणविलीं आहेत."

(८) मनोरंजक गोष्टी —( *Pleasing Instruction* ). ट्रॅ. सो. १८५१, पृ. ३२० [५०]

वरील खिस्ती वाङ्मयाप्रमाणें, लहान लहान पुस्तकें एकत्र बांधून त्यांचे कथासंग्रह निराळ्या नांवाखालीं मिशनरींनीं प्रसिद्ध केले आहेत. त्यांपैकीं वर दिलेला ' मनोरंजक गोष्टी ' हा कथासंग्रह आहे. यांत खालील पाच पुस्तकें एकत्र संग्रहित केलीं आहेत :—

१ सदाचरणाच्या गोष्टी — मिसेस कॅंडी.
२ चमत्कारिक गोष्टी — मिसेस फरार.
३ मुलांसाठीं बोधाच्या गोष्टी — मिसेस कॅंडी.
४ बालमोंतांतलें शाळेचें वर्णन — मिसेस कॅंडी.
५ Summary of Christian Doctrine.

(९) खिस्ती भक्तांच्या कथा ( *Christian Narratives* ). ट्रॅ. सो. १८५४, पृ. २४८. [५१]

वरीलप्रमाणेंच हें कथासंग्रहाचें पुस्तक असून, त्यामध्यें इंग्रजींतून भाषांतर केलेल्या पुढील गोष्टी आहेत :—

४९. तत्रैव, पृ २९.

५०. या पुस्तकाची माहिती *O. C. S.* मध्यें देण्यात आली आहे. पहा–*O. C. S.* November 1851, p. 426.

५१. या पुस्तकाची माहिती ज्ञानोदय–१ सप्टेंबर १८५४, पृ. २६१ मध्यें दिली आहे.

आहे. या पुस्तकांत जीं प्रश्नोत्तरें आहेत त्यांचें स्वरूप समजून यावें, म्हणून या ठिकाणीं या पुस्तकांतील दोन नमुने देतों :—

"प्रश्न १। हे मुला। तुला कोणी उत्पन्न केलें। हें तूं जाणतोस काय?

उत्तर।— त्या मोठ्या देवानें आकाश व पृथ्वी उत्पन्न केलीं। तोच माझा उत्पन्नकर्ता॥

प्रश्न २। तुजसाठीं देव काय करितो?

उत्तर।— रात्रंदिवस तो मला अनर्थापासून सांभाळितो। आणि सर्वकाळ माझें बरें करितो॥"[५७]

हीं प्रश्नोत्तरें संपल्यानंतर पुढें सूचना देऊन आमेन या शब्दाचा अर्थहि दिला आहे. तो असा :—

"आमेन या शब्दाचा अर्थ असा समजावा। कीं। जें मीं बोलतों। तें मीं खरें मानितों। आणि जें मीं तोंडानें मागतों। तें मीं अंतःकरणापासून इच्छितों॥"[५८]

(१५) शास्त्रांतील वर्तमानसार (*Scripture History*). भाषांतर. अ. मि. प्रकाशनकाल नाहीं, पृ. ५६.

हें पुस्तक प्रथम १८१९ मध्यें प्रसिद्ध झालें व दुसरी आवृत्ति १८२५ मध्यें निघाली,[५९] परंतु अहमदनगर येथील अमेरिकन मिशनमध्यें जें पुस्तक उपलब्ध आहे त्यावर कालनिर्देश नाहीं. या पुस्तकाचा विषय कोणता, हें या पुस्तकांतच लेखकानें थोडक्यांत सांगितलें आहे :

"लोकांस हितोपदेश होण्याकरितां, ईश्वरानें येकच शास्त्र स्थापलें. तें खरें आहे, आणि त्यावांचून ईश्वरानें दुसरें शास्त्र व वेदही लोकांस दिल्हीं नाहींत. पुर्वी काय काय जालें, आणि पुढें काय काय होईल, हें वर्तमान त्या शास्त्रांत विस्तारानें सागीतलें आहे; त्या वर्तमानाचें सार काढून येथें लिहिलें आहे."

या लहानशा उताऱ्यावरून या पुस्तकाची भाषा कशी असेल हें समजून येईल. या पुस्तकात येशूचे चमत्कार वर्णन करून येशूचें महत्त्व भाविकांच्या मनांत ठसावें, या दृष्टीनें याची रचना केली आहे.

येथपर्यंत ज्या मिशनरींनीं व युरोपियन लोकांनीं मराठी भाषेंत स्वतंत्र व भाषांतरित पुस्तकें लिहिलीं; परंतु त्यांचीं नांवें त्या त्या पुस्तकावर नसल्यामुळें त्या पुस्तकाचे लेखक कोण होते, हें समजण्यास मार्ग नाहीं, अशा अनामिक ग्रंथकारांच्या ग्रंथांची माहिती देण्यांत आली. हीं सर्व पुस्तकें अगदीं जुनीं आहेत हें त्या पुस्तकांचे

---

५७. लहान मुलांसाठीं प्रश्नोत्तरावली, पृ. १.

५८. तत्रैव, पृ. २७.

५९. *Memorial Papers of the American Marathi Mission*, p.112.

प्रसिद्धिकाल पाहिले असतां दिसून येणार आहे. हीं पुस्तकें युरोपियन लोकांनीं आणि मिशनरींनीं लिहिलीं असलीं पाहिजेत, याविषयीं कांहीं विचार मांडतां येतील. इंग्रजी भाषा शिकण्याच्या पुस्तकांतसुद्धां अंकगणित, भूगोल, खगोल, इतिहास असे विषय लेखकानें हाताळले आहेत. हे विषय मराठींत सांगणारे युरोपियन लोक असले पाहिजेत, कारण इंग्रजी ही भाषा तत्कालीन एतद्देशीयांना येत नव्हती.

दुसरें म्हणजे या पुस्तकांत पुष्कळ उल्लेख व उदाहरणें येशू खिस्तविषयक आहेत, त्याचा हेतुहि खिस्तीधर्म प्रचाराचाच दिसतो. या पुस्तकांत कथात्मक, अभंगांच्या स्वरूपाचीं पद्यात्मक अशींहि कांहीं पुस्तकें आहेत. त्यांतील ठराविक सांच्यावरून व स्वरूपावरून या पुस्तकांचे लेखक मिशनरी असावेत, हें समजावयास कठीण जात नाहीं.

---

# युरोपियन लोकांची मराठी भाषेची सेवा व त्यांचे विविध विषयांवरील ग्रंथ

हिंदुस्तानांत प्रथम पोर्तुगीजांनीं व नंतर इंग्रजांनीं प्रवेश केल्यानंतर, त्यांपैकीं कांहीं युरोपियन लोकांनीं मराठी भाषेची सेवा कशी केली, यासंबंधीं मागील सर्व प्रकरणांत आढावा घेतला आहे. जितके इंग्रज व युरोपियन लोक येथें येतील तितक्यांनीं या देशांतील भाषांचा अभ्यास केला तर ब्रिटिश संस्कृति येथें कायमची टिकेल व सर्व आशियांत ख्रिश्चन धर्माचीं तत्त्वें पसरतील असें त्यांना वाटे. देशी भाषा शिकण्याचा त्यांचा हा हेतु स्पष्ट होता व तो कॅरेच्या एका भाषणांतील पुढील उताऱ्यावरून स्पष्ट कळून येईल. कॅरे म्हणतो,

"They will extend the domain of British civilisation, security, and happiness, by enlarging the bounds of Oriental literature and thereby diffusing the spirit of Christian principles throughout the nations of Asia." १

वेलस्लीनें देशी भाषाचा अभ्यास करण्याची सोय केल्यापासून पुष्कळ युरोपियन लोक देशी भाषांचा अभ्यास करूं लागले. या युरोपियन लोकांनीं मराठी भाषेचा अभ्यास करून व्याकरण, भाषाशास्त्र, वैद्यक, इतिहास व संतचरित्रें या विषयांवर अनेक पुस्तकें मराठींतून व इंग्रजींतून लिहिलीं त्यांची माहिती यापुढें द्यावयाची आहे.

## व्याकरणविषयक पुस्तकें :

देशी भाषा शिकतांना व्याकरण विषयाचा अभ्यास करणें आवश्यक आहे, असें या युरोपियन लोकाना आढळून आल्यानेंच जेसुइट मिशनरींनीं व इतरांनीं कॅरेनें मराठी भाषेचीं व्याकरणें लिहिलीं तीं अशीं :—

(१) *Illustrations of the Grammatical Parts of Guzerattee Mahratta, and English Languages*. डॉ. ड्रमंड. कुरियर छापखाना, मुंबई, १८०८. पृष्ठांक नाहींत.

" डॉ. राबर्ट ड्रमंड यानें १७९२ मध्यें कॉर्पोरेशन ऑफ सर्जनचें सर्टिफिकेट (C. C. S.) मिळविल्यानंतर तो १७९३-९४ मध्यें मुंबईत आला व त्याची नेमणूक असिस्टंट सर्जन म्हणून १३ जानेवारी १७९७ मध्यें झाली. (*Bo. Mily. Cons. 13 Jan. and 14 Mar. 1797*) सन १८०० मध्यें किंग्ज कॉलेज, ॲबर्डीन, येथून तो एम्. डी. झाला व सर्जन म्हणून १ फेब्रुवारी १८०३ मध्यें त्याला नेमण्यांत

१ George Smith, *The Life of William Carey*, p. 225.

आलें. पुढें इंग्लंडला जात असतांना वाटेंतच लेडी जेन डंडास ही बोट बुडाल्यानें तो १४ मार्च १८०९ मध्यें मरण पावला."[२]

डॉ. डूमंडचें गुजराती मराठींतील मुंबई प्रांतांतील प्रसिद्ध झालेलें पहिलें पुस्तक आहे. डूमंडच्या व्याकरणांतील मराठी भाषेची लिपि मोडी आहे. हें व्याकरण तयार करतांना त्याच्या डोळ्यांपुढें कॅरेचें व्याकरण असावें, असें त्यानें लिहिलेल्या प्रस्तावनेवरून दिसतें.

ग्रंथाच्या सुरुवातीला डूमंडनें गुजराती व मराठी वर्णमाला देऊन इंग्रजींतील अक्षरांनीं उच्चार कसा करावयाचा तें इंग्रजी शब्द देऊन उदाहरणानें दाखवून दिलें आहे. वर्णमालेनंतर बाराखड्या दिल्या आहेत. व्याकरणाचा प्रास्ताविक म्हणून एवढा भाग दिल्यानंतर त्यानें नामें, त्यांच्या विभक्ति, सर्वनामें व त्यांच्या विभक्ति, क्रियापदें, अव्ययें व अंक एवढा व्याकरणाचा भाग दिला आहे.

यापुढें डूमंडनें कांहीं वाक्प्रचार व सुभाषितवजा म्हणी दिल्या आहेत. हे सर्व वाक्प्रचार व म्हणी मुळांतून वाचणें फार मनोरंजक ठरेल तेव्हां वाक्प्रचारांसाठीं जागा अडविण्याऐवजीं या पुस्तकाचा महत्त्वाचा भाग जो शब्दसंग्रह त्याकडे वळूं. डॉ. डूमंडच्या या सर्व ग्रंथाचीं सुमारें दोनतृतीयांश पृष्ठें व्यापलीं आहेत व त्यांत ह्या शब्दसंग्रहासाठीं जवळ जवळ ४५० शब्द दिले आहेत. प्रत्येक शब्दाचा नुसता अर्थ न देता त्या शब्दावर विस्तृत व माहितीपूर्ण अशी टीप दिली आहे. त्या शब्दामुळें आपणास तत्कालीन, सामाजिक व राजकीय परिस्थितीचें ज्ञान होईल अशा तऱ्हेनेंच या शब्दसंग्रहांतील शब्दांची निवड केली आहे. हिंदु, जैन व पारशी या धर्मांची माहिती यांत आढळते. हिंदु शब्दाचा अर्थ व त्याबद्दलची माहिती डूमंडनें काय दिली आहे ती पहा:—

"Hindoo—This word in the Persian language signifies black, blacky or blue. In these parts it is employed by Foreigners to distinguish the aboriginal Indians or the followers of Bruhma and of Boodh etc. from Jews, Christians, and Mahomedans or Musulamans"[३]

निरनिराळ्या धर्मांतील लोकांची माहिती दिल्यानंतर उद्योगधंद्यानिमित्त ज्या जाती व वर्ग पडले आहेत, त्याची माहिती डूमंडनें दिली आहे. उदाहरणार्थ बामण, धेड, धोबी, हजाम, यति, जोगी, जंगम, जंगली, बैरागी, रजपूत, खत्री,

---

२ डूमंडची चरित्रविषयक माहिती कॉमनवेल्थ रिलेशन्स ऑफिस, लंडन नंबर आर. ६३/५४ यावरून देण्यात आली आहे. ही माहिती 'Crawford's Roll of the I. M. S. 1615–1930' यावरून देण्यात आल्याचें त्यात नमूद करण्यात आलें आहे.

३ R. Drummond, *Illustrations of the Grammatical Parts of Guzeraelle, Mahratta and English Languages*, p. 66 (written in Ink.)

कोळी, सुतार, कुणबी, लोहार, महियाडी-मेवाडी, पंड्या, मिआनी, मोमिन असे घरेच शब्द यांत आहेत. उदाहरणासाठी 'बामण' या शब्दाचा ड्रमंडनें दिलेला अर्थ पुढें देण्यांत आला आहे:

"Bamunn so the vulgar of Guzerat and the Mahratta languages speak and write Brahmin, i. e. a person of the Priesthood who meditates on the mystery of creation." ४

डॉ. ड्रमंडच्या पुस्तकाचें स्वरूप वरील कांहीं उताऱ्यांवरून ध्यानांत येईल. हें पुस्तक रॉयल एशियाटिक सोसायटी, मुंबई, येथील ग्रंथालयांत आहे.

(२) *A Grammar of the Mahratha Language.* महंमद इब्राहिम मकबा मुनशी, मुंबई. १८२५, पृ. ११२.

हें महंमद इब्राहिम मकबाचें मराठी भाषेचें व्याकरण व्हॅन्स केनेडीनें सुधारिलें. हें व्याकरण मराठी संशोधन मंडळ, मुंबई, याच्या ग्रंथालयांत आहे.

(३) *A Grammar of the Mahratta Language,* जेम्स रॉबर्ट बॅलंटाईन, एडिंबरो – १८३९, पृ. ५२.

केरेचें व्याकरण दुर्मिळ झाल्यानें व तें समाधानकारक न उतरल्यानें इंग्लंडमधील हेलिबरी येथील ईस्ट इंडिया कंपनीच्या कॉलेजच्या मराठी वर्गासाठीं हें पुस्तक बॅलंटाईन यानें केलें होतें. हें व्याकरण शिळाछाप असून त्यांतील मोडी लिपि स्वतः बॅलंटाइन याच्या हातची आहे. हें पुस्तक प्रा. प्रियोळकर याच्या खाजगी ग्रंथसंग्रहांत आहे.

(४) *A Grammar of the Marathi Language,* एच्. एस्. के. बेलायर्स व एल्. वाय्. असखेडकर, इंग्रजी–मुंबई. १८६८, पृ. ९०.

ह्या व्याकरणाचे एक लेखक बेलायर्स हे शिक्षणखात्यांत अधिकारी होते. बेळगांव येथील सरदार हायस्कूलचे कांहीं काळ हेडमास्तर म्हणून त्यांनीं काम केलें. हें व्याकरण लिहिण्याचा उद्देश या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत लेखक पुढीलप्रमाणें देतात,

"To gain a critical and accurate knowledge of the Marathi Language has, upto the present time, been almost *impossible* for Europeans."

'Dadoba Pandurang's and Krishna Shastri Godabola's Marathi Grammars, invaluable as they are, present insurmountable difficulties to any but very advanced scholars. Dr. Stevenson's Grammar is worse than useless.'' ५

४ *Ibid.*, p. 40 (written in Ink).

५ *The Bombay Educational Record.* Vol. VI. 1870, p. 5.

यामुळें हीं सर्व व्याकरणें निरुपयोगी वाटल्यामुळेंच लेखकांनीं हें व्याकरण लिहिलें असावें असें दिसतें.

**( ५ ) व्याकरणासंबंधीं सोपे धडे. भाग १, २, ३.** *( The Students Manual of Marathi Grammar ).* – मि. जे. एस्. हेग, १८६९-७४.

या व्याकरणाचे लेखक हेग यांच्यासंबंधीं खिस्ती वाङ्मयाच्या इतिहासांत माहिती मिळते ती अशी :

" यांनीं ' व्याकरणासंबंधीं सोपे धडे ' नामक पुस्तकाचे खंडशः तीन भाग प्रसिद्ध केले. ग्रंथावरून व्याकरण लावण्याची त्यांना मोठी हौस असून ते स्वतः श्रेष्ठ वर्गाला व्याकरण शिकवीत असत. हेग साहेबांचा मराठी शुद्धलेखनावर बराच कटाक्ष असून मोडी लिपींत पत्र लिहिणें वगैरे गोष्टींचा त्यांना विशेष नाद होता असें समजतें. "[६]

अहमदनगर येथील अमेरिकन मराठी मिशनमध्यें या व्याकरणाचा पहिला भाग १८६८ मध्यें व दुसरा भाग १८६९ मध्यें प्रसिद्ध झालेला असे दोन भाग आहेत. यावर " The Students Mannual of Marathi Grammar ( Designed for High School ) " असें शीर्षक असून लेखकाचें नांव नाहीं, पण ॲबट याच्या कॅटलॉगवरून हें पुस्तक वर लिहिल्याप्रमाणें हेग यांचेंच असावें असें दिसतें. या पुस्तकाची १४० व ८० पृष्ठें आहेत.

हें व्याकरण तयार करतांना लेखकानें डॉ मोरेल याचें " Analysis of Sentences " व डॉ. ऑंगस याचें " Hand book of the English Tongue " या दोन पुस्तकांचें साहाय्य घेतल्याचे नमूद केलें आहे. प्रस्तावनेंत लेखकानें मराठी भाषेविषयीं जे उद्गार काढले आहेत, त्यांवरून मराठी भाषेविषयीं लेखकाची काय कल्पना होती हें वाचकांस कळेल. पहा :—

" It is, indeed, difficult to account for this degree of development which it has attained, since it is deficient in written literature in Marathi is the work of small men, who were generally incapable of doing anything beyond paraphrasing Sanskrit poems. With the exception of Tukaram, none seems to write with the enthusiasm of a genuine poet, and even Tukaram failed to see the abundant charms of nature. One solution of this problem in my humble opinion, is this; that Marathi has for centuries been the language of several splendid courts, and of intelligence and culture." [७]

---

६ मराठी खिस्ती वाङ्मयाचा इतिहास, पृष्ठ. १९.

७ J. S. Haig. *The Students' Mannual of Marathi Grammar. Part II. Preface*, pp. III-IV.

हें पुस्तक हिंदी प्रौढ विद्यार्थ्यांना व मराठी भाषा शिकणाऱ्या युरोपियन लोकांना उपयोगी पडेल, असा अभिप्राय या पुस्तकावर मेजर थॉमस कँडी यानें दिला आहे.

(६) *A Comparative Grammar of the Indo-Aryan Languages of India ( Three Volumes. )* जे. बीम्स. १८७२-१८७९.[८]

बीम्सनें आपल्या या पुस्तकांत मराठी भाषेसंबंधीं महत्त्वाचे विचार मांडले आहेत, म्हणून या पुस्तकाचा निर्देश येथें करण्यांत आला आहे.

(७) *Linguistic Survey of India. Vol VII*, ग्रिअरसन. १९०५.

या भागाचा संपादक म्हणून ग्रिअरसनचें नांव असलें, तरी या पुस्तकाची प्रस्तावना स्टेन कोनौ या युरोपियनानें लिहिली असून त्यांत मराठी भाषेसंबंधीं कांहीं विचार मांडण्यांत आले आहेत. ही प्रस्तावना लिहिण्यापूर्वी स्टेन कोनोनें मराठी भाषेवर 'Maharashtri and Marathi' या नांवाचा एक लेखहि लिहिलेला आढळतो.[९] ग्रिअरसनच्या पुस्तकाला लिहिलेली प्रस्तावना व हा लेख वाचला असतां, स्टेन कोनौनें मराठी भाषेची केलेली सेवा वाचकांना सहज दिसून येईल.

(८) *La Formation de la Langue Marathe.* ब्लॉक्, १९२०, पृ. ४३२.

हें मराठी भाषेसंबंधीं लिहिलेलें फ्रेंच भाषेंतील पुस्तक आहे. याचें मराठी भाषांतर डॉ. वा. गो. परांजपे यांनीं करून १९४१ सालीं पुणें येथें छापलें आहे.

**(९) जॉन लेडन याचें व्याकरण :**

मराठी व्याकरण व भाषा यावर लेख लिहिणारा हा प्रमुख युरोपियन होय. याचा जन्म ८ सप्टेंबर १७७५ रोजीं झाला. यानें एडिंबरो येथें एल्. आर्. सी एम्. डी. ही पदवी १८०२ मध्यें मिळविल्यावर म्हैसूर सर्वेचा सर्जन म्हणून हा १८०४ मध्यें हिंदुस्तानांत आला. इ. स. १८०७ मध्यें हिंदुस्तानीचा प्रोफेसर म्हणून यानें फोर्ट विल्यम कॉलेज, कलकत्ता येथें काम केलें. पुढें कलकत्ता मिंट येथें असिस्टंट मास्टर म्हणून याची नेमणूक झाली होती. हा पुढें जावा येथें फोर्ट कॉर्नेलिस या ठिकाणीं २७ ऑगस्ट १८११ रोजीं मरण पावला.[१०]

यानें निरनिराळ्या विषयावर बरेंच लेखन केलें आहे- इंडो-पर्शियन, इंडो-चायनीज व दख्खनी भाषांचा लेखक ( १८०७ ), इंडो-चायनीज देशाची भाषा व

८ *Catalogue of Printed Books in Imperial Library Vol. I.* A to L. p. 103. बीम्स याचें थोडक्यात चरित्र पुढील ग्रंथात पहा, Buckland—*Dictionary of Indian Biography*, p 31–32.

९ *Indian Antiquary*, Vol. XXXII. April 1903. pp. 180-192.

१० डॉ. जॉन लेडनची चरित्रविषयक माहिती कॉमनवेल्थ रिलेशन्स ऑफिस, लंडन नंबर आर् ६२/५२ यावरून देण्यात आली आहे.

वाङ्मय (१८१० ), मलाया ग्रामर, प्राकृत ग्रामर यांचा लेखक म्हणून याचें नांव प्रसिद्ध आहे. सुप्रसिद्ध लेखक सर वॉल्टर स्कॉट याच्या Border of Minstrelsy (१८०२) याच्या दोन खंडांच्या लेखनामध्यें यानें मदत केली होती.

याच्या भाषाभ्यासासंबंधीं पुढील उल्लेख आढळतो,

"A rival to William Carey in his capacity to learn and use Oriental languages was John Leyden (1775-1811),.. he qualified, as a doctor and went to Madras in 1803. Within two years he was studying Arabic, Persian, Hindostani, Marathi, Sanskrit, Armenian, and four main Dravidian languages." [११]

लेडनच्या नांवाचा उल्लेख आपणांस एल्फिन्स्टनच्या चरित्रांतहि सांपडतो.[१२]

लेडनचीं छापील पुस्तकें मिळत नाहींत, पण त्यानें जे लेख व पुस्तकें लिहिलीं, त्यांच्या हस्तलिखितांची माहिती ब्रिटिश म्युझियममधील मराठी हस्तलिखितांच्या कॅटलॉगमध्यें मिळते. हीं हस्तलिखितें उइल्यम अर्स्किन यानें गोळा करून ब्रिटिश म्युझियममध्यें ठेवलेलीं आहेत. या कॅटलॉगांत लेडन यानें लिहिलेल्या व्याकरणाची माहिती पुढीलप्रमाणें देण्यांत आली आहे :—

A Grammar, फोलिओ ९१, आकार १३¼″ + ८½″, युरोपियन पेपरवर लिहिलेलें.

"The Grammar is elementary, and, more or less in an unfinished state. There is no special chapter on Syntax; but the latter part of the work contains a large number of useful and idiomatic phrases, chiefly on the syntax of the tenses and participles. There are also long lists of Adverbs and Adverbial phrases." [१३]

कॅटलॉगमध्यें लेडनच्या दुसऱ्या लेखाच्या हस्तलिखितांचीहि माहिती दिली आहे. यांत १६१ फोलिओ असून १८ लेख आहेत ते मराठी, उरिया व इतर भाषांत आहेत. यांत कांहीं भाषांतरें, टीपा व स्वतंत्र लेखहि आहेत. मराठी भाषा व वाङ्मय याविषयीं जे लेख आहेत ते खालीलप्रमाणें आहेत :

---

११ Sir A. Chatterji and Sir. R. Burn, *British Contributions to Indian Studies*, p. 21.

१२ Sir T. F. Colebrook, *Life of the Honourable Mount Stuart Elphinstone*, p. 238.

१३ J. F. Blumhardt, *Catalogue of the Marathi, Gujarati, Bengali, Assamese, Oriya, Pushtu, and Sindhi Manuscripts in the Library of the British Museum*, p. 12.

"IV. फोलिओ १७-४१. A Grammar of the Marathi language written in Modi, with interlinear translations and transliterations.

VIII. फोलिओ ९५-९६. Short notes on the gender and declension, of nouns in Marathi.

IX. फोलिओ ९७-१०१. Marathi stories transliterated in Roman Characters.

X. फोलिओ १०२. Marathi Phrases.

XI. फोलिओ १०३. Short Marathi extracts, written on the back of an invitation to dinner from "Mr. and Mrs. Smith," addressed to "Doctor Leyden," and dated "Chowringhee the 2nd April 1806." [१४]

लेडनचें हें व्याकरणाचें पुस्तक प्रसिद्ध झालेलें दिसत नाहीं, तसेंच याच्या लेखनाचा कालहि निश्चित ठरवितां येत नाहीं.

व्याकरणविषयक लेख :

(१) *On the Boundaries of the Marathi Language*—[१५] डब्ल्यू. एफ्. सिंक्लेअर. १८७४.

मराठी भाषेची मर्यादा नर्मदा कीं तापी असावी, याविषयीं हा लहानसा लेख लिहिण्यांत आला आहे.

(२) *Indo-Aryan Vernaculars*, सर जॉर्ज ग्रिअरसन, १९१७-२०.[१६]

या लेखांत मराठी भाषेसंबंधीं ग्रिअरसननें २७ व २८ असे दोन परिच्छेद लिहिले आहेत. मराठी भाषेसंबंधीं ग्रिअरसनचें काय मत होतें, हें या लेखावरून दिसून येतें. तो म्हणतो,

"Marathi has a copious literature, and many poetical works of great value are written in it." [१७]

(३) डॉक्टर याचे मराठी भाषा व व्याकरण यांसंबंधीं लेख :

१ "*The Passive Voice of The Jnanesvari*—1926-28. [१८]

२ "*The Grammar of The Jnanesvari*—1826-28. [१९]

---

१४ *Ibid.*, pp. 38-39.

१५ *Indian Antiquary*. Vol. III. September 1874, p. 250.

१६ *Bulletin of the School of Oriental Studies*, Vol. I, 1917-20. pp. 47-81 and 51-85.

१७ *Ibid.*, p. 68.

१८ *Bulletin of the School of Oriental Studies*, Vol. IV. 1920-28, pp. 59-64.

१९ *Ibid.*, pp. 543-573.

३ "*A Fourteenth century Marathi Inscription*—1928–30. [२०]
४ *Further Light on the Archaic Marathi* जा *Genitive*–
—1928–30. [२१]

पहिल्या दोन लेखांत ज्ञानेश्वरींत नेहमीं आढळणारी इज, पी, व पिज या तीन कर्मणि प्रयोगाच्या रूपांबद्दल त्याने विवेचन केलें आहे. हा लेख व्याकरणाच्या दृष्टीनें अपुरा वाटूनच की काय डॉडरेटनें ज्ञानेश्वरीच्या व्याकरणाचा सविस्तर विचार दुसऱ्या लेखांत केला आहे. हें व्याकरण लिहितांना माडगांवकरांच्या ज्ञानदेवीची प्रत अधिकृत म्हणून डॉडरेटनें धरली आहे. या व्याकरण विषयाच्या बाहेर जाऊन ज्ञानेश्वराचा जन्मकाल कोणता घ्यावा, याविषयाचीहि चर्चा त्यानें केली आहे व ज्ञानेश्वराचा जन्मकाल तेराव्या शतकाच्या मध्याला घ्यावा, असें सुचविलें आहे.

एवढें प्रास्ताविक लिहून ज्ञानेश्वरीच्या व्याकरणाला सुरवात करतांना डॉडरेट यानें व्याकरणाचा उद्देश सांगितला आहे तो असा :—

"The chief purpose of the present review is to assemble the principal archaisms of the Jnanesvari in a form which may be readily accessible to the English reader, and to illustrate them by references to the actual text." [२२]

ज्ञानेश्वरीच्या व्याकरणाचा हा उद्देश देऊन डॉडरेट यानें पुढें हें व्याकरण लिहिलें आहे. पण स्थलाभावीं त्याची अधिक माहिती येथें देतां येत नाहीं. तें मुळांतूनच पहावें, हें बरें.

डॉडरेटनें तिसऱ्या लेखांत नागांव शिलालेखाची माहिती दिली आहे. त्यानें या शिलालेखाच्या २८ ओळी देऊन, त्याचें भाषांतरहि दिलें आहे व त्यापुढें शब्दांवर टीपा दिल्या आहेत

चवथ्या लेखांत षष्ठी विभक्तीच्या 'जा' या प्रत्ययाचा डॉडरेटनें विचार केला आहे. एकंदरीत या लेखावरून डॉडरेटचा जुन्या मराठी वाङ्मयाचा अभ्यास आपणास दिसून येतो.

(४) *The Pronunciation of Marathi*. ए. लॉईड जेम्स व एस्. जी. कान्हेरे.—१९२६–२८.[२३]

२० *Bulletin of the School of Oriental Studies*, Vol. V, 1928–30, pp. 37–42.

२१ *Ibid.*, pp. 251–252.

२२ *Bulletin of the School of Oriental Studies*. Vol. IV. 1926–28. pp. 545.

२३. *Ibid.*, pp. 791–801.

मराठीच्या उच्चारशास्त्रावर लेख लिहितांना आरंभीं लेखकद्वय म्हणतात,

"The Pronunciation recorded in this article is that habitually used by one of the writers, whose native language is Marathi. It represents the pronunciation of a native of Bombay who has for many years lectured in his own language in the principal cities of the Bombay Presidency. It is not an attempt, therefore, to represent the colloquial pronunciation of Marathi, but of the style of language in vogue in learned circles in public utterances" [२४]

यानंतर जेम्सनें उच्चारशास्त्राचे कांहीं नियम सांगून उच्चार कसे करावेत यासाठीं एक दोन उतारे देऊन त्याच्यावर उच्चार कसा करावयाचा त्याचे चिन्हांकित ध्वनिलेखन केलें आहे. आणि हा उच्चारशास्त्रावरील लेख संपविला आहे.

(५) *Some Problems of Indo-Aryan Philology,* जूल्स ब्लोक, 1928–1930.[२५]

हा लेख म्हणजे ज्युल् ब्लोकनें भाषाशास्त्रावर दिलेलीं कांहीं व्याख्यानें होत. यांत भाषाशास्त्रांतील कांहीं प्रश्नांचा विचार करतांना मराठी भाषेविषयीं कांहीं विचार व्यक्त झाले आहेत.

## २. वाक्यावळी व म्हणी यांवरील पुस्तकें

भाषा व व्याकरण यांना अगदीं जवळचा ग्रंथप्रकार म्हणजे वाक्यावळी व म्हणी हा होय. मराठी वाङ्मयांत हा ग्रंथप्रकार आला तोहि अगदीं नवीनच. याचें कारण म्हणजे युरोपियन लोकांना मराठी भाषा यावी व एतद्देशियांना इंग्रजी भाषा कळावी हाच असे. याची सुरवातहि प्रथम युरोपियन लोकांनीं केली व त्यानंतर अशाच प्रकारचीं काहीं पुस्तकें एतद्देशीयांनीं तयार केलीं.

वाक्यावळीसारखें लेखन व या प्रकारचीं जीं पुस्तकें युरोपियन लोकांनीं लिहिलीं त्याची माहिती प्रसंगानुसार मागें आली आहे. त्यांत कॅरी व डॉ. विल्सन यांच्या पुस्तकाची माहिती दिलेलीच आहे. या दोघांनीं जरी अशा प्रकारचें लेखन केलेलें असलें तरी याची सुरवात ड्रमंडनें केली होती, असें म्हणावें लागतें. ड्रमंडनें, आपल्या Illustrations of the Grammatical Parts of Guzerattee, Mahratta and English Languages या पुस्तकांत वाक्प्रचार व सुभाषितवजा म्हणी दिल्या आहेत. मात्र त्या गुजराती व इंग्रजी भाषांमधून दिल्या आहेत. यांतच *Kuckoobhai's Proverbs* म्हणून कांहीं म्हणी दिल्या आहेत.[२६]

२४ *Ibid.*, p. 791.

२५ *Bulletin of the School of Oriental Studies*, Vol. V, 1928–30, pp. 719–756.

२६ *Illustrations of the Grammatical Parts of Guzerattee, Mahratta and English Language*, p. 31.

ककुभाईच्या म्हणी त्या काळीं प्रचारांत असाव्या असें दिसतें. या म्हणींचा व वाक्प्रचारांचा उद्देश काय हें सांगतांना तो म्हणतो,

"*The few following examples are eminently adapted to impress the power of* GUZERAT LETTERS *upon the mind, as well as maxims of morality taught to Indian youth.*" [२७]

या ग्रंथप्रकारांत विशेष भर ज्यानें घातली असा युरोपियन गृहस्थ म्हणजे मॅन्वेअरिंग हा होय. याच्या पुस्तकाचें नांव 'Marathi Proverbs' असें आहे. मॅन्वेअरिंग यानें या पुस्तकांत मराठी म्हणी गोळा करून त्या इंग्रजी भाषांतरासह व स्पष्टीकरणासह छापल्या आहेत. मराठी म्हणींचें अशा तऱ्हेचें पुस्तक, पुष्कळशा म्हणी गोळा करून मॅन्वेअरिंग यानें प्रसिद्ध केलें, हा या पुस्तकाचा विशेष आहे. याचें कारण, पुढच्या पिढींत या म्हणी विसरून जातील, म्हणून त्या पुस्तकरूपानें जपून ठेवाव्या, असें त्यानें आपल्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे. तो लिहितो,

"The only excuse which can be offered for the issue of this work is the importance of preserving as far as possible all proverbial expressions, which depict the thought and character of the people, before they pass out of use altogether." [२८]

या म्हणी गोळा करण्यांत, त्यांचें भाषांतर करण्यांत व त्या जुळवून लावण्यांत या देशांतील मित्राचें साहाय्य झालें आहे, असें लेखकानें आपल्या प्रस्तावनेंत शेवटीं नमूद केलें आहे.

या पुस्तकांत एकंदर १९१० म्हणी मराठी व इंग्रजींत देऊन त्यांचें स्पष्टीकरण इंग्रजींत दिलें आहे. मधून मधून कांहीं म्हणींचा उलगडा व्हावा म्हणून ऐतिहासिक दंतकथादि दिल्या आहेत.

या पुस्तकाविषयीं 'मराठी ख्रिस्ती वाङ्मयाच्या इतिहासां'त पुढील माहिती दिलेली आढळते,

"सदर ग्रंथांत दोष नाहींत असें नाहीं, तरी वाङ्मयाच्या दृष्टीनें या प्रयत्नाचें महत्त्व फार मोठें आहे. आपटे व भिडे यांचे प्रस्तुत विषयावरील पद्धतशीर ग्रंथ हे अलिकडचे आहेत हें सांगण्याची गरज नाहीं."

### ३. मराठी संतवाङ्मयावरील लेखन व संपादन

युरोपियन लोकांचा एक विशेष म्हणजे मराठी संतवाङ्मयाचा अभ्यास करून त्या वाङ्मयावर परीक्षणात्मक व टीकात्मक असें लेखन करणें व त्याबरोबरच

२७ *Ibid.*, p. 29.

२८ Rev. A. Manwaring, *Marathi Proverbs, Preface*, p. V.

२९ मराठी ख्रिस्ती वाङ्मयाचा इतिहास, पृ. ३०

संतांचीं चरित्रें लिहिलीं. मराठी भाषेचें अध्ययन केल्याबरोबर युरोपियन लोकांनीं व मिशनरींनीं संतवाङ्मयाचा अभ्यास केला. जेसुइट येथें आल्याबरोबर त्यांनीं निरनिराळ्या हिंदु पुराणांचा अभ्यास केला. हें मागें प्रास्ताविक प्रकरणांत सांगितलेंच आहे.

इंग्रजी राज्य आल्यावर जे अमेरिकन व स्कॉटिश मिशनरी येथें आले, त्यांनीं महाराष्ट्रांतील संतांचा व त्यांच्या वाङ्मयाचा अभ्यास सुरू केला व त्यावर लेख लिहिण्याचें काम सुरू केलें. त्यांपैकीं लेख लिहिणारे प्रमुख मिशनरी म्हणजे डॉ. स्टीव्हन्सन, डॉ. विल्सन व रे. मरे मिचेल हे होत. यांच्या संतचरित्र व वाङ्मय विषयक लेखांची माहिती त्या त्या प्रकरणांत देण्यांत आली आहे. या सुमारास हें लेखन होऊं लागलें, याचें कारण म्हणजे खरें मराठी वाङ्मय हें पद्यात्मक आहे, अशी निश्चित कल्पना युरोपियन लोकांची होऊं लागली होती असें दिसतें. याविषयीं पुढील उल्लेख आढळतो. पहा,

"The true literature of the Marathas, as amongst, all people arrived at a similar stage of civilization, is to be found in their songs, of which immense collections might be made if sufficient encouragement were afforded and in which alone the genuine expression of their feelings and tone of thought is to be found." २०

यापुढें संतवाङ्मयावर व चरित्रावर जे लेख व ग्रंथ लिहिले गेले त्यांची माहिती देण्यांत येत आहे.

**१. सर अलेक्झांडर ग्रांट, '*Tukaram–A Study of Hinduism*' 1867.** २१

युरोपियन लोकांच्या व मिशनरी लोकांच्या प्रयत्नानें मराठी संत व त्यांचें वाङ्मय सरकारच्या नजरेस येऊन या वाङ्मयाचा अभ्यास करण्यास चालना मिळाली. एल्फिन्स्टन कॉलेजचे त्या वेळचे प्रिन्सिपॉल सर अलेक्झांडर ग्रांट यांनीं तुकारामाच्या तत्त्वज्ञानाची शिकवणूक युरोपियन लोकांना कळावी म्हणून रॉयल एशिआटिक सोसायटीच्या मुंबई शाखेंत 'तुकारामा'वर एक निबंध वाचला. हा निबंध "Tukaram–A Study of Hinduism' या नांवानें प्रसिद्ध झालेला आहे. या निबंधांत सर अलेक्झांडर ग्रांट यानें 'तुकाराम हा राष्ट्रीय कवि कां आहे?' असा प्रश्न उपस्थित करून तुकारामाच्या अभंगाचा अभ्यास कां झाला, याचीहि कारणमीमांसा केली आहे. 'Psalms of David' याबरोबर तुकारामाच्या

२० *Report of the Board of Education for the Year 1845*, No. V, p. 18.

२१ *Fortnightly Review*, *Jan.* 1867. हाच लेख *The Bombay Educational Record*, Vol III. March 1867, pp. 51–65 यांत पुनर्मुद्रित झाला आहे.

अभंगांची तुलना करण्याचा मोह त्याला आवरला नाहीं. तुकारामाच्या अभंगां-विषयीं तो म्हणतो,

"Of Tukaram's poetry, in general, it may be said that his thoughts and expressions indicate, beyond question, a tenderness, a high morality, and a spirituality of devoutness, which perhaps most people would hardly expect to find in a Hindu religionist. It would be a mistake, however, to regard Tukaram as a representative of Hinduism in general." [३२]

सर अलेक्झांडर ग्रांट यांच्यासारख्या एका अधिकारी व्यक्तीनें असें मत मांडतांच, तुकारामाच्या अभंगांकडे लोकांचें लक्ष वेधलें व सरकारनें लवकरच तुकारामाच्या अभंगांचा गाथा शं. पां. पंडित यांच्या नेतृत्वाखालीं प्रसिद्ध केला. अशा प्रकारें संतवाङ्मयाकडे व तुकारामाकडे युरोपियन लोकांचें लक्ष गेलें. त्याचें श्रेय वरील स्कॉटिश मिशनरी व अलेक्झांडर ग्रांट यांना द्यावें लागेल.

## २. मरे मिचेल

ग्रांटनंतर युरोपला जाण्यापूर्वी मरे मिचेल यानेंहि तुकाराम व ज्ञानेश्वर यांच्यावर एक निबंध रॉयल एशिआटिक सोसायटींत वाचला. या प्रसंगीं ज्ञानेश्वरींतील कांहीं भागाचें इंग्रजींत केलेलें भाषांतरहि त्यानें वाचून दाखविलें.[३३]

## ३. अक्वर्थ

अक्वर्थनें आपल्या Ballads of the Marathas या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत संतवाङ्मयाचा परामर्श घेतला आहे.[३४]

## ४. जे. नेल्सन फ्रेझर, *Poems of Tukaram*. Vol. I, II & III.

जे. नेल्सन फ्रेझर व मराठे या दोघांनीं तुकारामाच्या अभंगांचें इंग्रजींत भाषांतर करून Poems of Tukaram या पुस्तकाचे तीन खंड मद्रास येथें १९०९, १९१३ व १९१५ या वर्षी प्रसिद्ध केले. तुकारामाच्या अभंगाचें भाषांतर करण्याचा प्रयत्न अलेक्झांडर ग्रांट यांच्यापासून सुरू झाला होता. त्यानें प्रथम तुकारामाच्या १८ अभंगाचें भाषांतर केलें; परंतु तुकारामाच्या अभंगाचें भाषांतर करण्याचा मोठा प्रयत्न फ्रेझर यांचाच होय. फ्रेझर यानें तुकारामाच्या अभंगांचीं तीन पुस्तकें प्रसिद्ध केलीं, त्यात एकंदर ३७२१ अभंग आलेले आहेत. या भाषांतराच्या उद्देशाबद्दल या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत फ्रेझर म्हणतो,

---

३२ *The Bombay Educational Record* Vol. III. March 1867, p 61.

३३ *The Bombay Educational Record* Vol IX. 1873, pp. 100–101.

३४ ए. सी. ॲक्वर्थ आणि शाळिग्राम, इतिहासप्रसिद्ध पुरुषांचे व स्त्रियांचे पोवाडे, Introduction, pp. XXII—XXXVIII.

"The translations here offered to the public aims at presenting Tukaram's poetry in readable English; and accordingly it has not been made on strictly 'scientific principles.'"

या पुस्तकाशिवाय फ्रेजर व एडवर्ड्स या दोघांनी मिळून 'The Life and Teaching of Tukaram'—Madras-1923 हें पुस्तक लिहिलें आहे.

५. लियोनार्ड जॉन सेज्विक: *The Nal Damayanti of Raghunath-Pandita.*-1912.

मराठी वाङ्मयाचा अभ्यास करून ज्यानें तुकाराम सोडून दुसऱ्या एका प्राचीन कवीवर लिहिलें असा युरोपियन लेखक सेज्विक हा होय. यानें रघुनाथपंडितकृत नलदमयंती स्वयंवराख्यान हें पुस्तक १९१२ मध्यें संपादित केलें. हें पुस्तक Critical Text म्हणून संपादित करतांना सेज्विकनें नवनीताची पांचवी आवृत्ति, हरि त्रिंबक मावट यांची आवृत्ति, उपयुक्तकथासंग्रह, सर्वसंग्रह व शाळिग्राम यांच्यातर्फे आलेलें एक हस्तलिखित, या आवृत्तींचा उपयोग केला होता. त्या दृष्टीनें मराठी Critical Text तयार करण्याचा युरोपियन माणसाचा हा पहिलाच प्रयत्न दिसतो. याविषयीं प्रस्तावनेंत तो म्हणतो,

"The West is always ready to learn from the East, as can be seen from any modern European decorative design, or any page of any modern European metaphysician. And the East must similarly learn from the West if it is to produce work of value in whatever sphere of mental or artistic activity When, therefore, I say that textual criticism is unfortunately not considered of much importance among Indian students, I am not preaching; I am merely stating a regrettable fact." [३५]

ह्या पुस्तकाचीं ६८ पृष्ठें असून मूळ Text देवनागरी लिपींत आहे. हें पुस्तक इंग्लंड (हर्टफोर्ड) येथें छापलें आहे.

या पुस्तकाशिवाय सेज्विक यानें 'Bhakti' हा एक लेख लिहून संतवाङ्मयाची ओळख करून दिली आहे.[३६] सेज्विक याचें संतवाङ्मयाविषयीं फार चांगलें मत होतें. या मताचा उल्लेख एडवर्ड्सनें आपल्या पुस्तकांत दोन ठिकाणीं केला आहे. तो असा :—

---

३५ L. J. Sedgwick, *The Naldamayanti of Raghunathpandita*, Introduction, p. VII.

३६ *The Journal of the B. B. R. A. S.* Vol. XXIII, 1914, pp. 109–134.

" टीका कोणत्याहि दृष्टीकोनानें पाहिली तर महिपतीचें ओवीबद्ध काव्य, नामदेव, एकनाथ, तुकाराम व रामदास यांचें अभंग यांना जगाच्या उत्तमोत्तम काव्यांच्या उत्पादनांतच स्थान दिलें पाहिजे. "[३७]

दुसऱ्या पुस्तकांत एडवर्डनें सेज्विकचें मत उद्धृत केलें आहे. तें असें :—

" नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास इत्यादि कवींच्या उक्ति इतक्या उत्तम प्रतीच्या आहेत कीं, जगांतील अत्युत्तम काव्यांत त्यांची गणना करणें अगदीं योग्य होईल. "[३८]

६. डॉ. निकोल मॅकनिकल : *Psalms of Maratha Saints*, १९१९.

डॉ. मॅकनिकल याचा मराठी वाङ्मयाचा व विशेषतः ज्ञानेश्वरीचा एवढा अभ्यास होता कीं, त्याला ' पुण्यनगरीचे मुनि ' या नांवानें संबोधित असत, असें एडवर्डस म्हणतो.[३९] मॅकनिकल यानें संतांचीं चरित्रें लिहितांना रे. ॲबट् याला फार मदत केली. याशिवाय त्यानें Psalms of Maratha Saints हें पुस्तक लिहिलें. याचा उल्लेख ' महाराष्ट्र संतांचीं गीतें ' असा एडवर्डसनें केला आहे.[४०]

डॉ. मॅकनिकल याचें हें पुस्तक १९१९ मध्यें प्रसिद्ध झालें. यांत ज्ञानेश्वर, जनाबाई, मुक्ताबाई, नामदेव, एकनाथ व तुकाराम या सहा संतांच्या अभंगांचें इंग्रजींत भाषांतर केलें आहे. यांत एकंदर १०८ अभंग असून, सुरवातीच्या पृष्ठावर १०८ मण्यांची तुळशीची माळ देऊन " A Rosary of Tulsi Beads for Helen and Frances. " असें म्हटलें आहे. या पुस्तकांत तुकारामाच्या अभंगांची संख्या सर्वांत जास्त म्हणजे ७६ असून उरलेले ३२ अभंग पांच जणांचे आहेत. भाषांतरासाठीं तुकारामाचे कोणते अभंग निवडावेत असा लेखकापुढें पेंच पडल्यामुळें व एवढ्या अभंगांतून तुकारामाचे उत्कृष्ट अभंग निवडणें हें फारच कठीण काम असल्यामुळें मॅकनिकलनें डॉ. भांडारकर यांना उत्कृष्ट अभंग निवडून देण्यास सांगितलें व भांडारकरांनीं ५० अभंग निवडून ही कामगिरी उत्कृष्ट बजावली. त्याचप्रमाणें भाषांतराच्या कामांत प्रो. पटवर्धन व डॉ. सुरठणकर यांची मदत झाली असल्याचें या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत मॅकनिकलनें नमूद केलें आहे. तरी पण मुख्य भाषांतराचें काम मॅकनिकलचेंच असावें याची शंका राहात नाहीं. या भाषांतरावरून पहातां डॉ. मॅकनिकल याला त्यांतील मर्म चांगलेंच कळलें होतें हें स्पष्ट दिसून येतें.

डॉ. मॅकनिकल यानें सुमारें २३ पृष्ठें या पुस्तकाचा उपोद्घात लिहिला आहे. त्यांत त्यानें तत्कालिन सर्व संतांचा चरित्रवजा उल्लेख करून त्यांच्या कार्याचा आढावा घेतला आहे व त्यांच्या भक्तीच्या तत्त्वज्ञानाचें स्वरूप विशद केलें आहे.

---

३७ जे. एफ्. एडवर्डस, महाराष्ट्राला आध्यात्मिक जीवनाची भूक, पृ. ७६.

३८ जे एफ्. एडवर्डस, तुकारामबोवांचा सेतु, पृ. १८. मूळ ज्ञानोदय ६-९-१९२६.

३९ जे. एफ्. एडवर्डस, ज्ञानेश्वर, पृ. २.

४० जे. एफ्. एडवर्डस, महाराष्ट्राला आध्यात्मिक जीवनाची भूक, पृ. ५७.

या पुस्तकाशिवाय मॅक्निकल यानें संतवाङ्मयावर एक लेख लिहिला आहे. त्याचें नांव " The Indian Poetry of Devotion" असें आहे.[४१]

### ७. जस्टिन ई. ॲबट

मराठी संतवाङ्मयाचे लेखक म्हणून ज्याचें नांव प्रामुख्यानें मराठी भाषेत राहील असा हा एक महत्त्वाचा ख्रिस्ती मिशनरी आहे. याचा जन्म सन १८५३ च्या डिसेंबरांत नाताळमध्यें झाला. तो हिंदुस्थानांत १८८१ मध्यें आला व सुमारें ३० वर्षे अहमदनगर येथें काम करून परत स्वदेशीं गेला. त्यानंतर सन १९२० मध्यें तो हिंदुस्थानांत आला व एक वर्षानें अमेरिकेस गेला. तेथें असतांनाच त्यानें संतवाङ्मयमाला निर्माण करून अनेक ग्रंथ लिहिले. जस्टिस ॲबट ता. २१ जून १९३२ रोजीं मरण पावला. आपल्या मृत्यूपर्यंत संतवाङ्मयाचा अभ्यास करून तो पुस्तकें लिहीत होता. या पुस्तकाशिवाय त्यानें बायबलच्या भाषांतराच्या सुधारणेच्या कामातहि भाग घेतला होता. या कामांत त्याला डॉ. मॅकिकन यांचेंहि साहाय्य झालें. या कार्याबद्दल ॲबट याच सोसायटीनें गौरव केला.[४२]

ॲबट यानें संतवाङ्मयाचा अभ्यास करून जे ग्रंथ लिहिले, त्यांची मीमांसा एडवर्ड्स् यानें केली आहे. त्यात हे मिशनरी व जस्टिन ॲबट संतवाङ्मयाकडे कां वळले, याचें कारण त्यानें दिलें आहे. हें कारण सांगताना तो म्हणतो,

" We are convinced that a knowledge of the religious literature of the Indian people is more than ever before an essential qualification for a missionary to India, and also because the more we come to know of this literature the more are we convinced of India's need of Christ and of His power to satisfy India's aching heart." [४३]

ॲबट हा जेव्हां अमेरिकन मिशनमधून निवृत्त होऊन स्वदेशीं गेला, तेव्हां न्यू जेरेसी येथें राहून मराठी संतांच्या वाङ्मयाचा अभ्यास व त्यांचें भाषांतर करण्याचें काम त्यानें चालविलें. संतवाङ्मयाचे जें भाषांतर ॲबटनें केलें, त्या त्या संतांचीं निवासस्थानें त्यानें प्रत्यक्ष पाहिलीं होतीं[४४] व रामदासस्वामी जेथें जेथें हिंडले, ते ते डोंगर व दऱ्या त्यानें प्रत्यक्ष पाहून परिचय करून घेतला होता.[४५] आणि संतवाङ्मयातील हे प्रसंग वाचून ते प्रसंग जेथें घडले तीं स्थळें पाहिलीं.

---

४१ *The Hibbert Journal*, No. 61. *Vol.* 16. 1917–18. pp. 74–75.
४२ J. E Abbott, *Ramdas.* Foreward. p. X.
४३ *Ibid.*, Foreword. p. IX.
४४ J. E. Abbott; *Eknath.* Dedication.
४५ J. E. Abbott, *Ramdas*, Author's Preface. p. XV.

अशा रीतीनें संतवाङ्‌मयाचा अभ्यास करून ॲबटनें महाराष्ट्र-कवि-संतमालेंतून (Poet Saints of Maharashtra) एकंदर अकरा पुस्तकें लिहिलीं. व अशा प्रकारें एकंदर ४५८९ पृष्ठें मजकूर छापून प्रसिद्ध केला.
या मालेची कामगिरी ॲबट व त्याच्यानंतर एडवर्डस् यानें पुरी केली. या मालेंत प्रसिद्ध झालेली पुस्तकें पुढीलप्रमाणें आहेत :—

(१) **मानुदास**—महीपतिकृत भक्तविजय, अध्याय ४२ व ४३ यांचें इंग्रजी भाषांतर, सन १९२६. पृष्ठें ४९ + ५६.
याला मूळचे अध्यायहि जोडले आहेत.

(२) **एकनाथ**—भक्तलीलामृतमधील अध्याय १३ ते २४ यांचें इंग्रजी भाषांतर, सन १९२७. पृष्ठें २९५.

(३) **भिक्षुगीत अथवा अनुतप्तकदर्य**—एकनाथी भागवतामधून २३ व्या अध्यायाचें इंग्रजी भाषांतर, सन १९२७. पृष्ठें ११३+५६ (Appendix)+७९ मराठी.
याला एकनाथी भागवतमधील मूळचा भाग जोडला आहे.

(४) **दासोपंत दिगंबर (श्रीदासोपंत चरित्र)**—महाराष्ट्र काव्यग्रंथ यामध्यें प्रकाशित झालेल्या या चरित्राचें इंग्रजी भाषांतर, सन १८२७. पृष्ठें ८१ + ३६ + ५५ + १२ (मराठी).
याला मूळचें दासोपंत चरित्र जोडलें आहे.

(५) **बहिणाबाई हिचें आत्मचरित्र व अभंग**—याचें इंग्रजी भाषांतर, सन १९२९. पृष्ठें ३०१ (इंग्रजी व मराठी मिळून).
याला मुळांतील संत बहिणाबाईचा गाथा हा भाग जोडला आहे.

(६) **स्तोत्रमाला**—संताच्या अभंगांचें इंग्रजी भाषातर, सन १९२९. पृष्ठें ३३१ (इंग्रजी व मराठी मिळून).
याला मुळांतील भाग जोडला आहे.

(७) **तुकाराम**—भक्तलीलामृत अध्याय २५ ते ४० चें इंग्रजी भाषांतर, सन १९३०. पृष्ठें ३४६.

(८) **रामदास**—संतविजयांतील अध्यायांचें इंग्रजी भाषांतर, सन १९३२. पृष्ठें ४०९.

(९) *Stories of Indian Saints*—महीपतीच्या भक्तविजयाचें इंग्रजी भाषांतर, भाग १ ला, पुणें, सन १९३३. पृष्ठें ५०७.

(१०) *Stories of Indian Saints*—महिपतीच्या भक्तविजयाच्या कांहीं भागाचें इंग्रजी भाषांतर, भाग २ रा, पुणें सन १९३४. पृष्ठें ४९९.

(११) *Nectar from Indian Saints*—महीपतीच्या भक्तलीलामृताच्या कांहीं भागाचें इंग्रजी भाषांतर, पुणें, सन १९३५. पृष्ठें ४९६.

मराठी संतांच्या गोष्टी लिहिण्याची ॲबटची इच्छा कितीतरी दिवसांपासून होती. हीं संतचरित्रें मराठी असल्यानें हिंदुस्तानाबाहेरील लोकांना तीं अज्ञात होतीं. तीं या लोकांना ज्ञात होण्यासाठीं त्यांचें इंग्रजींत भाषांतर करावें, असा ॲबट याचा उद्देश होता. तो म्हणतो,

"To make these stories of the Maratha saints available to a large circle, both in India and outside, an English translation is obviously a necessity. And as I feel that these stories have a moral value, and that they can be used to impress vital truths, the translation of them into the English language has been for me a labour which I have felt was worthwhile, and has been a labour of love." [४६]

हा भाषांतराचा उद्देश पुन्हा अशाच रीतीनें या पुस्तकांत ॲबटनें सांगितला आहे.[४७] त्याचप्रमाणें दुसऱ्याहि एका ठिकाणीं त्यानें तो स्पष्ट केला आहे.[४८] यावरून ॲबट यांस संतांच्या चरित्रांचें इंग्रजींत भाषांतर कां करावेंसें वाटूं लागलें, याचा उलगडा होईल. ॲबट यानें मराठी भाषेचा अभ्यासहि लहानपणापासून केला होता. यामुळेंच त्याला मराठी संतांचीं चरित्रें भाषांतरित करणें शक्य झालें. आपलें मराठी भाषेचें ज्ञान अगदीं अल्प आहे, असे जरी ॲबट यानें उद्गार काढले असले तरी ते विनयाचेच द्योतक आहेत, असें त्याचीं पुस्तकें पाहिलीं असतां दिसून येईल. आपल्या मराठी-ज्ञानाविषयीं तो म्हणतो,

"My knowledge of Marathi, is, I feel, painfully deficient, in spite of the fact that it began when I was four years of age, and that its study covers practically all my life, with perhaps special opportunities through a long life among the Maratha people." [४९]

महाराष्ट्र कविसंतमाला लिहितांना वर सांगितल्याप्रमाणें जसा ॲबट यानें आपल्या डोळ्यांपुढें उद्देश ठेवला होता, तसाच त्या मालेंतील निरनिराळीं चरित्रें लिहितांना त्याचा कांहीं विशेष उद्देश होता, त्याचा त्यानें त्या त्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत उल्लेख केला आहे. दासोपंतांचें चरित्र भाषांतरासाठीं कां निवडलें याचें त्यानें प्रस्तावनेंत विवेचन केलें आहे तें असें:—

"This idea of God's nearness to man and His ever readiness to come to their help, runs through all the *Bhakti* literature of the Marathas. It is so well illustrated in the story of Dasopant's

---

४६ J. E. Abbott, *Bhanudas*, Preface, p. V.

४७ *Ibid.*, p. X. and *Bhikshugita*, Preface, p. I.

४८ J. E. Abbott, *Eknath*, Preface, I.

४९ J. E. Abbott, *Bhanudas*, Preface, p. XII.

deliverence, that it appealed to me as a helpful illustration of this belief, and hence I have chosen the story, though an incomplete one, for this fourth book in the series." ५०

अॅबट यानें मुख्यतः कोणत्या उद्देशानें हीं पुस्तकें लिहिलीं व तो या संतवाङ्मयाकडे कशामुळें वळला, हें येथपर्यंत सांगितलें. ह्या भाषांतराच्या कामांत त्याला निकोल मॅकनिकल, एडवर्डस् व डेमिंग यांची मदत झाली. त्यांचा उल्लेख त्यानें ठिकठिकाणीं प्रस्तावनेंत केला आहे. या सर्व युरोपियन पंडितांचा संतवाङ्मयाचा अभ्यास चांगलाच होता. या युरोपि न लोकांनीं संतवाङ्मयावर स्वतंत्र पुस्तकें लिहिलीं आहेत. या पुस्तकांचें भाषांतर इंग्रजींत करणें फार कठीण काम आहे, याचें कारण अॅबटनें एके ठिकाणीं सांगून पाश्चात्य वाचकांनीं घाईनें कोणतेंहि मत करून घेऊं नये, अशी वाचकांना त्यानें विनंती केली आहे. या भाषांतराविषयीं तो पुढीलप्रमाणें लिहितो,

"Indian psychology, and terms expressing it, are different from those of the West. This makes an accurate translation very difficult, and a clear understanding of it not at all easy. The Western reader must, therefore, bear this in mind, and not condemn too hastily what may seem to him unreasonable." ५१

महाराष्ट्र कविसंतमालेची पुढील कांहीं पुष्पांची कामगिरी अॅबटच्यानंतर एडवर्ड्स् यानें पुरी केली शेवटचीं कांहीं पुस्तकें एडवर्ड्स् यानें लिहिलीं आहेत त्यात अॅबट यानें सुरू केलेल्या मालेचा हेतु त्यानें थोडक्यांत सांगितला आहे तो असा :—

"His aim throughout the series has been to let the Marathi Poet Saints speak for themselves as far as that is possible through the medium of a translation." ५२

मराठी संतवाङ्मयाच्या वाचनानें ज्यांनीं या वाङ्मयाची निंदा केली होती, त्यांचें मत पुढें बदललें. त्यांपैकीं जे प्रामाणिक व सहृदय होते, अशा व्यक्तींत अॅबट याची गणना करावी लागेल. कारण या वाङ्मयाचा जो परिणाम अॅबट याच्यावर झाला, त्याची पश्चात्तापयुक्त कबुली त्यानें मरणापूर्वी दिली आहे. हा पश्चात्ताप त्यानें पुढील शब्दांत व्यक्त केला आहे :—

"I have lived many years in India. I have read the Vedanta philosophy through Sanskrit. I have discussed religious problems

५० J. E. Abbott, *Dasopant Digambar*, Preface, p. VI.

५१ J. E. Abbott, *Bhikshugita*, Preface, p. I. & II.

५२ J. E. Abbott & N. R. Godbole, *Stories of the Indian Saints*, Vol. I. Foreword, p. VII.

with Pandits, with the simple farmer in his field; and with the wild men of the forest, and gained a certain amount of knowledge of the essential spirit of Hindus learned and unlearned. But I was not aware of the flood of light that has come to me through the close contact with the saints through their histories and writings... Indeed I now see the mistake I made in my discussions in both my writings and in my conversations, exprsssing so confidently my opinions on the ideals of these saints when I had not familiarized myself with their history or writings. It is rather late to do so, but a confession of error is always for one. Possibly, I might plead an excuse in that I led a busy life, and to read their writings readily requires hard study and the time to do so but it is better to acknowldge my ignorance and gain the forgiveness of those whom I might have offended through my confident assertions, while claiming a knowledge I did not possess." ५३

## ८. रे. जे. एफ्. एडवर्ड्स्

रे. एडवर्ड्स् हा ॲबट याचा सहकारी होता. यानेंहि मराठींत संतवाङ्मयावर पुस्तकें लिहिलीं आहेत. तसेंच इंग्रजींत कांहीं पुस्तकें व लेख लिहिले आहेत. तीं पुस्तकें पुढीलप्रमाणें :—

(१) तुकारामबोवांचे धर्मविचार, पुणें, सन १९२२, पृष्ठें १६०.

(२) *The Life and Teachings of Tukaram* (इंग्रजी), मद्रास, १९२२, पृष्ठें ३६३.

हें पुस्तक एडवर्ड्स् यानें नेल्सन फ्रेझर याच्या सहकार्यानें लिहिलें आहे. याचा उल्लेख मागें करण्यांत आला आहे. या पुस्तकाची पहिलीं आठ प्रकरणें (८० पृष्ठें) फ्रेजर यानें लिहिलीं असून बाकी सर्व पृष्ठांचा मजकूर एडवर्ड्स् याच्या हातचा आहे. हें पुस्तक लिहिण्याचे दोन उद्देश आहेत, असें लेखकानें प्रस्तावनेंत म्हटलें आहे. ते असे :—

"I have been sustained by the two-fold conviction that study of Indian Poet-saints is a sure road to unity between East and West, and is a master key to unlock the treasures of religious aspiration in the soul of India "५४

---

५३ J. E. Abbott, *Ramdas*, Author's Preface, pp. XVI & XVII.

५४ J. N. Fraser & J. F. Edwards, *The Life and Teachings of Tukaram*, Preface, p. VII.

(३) तुकारामावर लिहिलेला लेख

एन्सायक्लोपिडीआ ऑफ रिलिजन अँड एथिक्स या कोशाच्या १२ व्या खंडांत एडवर्ड्सनें तुकारामावर एक लेख लिहिला आहे.[५] या लेखांत तुकारामाची शिकवण व त्याचें चरित्र यासंबंधीं माहिती मिळते.

(४) संत तुकाराम व ख्रिस्ती समाज.[६]

हा लेख 'मराठी ख्रिस्ती वाङ्मयाचा इतिहास' या पुस्तकांत लिहिला आहे. यांत तुकारामाच्या अभंगांचा अभ्यास ख्रिस्ती लोकांनीं कां करावा, याचें विवेचन केलें आहे.

(५) तुकारामबोवांचा सेतु (*Tukaram's Bridge*). ट्रॅ. सो. पुणें, सन १९२२, पृष्ठें २०२.

या पुस्तकास 'नामदेव पायरी' हें परिशिष्ट जोडलें आहे. हें पुस्तक लिहिण्यांत आपला काय उद्देश आहे तो एडवर्ड्सनें खालीलप्रमाणें सांगितला आहे :

"प्रस्तुतचें पुस्तक लिहिण्यांत आमचे मुख्य दोन उद्देश आहेत. पहिला हा कीं, विठोबाच्या पुष्कळशा भक्तांना 'तुकारामनिर्मित सेतूवरून' ख्रिस्ताकडे पार जातां येतें हें दाखविणें. दुसरा हा कीं, महाराष्ट्रांतील ख्रिस्तशिष्यांना तुकारामाच्या अनुयायांकडे जाण्यास ह्या तुकारामनिर्मित सेतूचा उपयोग करून घेतां येण्यासारखा आहे हें सुचविणें."

(६) *The Dnyaneshwar, The Out-caste Brahmin*, पुणें, १९४१, पृष्ठें ५२५.

(७) ज्ञानेश्वर (*Dnyaneshwar*) मराठी. पुणें, सन १९४२, पृ. १९९.

या पुस्तकांत ज्ञानेश्वरासंबंधानें सर्व विवेचन करून अखेर 'ज्ञानेश्वरींत तुम्हांला जें सांपडलें नाहीं तें नव्या करारांत सांपडलें आहे काय?' असा प्रश्न उपस्थित करून या प्रश्नाला लेखकानें उत्तर दिलें आहे तें असें :—

"ज्ञानेश्वरीच्या वाचनानें व मननानें मला तात्कालिक शांति व समाधान प्राप्त झालें पण त्यांनी दिलेल्या ख्रिस्तवचनांच्या योगें ज्याप्रमाणें मला अक्षय टिकणारें सामर्थ्य व मनःशांति प्राप्त झाली त्याप्रमाणें सामर्थ्य व मनःशांति मला कोठेंहि प्राप्त झाली नाहीं."[७]

(८) महाराष्ट्राला आध्यात्मिक जीवनाची भूक अथवा हिंदुस्तानला आध्यात्मिक सामर्थ्याची गरज (*The Religious Hunger of*

*Maharashtra or India's Need of Spiritual Power*) पुणें, १९४७, पृष्ठें २१८.

या पुस्तकांत संतकवींसंबंधानें जो भाग आहे, तोच आपणांस येथें प्रस्तुत आहे. यांत 'संतकवींतील सुप्रसिद्ध व्यक्ति' असें एक स्वतंत्र प्रकरणच लेखकानें लिहिलें आहे.[५८] या प्रकरणांत ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, बहिणाबाई यांची चरित्रवजा माहिती देऊन पुढच्या प्रकरणांत महाराष्ट्र संतकवींच्या कांहीं मुख्य कल्पना सांगितल्या आहेत.[५९]

९. विल्वर स्टोन डेमिंग

यानें इंग्रजींतून संतचरित्रपर व वाङ्मयपर अशीं तीन पुस्तकें लिहिलीं आहेत.

(१) *Ramdas and Ramdasis*, मुंबई, १९२८.

या पुस्तकाचीं पहिलीं दहा प्रकरणें पीएच्. डी.च्या प्रबंधासाठीं लिहिल्याचा उल्लेख लेखकानें प्रस्तावनेंत केला आहे.[६०] या पुस्तकाचें शेवटचें प्रकरण 'रामदास व जीझस' असें असून त्यांत रामदास व येशू ख्रिस्त यांची त्यानें तुलना केली आहे. रामदासांत येशू ख्रिस्ताचा विश्वात्मक संदेश सांपडत नाहीं असें मत मांडून रामदासाहून येशू ख्रिस्तास श्रेष्ठ ठरविण्याचा त्यानें प्रयत्न केला आहे.[६१]

(२) *Eknath, A Maratha Bhakta*, मुंबई, १९३१.

यांत एकनाथाचें चरित्र व त्याची शिकवण लेखकानें दिली आहे. एकनाथाच्या चरित्रांतील कांहीं चमत्कारहि वर्णन केले आहेत.

(३) *Selections from Tukaram*, मद्रास, १९३२.

या पुस्तकात डेमिंगनें तुकारामाचें चरित्र दिलें असून (पृ. १ ते ३६) पुढें तुकारामाच्या ४७१ अभंगांचें इंग्रजी भाषांतर दिलें आहे. (पृ. ३७ ते २१५) या अभंगांच्या भाषांतराबद्दल डेमिंग प्रस्तावनेंत म्हणतो,

"The present effort is simply an attempt to gather together representative poems which reveal Tukaram's spiritual experience and his teaching about various subjects."[६२]

१०. ज्युल्स ब्लोक

संतांवर चरित्रपर लिहिणारे, त्यांच्या अभंगांचें व इतर ग्रंथांचें भाषांतर करणारे जसे अनेक युरोपियन लोक दिसतात, तसें संतांच्या पुस्तकांच्या संपादित

५८ जे. एफ्. एडवर्ड्स्, महाराष्ट्राला आध्यात्मिक जीवनाची भूक, पृ. ५३-६८,

५९ तत्रैव, पृ ६९-७३.

६० W. S. Deming, *Ramdas and Ramdasis*, Preface, p. *IX*,

६१ *Ibid.*, Chapter XI *Ramdas and Jesus*, pp. 193-216.

६२ W. S. Deming–*Selections from Tukaram*, *Preface*, p. V.

आवृत्त्या, त्यांतील दोष व मुळांतील हस्तलिखितें यांची दुर्मिळता यांचा संशोधनपर अभ्यास करून टीकात्मक लेखन करणारे कांहीं युरोपियन आहेत. त्यांत ब्लुल ब्लोकचा उल्लेख करावा लागेल. सन १९२९ मध्यें ब्लुल् ब्लोकनें Academic Board of the School of Oriental Studies, London येथें भाषाशास्त्रावर एक व्याख्यान दिलें.[६३] व्याख्यानाचा विषय " Some Problems of Indo-Aryan Philology " हा होता. या व्याख्यानांत ' Present-requirements of Indo-Aryan Research ' या विषयासंबंधानें बोलतांना तुकारामाच्या अधिकृत अभंगांचें हस्तलिखित मिळत नाहीं; तीच स्थिति ज्ञानदेव व नामदेव यांच्या ग्रंथांची आहे; त्यांत सूच्या संपूर्ण नसतात; त्यामुळें खरा अर्थ व शब्दांचा उपयोग कळत नाहीं, अशी त्यानें टीका केली आहे.[६४] संतचरित्रांकडे व त्यांच्या ग्रंथांकडे संशोधनपर दृष्टि वळवून त्यासंबंधीं लेखन करणारा ब्लुल् ब्लोक हा एक युरोपियन लेखक दिसतो. म्हणून त्याचें महत्त्व मराठी भाषेच्या दृष्टीनें फार आहे.

### ४. गोष्टींचीं पुस्तकें

गोष्टींच्या पुस्तकांमध्यें मिशनरी लोकांनीं पुष्कळच भर घातली, हें आपण मागें पाहिलेंच आहे. याशिवाय गोष्टींचीं आणखी कांहीं पुस्तकें पुढीलप्रमाणें आहेत :—

( १ ) *An Elementary School Book*, ई. एच्. टाउनशेंड.[६५]

इ. इच्. टाउनशेंड यानें लिहिलेलें वरील पुस्तक हें अगदीं प्रारंभिचें गोष्टींचें पुस्तक असावें. या पुस्तकांत तीन ते आठ वर्षांच्या मुलांसाठीं कांहीं गोष्टींचें भाषांतर केल्याचा निर्देश या पुस्तकाची माहिती देतांना बॉबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या रिपोर्टांत करण्यात आला आहे. हें पुस्तक बहुधा १८२५ च्या सुमारास प्रसिद्ध झालें असावें; परंतु तें आतां कोठें मिळत नाहीं.

( २ ) बाळमित्र-भाग २.-गेस्फर्ड

वरील प्रकारचें दुसरें पुस्तक म्हणजे गेसफर्ड यानें केलेलें बाळमित्र भाग २ हें पुस्तक होय.[६६] या पुस्तकाची पहिली आवृत्ति १८३३, दुसरी १८४८ व कँडीनें तपासलेली १८५१ ची व १८५७ ची आवृत्ति अशा चार आवृत्त्या उपलब्ध

६३ याचा उल्लेख मागें आला आहे. पहा, *Bulletin of the School of Oriental Studies* Vol V, 1928-30, pp. 719-750.

६४ *Bulletin of the School of Oriental Studies* Vol. V, 1928-30, pp. 748-749.

६५ *The Third Report of the Bombay Native Education Society* 1825-26, Appendix N.'3 p. 32.

६६ *Catalogue of the Library of the Hon. East India Company*, p. 269.

आहेत. पहिल्या तीन आवृत्त्या महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें असून १८५७ ची आवृत्ति मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहे. या पुस्तकांत प्रतापसिंग, लहान हरणी, कोंबडी असे एकंदर २२ विषय आहेत. संवादात्मक, वर्णनात्मक गोष्टी, तर दोन अंकी, एक अंकी अशीं कांहीं नाटकें यांत आहेत.

हें पुस्तक कँडीनें ' शोधिलें ' आहे. या पुस्तकांत कँडीनें काय बदल केला तो ' Notice by Editor ' यामध्यें त्यानें दिला आहे. तो म्हणतो,

" The chief alterations which have been made in this edition of Captain Gaisford's excellent work, consist in a substitution of easy words for some hard ones, in a simplification of the construction here and there, and in replacing cocanee forms by pure Desh ones. The title of the last piece has been changed. "

या पुस्तकांतील मायेचें स्वरूप समजण्यासाठीं निरनिराळ्या आवृत्तींतील लहानसे उतारे खालीं देण्यांत येत आहेत :—

मराठी बाळमित्र–भाग २ रा, मुंबई १८३२.

" प्रतापसिंग–प्रतापसिंग ह्मणोन पलटणीचा मुख्य सरदार होता. तो आपले सुचालीने मोठे योग्यतेस चढला होता. त्याणें पाहिलें तों आपले हाताखालचे सरदार सर्व वेळ मन जुगाराकडे योजित असतात, ह्मणून त्यास फार खेद उत्पन्न झाला..." (पृ. १)

**बाळमित्र–भाग २ रा, पुणें १८४८ ( आवृत्ति २ री )**

" प्रतापसिंग ह्मणून पलटणीचा मुख्य सरदार होता, तो आपले उत्तम चालीनें मोठे योग्यतेस चढला होता, त्याणें पाहिलें तों आपले हाताखालचे सरदार सर्व वेळ मन जुगाराकडे योजित असतात, ह्मणून त्यांस फार खेद उत्पन्न झाला. " ( पृ. १ ).

**बाळमित्र, भाग दुसरा–मेजर क्यांडीसाहेब, पुणें पाठशाळेचे प्रिन्सिपाल ह्यांनीं तपासली. पुणें १८५१.**

" प्रतापसिंग ह्मणून कोणे एके पलटणीचा मुख्य सरदार होता; तो आपले उत्तम चालीनें मोठे योग्यतेस चढला होता; त्यानें पाहिलें तों आपले हाताखालचे सरदार सर्वेवेळ जुगाराकडे मन योजित असतात, असें त्यांस समजलें, ह्मणून त्यांस फार खेद उत्पन्न झाला. " ( पृ. १ ).

### ५. इतिहासाचीं पुस्तकें

#### १. मेजर कॉलिन मॅकेन्झी

इतिहासविषयक पुस्तकें मराठींत लिहिण्याची पद्धत युरोपियन लोकांनीं सन १८०७ पासून सुरू केलेली दिसते; अर्थात् प्रथम हीं पुस्तकें ते स्वतः लिहीत नसून

स्वतःच्या माहितीसाठीं एतद्देशीय गृहस्थांकडून लिहून घेत असत. मेजर कॉलिन मॅकेन्झी यानें सन १८०७ मध्यें मोडी लिपींत नागपूरच्या राज्याचा इतिहास बजाबा पैठणकर यांजकडून लिहवून घेतल्याचा उल्लेख आढळतो.[६७] युरोपियनांचीं इतिहास-विषयक पुस्तकें तयार करण्याची हीच पहिली सुरुवात असावी.

## २ सर रिचर्ड जॅकिन्स

मेजर कॉलिन मॅकेन्झी याच्यानंतर दुसरा उल्लेख आढळतो तो नागपूरचा रेसिडेंट सर रिचर्ड जेकिन्स याचा. यानें सन १८१२ मध्यें विनायकराव औरंगाबाद-कर यांजकडून नागपूरचा इतिहास मोडी लिपींत लिहवून घेतला. या इतिहासाचें हस्तलिखित इंडिया ऑफिसच्या लायब्ररींत असून प्रास्ताविक भागाच्या सुरुवातीला लेखक म्हणतो,

"ॐ नमो भगवंता कुशल ठेवा माझिया दाता आणि माझे जन्ममरणाची चुकवी वेथा कृपा करूनी. हा दास आपराधी राहानार आंवरंगाबाद नाम नासीवंत देहाचें विनायेक प्रभु दीन पाळक शडगुणनिधान साहेब आलिशान रजाडद[ sic ] जेंकिंस साहेब बहादूर रसीडनश नागपूर मामले भागपुर स्वामी आशाप्रमाणें शोध राज्याचा केला त्याचा तपशील. हा शोध सन १८१२ ईसवीत झाला. पुढले वरसीचा नाहीं कारन की शोधिता नित नवच शोध होतो. त्यास पुढील शोध पुढेंच आहे व होईल हा जितका यथामति समजला त्यास लिहिले "[६८]

पुढें सन १८१६ मध्यें सर रिचर्ड जॅकिन्सच्या सांगण्यावरून विनायकरावांनीं नागपूरचा इतिहास मोडी लिपींत पुन्हा लिहिला, त्याचेंहि हस्तलिखित इंडिया ऑफिसच्या लायब्ररींत आहे.[६९] पुढें सन १८२० मध्यें जॅकिन्सनें गंगाधर चिटणीस यांजकडून नागपूरकर भोसल्याचा इतिहास मोडींत लिहून घेतला[७०]

हे मराठी भाषेतील इतिहास जरी एतद्देशीयांनीं लिहिले, तरी इतिहासाची सुरुवात युरोपियन लोकांनीं केल्यामुळें, त्याचें श्रेय युरोपियन लोकाना द्यावें लागेल. एवढ्यासाठीं या प्रयत्नांचा येथें निर्देश करण्यांत आला आहे.

## ३. डेव्हिड केपन

मराठी भाषेचा अभ्यास करून ज्यानें इतिहासविषयक पुस्तक लिहिलें असा युरोपियन गृहस्थ म्हणजे डेविड केपन होय.[७१] याचें 'मराठ्यांची बखर' हें शिळा-

६७ J. F. Blumhardt and S G. Kanhere, *Catalogue of the Marathi Manuscripts in the India Office Library*, p. 72.

६८ *Ibid*, p. 71.

६९ *Ibid.*, p. 72

७० *Ibid.*, p. 74.

७१ याची माहिती पृ. १४४ वर देण्यात आली आहे.

छापावर छापलेलें पुस्तक सन १८२९ मध्यें प्रकाशित झालें. हें पुस्तक म्हणजे ग्रांट डफनें लिहिलेल्या इतिहासाचें भाषांतर आहे. या पुस्तकाची एकंदर पृष्ठसंख्या ४+२९+४२७ इतकी आहे. बखर लिहिण्याचें कारण देतांना केपन लिहितो,

"कोणी ह्मणेल किं ही बखर कोणी कशी निर्माण केली व करण्याचें कारण काय, तर त्याणें असें समजावें किं बाजिराव असतां, आल्फिन्स्टन साहेबाच्या हाताखालीं कारभार चालविणारा कतान ग्रांट साहेब पुण्यास होता. तो पुढें बाजिराव गेल्यावर सातान्यास नेमिला. तो तेथें असतां, त्याचा मनांत आलें किं, महाराष्ट्र लोक इतक्या योग्यतेस कसे चढले, तें समजावयास त्या लोकांचें वृत्त ध्यानास आणिलें पाहिजे. तेणेंकरून विलायतेंतील लोकांसहि विदित होईल, ह्मणोन त्याणें बहुत जागचे पुरातन लेख जमा केले...त्या सर्व विस्तारांतील सारांश निवडून, आपले बरोबर घेऊन विलायतेस गेला. आणि तेथें इंग्रेजी भाषेत त्याची बखर लिहून छापिली; तिचीं तीन बुकें जालीं, त्यांतील गोष्टी महाराष्ट्र मुलखी लोकांस फार हितावह आहे तशा समजून सरकार कंपेनी इंग्रेज बहादुर यांचे आज्ञेवरून कतान केपिन साहेब याणीं बाबा साने याचे साहाय्यानें, ती इंग्रजी भाषेची बखर, मराठी भाषेत लिहून, सन अठराशें एकुणतिसांत मुंबैमध्यें छापिली,"[७१]

या पुस्तकाची दुसरी आवृत्ति दोन भागांत सन १८४७ मध्यें पुणें पाठशाळेनें छापून प्रसिद्ध केली. १८२९ सालची व १८४७ सालची अशा दोनहि आवृत्त्या मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहेत.

**इंग्लंड देशाची बखर, १८३२.**

केपनच्या 'मराठ्यांची बखर' या पुस्तकाप्रमाणें 'इंग्लंड देशाची बखर' हें पुस्तक दोन खंडांत सन १८३२ मध्यें प्रसिद्ध झालें. या पुस्तकाच्या लेखकाची माहिती देताना नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या युरोपियन नेटिव्ह सेक्रेटरीनें तें पुस्तक भाषांतरित केलें असें नमूद करण्यांत आलें आहे."[७३] हे युरोपियन व नेटिव्ह सेक्रेटरी म्हणजे रॉबर्ट कॉटन मनी व बाळ गंगाधर शास्त्री हे होत.[७४] याविषयीं दादोबा पांडुरंग आपल्या आत्मचरित्रांत लिहितात,

"सन १९३१-३२ सात Mr. Robert Cotton Money हे सोसायटीचे सक्रेतार झाल्यावर त्यांहीं व त्याचे असिस्टंट बाळशास्त्री यांहीं मिळून Gold-

---

७१ डेविड केपन, मराठ्यांची बखर (प्रस्ताव नाहीं).

७३ *The Ninth Report of the Proceedings of the Bombay Native Education Society* 1836, Appendix K, p. 31.

७४ *O. C. S., July* 1831, p. 249. "Goldsmith's Abridgement of the History of England translated into Murathee, by R. C. Money Esq. and Bal Gangudhur Shastree."

smith's History of England या ग्रंथाचें मराठींत भाषांतर करून त्याचे दोन भाग शिलाछापावर छापवून प्रसिद्ध केले,"[७५]

हीं दोनहि पुस्तकें उपलब्ध असून पहिल्या खंडाचीं ४६९ पृष्ठें व दुसऱ्या खंडाचीं २७१+२६६+२७ (सूची) इतकीं पृष्ठें आहेत.

### ४. कॅप्टन आर्चिबाल्ड मॅक्डोनल्ड

इतिहास विषयावर लिहिणारा आणखी एक युरोपियन गृहस्थ कॅप्टन आर्चिबाल्ड मॅकडोनल्ड हा होय. यानें भाषांतरित केलेलें 'गुजराथ देशाचा इतिहास' हें पुस्तक १८५० साली प्रसिद्ध झालें. या पुस्तकावर प्रारंभीं "जेम्स बर्ड साहेबांनीं अली महंमदखान यांच्या ग्रंथाचें इंग्रजी भाषांतर केलें आहे, त्यावरून मुंबई पायदळ खात्याच्या एतद्देशीय लोकांचे अठराव्या पलटणीच्या क्याप्तन् आर्चिबाल्ड म्याक्डानल्ड् साहेब यांणीं मराठी भार्षेत केला." असें लिहिलेलें आहे. याचीं एकंदर ३०३ पृष्ठें आहेत.

कॅप्टन मॅक्डोनल्ड याचें मराठींतील दुसरें पुस्तक म्हणजे "नाना फडणवीस यांची बखर" हें होय. हें पुस्तक सन १८५२ मध्यें प्रसिद्ध झालें. खाजगी दप्तरावरून व प्रसिद्ध पुस्तकांवरून यानें मराठी भार्षेत ही बखर लिहिली. याचीं एकंदर पृष्ठें २१५+१२ आहेत. हीं दोनहि पुस्तकें मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहेत.[७६]

### ५. ॲक्वर्थ व शाळिग्राम

इतिहासविषयक मराठींतील युरोपियन अधिकाऱ्यांचें-संग्रहात्मक पुस्तक म्हटलें म्हणजे ॲक्वर्थ व शाळिग्राम यांचें 'इतिहासप्रसिद्ध पुरुषांचे व स्त्रियांचे पोवाडे' हें होय. हें १८९१ मध्यें प्रकाशित झालें. या पुस्तकाचे तीन भाग असून मराठे छत्रपति राजे याविषयीं १६ पोवाडे, दुसऱ्या भागात पेशव्यांविषयीं २३ पोवाडे व तिसऱ्या भागांत मराठे सरदारांविषयीं १९ पोवाडे आहेत. हे पोवाडे गोंधळी लोकांकडून गोळा करण्याचें सर्व श्रेय ॲक्वर्थ याच्याकडे जातें कारण त्यानेंच प्रथम १८८७ च्या एप्रिल महिन्यांत पोवाडे संग्रह करण्यासाठीं सर्व सरदारांकडे एक प्रसिद्धि-पत्रक पाठविलें.[७७] खुद्द ॲक्वर्थ यानें सिंहगडचा तानाजी

---

७५ अ. का. प्रियोळकर, रावबहादुर दादोबा पांडुरंग (आत्मचरित्र व चरित्र), पृ. ८० व पृ. ५१ ५२ व पृ. १८५.

७६ मुंबई मराठा ग्रंथसंग्रहालयांतील दोलामुद्रितें, पृ. १८ व २०. नाना फडणवीस यांची बखर हें पुस्तक सन १८५१ मध्यें अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई येथें इंग्रजांत छापलेलें महाराष्ट्र ग्रंथालय, पुणें येथें आहे. त्याचें नाव "*Memoir of the Life of the Late Nana Furnuwees*' असें आहे.

७७ हें प्रसिद्धिपत्रक या पुस्तकात दिलें आहे. पहा.—इतिहासप्रसिद्ध पुरुषांचे व स्त्रियांचे पोवाडे, मराठी प्रस्तावना. पृ. २.

मालुसऱ्याचा पोवाडा गोंधळ्याकडून मिळविण्यासाठीं काय खटपट केली, याची हकीकत स्वतःच प्रस्तावनेंत दिली आहे.[७८] या पुस्तकांत ॲक्वर्थ याचा भाग किती व त्याचें श्रेय त्याला किती द्यावें, याविषयीं खुलासा असलेला एक उतारा येथें देतों :

"Most of the ballads in this volume are new. But a few have been taken from Mr. Shaligram's collection published in 1879. There were many inaccuracies in the latter which have been corrected and the ballads collected with copies independently obtained by myself.[७९] "

यावरून मराठी वाङ्मयांत अशा प्रकारच्या वाङ्मयप्रकाराची भर घालून ॲक्वर्थ यानें मराठी वाङ्मयाची मोठीच सेवा केली आहे, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं.

## ६. अर्थशास्त्र

अर्थशास्त्रावर युरोपियनानें 'गांवची वही' हें एकच पुस्तक लिहिल्याचें दिसतें. याचा उल्लेख आढळतो तो असा :—

"Ganvachi Vahi, Mr. Blanc. Subject–Village Accounts Path-shala, Poona "[८०]

हें पुस्तक कोठेंच आढळत नाहीं, पण युरोपियनानें लिहिलेलें पुस्तक म्हणून त्याचा उल्लेख करण्यांत आला आहे.

## ७. वैद्यक विषयांवरील पुस्तकें

या काळांत औषधविद्येविषयीं व वैद्यकविषयावरील पुस्तकें युरोपियन लोकांनीं लिहिलेलीं आहेत तीं अशीं :—

### १. डॉ. थॉमस कोट्स् :

या विषयावरील अगदीं पहिलें पुस्तक म्हणजे डॉ. थॉमस कोट्स, यानें सन १८१२ मध्यें लिहिलेलें 'गाइच्या देवीची उत्पत्ति व गुण त्याचा तपसील' हें होय. याचें हस्तलिखित इंडिया ऑफिसमध्यें आहे.[८१] याची मायक्रोफिल्म मुंबई येथील मराठी संशोधनमंडळांत असून हें पुस्तक संशोधन पत्रिकेंत अलिकडे प्रसिद्ध करण्यांत आलें आहे. या पुस्तकाचें नांव व त्याची सुरुवात खालीलप्रमाणें देण्यांत आली आहे.

---

७८ *Ibid*, Introduction, pp. IX–X.

७९ *Ibid.*, Introduction, p. X.

८० Sir A. Grant, *Catalogue of the Native Publications in the Bombay Presidency*, p. 62.

८१ J. F. Blumhardt & S. G. Kanhere, *Catalogue of the Marathi Manuscripts in the India Office Library*, p. 10.

"नांवः— किताब गाइच्या देवीची उत्पत्ति व गुण त्याचा तपसील.

प्रथम अंगाच्या देवीच्या उपद्रवाची हकीकत.

सुरवात : "देवी सगळे पृथ्वीवर आहेत. सर्व रोगापेक्षां देवीचा रोग परम कठीण. मनुष्यें फार मरतात. कलम १ : इंग्रेजी मुलकांत कोणते रोगानें किती मनुष्यें मरतात याचे चौकसीची चाल आहे तेव्हां देवीचे रोगानें किती मनुष्यें मरतात याची चौकसी केली तो साहा मनुष्यांत एक मनुष्य लचीत मृत्य पावतें. कलम २."[८२]

या पुस्तकांत एकंदर ६१ कलमें आहेत. त्यांत देवीचा युरोपांतील इतिहास, मुंबई व पुण्यांत देवीची सुरवात, देवी टोचण्याची पद्धत व देवी टोचून घेण्यापासून फायदे व त्याविरुद्ध आक्षेपांना उत्तरें अशी सर्व माहिती आहे. अगदीं सुरवातीचें हस्तलिखित म्हणून याला महत्त्व आहे.

## २. सर्जन पीटर ब्रेटन

यानंतरचा दुसरा प्रयत्न १८२६ मधील आढळतो. हिंदुस्थानांतील वैद्यकीय खात्याच्या उपयोगासाठीं शरीराचे भाग व वैद्यकीय विषयांत येणारे शब्द यांचा एक शब्दकोश ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरींतील एक सर्जन व नेटिव्ह मेडिकल इन्स्टिटयूटचा सर्जन पीटर ब्रेटन यानें तयार केला होता. हा शब्दकोश इंग्लिश, अरबी, फारशी, हिंदी व संस्कृत या भाषांत होता. याचा एक खंड प्रसिद्ध झाल्याचें दिसतें. कारण एशियाटिक लियो प्रेसमध्यें छापलेल्या व प्रसिद्ध झालेल्या पुस्तकाच्या यादींत यासंबंधीं माहिती मिळते ती अशी :—

"A vocabulary of the Names of the various parts of the Human Body and of Medical and Technical Terms in English, Arabic, Persian, Hindee and Sanscrit for the use of the Members of the Medical department in India. By Peter Breton Vol I. Printed on fine Europe Printing Paper." [८३]

पुढें डॉ. मॅक्लेनान यानें जे वैद्यकीय ग्रंथ लिहिले, त्यांची पूर्वतयारी म्हणून या ग्रंथाकडे पहावें लागेल. वैद्यक विषयात देशी भाषांत ग्रंथ लिहिण्याचा युरोपियनाचा हा प्रयत्न म्हणून यास महत्त्व द्यावेंसें वाटतें. हा शब्दकोश उपलब्ध नाहीं.

## ३. डॉ. मॅक्लेनान

डॉ. मॅक्लेनान यानें मराठींत पांच पुस्तकें लिहून वैद्यकविषयक ग्रंथात चांगली भर घातली. हा बॉंबे एस्टॅब्लिशमेंटचा असिस्टंट सर्जन व नेटिव्ह मेडिकल स्कूलचा

८२ मायक्रोफिल्म पृ. १ व २ हें पुस्तक मराठी संशोधन पत्रिका (त्रैमासिक) यात छापण्यात आलें आहे. वर्ष ३ रें अंक ४ था. जुलै १९५६, पृ. ४१–४७.

८३ *G. D.*, *Vol.* 21/129. 1826, p. 216.

सुपरिंटेंडेंट होता. पुढें १८४४-४५ मध्यें जॉग्राफिकल सोसायटीचा हा रेसिडेंट मेंबर झाला. सन १८५० मध्यें युरोपहून परत आल्यावर बोर्ड ऑफ एज्युकेशनवर त्याची नेमणूक झाली.[८४] सन १८२८ मध्यें वैद्यकशास्त्रावरील याचा पहिला ग्रंथ प्रसिद्ध झाला. तेव्हांपासून २५-३० वर्षे हा येथेंच होता. कारण १८५२-५३ मधील याचीं औषधविषयक पुस्तकें उपलब्ध आहेत यानें लिहिलेलीं पुस्तकें पुढीलप्रमाणें आहेत:

(१) निदान-*Nosology*, गव्हर्मेंट लिथोग्राफिक प्रेस, मुंबई, सन १८२८, पृ. १४२+१.

हेंच पुस्तक ' रोगनिदान ' या नांवानें बॉबे एज्युकेशन सोसायटीच्या छापखान्यांत शिळाछापावर १८५२ मध्यें छापण्यांत आलें. याचीं १३७ पृष्ठें आहेत. हीं दोन्ही पुस्तकें मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहेत. या पुस्तकाचें स्वरूप समजण्यासाठीं, यांतील मधेचा नमुना पुढें देण्यांत येत आहे :—

" १. आंतील त्वचेचा उग्र दाह. लहान आंतड्यांत दुःख होतें. त्या दुःखावरावर फार करून त्यांत आव जळतें व त्याचे बाह्य प्रदेशीं उष्ण स्पर्श होतो. जिव्हेचें अग्र व कांठ आरक्त होत नाहींत अथवा अग्रापासून मूळापर्यंत मध्यदेश आरक्त होतो उद्यासा होतो अथवा वमन होतें. हीं प्रारंभकाळीं झालीं नष्टतां मग होतात. नाडी त्वरित गति नम्र दम्य होत्ये. श्वासोश्वास त्वरित होतात. पोट हलकें होतें. मळ आमयुक्त पडतो. "[८५]

(२) औषध कल्पनाविधि, मुंबई सरकारी शिळा छापखाना, सन १८३८, पृ. ३७०.[८६]

या पुस्तकाचे एकूण तीन भाग आहेत ते असे : (१) औषधकल्पनाविधि, (२) धातु औषधोत्पत्ति, व (३) वनस्पति औषधोत्पत्ति. या तीन विषयांचें विवरण यांत केलें आहे.

या पुस्तकाची माहिती देण्यांत आली आहे ती अशी :— " रोगपरिहारार्थ वैद्यविद्येचे दोन प्रकार आहेत. एका प्रकारामध्यें रोगांचे भेद प्रकार लक्षणें कारणें व उपचार सविस्तर लिहिले आहेत आणि त्यांचे सर्व लक्षणाचे परिहारक पदार्थही

---

८४ *A Report of the Board of Education*, January 1850 to April 1851, No. IX, p. I.

८५ डॉ. जॉन मॅकेन्नान, निदान ( १ ली आवृत्ति ) १८२८, पृ. २०-२१.

८६ Sir A. Grant, *Catalogue of the Native Publications Bombay Presidency.* यामध्यें या पुस्तकाचें नाव 'औषधिकल्पनाविधि' असें देण्यात आलें असून त्याचा प्रसिद्धिकाल १८५५ हा दिला आहे. पहा—पृ. १००. पण या दोन्ही गोष्टी बरोबर नसाव्या.

लिहिले आहेत व अमुक लक्षणावर अमुक औषध द्यावें आणि देणें तें जेणेंकरून कांहीं वाईट गुण आणि अपरिमित गुण न होतील असें चौकशीनें द्यावें हेंही लिहिलें आहे. सांप्रत द्वितीय प्रकारामध्यें औषधांची उत्पत्ति व त्यांचें रूप आकार उत्पत्तिस्थान आणि शरीरावर परिणाम कसे होतात व जाहल्यानंतर रोगाचे कंचे लक्षणावर गुण करतात व कंचे कंचा रोगाचे कामाचे आहेत इत्यादिक सांगतो. या द्वितीय प्रकाराला इंग्रेजी भाषेत मटिर्यामेदिका आणि संस्कृतामध्यें औषधकल्पनाविधि म्हणतात." (पृ. १)

(३) शारीर—Anatomy, बॉंबे एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, शिळाछाप, सन १८५२, पृ. १४०+२७.

या पुस्तकावर 'अस्थिवर्णन व शरीराचें वर्णन करत्येवेळेस मनुष्याची रचना कशी मनांत आणिली पाहिजे या विषई" असें शीर्षक देण्यांत आलें आहे. यावरून या पुस्तकांत कोणत्या विषयाचें विवेचन करण्यांत आलें असेल हें वाचकांस समजून येईल. स्पष्टीकरणासाठीं यांत कांहीं आकृतीहि दिल्या आहेत.

(४) विषविद्या, बॉंबे एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, शिळाछाप, सन १८५२, पृ. ४+१४२+२.

विषाचे वेगवेगळे प्रकार देऊन त्यावर उपाययोजना सांगितली आहे. देशी व पाश्चात्य औषधांचे गुणधर्म यांत लेखकानें दिले आहेत.

(५) आघातादिजन्य अस्थिविकार, बॉंबे एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, शिळाछाप, सन १८५३, पृ १२६.

अपघातांनीं हाडें व सांधे यांना जी इजा पोहोचते, त्यांचें आकृतीच्या साहाय्यानें स्पष्टीकरण करून तीवरचे उपचार या पुस्तकात दिले आहेत.

डॉ. मॅक्लेनान याचीं हीं सर्व पुस्तकें मुंबई ग्रंथसंग्रहालयात आहेत. यावरून १८२८ मध्यें दोन, १८५२ मध्यें दोन व १८५३ मध्यें एक अशीं पांच पुस्तकें प्रसिद्ध झाल्याचें दिसतें; परंतु Anatomy हें पुस्तक १८२९ पूर्वींचें असावें, असें न्या. रानडे यांनीं एके ठिकाणीं लिहिलें आहे,[८७] तें चुकीचें दिसतें. कारण याच *पुस्तकांत न्या. रानडे दुसऱ्या ठिकाणीं म्हणतात,*

"Ten works appear from the catalogue to have been published during the next ten years between 1827 and 1837; two of them being medical works by Dr. Mac Lennan on Materia Medica and Nosology."[८८]

---

८७ *Miscellaneous Writings of the Late Hon'ble Mr. Justice M.G. Ranade*, p. 7.

८८ *Ibid.*, p. 13.

डॉ. मॅक्लेनान याच्या १८२८ मधील व १८५२-५३ मधील पांच मराठी पुस्तकांची माहिती वर दिल्याप्रमाणें मिळते. या कालांत डॉ. मॅक्लेनान याचीं तेवढीं वैद्यकीय पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं दिसतात.

### ४. डॉ. कॉस्टेलो

या कालांत वैद्यक विषयावर आणखी एक पुस्तक लिहिण्याचा प्रयत्न झालेला दिसतो, त्याचा उल्लेख करणें उचित होईल. हा प्रयत्न डॉ. कॉस्टेलो याचा होय. यानें 'मिडवाइफरी' या विषयावर एक पुस्तक लिहून सरकारनें त्या पुस्तकाला मान्यता द्यावी म्हणून D. P. I. यांना एक पत्र लिहिल्याचें नमूद आहे. तें पत्र असें :—

"A compilation of midwifery in Murahtta should be useful to the Native in general hospital assistants. I have therefore commenced to draw up a manual chiefly from the works of Bonseth and ... taking the liberty to forward for Government approval."[८९]

या पुस्तकाला सरकारी आश्रय मिळाला नाहीं. त्यामुळें हें पुस्तक प्रसिद्ध झालें नाहीं, असें दिसतें. तरी वैद्यकविषयावरील ग्रंथ लिहिणाऱ्या दुसऱ्या युरोपियन गृहस्थाबरोबर हा प्रयत्न नमूद करावा म्हणून याचा उल्लेख येथें केला आहे.

### ८. कायदेविषयक पुस्तकें

कायदेविषयक कांहीं पुस्तकें युरोपियन लोकांकडून मराठींत भाषांतरित झालीं आहेत तीं अशीं :—

### १. रॉबर्ट ड्रमंड

आरंभींचें मराठींत भाषांतरित झालेलें कायद्याचें पुस्तक रॉबर्ट ड्रमंडनें केलें असावें. यासंबंधीं उल्लेख मिळतो तो असा :—

"Regulations and Laws passed by the Governor in Council, 1799 to 1807 translated into Mahrata by R. Drummond."[९०]

हें पुस्तक मात्र कोठेंच मिळत नाहीं.

### २. जे. स्पायर्स

यानेंहि कायद्याचें एक पुस्तक मराठींत भाषांतर केल्याचा निर्देश सांपडतो. तो खालीलप्रमाणें :—

८९ *D. P. I., Board of Education Miscellaneous*, 1851, p. 80.

९० *Catalogue of the Library of the Hon. East India Company*, p. 193.

"Police Kayade, J. Spiers, (translated). Subject: Police regulations. Dnyanprakas, Poona 1855, p. 56." [११]

### ३. मेजर जी. इ. थॉमस :

याचें पुस्तक पुढीलप्रमाणें आहे :—

"Brief summary of the Penal Code, Major G. E. Thomas, Superintendent of the Police. Sub: Summary of the Act. Samachar, Belgaum 1864, p. 157." [१२]

या पुस्तकाप्रमाणेंच कँडीनेंहि कायदेविषयक कांहीं पुस्तकांचीं भाषांतरें केलेलीं आहेत. त्यांची माहिती कँडीच्या प्रकरणांत दिलेली आहे. हीं पुस्तकें मात्र कोठेंच मिळत नाहींत.

### ९. शिल्पशास्त्रावरील पुस्तकें

या कालांत शिल्पशास्त्रावरहि एक पुस्तक झालें आहे. तें असें :—

**(१) विल्यम हेन्री बेल : शिल्पविद्या या विषयाचे निबंध, मुंबई १८३५, पृ. ३०४.**

हें पुस्तक विल्यम हेन्री बेल यानें नारायणशास्त्री चौलकर याच्या साहाय्यानें लिहिलें आहे.

या पुस्तकांत तीन निबंध आहेत. ते म्हणजे शिल्पसाधनें किंवा आदिचालकें याविषयीं यंत्राच्या बीजांविषयीं घर्षण आणि दोरीची अनम्रता, अशीं त्या निबंधांचीं नांवें आहेत. हें पुस्तक मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहे.[१३]

**(२) लॉर्ड नेपियर :**

शिल्पविद्येवर मद्रास येथें लॉर्ड नेपियर यानें एक व्याख्यान दिलें होतें. त्याचें मराठी भाषांतर डब्ल्यू. एच्. हॅवलॉक यानें केल्याचा उल्लेख इंडिया ऑफिस लायब्ररीच्या कॅटलॉगमध्यें आहे. तो असा :—

"Lecture on Architecture in India, delivered at Madras by His Excellency Lord Napier, Poona 1871. Translated into Marathi by W. H. Havelock, pp. 6, 31." [१४]

---

११ Sir A. Grant, *Catalogue of the Native Publications in the Bombay Presidency*, p. 92.

१२ *Ibid.*, p 50.

१३ मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांतील दोलामुद्रितें, पृ. ६.

१४ J. F. Blumhardt., *Catalogue of the Library of the India Office*, Vol. II Part V, p. 2.

